महामुनि आदिकवि श्रीवाल्मीकिप्रणीत

# श्रीरामायण महाकाव्य

[ चतुर्थ भाग ]

( ४ )

## अरण्य-काण्ड

( मराठी अनुवाद व उपसंहार यांसहित

संपादक

पं. श्रीपाद दामोदर सातवळेकर,

साहित्य-वाचस्पति, गीतालंकार, अध्यक्ष स्वाध्याय-मण्डल

'आनन्दाश्रम' किल्ला-पारडी, (जि. सूरत)

प्रथम आवृत्ति

संवत २००७, शके १८७२, सन १९५०

मूल्य ४ रु०

# अरण्यकाण्डाचें प्रकाशन



स्वाध्याय-मण्डल व त्याचें मुद्रणालय औंध ( जि. सातारा ) येथून किल्ला-पारडी ( जि. सूरत ) येथें आणावें लागलें. या स्थानपरिवर्तनासाठीं वर्ष-सवा वर्षाचा अवधि गेला. यामुळें औंधामध्यें हा अर्धा अधिक भाग छापून झाला असताही याच्या प्रकाशनाला इतका वेळ लागला. याची क्षमा वाचक करतील अशी आशा आहे. कारण हा कालातिक्रम अपरिहार्य कारणामुळें झालेला आहे. आता या पुढचे भाग लवकरच प्रकाशित होतील.

किल्ला-पारडी ( जि. सूरत ) —प्रकाशक.

१ आषाढ संवत् २००७

श्री वाल्मीकि रामायणाच्या

# अरण्यकाण्डाची विषयसूची



**सर्ग ५, पृ. १७-२३**

श्रीराम शरभंग ऋषिच्या आश्रमात जातो. तेथें देवसम्राट् इन्द्र आलेला असतो इन्द्राचा थाट ( १-१९ ) इन्द्र रामाला न भेटताच निघून जातो व योग्य वेळीं भेटू असें म्हणतो ( २०-२४ ) शरभंग रामाला सुतीक्ष्णमुनींना भेटावयास सांगतात व स्वत देहत्याग करून ब्रह्मलोकीं जातात ( २५-४२ ).

**सर्ग ६, पृ २४-२७**

सर्व ऋषिमुनि रामाला म्हणाले ' जो राजा प्रजेचें रक्षण करीत नाहीं त्याला पाप लागतें ( १-१४ ) या आश्रमामध्यें राक्षस आम्हा ऋषिमुनींचा नाश करीत आहेत मेलेल्या ऋषींचे हे सांगाडे पहा व आमचें रक्षण कर ' ( १५-२० ). राम राक्षसांपासून ऋषींचें संरक्षण करण्याची प्रतिज्ञा करतो ( २१-२६ )

**सर्ग ७, पृ २८-३१**

राम सुतीक्ष्णमुनीच्या आश्रमाजवळ गेला हरिणास आपल्या धनुष्यबाणापासून त्रास होऊ नये अशी दक्षता राम घेतो राम सायंसंध्या करतो व नतर सायंकाळचें भोजन करतो ( १-२४ )

**सर्ग ८ पृ ३१-३४**

सुतीक्ष्णमुनींच्या आश्रमात रामानें एक रात्र काढली सकाळीं उठून त्यानें स्नान केलें व सूर्याचा ताप अधिक होण्यापूर्वीच पुढें चालण्यास प्रारंभ केला (१ २०)

**सर्ग ९, पृ. ३४-३९**

सीतेचें मत- ' राक्षसांचा वध करणें योग्य नाहीं सर्वच राक्षस काहीं दुष्ट नसतात मिथ्या भाषण करूं नये. परस्त्रीसेवन करू नये व वैरावाचून क्रौर्य करू नये तेव्हा राम या वनामध्यें जो राक्षसाचा वध करीत आहे तें पाप होत आहे ( १-१८ ) शस्त्र बाळगल्यामुळेंच एका ऋषीचा अध पात झाल्याची कथा ( १९-२९ ) यासाठीं रामलक्ष्मणानीं धनुष्यबाण टाकून तप करावें ( ३०-३३ )

**सर्ग १०, पृ ४०-४३**

रामानें सीतेला सांगितलें कीं- ' ऋषिंचा वध राक्षस करीत आहेत अमुक

राक्षस बरा व दुसरा वाईट असा भेद करणें शक्य नाहीं. मी ऋषींचें संरक्षण करण्याची प्रतिज्ञा केली आहे तेव्हा राक्षसाचा वध करणें योग्यच आहे (१–२२).

## सर्ग ११, पृ. ४३-५७

राम तपोवनाचें दर्शन करतो (१–५). तपोवन, सरोवर व अप्सरा (६–१५) रामाचें दहा वर्षे वनात वास्तव्य झालें (१५-३४). अगस्त्य मुनीच्या आश्रमाचें वर्णन (३५–५५). आतापी व वातापींचा नाश. अगस्ती मुनींच्या प्रतापानें दक्षिण दिशा निर्भय झाली (५६–९५)

## सर्ग १२ पृ. ५७-६२

अगस्त्य मुनीच्या आश्रमांत राम पोंचतो (१–९) अगस्त्य रामाचा सत्कार करतात (१०–२३) अतिथिसत्कार न करणारा व खोटी साक्ष देणारा परलोकीं आपलेंच मास खातो (२४–३०) अगस्ति रामाला शस्त्रें देतात (३१–३७)

## सर्ग १३, पृ. ६२-६६

अगस्तीची सूचना, रामानें पंचवटींत रहावें (१–२५)

## सर्ग १४, पृ. ६७-७१

रामाची जटायूशीं भेट जटायूचा वृत्तात कश्यपाची संतति (१–३४) राम जटायुसह पंचवटीकडे गेला (३५–३६)

## सर्ग १५, पृ. ७२-७६

पंचवटींत राहण्याचें रामाचें स्थान (१–१२). लक्ष्मण पर्णशाला बनवतो व राम वास्तुशान्ति करून तींत राहतो (१३–३१)

## सर्ग १६, पृ. ७६-८३

नवान्न भक्षण करण्याचे दिवस आले. विजयेच्छु राजे या वेळीं ससैन्य बाहेर पडतात (१–७). शीतवर्णन साळीचीं शेतें सुवर्णासारखीं दिसत आहेत (८-२०). भरत भूमीवर निजतो व थंड पाण्याचें प्रत स्नान करतो (२१-४३).

**सर्ग १७, पृ. ८३–८७**

राम प्रातःकाळीं शीतजलस्नान करतो. शूर्पणखा येते. तिचा रामाशीं संवाद-शूर्पणखा स्वकीय वृत्त सांगते ( १–२८ ).

**सर्ग १८, पृ. ८७–९१**

शूर्पणखा काममोहित होते. तिला राम लक्ष्मणाकडे पाठवतो. लक्ष्मण म्हणतो कीं 'मी दास आहे, माझी पत्नी होण्यानें तूं दासी होशील' (१–१२). शूर्पणखेचे नाक कान कापले ( १३–२६ )

**सर्ग १९, पृ. ९१–९५**

विरूप होऊन शूर्पणखा खराजवळ जाते. खर राक्षस रागानें लाल होतो ( १-२६ )

**सर्ग २०, पृ. ९६-९९**

राक्षसाशीं युद्ध व त्याचा संहार ( १-२४ ).

**सर्ग २१, पृ. ९९-१०२**

शूर्पणखेचा आक्रोश ( १-२२ ).

**सर्ग २२, पृ. १०३--१०६**

खर १४ हजार राक्षसासह रामावर चाल करून जातो ( १-२४ ).

**सर्ग २३-,२४ पृ १०६--११६**

खराला अशुभ चिन्हें दिसतात राम लक्ष्मणासह सीतेला गुहेंत सुरक्षितपणें ठेवतो.

**सर्ग २५ ३०, पृ ११७–१४७**

रामानें १४ हजार राक्षसाचा संहार केला. इन्द्रानें अगस्त्यमुनीजवळ दिलेले धनुष्यबाण वापरले. ऋषींचें कार्य झालें. ऋषिमुनींनीं रामाची प्रशंसा केली.

**सर्ग ३१, पृ. १४७ -१५५**

अकंपन राक्षसानें १४ हजार राक्षसाचा वध झाल्याचा वृत्तांत रावणाला सांगितला. रावण आश्चर्यचकित झाला. अकंपनानें सांगितलें कीं राम अवध्य आहे

म्हणून त्याची पत्नी सीता, हिचें हरण कर ( १–२७ ). मारीचाच्या उपदेशानें रावण परत फिरतो ( २८-५० ).

### सर्ग ३२, पृ. १५५-१५८

शूर्पणखा रावणाजवळ जाते व त्याला सर्व वृत्त सांगते रावणाचा वाडा ७ मजली. रावणाच्या शरीरावर शस्त्रांचे घाव. धर्माचा उच्छेद व स्त्रियांचें हरण करणारा रावण ( १--२५ )

### सर्ग ३३, पृ. १५९-१६३

राजनीतिचा उपदेश शूर्पणखा रावणाला करते ( १--२४ )

### सर्ग ३४ पृ. १६३--१६७

शूर्पणखेला रावण रामासंबधींची माहिती विचारतो ती त्यास रामाच्या पराक्रमाचें वर्णन करून सांगते ( १–२६ )

### सर्ग ३५, पृ. १६७–१७३

रावण सीताहरण करण्यासाठीं निघतो व मारीचाजवळ येतो ( १-४२ ).

### सर्ग ३६, पृ. १७३-१७६

*मारीचानें सुवर्णमृग व्हावें व रामाला आकर्षण करून दूर न्यावें अशी योजना रावणानें मारीचाला सांगितली ( १–२४ )*

### सर्ग ३७, पृ १७७–१८०

मारीच रामाच्या प्रतापाचें वर्णन करून रावणास या पापकृत्यापासून निवृत्त करण्याचा यत्न करतो ( १–२५ ).

### सर्ग ३८, पृ. १८१–१८६

विश्वामित्र ऋषींच्या यज्ञाचें रक्षण करतांना बालक रामानें केलेल्या पराक्रमाचें वर्णन मारीच रावणास सांगून या पापकृत्यापासून निवृत्त होण्याची इच्छा करतो. ( १–३३ ).

## सर्ग ४६, पृ. २११-२२६

सीतेचें कठोर भाषण लक्ष्मणास सहन झालें नाहीं. निरुपायानें तो रामाजवळ गेला ( १-८ ). हें पाहून रावण संन्याशाच्या वेषानें रामाच्या आश्रमात आला रावण सीतेच्या सौंदर्याचें वर्णन करतो ( ९-३२ ) सीतेनें रावणाला संन्यासी समजून त्याचा सत्कार केला ( ३३-३८ ).

## सर्ग ४७, पृ. २२७-२३४

सीता आपला वृत्तान्त रावणाला सागते तो ऐकल्यावर रावण तिला सागतो कीं येथें वनात असे कष्ट भोगण्यापेक्षा माझ्यावर प्रेम कर म्हणजे तुझ्या सेवे-साठीं ५००० दासी नेहेमीं राहतील या रावणाचा सीतेनें धिक्कार केला ( १-५० ).

## सर्ग ४८, पृ २३४-२३८

रावण पुन आपला प्रताप वर्णन करून सागतो व आपणास वश हो असें सागतो व तें ऐकून सीता पुनः धिक्कार करते ( १-३४ )

## सर्ग ४९, पृ. २३८-२४४

रावणानें सीतेला उचलली व तो तिला घेऊन जाऊ लागला तेव्हा सीता लक्ष्मणाचा धावा करते सीतेचा शोक ऐकून जटायु तिच्या सहाय्यासाठीं येतो ( १-४० ).

## सर्ग ५०, पृ. २४४-२४८

जटायूचें रावणाला आह्वान ( १-२९ ).

## सर्ग ५१, पृ. २४८-२५५

जटायूचें रावणाशीं युद्ध जटायूनें रावणाचा सारथी मारला, रथ तोडला, घोडे ठार केले पण शेवटीं रावणानें जटायूचा वध केला. त्याला पाहून सीता शोक करते ( १-४६ ).

**सर्ग ५२, पृ. २५५-२६२**

सीतेचा विलाप. रावणानें सीतेला उचलून नेण्यास प्रारंभ केला. ब्रह्मदेव व ऋषी म्हणाले ' आपलें कार्य झालें ' ( १-४४ )

**सर्ग ५३, पृ. २६३-२६७**

सीतेनें केलेलें रावणाला झोंबणारें निषेधात्मक भाषण ( १-२७ ).

**सर्ग ५४, पृ. २६७-२७१**

सीता आपली भूषणें वानरांजवळ फेंकते ( १-५ ) सीतेला घेऊन रावण लंका नगरीमध्यें पोंचला व त्यानें सीतेला तेथें सुरक्षित ठेवली व रामाला मारण्यासाठीं पंचवटीकडे राक्षस पाठवले ( ६-३० ).

**सर्ग ५५, पृ. २७२-२७७**

रावण आपलें वैभव सीतेला दाखवतो व वश हो असें म्हणतो व असें करणें वेदप्रतिपादितच आहे असें सांगतो ( १-३७ ).

**सर्ग ५६, पृ. २७८-२८३**

सीता रामाची प्रशंसा करते व रावणाचा निषेध करते ( १-३६ ).

**सर्ग ५७, पृ २८३-२८७**

इन्द्र गुप्तपणानें हविष्यान्न आणून तें सीतेला देतो तो देवराजा आहे अशी खात्री पटल्यावर ती तें अन्न स्वीकारते ( १-२६ ).

**सर्ग ५८, पृ. २८७-२९१**

राम सुवर्णमृगाचा वध करून परत येत असता अशुभ चिन्हें दिसतात. लक्ष्मण भेटतो त्यास राम म्हणतो कीं सीतेला एकटी सोडून आलास हें अगदीं वाईट काम केलेंस ( १-२४ )

**सर्ग ५९, पृ. २९१-२९४**

राम आश्रमात परत आल्यावर तेथें त्याला सीता दिसत नाहीं ( १-२० ).

## अरण्यकाण्ड समाप्त





श्रीमहामुनि-वाल्मीकि-प्रणीतं

# श्री रा मा य ण म्

## अरण्यकाण्डम् ।

प्रथमः सर्ग ।

प्रविश्य तु महारण्यं दण्डकारण्यमात्मवान् ।
रामो ददर्श दुर्धर्षस्तापसाश्रममण्डलम् १
कुशचीरपरिक्षिप्तं ब्राह्मया लक्ष्म्या समावृतम् ।
यथा प्रदीप्तं दुर्दर्शं गगने सूर्यमण्डलम् २
शरण्यं सर्वभूतानां सुसंमृष्टाजिरं सदा ।
मृगैर्बहुभिराकीर्णं पक्षिसघैः समावृतम् ३
पूजितं चोपनृत्तं च नित्यमप्सरसां गणैः ४
विशालैरग्निशरणैः स्रुग्भाण्डैरजिनैः कुशैः ।
समिद्भिस्तोयकलशैः फलमूलैश्च शोभितम् ५

दंडकारण्य नांवाच्या महावनामध्यें प्रविष्ट झाल्यावर शत्रूंनीं वर मान करून पाहण्यासही अशक्य अशा जितेंद्रिय रामानें तपस्वी लोकांचा आश्रमसमुदाय पाहिला कुश आणि वल्कलें ह्यांनीं तो आश्रमसमूह सर्वत्र व्याप्त असून वेदाभ्यासाच्या तेजानें युक्त असल्यामुळें आकाशामध्यें असलेल्या सूर्यमंडलाप्रमाणें तो दैदीप्यमान आणि म्हणूनच राक्षसादिकांनीं अवलोकन करण्यास अशक्य झालेला होता सर्व प्राण्यांचें तो आश्रयस्थान होता त्यातील आगणें चांगलीं झाडलेलीं होतीं, अनेक प्रकारच्या मृगांनीं तो गजबजलेला होता, पक्ष्यांच्या समुदायांनीं तो व्यापलेला होता आणि अप्सरांचे गण जवळच नृत्य करून त्याला मान देत होते. मोठ्या होमशाला, स्रुक्प्रभृति यज्ञपात्रें, अजिनें, दर्भ, समिधा, पाण्यानें भरलेल्या घागरी, फळें व कंद-मुळें ह्यांनीं त्याला शोभा आलेली होती. (१-५)

आरण्यैश्च महावृक्षैः पुण्यैः स्वादुफलैर्वृतम्।
बलिहोमार्चितं पुण्यं ब्रह्मघोषनिनादितम् ६
पुष्पैश्चान्यैः परिक्षिप्तं पद्मिन्या च सपद्मया।
फलमूलाशनैर्दान्तैश्चीरकृष्णाजिनाम्बरैः ७
सूर्यवैश्वानराभैश्च पुराणैर्मुनिभिर्युतम्।
पुण्यैश्च नियताहारैः शोभितं परमर्षिभिः ८
तद्ब्रह्मभवनप्रख्यं ब्रह्मघोषनिनादितम्।
ब्रह्मविद्भिर्महाभागैर्ब्राह्मणैरुपशोभितम् ९
तद् दृष्ट्वा राघवः श्रीमांस्तापसाश्रममण्डलम्।
अभ्यगच्छन्महातेजा विज्यं कृत्वा महद्धनुः १०
दिव्यज्ञानोपपन्नास्ते रामं दृष्ट्वा महर्षयः।
अभिजग्मुस्तदा प्रीता वैदेहीं च यशस्विनीम् ११
ते तु सोममिवोद्यन्तं दृष्ट्वा वै धर्मचारिणम्।
लक्ष्मणं चैव दृष्ट्वा तु वैदेहीं च यशस्विनीम् १२
मङ्गलानि प्रयुञ्जानाः प्रत्यगृह्णन्दृढव्रताः।

गोड फळें येणाऱ्या अरण्यातील मोठमोठ्या पवित्र वृक्षांनीं तो व्यापलेला होता वैश्वदेव, होम आणि बलिहरण यानीं तो पवित्र झालेला होता आणि वेदघोषानें तो पवित्र आश्रम दुमदुमलेला होता. कमलयुक्त सरोवर आणि इतर फुलें ह्यांनीं तो भरलेला असून वल्कलें व कृष्णाजिनें धारण करून फलमूलावर जीवन कंठणाऱ्या आणि सूर्य व अग्नि याचेप्रमाणें तेजस्वी अशा जितेंद्रिय व पुरातन मुनींनीं तो युक्त असून नियमित आहार करणाऱ्या पुण्यवान् महर्षींनीं तो शोभित झाला होता वेदघोषानें निनादित, वेदवेत्त्या महाभाग्यवान् ब्राम्हणानीं सुशोभित आणि ब्रह्मलोकसमान असा तो तपस्वी मुनींचा आश्रमसमूह पाहिल्यावर महातेजस्वी राम आपल्या धनुष्याची दोरी उतरून जवळ गेला (६-१०)

तेव्हा ते दिव्यज्ञानयुक्त महर्षि, राम आणि यशस्विनी सीता याना पाहताच सुप्रसन्न होऊन सामोरे आले उदय पावलेल्या चद्राप्रमाणें धर्मनिष्ठ राम, लक्ष्मण आणि यशस्विनी सीता ह्याना अवलोकन करून, स्वीकृत मत दृढ निश्चयानें

रूपसंहननं लक्ष्मीं सौकुमार्यं सुवेषताम् १३
ददृशुर्विस्मिताकारा रामस्य वनवासिनः ।
वैदेहीं लक्ष्मणं रामं नेत्रैरनिमिषैरिव १४
आश्चर्यभूतान्ददृशुः सर्वे ते वनवासिनः ।
अत्रैनं हि महाभागाः सर्वभूतहिते रताः १५
अतिथिं पर्णशालायां राघवं संन्यवेशयन् ।
ततो रामस्य सत्कृत्य विधिना पावकोपमाः १६
आजह्रुस्ते महाभागाः सलिलं धर्मचारिणः ।
मङ्गलानि प्रयुञ्जाना मुदा परमया युताः १७
मूलं पुष्पं फलं सर्वमाश्रमं च महात्मनः ।
निवेदयित्वा धर्मज्ञास्ते तु प्राञ्जलयोऽब्रुवन् १८
धर्मपालो जनस्यास्य शरण्यश्च महायशाः ।
पूजनीयश्च मान्यश्च राजा दण्डधरो गुरुः १९
इन्द्रस्यैव चतुर्भागः प्रजा रक्षति राघव ।

---

चालविणाऱ्या महर्षींनीं आशीर्वाद देऊन अर्घ्य-पाद्य-आसन व फलमूलादिकांनीं सत्कार करून त्यांचें स्वागत केलें रामाचा बांधा, तेज, सुकुमारपणा आणि उज्ज्वल वेष पाहून त्या वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या महर्षींच्या मनाला आश्चर्य वाटलें डोळ्याच्या पापण्याही न हलविता सीता, लक्ष्मण आणि राम या आश्चर्य वाटावयास लावणाऱ्या तिघांना ते सर्व वनवासी पाहूं लागले. (११–१५)

नंतर ह्या आश्रममंडलामध्यें महाभाग्यवान् आणि सर्व प्राण्यांच्या कल्याणाविषयीं तत्पर असलेल्या त्या महर्षींनीं अतिथि रामाला पर्णकुटिकेंत उतरविलें. नंतर रामाचा यथाशास्त्र सत्कार करून त्या अग्निप्रमाणें तेजस्वी, महाभाग्यवान् व धर्मनिष्ठ महर्षींनीं रामाच्या पूजेकरिता पाणी वगैरे आणलें. नंतर मोठे आनंदी होऊन व आशीर्वाद देऊन त्या धर्मवेत्त्या महर्षींनीं, महात्म्या रामाला कंद-मुळें, पुष्पें व फळें अर्पण केलीं आणि " सर्व आश्रम तुझाच आहे " असें सांगून व हात जोडून ते त्याला म्हणाले, " हे महायशस्वी रामा ! तूं या ऋषींचा धर्मपालक व रक्षक असल्यानें पूज्य व मान्य आहेस. कारण, तूं राजा व दुष्टांचें दमन करणारा

राजा तस्माद्वरान्भोगान्रम्यान्भुङ्क्ते नमस्कृतः २०
ते वयं भवता रक्ष्या भवद्विषयवासिनः ।
नगरस्थो वनस्थो वा त्वं नो राजा जनेश्वरः २१
न्यस्तदण्डा वयं राजञ्जितक्रोधा जितेन्द्रियाः ।
रक्षणीयास्त्वया शश्वद्गर्भभूतास्तपोधनाः २२
एवमुक्त्वा फलैर्मूलैः पुष्पैरन्यैश्च राघवम् ।
वन्यैश्च विविधाहारैः सलक्ष्मणमपूजयन् २३
तथाऽन्ये तापसाः सिद्धा रामं वैश्वानरोपमाः ।
न्यायवृत्ता यथान्यायं तर्पयामासुरीश्वरम् २४

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥ [२४]

द्वितीयः सर्गः ।

कृतातिथ्योऽथ रामस्तु सूर्यस्योदयनं प्रति ।
आमन्त्र्य स मुनीन्सर्वान्वनमेवान्वगाहत १
नानामृगगणाकीर्णमृक्षशार्दूलसेवितम्

---

असून श्रेष्ठ आहेस. हे राघवा ! प्रजारक्षक राजा विष्णूचाच चतुर्थांश असतो आणि म्हणूनच सर्व लोक त्याला नमस्कार करीत असतात व श्रेष्ठ, रम्य अशा उपभोग्य वस्तूंचा तो उपभोग घेतो. (१५–२०)

"याकरिता तुझ्या देशात राहणाऱ्या आमचें रक्षण करणें तुझें कर्तव्य आहे. तूं नगरात असलास किंवा वनात असलास तरी तूंच लोकांचा व आमचा राजा आहेस हे राजा ! आम्ही क्रोधसंयम व इंद्रियदमन करून प्राण्यांचा निग्रह करण्याचें सोडलें आहे. म्हणून आई ज्याप्रमाणें 'गर्भाचें रक्षण करते, त्याप्रमाणें आमचें रक्षण करणें तुला अवश्य आहे." असें सांगून फळें, कंद-मुळें, पुष्पें व इतर वनातले भक्ष्य पदार्थ यानीं त्या महर्षींनीं लक्ष्मणासह रामाचें पूजन केलें व त्याचप्रमाणें न्यायी, अग्नितुल्य तेजस्वी, सिद्ध व तपस्वी इतरही मुनींनीं त्या ईश्वररूपी रामाला योग्य रीतीनें संतुष्ट केलें (२१-२४)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

याप्रमाणें आदरातिथ्य झालेल्या रामानें सूर्योदयीं त्या सर्व मुनींचा निरोप

ध्वस्तवृक्षलतागुल्मं दुर्दर्शसलिलाशयम् २
निष्कूजमानशकुनि झिल्लिकागणनादितम्।
लक्ष्मणानुचरो रामो वनमध्यं ददर्श ह ३
सीतया सह काकुत्स्थस्तस्मिन्घोरमृगायुते।
ददर्श गिरिशृङ्गाभं पुरुषादं महास्वनम् ४
गभीराक्षं महावक्त्रं विकटं विकटोदरम्।
बीभत्सं विषमं दीर्घं विकृतं घोरदर्शनम् ५
वसानं चर्म वैयाघ्रं वसार्द्रं रुधिरोक्षितम्।
त्रासनं सर्वभूतानां व्यादितास्यमिवान्तकम् ६
त्रीन्सिंहांश्चतुरो व्याघ्रान्द्वौ वृकौ पृषतान्दश।
सविषाणं वसादिग्धं गजस्य च शिरो महत् ७
अवसज्यायसे शूले विनदन्तं महास्वनम्।
स रामं लक्ष्मणं चैव सीतां दृष्ट्वा च मैथिलीम् ८

घेऊन वनात प्रवेश केला त्या वनात नानाप्रकारचे मृगसमुदाय, अस्वलें व वाघ रहात होते. त्यातील झाडें, वेली आणि झुडपें याचा नाश झाला होता व त्यातील पाण्याचें स्थान कोठें आहे, हें दिसेनासें झालें होतें. त्यातील पक्षी शब्द करीत नव्हते व फक्त चिलटाची मात्र गुणगुण तेथें चालला होती असें तें वन लक्ष्मणा सह असलेल्या रामानें पाहिलें. श्वापदानीं युक्त अशा त्या वनामध्यें सीतेसह रामानें पर्वतशिखरासारखा एक प्रचंड, गर्जना करीत असलेला राक्षस पाहिला. मोठ्या विहिरीसारखे खोल डोळे, मोठें तोंड व पोट आणि भयंकर चेहरा ह्यानीं युक्त, विशाल, बीभत्स, ओबडधोबड, कुरूप, लाबलचक, व्याघ्रचर्म धारण केलेला, वसेनें ( मासामध्यें असलेला स्निग्ध पदार्थ ) सर्वांग माखलेला व रक्तानें न्हालेला, आ पसरलेला, सर्व प्राण्याना त्रास देणारा आणि सर्वांचा घात करणारा असा तो राक्षस होता. (१-६)

त्या वेळीं तीन सिंह, चार वाघ, दोन लाडगे, पृषत् नामक दहा मृग आणि वसेनें माखलेलें व पुढल्या दातासकट असलेलें एक गजाचें मोठें मस्तक, इतकें साहित्य खाण्याकरितां एका लोखंडाच्या सुळाला अडकवून ठेवून तो

अभ्यधावत्सुसंक्रुद्धः प्रजाः काल इवान्तकः ।
स कृत्वा भैरवं नादं चालयन्निव मेदिनीम् ९
अङ्केनादाय वैदेहीमपक्रम्य तदाऽब्रवीत् ।
युवां जटाचीरधरौ सभार्यौ क्षीणजीवितौ १०
प्रविष्टौ दण्डकारण्यं शरचापासिपाणिनौ ।
कथं तापसयोर्वां च वासः प्रमदया सह ११
अधर्मचारिणौ पापौ कौ युवां मुनिदूषकौ ।
अहं वनमिदं दुर्गं विराधो नाम राक्षसः १२
चरामि सायुधो नित्यमृषिमांसानि भक्षयन् ।
इयं नारी वरारोहा मम भार्या भविष्यति १३
युवयोः पापयोश्चाहं पास्यामि रुधिरं मृधे ।
तस्यैवं ब्रुवतो दुष्टं विराधस्य दुरात्मनः १४
श्रुत्वा सगर्वितं वाक्यं संभ्रान्ता जनकात्मजा ।

अतिशय उंच स्वरानें गर्जना करीत होता. राम, लक्ष्मण आणि जनककन्या सीता याना पाहिल्याबरोबर युगांतीं क्रुद्ध मृत्यु ज्याप्रमाणें लोकाकडे धावतो, त्याप्रमाणें तो राक्षस अत्यंत क्रुद्ध होऊन त्याच्याकडे धावला. नंतर भयंकर गर्जना करून जणूंकाय पृथ्वी कंपित करीत करीत तो राक्षस पुढें आला आणि सीतेला कमरेशी धरून व उचलून घेऊन थोडा मार्गे सरून म्हणाला, " अरे ! बाण, धनुष्य, आणि खड्ग हातात घेऊन व जटा आणि वल्कलें धारण करून दंडकारण्यात भार्येसह आलेल्या तुम्हा दोघाचें आयुष्य सपलें ! अरे, तरुण स्त्रीसह तुम्ही तपस्वी अरण्यामध्यें कसेरे वास्तव्य करता ? मुनिवेषाला न शोभणारीं अशीं आयुधें धारण करून एकाच स्त्रीचें ठिकाणीं रत असलेले असे अधर्मनिष्ठ पापी आणि मुनींच्या नावाला बट्टा लावणारे तुम्ही कोणरे आहात ? मी विराध नावाचा राक्षस आहे आणि हातामध्यें शस्त्र धारण करून या भयंकर वनामध्यें संचार करीत ऋषींच्या मासाचें भक्षण करीत असतों. ही अत्यन्त रूपवती स्त्री माझी बायको होईल. मी युद्धामध्यें तुम्हा पापरूपी उभयतांचें रुधिर प्राशन करीन. " (७-१४)

याप्रमाणें त्या दुष्ट विराधाचें गर्वयुक्त भाषण ऐकताच जनकराजकन्या

सीता प्रवेपितोद्वेगात्प्रवाते कदली यथा १५
तां दृष्ट्वा राघवः सीतां विराधाङ्कगतां शुभाम् ।
अब्रवील्लक्ष्मणं वाक्यं मुखेन परिशुष्यता । १६
पश्य सौम्य नरेन्द्रस्य जनकस्यात्मसंभवाम् ।
मम भार्यां शुभाचारां विराधाङ्के प्रवेशिताम् १७
अत्यन्तसुखसंवृद्धां राजपुत्रीं यशस्विनीम् ।
यदभिप्रेतमस्मासु प्रियं वरवृतं च यत् १८
कैकेयास्तु सुसंवृत्तं क्षिप्रमद्यैव लक्ष्मण ।
या न तुष्यति राज्येन पुत्रार्थे दीर्घदर्शिनी १९
ययाहं सर्वभूतानां प्रियः प्रस्थापितो वनम् ।
अद्येदानीं सकामा सा या माता* मध्यमा मम २०
परस्पर्शात्तु वैदेह्या न दुःखतरमस्ति मे ।
पितुर्विनाशात्सौमित्रे स्वराज्यहरणात्तथा २१

सीता भयभीत होऊन वाऱ्यानें हलणाऱ्या केळीप्रमाणें थरथर कापूं लागली. इतक्यात ती सीता विराधाच्या मांडीवर असलेली पाहून शोकानें म्लान वदन झालेला राम लक्ष्मणाला म्हणाला, " बा लक्ष्मणा ! राजश्रेष्ठ जनकाची कन्या, लहानपणापासून सुखामध्येंच वाढलेली व शुद्ध आचरण करणारी अशी माझी भार्या म्हणून प्रसिद्ध असलेली यशस्विनी सीता विराधाच्या अंकावर असलेली तूं पहा. हे लक्ष्मणा ! वनामध्यें आम्हाला जें दुःख व्हावें असें कैकेयीला वाटत होतें तें व वर प्राप्त करून जें प्रिय करून घ्यावयाचें होतें, तें हें सर्व तिचें इच्छित आजच तिला प्राप्त झालें ! ती मोठी दूरदर्शी असल्यामुळें आपल्या मुलाला राज्य प्राप्त झालें, एवढ्यानेंच ती तृप्त होत नसून तें त्याला कायम मिळण्याकरितां आमच्या नाशाची इच्छा करीत आहे. सर्व प्राणिमात्रांना प्रिय असलेल्या मला वनामध्यें पाठवून देऊन आज ती माझी मधली* माता कैकेयी कृतकृत्य झाली ! लक्ष्मणा ! जरी

* टीप श्लोक २०– कैकेयी सुमित्रेपेक्षां धाकटी, वडील नाहीं, येथें " मध्यमा " जें म्हटलें आहे तें बाकीच्या ३५० इतर राण्यापैकीं काहींपेक्षां वयानें आणि सर्वांपेक्षां मानानें मोठी असल्यानें म्हटलेलें दिसतें.

इति ब्रुवति काकुत्स्थे बाष्पशोकपरिप्लुतः ।
अब्रवील्लक्ष्मणः क्रुद्धो रुद्धो नाग इव श्वसन् २२
अनाथ इव भूतानां नाथस्त्वं वासवोपमः ।
मया प्रेष्येण काकुत्स्थ किमर्थं परितप्यसे २३
शरेण निहतस्याद्य मया क्रुद्धेन रक्षसः ।
विराधस्य गतासोर्हि मही पास्यति शोणितम् २४
राज्यकामे मम क्रोधो भरते यो बभूव ह ।
तं विराधे विमोक्ष्यामि वज्री वज्रमिवाचले २५
मम भुजबलवेगवेगितः पततु शरोऽस्य महान्महोरसि ।
व्यपनयतु तनोश्च जीवितं पततु ततश्च मही विघूर्णितः २६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्वितीयः सर्गः ॥२॥ [५०]

माझा पिता मृत झाला व मी स्वतः त्या राज्यापासून भ्रष्ट झालों, तरीसुद्धा विदेहराजकन्या सीतेला दुसऱ्यानें स्पर्श केलेला पाहून जें दुःख होतें, त्यापेक्षा जास्त दुसरें कसलेंही दुःख मला होत नाहीं " (१४-२१)

याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचें भाषण ऐकल्यावर दुःखामुळें ज्याच्या डोळ्यांतून अश्रु वहात आहेत, असा लक्ष्मण कोंडून ठेवलेल्या सापाप्रमाणें श्वासोच्छ्वास टाकीत रागावून बोलूं लागला. तो म्हणाला, "हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामचंद्रा ! तूं सर्व प्राण्यांचा स्वामी असून पराक्रमाविषयीं इंद्रासारखा असतां अनाथाप्रमाणें शोक कां करीत आहेस ? तुझा सेवक मी क्रुद्ध झालों असतां त्या विराध राक्षसाला बाणानें प्रहार करून गतप्राण करीन व त्यामुळें त्याच्या शरिरांतून निघालेलें रक्त ही पृथ्वी प्राशन करील. वज्र धारण करणारा इंद्र ज्याप्रमाणें पर्वताला वज्रानें प्रहार करतो, त्याप्रमाणें राज्यासंबंधानें भरताविषयीं जो मला क्रोध आला आहे तो मी त्या राक्षसावर उगवीन. माझ्या बाहुबलाच्या वेगानें ज्याला वेग आला आहे, असा एक मोठा बाण त्याच्या विस्तीर्ण हृदयाचे ठिकाणीं जाऊन पडो व त्याच्या योगानें त्याचें जीवित नाहींसें होऊन मूर्च्छा येऊन तो या पृथ्वीवर पडो " (२२-२६)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकाण्डांपैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

तृतीयः सर्गः।

अथोवाच पुनर्वाक्यं विराधः पूरयन्वनम्।
पृच्छतो मम हि ब्रूत कौ युवां क्व गमिष्यतः १
तमुवाच ततो रामो राक्षसं ज्वलिताननम्।
पृच्छन्तं सुमहातेजा इक्ष्वाकुकुलमात्मनः २
क्षत्रियौ वृत्तसंपन्नौ विद्धि नौ वनगोचरौ।
त्वां तु वेदितुमिच्छावः कस्त्वं चरसि दण्डकान् ३
तमुवाच विराधस्तु रामं सत्यपराक्रमम्।
हन्त वक्ष्यामि ते राजन्निबोध मम राघव ४
पुत्रः किल जवस्याहं माता मम शतह्रदा।
विराध इति मामाहुः पृथिव्यां सर्वराक्षसाः ५
तपसा चाभिसंप्राप्ता ब्रह्मणो हि प्रसादजा।
शस्त्रेणावध्यता लोकेऽच्छेद्याभेद्यत्वमेव च ६
उत्सृज्य प्रमदामेनामनपेक्षौ यथागतम्।
त्वरमाणौ पलायेथां न वां जीवितमाददे ७

त्यानंतर विराध आपल्या भाषणानें तें वन निनादित करीत करीत पुनः म्हणाला, "अरे, तुम्ही कोण आहांत व कोणीकडे जाणार, हें मला मला सांगा" हें श्रवण करितांच महातेजस्वी राम, तोंडातून ज्वाला चालल्या आहेत अशा त्या विराध राक्षसाला म्हणाला, 'आम्ही इक्ष्वाकु कुलामध्यें जन्मलों असून सदाचारसंपन्न क्षत्रिय असतां कांहीं कारणानें वनांत संचार करीत आहों आतां तू कोण आहेस व या दंडकारण्यामध्यें कां रहात आहेस, हें जाणण्याची आम्हांला इच्छा आहे" नंतर तो विराध राक्षस त्या सत्यपराक्रमी रामाला म्हणाला, "हे राजा रामचंद्रा! मी आपलें वृत्त सांगतों तें तू श्रवण कर मी जव राक्षसाचा पुत्र व माझी माता शतह्रदा ही होय व या पृथ्वीवर सर्व राक्षस मला विराध असें म्हणतात. मी तपानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेऊन त्याच्यापासून या लोकांमध्यें शस्त्रानें अवध्यता, अच्छेद्यता व अभेद्यता हीं प्राप्त करून घेतलीं आहेत. याकरितां, या स्त्रीला सोडून देऊन मोठ्या त्वरेनें जसे आलात, तसे

तं रामः प्रत्युवाचेदं कोपसंरक्तलोचनः ।
राक्षसं विकृताकारं विराधं पापचेतसम् ८
क्षुद्र धिक्त्वां तु हीनार्थं मृत्युमन्वेषसे ध्रुवम् ।
रणे प्राप्स्यसि संतिष्ठ न मे जीवन्विमोक्ष्यसे ९
ततः सज्यं धनुः कृत्वा रामः सुनिशिताञ्शरान् ।
सुशीघ्रमभिसंधाय राक्षसं निजघान ह १०
धनुषा ज्यागुणवता सप्त बाणान्मुमोच ह ।
रुक्मपुङ्खान्महावेगान्सुपर्णानिलतुल्यगान् ११
ते शरीरं विराधस्य भित्त्वा बर्हिणवाससः ।
निपेतुः शोणितादिग्धा धरण्यां पावकोपमाः १२
स विद्धो न्यस्य वैदेहीं शूलमुद्यम्य राक्षसः ।
अभ्यद्रवत्सुसंक्रुद्धस्तदा रामं सलक्ष्मणम् १३
स विनद्य महानादं शूलं शक्रध्वजोपमम् ।
प्रगृह्याशोभत तदा व्यात्तानन इवान्तकः १४

---

पळून जा; म्हणजे मी तुमचे प्राण घेणार नाही" (१-७)

हें त्या राक्षसाचें भाषण ऐकून रागानें तांबडेलाल डोळे झालेला राम भयंकर आकृतीच्या महापापी विराधाला म्हणाला, "हे नीचा ! तुला धिक्कार असो! दुसऱ्याच्या स्त्रीला स्पर्श करण्याचें हें नीच कृत्य करून तूं मरणाचीच इच्छा करीत आहेस. तर तें आताच तुला रणामध्यें खात्रीनें प्राप्त होईल. माझ्या समोर उभा रहा. माझ्या हातून तूं जिवत सुटणार नाहींस" याप्रमाणें भाषण केल्यानंतर रामानें धनुष्य सज्ज केलें आणि तीक्ष्ण धारा असलेले बाण धनुष्याला लावून त्या राक्षसावर प्रहार केला नंतर प्रत्यंचा चढविलेल्या धनुष्याला सोन्याचा पिसारा असलेले व गरुड आणि वायु याप्रमाणें शीघ्र गमन करणारे असे सात बाण लावून त्या राक्षसावर सोडले व ते मोराचा पिसारा असलेले, अग्नीप्रमाणें तेजस्वी असे ते बाण विराधाच्या शरिराचा भेद करून रक्तानें भरून जमिनीवर पडले. याप्रमाणें त्या राक्षसाला प्रहार होताच वैदेहीला खालीं ठेऊन त्यानें आपल्या हातात शूल घेतला आणि तो लक्ष्मणासह रामावर धावला. तेव्हा त्या

अथ तौ भ्रातरौ दीप्तं शरवर्षं ववर्षतुः ।
विराधे राक्षसे तस्मिन्कालान्तकयमोपमे १५
स प्रहस्य महारौद्रः स्थित्वाजृम्भत राक्षसः ।
जृम्भमाणस्य ते बाणाः कायान्निष्पेतुराशुगाः १६
स्पर्शात्तु वरदानेन प्राणान्संरोध्य राक्षसः ।
विराधः शूलमुद्यम्य राघवावभ्यधावत १७
तच्छूलं वज्रसंकाशं गगने ज्वलनोपमम् ।
द्वाभ्यां शराभ्यां चिच्छेद रामः शस्त्रभृतां वरः १८
तद्रामविशिखैश्छिन्नं शूलं तस्यापतद्भुवि ।
पपाताशनिना च्छिन्नं मेरोरिव शिलातलम् १९
तौ खड्गौ क्षिप्रमुद्यम्य कृष्णसर्पाविवोद्यतौ ।
तूर्णमापेततुस्तस्य तदा प्रहरतां बलात् २०
स वध्यमानः सुभृशं भुजाभ्यां परिगृह्य तौ ।

---

राक्षसानें मोठ्यानें गर्जना करून इंद्राच्या ध्वजाप्रमाणें असलेला शूल हातामध्यें घेतला असता तो तोंड पसरलेल्या यमाप्रमाणें दिसू लागला (८-१४)

तेव्हा प्रलयकालच्या प्राणिघातक यमाप्रमाणें असलेल्या त्या विराध राक्षसावर ते दोघे भाऊ राम व लक्ष्मण दिव्य बाणांचा वर्षाव करू लागले, तेव्हा शस्त्रानें अवध्य असलेल्या माझ्यावर हे व्यर्थ बाणवृष्टि करीत आहेत, असें पाहून तो महा-भयंकर राक्षस हंसला व जांभया देत उभा राहिला आणि ते सर्व बाण त्याच्या शरिरापासून आपोआप गळून पडूं लागले फार वेदना होत असताही वरप्राप्ती-मुळें ज्याचे प्राण गेले नाहींत, असा तो विराध आपल्या हातामध्यें शूल घेऊन त्या राम-लक्ष्मणाकडे धावला तेव्हा शस्त्र धारण करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ अशा रामानें वज्राप्रमाणें तेजस्वी व अग्नीप्रमाणें प्रकाशमान असा आकाशातून येणारा तो त्याचा शूल दोन बाणांनीं तोडून टाकला. तो रामाच्या बाणांनीं तुटून पडलेला शूल वज्रप्रहारानें छिन्न होऊन पडलेल्या मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें दिसूं लागला. तो शूल पडल्याबरोबर त्या दोघांनीं कृष्णसर्पाप्रमाणें असलेले दोन खड्ग उचलून आपल्या हातात घेऊन त्या विराध राक्षसाला प्रहार केला. (१५-२०)

अप्रकम्प्यौ नरव्याघ्रौ रौद्रः प्रस्थातुमैच्छत २१
तस्याभिप्रायमाज्ञाय रामो लक्ष्मणमब्रवीत् ।
वहत्वयमलंतावत्पथानेन तु राक्षसः २२
यथा चेच्छति सौमित्रे तथा वहतु राक्षसः ।
अयमेव हि नः पन्था येन याति निशाचर. २३
स तु स्वबलवीर्येण समुत्क्षिप्य निशाचरः ।
बालाविव स्कन्धगतौ चकारातिबलोद्धतः २४
तावारोप्य ततः स्कन्धं राघवौ रजनीचरः ।
विराधो विनदन्घोरं जगामाभिमुखो वनम् २५
वनं महामेघनिभं प्रविष्टो द्रुमैर्महद्भिर्विविधैरुपेतम् ।
नानाविधैः पक्षिकुलैर्विचित्रं शिवायुतं व्यालमृगैर्विकीर्णम् २६
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे तृतीयः सर्गः ॥३॥ [७६]

याप्रमाणें अतिशय प्रहार केला असताही युद्धामध्यें न ढळणाऱ्या त्या पुरुषश्रेष्ठांना आपल्या भुजामध्यें घेऊन पळून जाण्याचा तो विराध विचार करूं लागला असता त्याचा तो हेतु समजून राम लक्ष्मणाला म्हणाला, "ह्या मार्गानें हा राक्षस आपणाला पाहिजे तितके दूर घेऊन जावो. हे लक्ष्मणा ! ह्याची इच्छा असेल त्याप्रमाणें हा राक्षस आपणाला घेऊन जाऊं दे ज्या मार्गानें हा राक्षस चालला आहे, तोच आपला मार्ग आहे." तदनंतर अतिशय शक्तीमुळें गर्विष्ठ झालेल्या त्या राक्षसानें आपल्या बलानें त्या राम-लक्ष्मणांना वर उचलून धरलें आणि मुलाप्रमाणें खांद्यावर ठेवून दिलें. त्या रघुवंशज राम-लक्ष्मणांना याप्रमाणें खांद्यावर घेतल्यानंतर तो विराध राक्षस भयंकर गर्जना करीत करीत दंडकारण्याकडे तोंड करून निघाला. सारांश, नानाप्रकारच्या मोठमोठ्या वृक्षांनीं युक्त, अनेक प्रकारच्या पक्षिसमुदायामुळें चित्रविचित्र, कोल्हे, श्वापदें व मृग यांनीं गजबजलेल्या आणि मोठ्या मेघाप्रमाणें असलेल्या वनामध्यें तो राक्षस शिरला. (२१-२६)

ह्याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकाण्डापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

चतुर्थः सर्गः ।

ह्रियमाणौ तु काकुत्स्थौ दृष्ट्वा सीता रघूत्तमौ ।
उच्चैः स्वरेण चुक्रोश प्रगृह्य सुमहाभुजौ १
एष दाशरथी रामः सत्यवाञ्छीलवाञ्शुचिः ।
रक्षसा रौद्ररूपेण ह्रियते सहलक्ष्मणः २
मामृक्षा भक्षयिष्यन्ति शार्दूलद्वीपिनस्तथा ।
मां हरोत्सृज काकुत्स्थौ नमस्ते राक्षसोत्तम ३
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा वैदेह्या रामलक्ष्मणौ ।
वेगं प्रचक्रतुर्वीरौ वधे तस्य दुरात्मनः ४
तस्य रौद्रस्य सौमित्रिः सव्यं बाहुं बभञ्ज ह ।
रामस्तु दक्षिणं बाहुं तरसा तस्य रक्षसः ५
स भग्नबाहुः संविग्नः पपाताशु विमूर्च्छितः ।
धरण्यां मेघसंकाशो वज्रभिन्न इवाचलः ६
मुष्टिभिर्बाहुभिः पद्भिः सूदयन्तौ तु राक्षसम् ।
उद्यम्योद्यम्य चाप्येनं स्थण्डिले निष्पिपेषतुः ७

रघुवंशजश्रेष्ठ ककुत्स्थकुलोत्पन्न महाबाहु राम-लक्ष्मणाना विराध राक्षस धरून घेऊन जात आहे असें पाहून सीता आपले हात वर करून उच्च स्वरानें आक्रोश करूं लागली. ती म्हणाली, " सत्यनिष्ठ, सुशील व पवित्र असलेल्या या दाशरथि रामाला लक्ष्मणासह विराध राक्षस घेऊन जात आहे. आता मला अस्वलें, वाघ आणि चित्ते खाऊन टाकतील. हे राक्षसश्रेष्ठा ! मी तुला हात जोडतें, तूं मला ने आणि या ककुत्स्थवंशजाना सोड " हें त्या सीतेचें भाषण ऐकताच वीर राम-लक्ष्मणानीं त्या दुष्टाच्या वधाविषयीं घाई केली व त्या भयंकर राक्षसाचा डावा हात लक्ष्मणानें व उजवा रामानें जोर करून तोडिला. तेव्हा हात तुटून गेलेला तो राक्षस व्याकुल झाला आणि वज्रानें विदीर्ण झालेल्या पर्वताप्रमाणें तो मेघतुल्य राक्षस मूर्च्छित होऊन लगेच जमिनीवर पडला. लाथाबुक्क्यांनीं व बाहुरखड्यांनीं त्या राक्षसाला ते मारूं लागले आणि प्रयत्न कर-करून त्याला ते भूमीवर खालीं पाडून त्याचा चेंदामेंदा करूं लागले परंतु

स विद्धो बहुभिर्बाणैः खड्गाभ्यां च परिक्षतः।
निष्पिष्टो बहुधा भूमौ न ममार स राक्षसः ८
तं प्रेक्ष्य रामः सुभृशमवध्यमचलोपमम्।
भयेष्वभयदः श्रीमानिदं वचनमब्रवीत् ९
तपसा पुरुषव्याघ्र राक्षसोऽयं न शक्यते।
शस्त्रेण युधि निर्जेतुं राक्षसं निखनावहे १०
कुञ्जरस्येव रौद्रस्य राक्षसस्यास्य लक्ष्मण।
वनेऽस्मिन्सुमहच्छ्वभ्रं खन्यतां रौद्रवर्चसः ११
इत्युक्त्वा लक्ष्मणं रामः प्रदरः खन्यतामिति।
तस्थौ विराधमाक्रम्य कण्ठे पादेन वीर्यवान् १२
तच्छ्रुत्वा राघवेणोक्तं राक्षसः प्रश्रितं वचः।
इदं प्रोवाच काकुत्स्थं विराधः पुरुषर्षभम् १३
हतोऽहं पुरुषव्याघ्र शक्रतुल्यबलेन वै।
मया तु पूर्वं त्वं मोहान्न ज्ञातः पुरुषर्षभ १४

अनेक बाणांनीं जरी तो जखमी झाला होता, तलवारींनीं जरी त्याच्या सर्व शरिरावर जखमा झालेल्या होत्या आणि जमिनीवर जरी तो अनेक प्रकारांनीं चिरडलेला होता, तरी तो राक्षस मेला नाहीं. (१–८)

तेव्हां भयप्रसंगीं अभय देणारा श्रीमान् राम त्या अत्यंत अवध्य असलेल्या पर्वतप्राय राक्षसाकडे पाहून म्हणाला– 'हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा! तपश्चर्या करून या राक्षसानें वर प्राप्त करून घेतला असल्यानें शस्त्रानें युद्धामध्यें याचा पराभव होणें शक्य नाहीं. याकरितां आपण या राक्षसाला पुरून टाकूं. तेव्हां हे लक्ष्मणा! मोठ्या हत्तीला पुरण्याकरितां जसा फारच मोठा खड्डा खणावा लागतो, तसा या उग्र तेजानें युक्त असलेल्या राक्षसाकरितां तूं या वनामध्यें बराच मोठा खड्डा खण." याप्रमाणें "खड्डा खण" असें लक्ष्मणाला सांगितल्यावर शूरवीर राम विराध राक्षसाच्या मानेवर पाय देऊन उभा राहिला. तें रामाचें भाषण ऐकून विराध राक्षस पुरुषश्रेष्ठ रामाला नम्रपणें म्हणाला, "हे पुरुषश्रेष्ठा! इंद्रतुल्य बलाढ्य अशा तूं मला मारलें आहेस. हे पुरुषोत्तमा! मी पूर्वी मोहामुळें तुला

कौसल्या सुप्रजास्तात रामस्त्वं विदितो मया ।
वैदेही च महाभागा लक्ष्मणश्च महायशाः १५
अभिशापादहं घोरां प्रविष्टो राक्षसीं तनुम् ।
तुम्बुरुर्नाम गन्धर्वः शप्तो वैश्रवणेन हि १६
प्रसाद्यमानश्च मया सोऽब्रवीन्मां महायशाः ।
यदा दाशरथी रामस्त्वां वधिष्यति संयुगे १७
तदा प्रकृतिमापन्नो भवान्स्वर्गं गमिष्यति ।
अनुपस्थीयमानो मां स क्रुद्धो व्याजहार ह १८
इति वैश्रवणो राजा रम्भासक्तमुवाच ह ।
तव प्रसादान्मुक्तोऽहमभिशापात्सुदारुणात् १९
भुवनं स्वं गमिष्यामि स्वस्ति वोऽस्तु परंतप ।
इतो वसति धर्मात्मा शरभङ्गः प्रतापवान् २०
अध्यर्धयोजने तात महर्षिः सूर्यसंनिभः ।
तं क्षिप्रमभिगच्छ त्वं स ते श्रेयोऽभिधास्यति २१
अवटे चापि मां राम निक्षिप्य कुशली व्रज ।

---

ओळखलें नाहीं रामा ! तुझ्यामुळें कौसल्या सुपुत्रवती झाली आहे, तुला, महाभाग्यवती सीतेला आणि महायशस्वी लक्ष्मणाला मी आता पुरें जाणलें. हा भयंकर राक्षस देह मला शापामुळें प्राप्त झालेला आहे, मी पूर्वी तुंबुरु नावाचा गंधर्व होतों व कुबेरानें मला शाप दिला होता शाप दिल्यानंतर मी शापनिवृत्तीकरितां त्याची प्रार्थना करूं लागलों असतां तो महायशस्वी कुबेर मला म्हणाला, "दाशरथि राम जेव्हा संग्रामांत तुला मारील, तेव्हा तुला पुन: गंधर्वरूप प्राप्त होऊन स्वर्गाला जाशील " मी रंभेवर आसक्त झाल्यानें माझ्या हातून कुबेराची सेवा होईनाशी झाल्यामुळें रागावून त्यानें मला तसा शाप दिला होता व त्याच्याच उश्शापाप्रमाणें मी आतां तुझ्या कृपेनें त्या अत्यंत भयंकर शापापासून मुक्त झालों आहे. मी आता आपल्या स्वर्गलोकीं जातों हे शत्रुतापना ! तुमचें कल्याण असो येथून सुमारें दीड योजनावर प्रतापी, धर्मनिष्ठ आणि सूर्यासारखे तेजस्वी असे शरभंग महर्षि राहतात, त्याच्याकडे तूं सत्वर जा ते महर्षि तुझें कल्याण

रक्षसां गतसत्त्वानामेष धर्मः सनातनः २२
अवटे ये निधीयन्ते तेषां लोकाः सनातनाः ।
एवमुक्त्वा तु काकुत्स्थं विराधः शरपीडितः २३
बभूव स्वर्गसंप्राप्तो न्यस्तदेहो महाबलः ।
तच्छ्रुत्वा राघवो वाक्यं लक्ष्मणं व्यादिदेश ह २४
कुञ्जरस्येव रौद्रस्य राक्षसस्यास्य लक्ष्मण ।
वनेऽस्मिन्सुमहाञ्छ्वभ्रः खन्यतां रौद्रकर्मणः २५
इत्युक्त्वा लक्ष्मणं रामः प्रदरः खन्यतामिति ।
तस्थौ विराधमाक्रम्य कण्ठे पादेन वीर्यवान् २६
ततः खनित्रमादाय लक्ष्मणः श्वभ्रमुत्तमम् ।
अखनत्पार्श्वतस्तस्य विराधस्य महात्मनः २७
तं मुक्तकण्ठमुत्क्षिप्य शङ्कुकर्णं महास्वनम् ।
विराधं प्राक्षिपच्छ्वभ्रे नदन्तं भैरवस्वनम् २८
तमाहवे दारुणमाशुविक्रमौ स्थिरावुभौ संयति रामलक्ष्मणौ ।

करतील. हे रामा ! मला खड्ड्यांत गाडून टाक व मग तूं खुशाल जा; कारण गतप्राण राक्षसांना खड्ड्यांत पुरणें हा सनातन धर्म आहे. जे राक्षस खड्ड्यांत पुरले जातात, त्यांना अक्षय लोक प्राप्त होतात.'' याप्रमाणें बाणांनीं विद्ध झालेला तो महाबलवान् राक्षस रामाला सांगून व देहत्याग करून स्वर्गाला गेला. (१२-२४)

तें त्याचें भाषण ऐकून राम पुनः लक्ष्मणाला म्हणाला, '' हे लक्ष्मणा ! प्रचंड हत्तीला पुरण्याकरितां जसा फारच मोठा खड्डा खणावा लागतो, तसा या क्रूरकर्मी राक्षसाकरितां तूं या या वनामध्यें बराच मोठा खड्डा खण. '' याप्रमाणें '' खड्डा खण '' म्हणून लक्ष्मणाला सांगितल्यावर वीर्यवान् राम राक्षसाच्या मानेवर पाय देऊन उभा राहिला. नंतर लक्ष्मणानें कुदळ घेऊन त्या विराधाच्या बाजूला चांगला मोठा खड्डा खणला. रामानें त्याच्या मानेवरून पाय काढल्यावर शंकूप्रमाणें कठीण कान व मोठा आवाज असलेला तो विराध राक्षस भयंकर गर्जना करीत असताच लक्ष्मणानें त्याला त्या खड्ड्यांत लोटून दिलें.

मुदान्वितौ चिक्षिपतुर्भयावहं नदन्तमुत्क्षिप्य बलेन राक्षसम् ॥२९॥
अवध्यतां प्रेक्ष्य महासुरस्य तौ शितेन शस्त्रेण तदा नरर्षभौ ।
समर्थ्य चात्यर्थविशारदावुभौ बिले विराधस्य वधं प्रचक्रतुः ३०
स्वयं विराधेन हि मृत्युमात्मनः प्रसह्य रामेण यथार्थमीप्सितः ।
निवेदितः काननचारिणा स्वयं न मे वधः शस्त्रकृतो भवेदिति ३१
तदेव रामेण निशम्य भाषितं कृता मतिस्तस्य बिलप्रवेशने ।
बिलं च तेनातिबलेन रक्षसा प्रवेश्यमानेन वनं विनादितम् ३२
प्रहृष्टरूपाविव रामलक्ष्मणौ विराधमुर्व्यां प्रदरे निपात्य तम् ।
ननन्दतुर्वीतभयौ महावने दिवि स्थितौ चन्द्रदिवाकराविव ३३
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये अरण्यकाण्डे चतुर्थः सर्गः ॥४॥ [१०९]

पञ्चमः सर्गः ।

हत्वा तु तं भीमबलं विराधं राक्षसं वने ।
ततः सीतां परिष्वज्य समाश्वास्य च वीर्यवान् १

---

युद्धामध्यें धैर्यवान् अशा त्या चपल राम-लक्ष्मणांनीं त्या घोर राक्षसाला युद्धात जिंकून स्वसामर्थ्यानें त्याला उचलून तो भयंकर गर्जना करीत असतां आनंद झालेल्या त्या राम-लक्ष्मणांनीं त्याला खड्ड्यांत लोटून दिलें (२४-२९)

तीक्ष्ण शस्त्रानें त्या महा दैत्याचा वध होत नाहीं, असें आढळून आल्यावर अत्यंत युद्धकुशल राम लक्ष्मणांनीं विराधाला खड्ड्यांत पुरून त्याचा वध केला. रामाकडून इच्छिलला जो मृत्यु, तो सिद्धीस नेण्याकरिता अरण्यांत संचारणाऱ्या त्या राक्षसानें "शस्त्रानें माझा वध होणार नाहीं." असें स्वतः रामाला सांगितलें तेंच त्याचें भाषण ऐकून त्याला खड्ड्यांत टाकण्याचें रामानें ठरवलें आणि ते त्या राक्षसाला खड्ड्यांत टाकूं लागले असतां त्यानें तें वन दणाणून टाकलें. याप्रमाणें त्या विराध राक्षसाला जमिनींतील खड्ड्यांत टाकून ते रामलक्ष्मण आनंदित झाले आणि आकाशांतील सूर्यचंद्राप्रमाणें ते त्या महावनांत निर्भय होऊन आनंदांत राहिले. (३०-३३)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं चौथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

अब्रवीद्भ्रातरं रामो लक्ष्मण दीप्ततेजसम् ।
कष्टं वनमिदं दुर्गं न च स्मो वनगोचराः १
अभिगच्छामहे शीघ्रं शरभङ्गं तपोधनम् ।
आश्रमं शरभङ्गस्य राघवोऽभिजगाम ह २
तस्य देवप्रभावस्य तपसा भावितात्मन ।
समीपे शरभङ्गस्य ददर्श महदद्भुतम् ४
विभ्राजमानं वपुषा सूर्यवैश्वानरप्रभम् ।
रथप्रवरमारूढमाकाशे विबुधानुगम् ५
असंस्पृशन्त वसुधां ददर्श विबुधेश्वरम् ।
सुप्रभाभरणं देवं विरजोम्बरधारिणम् ६
तद्विधैरेव बहुभिः पूज्यमान महात्मभिः ।
हरितैर्वाजिभिर्युक्तमन्तरिक्षगतं रथम् ७
ददर्शादूरतस्तस्य तरुणादित्यसंनिभम् ।
पाण्डुराभ्रघनप्रख्यं चन्द्रमण्डलसंनिभम् ८

त्या भयकर बलानें युक्त असलेल्या विराध राक्षसाला मारून आणि सांत्वनपूर्वक सीतेला आलिंगन देऊन वीर्यवान् राम तेजस्वी बधु लक्ष्मणाला म्हणाला, " हें अरण्य त्रासदायक व आत जाण्याला कठीण असें आहे आणि आपल्याला तर वनामध्यें राहण्याचा अनुभव नाहीं याकरिता आता आपण लौकर महातपस्वी शरभग ऋषींकडे जाऊ " असें म्हणून राम शरभग मुनींच्या आश्रमाला गेला. तेव्हा तपश्चर्येनें ज्याचें चित्त पवित्र झालेलें आहे व देवाप्रमाणें ज्याचा प्रभाव आहे, अशा त्या शरभग मुनींच्या आश्रमाजवळ रामानें एक मोठा आश्चर्यकारक प्रकार पाहिला सूर्य आणि अग्नि ह्यांच्याप्रमाणें तेजस्वी, शरीरकातीनें देदीप्यमान, देवरूप सेवकांबरोबर असलेला, अत्यत उज्ज्वल आभूषणें आणि निर्मल वस्त्रें परिधान केलेला, जमिनीवर उतरला असताही तिला स्पर्श न करणारा व तशाच प्रकारचीं भूषणें वगैरे धारण करून स्तुति करीत असलेल्या अनेक महात्म्यांनीं युक्त आणि श्रेष्ठ रथामध्यें आरूढ झालेला असा आकाशामध्यें देवराज इंद्र आणि श्यामवर्ण अश्व जुपलेले असून अतरिक्षातून चालणारा त्याचा रथ ह्याना रामानें पाहिलें त्याच्याजवळच बालसूर्याप्रमाणें तेजस्वी, श्वेतवर्ण अभ्राप्रमाणें अतिशय

अपश्यद्विमलं छत्रं चित्रमाल्योपशोभितम् ।
चामरव्यजने चान्ये रुक्मदण्डे महाधने ९
गृहीते वरनारीभ्यां धूयमाने च मूर्धनि ।
गन्धर्वामरसिद्धाश्च बहवः परमर्षयः १०
अन्तरिक्षगतं देवं गीर्भिरग्र्याभिरैडयन् ।
सह संभाषमाणे तु शरभङ्गेन वासवे ११
दृष्ट्वा शतक्रतुं तत्र रामो लक्ष्मणमब्रवीत् ।
रामोऽथ रथमुद्दिश्य भ्रातुर्दर्शयताद्भुतम् १२
अर्चिष्मन्तं श्रिया जुष्टमद्भुतं पश्य लक्ष्मण ।
प्रतपन्तमिवादित्यमन्तरिक्षगतं रथम् १३
ये हयाः पुरुहूतस्य पुरा शक्रस्य नः श्रुताः ।
अन्तरिक्षगता दिव्यास्त इमे हरयो ध्रुवम् १४
इमे च पुरुषव्याघ्र ये तिष्ठन्त्यभितो दिशम् ।
शतं शतं कुण्डलिनो युवानः खड्गपाणयः १५
विस्तीर्णविपुलोरस्काः परिघायतबाहवः ।

---

कातीनें युक्त, चंद्रमंडलासारख्या प्रभेनें संपन्न आणि आश्चर्यकारक पुष्पानीं सुशोभित असें एक निर्मल छत्र व उत्कृष्ट स्त्रियानीं हातात घेतलेलीं, मस्तकावर हलत असलेलीं आणि सुवर्णदंडानीं युक्त असलेलीं मोठीं मूल्यवान् चामरें त्यानें पाहिलीं. (१-१०)

गंधर्व, देव, सिद्ध आणि अनेक महर्षि त्या आकाशांत असणाऱ्या देवाचें उत्कृष्ट शब्दानीं स्तवन करीत होते नंतर इंद्र शरभंग मुनींशीं भाषण करूं लागला, तेव्हां त्या इंद्राला ओळखून राम लक्ष्मणाशीं बोलूं लागला रथाकडे बोट करून प्रथमतः रामानें आपल्या भावाला तो आश्चर्यकारक रथ दाखविला आणि म्हणाला, "हे लक्ष्मणा ! तेजस्वी, कांतीनें युक्त, सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेला आणि आकाशांत असणारा हा रथ तूं पहा. यज्ञाकरितां अनेकदां याजकांनीं बोलावलेल्या इंद्राच्या ज्या अश्वांबद्दल आम्ही ऐकलें होतें, तेच हे आकाशांत संचारणारे दिव्य अश्व नि संशय होत. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा ! इंद्राच्या चारही दिशांना कुंडलें धारण

शोणांशुवसनाः सर्वे व्याघ्रा इव दुरासदाः १६
उरोदेशेषु सर्वेषां हारा ज्वलनसंनिभाः ।
रूपं बिभ्रति सौमित्रे पञ्चविंशतिवार्षिकम् १७
एतद्धि किल देवानां वयो भवति नित्यदा ।
यथेमे पुरुषव्याघ्रा दृश्यन्ते प्रियदर्शनाः १८
इहैव सह वैदेह्या मुहूर्तं तिष्ठ लक्ष्मण ।
यावज्जानाम्यहं व्यक्तं क एष द्युतिमानिति १९
तमेवमुक्त्वा सौमित्रिमिहैव स्थीयतामिति ।
अभिचक्राम काकुत्स्थः शरभङ्गाश्रमं प्रति २०
ततः समभिगच्छन्तं प्रेक्ष्य रामं शचीपतिः ।
शरभङ्गमनुज्ञाप्य विबुधानिदमब्रवीत् २१
इहोपयात्यसौ रामो यावन्मां नाभिभाषते ।
निष्ठां नयत तावत्तु ततो मां द्रष्टुमर्हति २२
जितवन्तं कृतार्थं हि तदाहमचिरादिमम् ।
कर्म ह्यनेन कर्तव्यं महदन्यैः सुदुष्करम् * २३

कस्न हातात खङ्ग घेतलेले जे हे शंभर-शंभर तरुण पुरुष उभे आहेत, त्यांच्या छात्या फारच रुन्द आहेत, त्यांचे हात अडसरासारखे लांब आहेत, जवळ येणाऱ्याला याप्रमाणें सर्वही भयावह आहेत. सर्वांच्या छातीवर अग्नीसारखे उज्ज्वल हार दिसत आहेत आणि हे लक्ष्मणा! सर्वही वयानें पंचवीस वर्षांचे दिसत आहेत. आनंदी मुद्रेनें युक्त असलेले हे पुरुषश्रेष्ठ ज्याप्रमाणें दिसत आहेत, त्याचप्रमाणें हें देवांचें वय नित्य कायम असतें. हे लक्ष्मणा ! तूं सीतेसह एक क्षणभर येथेंच थांब. तोंवर हा कोण तेजस्वी पुरुष रथांत बसला आहे, हें समजून घेतों." (१०-१९)

याप्रमाणें "येथेंच थांब" असें लक्ष्मणाला सांगून काकुत्स्थ राम शरभंग मुनींच्या आश्रमाकडे गेला. तेव्हां राम येत असल्याचें पाहून शचीपति

* "निष्पादयित्वा तत्कर्म ततो मां द्रष्टुमर्हति ।" २३ व्या श्लोकांत एवढा श्लोकार्ध गोविन्दराजीय प्रतीमध्यें अधिक आहे.

अथ वज्री तमामन्त्र्य मानयित्वा च तापसम् ।
रथेन हययुक्तेन ययौ दिवमरिंदम· २४
प्रयाते तु सहस्राक्षे राघवः सपरिच्छदः ।
अग्निहोत्रमुपासीनं शरभङ्गमुपागमत् २५
तस्य पादौ च संगृह्य रामः सीता च लक्ष्मणः ।
निषेदुस्तदनुज्ञाता लब्धवासा निमन्त्रिताः २६
ततः शक्रोपयानं तु पर्यपृच्छत राघवः ।
शरभङ्गश्च तत्सर्वं राघवाय न्यवेदयत् २७
मामेष वरदो राम ब्रह्मलोकं निनीषति ।
जितमुग्रेण तपसा दुष्प्रापमकृतात्मभिः २८
अहं ज्ञात्वा नरव्याघ्र वर्तमानमदूरतः ।
ब्रह्मलोकं न गच्छामि त्वामदृष्ट्वा प्रियातिथिम् २९

इंद्र शरभंग मुनींची अनुज्ञा घेऊन देवांना म्हणाला, " हा राम इकडे येत आहे; परंतु इकडे येऊन हा माझ्याशीं भाषण करण्यापूर्वींच तुम्ही माझ्यासह स्वर्गाला चला रावणाला जिंकून कृतार्थ झाला म्हणजे पुढें याला माझें दर्शन होईल. इतरांना करण्यास अत्यंत कठीण असें मोठें कर्म याच्याकडून व्हावयाचें आहे." याप्रमाणें देवांना सांगून वज्रपाणि इंद्रानें आदरपूर्वक त्या मुनींचा निरोप घेतला आणि घोडे जोडलेल्या रथांत बसून तो शत्रूंना नमवणारा इंद्र स्वर्गाला निघून गेला. ( २०-२४ )

इंद्र निघून गेल्यावर लक्ष्मण व सीता यांसह राम होमशाळेंत बसलेल्या शरभंग मुनींकडे गेला जवळ गेल्यावर राम, सीता आणि लक्ष्मण यांनीं त्या मुनींचे पाय धरले. नंतर त्यांनीं भोजनाकरितां निमंत्रण दिल्यावर आणि राहण्याच्या जागेची सोय लागल्यावर त्यांची संमति घेऊन ते तिथे तेथें बसले. नंतर इंद्राच्या येण्याचें कारण रामानें त्यांना विचारलें असतां शरभंग मुनींनींही तें सर्व रामाला सांगितलें, ते म्हणाले," हे रामा ! चित्त पवित्र न केलेल्या पुरुषांना प्राप्त होण्यास कठीण असा ब्रह्मलोक मी प्रखर तपश्चर्येनें संपादन केला आहे व त्या ब्रह्मलोकीं मला असा वर देणारा इंद्र नेऊं इच्छितो. परंतु हे पुरुषश्रेष्ठा ! तुझ्या-

त्वयाहं पुरुषव्याघ्र धार्मिकेण महात्मना ।
समागम्य गमिष्यामि त्रिदिवं चावरं परम् ३०
अक्षया नरशार्दूल जिता लोका मया शुभाः ।
ब्राह्मयाश्च नाकपृष्ठयाश्च प्रतिगृह्णीष्व मामकान् ३१
एवमुक्तो नरव्याघ्रः सर्वशास्त्रविशारदः ।
ऋषिणा शरभङ्गेन राघवो वाक्यमब्रवीत् ३२
अहमेवाहरिष्यामि सर्वाँल्लोकान्महामुने ।
आवासं त्वहमिच्छामि प्रदिष्टमिह कानने ३३
राघवेणैवमुक्तस्तु शक्रतुल्यबलेन वै ।
शरभङ्गो महाप्राज्ञः पुनरेवाब्रवीद्वचः ३४
इह राम महातेजाः सुतीक्ष्णो नाम धार्मिकः ।
वसत्यरण्ये नियतः स ते श्रेयो विधास्यति ३५
इमां मन्दाकिनीं राम प्रतिस्रोतामनुव्रज ।
नदीं पुष्पोडुपवहां ततस्तत्र गमिष्यसि ३६
एष पन्था नरव्याघ्र मुहूर्तं पश्य तात माम् ।

सारखा अत्यंत प्रिय असा अतिथि जवळ आला आहे, असें समजल्यामुळें तुझें दर्शन घेतल्यावांचून मी ब्रह्मलोकीं न जाण्याचें ठरविलें. हे पुरुषश्रेष्ठा! महात्मा धर्मनिष्ठ अशा तुझी भेट घेऊन नंतर स्वर्गाला व उत्कृष्ट ब्रह्मलोकाला मी जाईन. हे पुरुषोत्तमा! मी तप आचरून अक्षय व शुभ असे ब्रह्मलोक आणि स्वर्गलोक हे संपादन करून ठेविले आहेत; त्या माझ्या लोकाचा तूं स्वीकार कर." (२५–३१)

शरभंग ऋषि याप्रमाणें पुरुषश्रेष्ठ रामाला म्हणाले असता तो सर्वशास्त्रपारंगत राम त्यांना म्हणाला, "हे महामुने! मीच तपश्चर्येनें सर्व लोक संपादन करीन. आपण फक्त या अरण्यांत राहण्याकरिता एक जागा दाखवून द्यावी, एवढीच माझी इच्छा आहे." इंद्रासारख्या बलाढ्य रामानें शरभंग मुनींना असें म्हटलें असतां ते महाज्ञानी शरभंग मुनि पुन्हा त्याला म्हणाले, "हे रामा! या अरण्यात जितेंद्रिय, धर्मनिष्ठ आणि महातेजस्वी असे सुतीक्ष्ण ऋषि आहेत, ते तुझें कल्याण करतील. हे रामा! पुष्पसमुदाय वाहून नेणाऱ्या या मंदाकिनी नदीच्या प्रवाहाचे

यावज्जहामि गात्राणि जीर्णां त्वचमिवोरगः	३७
ततोऽग्निं स समाधाय हुत्वा चाज्येन मन्त्रवत् ।
शरभङ्गो महातेजाः प्रविवेश हुताशनम्	३८
तस्य रोमाणि केशांश्च तदा वह्निर्महात्मनः ।
जीर्णां त्वचं तदस्थीनि यच्च मांसं च शोणितम्	३९
स च पावकसंकाशः कुमारः समपद्यत ।
उत्थायाग्निचयात्तस्माच्छरभङ्गो व्यरोचत	४०
स लोकानाहिताग्नीनामृषीणां च महात्मनाम् ।
देवानां च व्यतिक्रम्य ब्रह्मलोकं व्यरोहत	४१
स पुण्यकर्मा भुवने द्विजर्षभः पितामहं सानुचरं ददर्श ह ।
पितामहश्चापि समीक्ष्य तं द्विजं ननन्द सुस्वागतमित्युवाच ४२

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चमः सर्गः ॥५॥[१५१]

उलट दिशेनें तूं जा, म्हणजे सुतीक्ष्ण मुनींकडे जाशील हे पुरुषश्रेष्ठा ! त्या आश्रमाला ह्याच मार्गे जातो रामा ! एक क्षणभर माझ्याकडे पहा. तोंपर्यंत जीर्ण कात टाकणाऱ्या सापाप्रमाणें मी ह्या गात्राचा त्याग करतों " ( ३२-३७ )

यात्रमाणें रामाची प्रार्थना केल्यावर त्या शरभंग मुनींनीं अग्नि स्थापन करून मंत्र म्हणून तुपाच्या आहुति दिल्या आणि त्या महातेजस्वी शरभंग मुनींनीं अग्नींत प्रवेश केला नंतर त्या महात्म्या मुनींचे रोम, केश, जीर्ण त्वचा, अस्थि, मांस आणि रक्त असें जें काहीं होतें, तें अग्नीनें दग्ध केलें. नंतर त्या अग्निराशीतून ते शरभंगमुनि अग्निसमान तेजस्वी कुमाराच्या रूपानें बाहेर येऊन प्रकाशूं लागले. नंतर अग्निहोत्री, महर्षि व देव याच्या लोकाचें अतिक्रमण करून ते ब्रह्मलोकीं गेले तेथें गेल्यावर त्या पवित्र कर्मे करणाऱ्या द्विजश्रेष्ठ शरभंग मुनींनीं सेवकासह ब्रह्मदेवाला पाहिलें व ब्रह्मदेवही त्यांना पाहून आनंदित झाले आणि " आपलें चागलें स्वागत असो " असें त्या मुनींना म्हणाले ( ३८-४२ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्य-काडापैकीं पाचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

षष्ठः सर्गः।

शरभङ्गे दिवं प्राप्ते मुनिसङ्घाः समागताः।
अभ्यगच्छन्त काकुत्स्थं रामं ज्वलिततेजसम् १
वैखानसा वालखिल्याः संप्रक्षाला मरीचिपाः।
अश्मकुट्टाश्च बहवः पत्राहाराश्च तापसाः २
दन्तोलूखलिनश्चैव तथैवोन्मज्जकाः परे।
गात्रशय्या अशय्याश्च तथैवानवकाशिकाः ३
मुनयः सलिलाहारा वायुभक्षास्तथापरे।
आकाशनिलयाश्चैव तथा स्थण्डिलशायिनः ४
तथोर्ध्ववासिनो दान्तास्तथार्द्रपटवाससः।
सजपाश्च तपोनिष्ठास्तथा पञ्चतपोऽन्विताः ५
सर्वे ब्राह्मया श्रिया युक्ता दृढयोगसमाहिताः।
शरभङ्गाश्रमे राममभिजग्मुश्च तापसाः ६

शरभंगमुनि स्वर्गी गेल्यावर सर्व ऋषि एकत्र जमून अग्नीसमान तेजस्वी अशा ककुत्स्थकुलात जन्मलेल्या रामाकडे आले ईश्वराच्या नखापासून उत्पन्न झालेले वैखानस, केसापासून उत्पन्न झालेले वालखिल्य, पादप्रक्षालनापासून उत्पन्न झालेले संप्रक्षाल, सूर्यचंद्राच्या किरणावर उपजीविका करणारे मरीचिप, शिजविल्या-वाचून कुटलेलें अन्न खाणारे असंख्य अश्मकुट्ट, वृक्षाची गळून पडलेल्या पानांवर उपजीविका करून राहणारे तपस्वी पत्राहार, दातावाचून कुटण्याचें वगैरे साधन जवळ न बाळगणारे दंतोलूखली, त्याचप्रमाणें गळ्याइतक्या पाण्यात उभे राहून तप करणारे दुसरे उन्मज्जक, भूमीवर कांहीं एक न पसरता निजणारे दुसरे गात्रशय्य, कधींच झोंप न घेणारे अशय्य, त्याचप्रमाणें एका पावलापेक्षा जास्त जागेची अपेक्षा न धरता एकाच पावलावर उभे राहून तपश्चर्या करणारे अनवकाशिक, फक्त पाणी पिऊन राहणारे मुनि, वायुभक्षण करून राहणारे दुसरे मुनि, उघड्या प्रदेशात राहणारे आकाशनिलय, ओटा घालून त्यावर पडून राहणारे स्थंडिलशायी, पर्वतशिखरासारख्या उंच प्रदेशावर नेहमीं राहणारे ऊर्ध्व-वासी, जितेंद्रिय, नेहमीं भिजलेलें वस्त्र परिधान करणारे, नेहमीं जप करीत

अभिगम्य च धर्मज्ञा रामं धर्मभृतां वरम् ।
ऊचुः परमधर्मज्ञमृषिसङ्घाः समागताः ७
त्वमिक्ष्वाकुकुलस्यास्य पृथिव्याश्च महारथः ।
प्रधानश्चापि नाथश्च देवानां मघवानिव ८
विश्रुतस्त्रिषु लोकेषु यशसा विक्रमेण च ।
पितृव्रतत्वं सत्यं च त्वयि धर्मश्च पुष्कलः ९
त्वामासाद्य महात्मानं धर्मज्ञं धर्मवत्सलम् ।
अर्थित्वान्नाथ वक्ष्यामस्तच्च नः क्षन्तुमर्हसि १०
अधर्मः सुमहान्नाथ भवेत्तस्य तु भूपतेः ।
यो हरेद्बलिषड्भागं न च रक्षति पुत्रवत् ११
युञ्जानः स्वानिव प्राणान्प्राणैरिष्टान्सुतानिव ।
नित्ययुक्तः सदा रक्षन्सर्वान्विषयवासिनः १२
प्राप्नोति शाश्वतीं राम कीर्तिं स बहुवार्षिकीम् ।

राहणारे, सर्वदा अध्ययन करणारे तपोनिष्ठ आणि उन्हाळ्यामध्यें पंचाग्नि-साधन करणारे पंचतपोन्वित, असे सर्व ब्रह्मतेजानें युक्त असलेले व योगसाधनानें एकाग्र-चित्त असलेले तपस्वी शरभंग मुनींच्या आश्रमात आले आणि एकत्र जमलेले ते धर्मज्ञ ऋषि धर्माचरण करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ आणि परम धर्मज्ञ रामाजवळ जाऊन म्हणाले– (१-७)

" इंद्र जसा देवाचा अधिपति आहे, तसा महारथि तूं इक्ष्वाकु वंशाचा आणि या पृथ्वीचा अधिपति आहेस. यश आणि पराक्रम यामुळें तूं त्रैलोक्यात विख्यात झाला आहेस पित्याची आज्ञा पाळण्याचें व्रत, सत्यवचन आणि संपूर्ण धर्म हे तुझ्या ठिकाणीं आहेत. हे नाथ ! धर्मज्ञ, धर्मवत्सल आणि महात्मा अशा तुला एक प्रार्थना करण्यासाठीं आम्ही आलों आहों आणि जें कांहीं सांगणार आहों त्याबद्दल तूं आम्हाला क्षमा कर. हे रामा ! प्राप्तीचा सहावा भाग करूपानें घेऊन-ही प्रजेचें जो पुत्राप्रमाणें रक्षण करीत नाहीं, त्या राजाला फारच मोठें पाप लागतें. प्रजेच्या रक्षणाविषयीं प्रयत्न करणारा आणि सदोदित तत्पर असणारा राजा आपल्या देशामध्यें वास्तव्य करणाऱ्या सर्व लोकाचें प्राणापेक्षाही प्रिय असलेल्या

ब्रह्मणः स्थानमासाद्य तत्र चापि महीयते १३
यत्करोति परं धर्मं मुनिर्मूलफलाशनः ।
तत्र राज्ञश्चतुर्भागः प्रजा धर्मेण रक्षतः १४
सोऽयं ब्राह्मणभूयिष्ठो वानप्रस्थगणो महान् ।
त्वं नाथोऽनाथवद्राम राक्षसैर्हन्यते भृशम् १५
एहि पश्य शरीराणि मुनीनां भावितात्मनाम् ।
हतानां राक्षसैर्घोरैर्बहूनां बहुधा वने १६
पम्पानदीनिवासानामनुमन्दाकिनीमपि ।
चित्रकूटालयानां च क्रियते कदनं महत् १७
एवं वयं न मृष्यामो विप्रकारं तपस्विनाम् ।
क्रियमाणं वने घोरं रक्षोभिर्भीमकर्मभिः १८
ततस्त्वां शरणार्थं च शरण्यं समुपस्थिताः ।
परिपालय नो राम वध्यमानान्निशाचरैः १९
परा त्वत्तो गतिर्वीर पृथिव्यां नोपपद्यते ।
परिपालय नः सर्वान्राक्षसेभ्यो नृपात्मज २०

पुत्राप्रमाणें नेहमीं रक्षण करीत असतो, तो असंख्य वर्षें टिकणारी अक्षय कीर्ति प्राप्त करतो आणि हे रामा ! त्याला ब्रह्मलोक प्राप्त होतो व तेथेंही त्याची प्रशंसाच होत असते. फलमूलावर जीविका चालवणारा मुनि जें उत्कृष्ट पुण्य मिळवितो, त्याचा चौथा अंश धर्मानें प्रजा रक्षण करणाऱ्या राजाला मिळतो. ( ८–१४ )

"सागण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, ब्राम्हणाची संख्या ज्यामध्यें अधिक आहे, अशा या वानप्रस्थाच्या मोठ्या समुदायाचा हे रामा ! तूं याचा रक्षक असतानाही अनाथाप्रमाणें राक्षस वारंवार नाश करीत आहेत. तूं आमच्याबरोबर ये आणि वनांत क्रूर राक्षसांनीं मारून टाकलेल्या भगवद्भक्त मुनींचीं शरिरें तूं पहा. पंपानदी, मंदाकिनी आणि चित्रकूटपर्वत ह्या ठिकाणीं राहणाऱ्या मुनींचा भयंकर संहार चालला आहे आणि याप्रमाणें तपस्वी लोकाना, भयंकर कर्म करणाऱ्या राक्षसां-कडून अरण्यामध्यें जें घोर दुःख दिलें जात आहे, तें आता आमच्यानें सहन करवत नाहीं. म्हणूनच रक्षणाकरिता आम्ही तुज रक्षकाकडे आलों आहों. याकरीतां

एतच्छ्रुत्वा तु काकुत्स्थस्तापसानां तपस्विनाम् ।
इदं प्रोवाच धर्मात्मा सर्वानेव तपस्विनः २१
नैवमर्हथ मां वक्तुमाज्ञाप्योऽहं तपस्विनाम् ।
केवलेन स्वकार्येण प्रवेष्टव्यं वनं मया २२
विप्रकारमपाक्रष्टुं राक्षसैर्भवतामिमम् ।
पितुस्तु निर्देशकरः प्रविष्टोऽहमिदं वनम् २३
भवतामर्थसिद्ध्यर्थमागतोऽहं यदृच्छया ।
तस्य मे यं वने वासो भाविष्यति महाफलः २४
तपस्विनां रणे शत्रून्हन्तुमिच्छामि राक्षसान् ।
पश्यन्तु वीर्यमृषयः सभ्रातुर्मे तपोधनाः २५
दत्त्वा वरं चापि तपोधनानां धर्मे धृतात्मा सह लक्ष्मणेन ।
तपोधनैश्चापि सहायदत्तः सुतीक्ष्णमेवाभिजगाम वीरः २६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे षष्ठः सर्ग ॥६॥ [१७७]

हे रामा ! आमचें संरक्षण कर. राक्षस आम्हाला मारून टाकीत आहेत हे वीरा ! पृथ्वीवर तुझ्याशिवाय आम्हाला दुसरा कोणीही त्राता नाहीं हे राजपुत्रा ! आम्हा सर्वांचें तूं राक्षसांपासून पालन कर." ( १५-२० )

हें त्या तपस्वी ऋषींचें भाषण ऐकून धर्मशील ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्या सर्व तपस्व्यांना म्हणाला, " माझ्याशीं आपण असें बोलूं नका मी तपस्वी जनांचा सेवक आहें. आपण जें सांगत आहात, तें माझें कर्तव्यच आहे तेव्हा केवल स्वकर्तव्य समजून तरी तें करण्याकरितां मला वनामध्यें जाणें अवश्यच आहे. वडिलाची आज्ञा पालन करण्याकरिता मी या वनामध्यें आलों आहे तेव्हा यातच राक्षसांनीं आपणाला दिलेलें हें दुःख दूर करण्याचेंही कार्य होणार आहे. स्वेच्छेनें मी या वनात आलोंच आहे आणि त्यात आपलेंही कार्य करण्याकरिता आल्यासारखें होणार आहे. म्हणून हा माझा वनवास मोठा फलप्रद होणार आहे. तपस्वी लोकांचे शत्रु जे राक्षस त्यांना संग्रामात मारण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां आतां तपस्वी ऋषींनीं भ्रात्यासह माझा पराक्रम पहावा." याप्रमाणें त्या तपोधन ऋषींना वचन देऊन धर्माकडेच लक्ष असलेला तो वीर राम, लक्ष्मण व तपोधना

सप्तमः सर्गः ।

रामस्तु सहितो भ्रात्रा सीतया च परंतपः ।
सुतीक्ष्णस्याश्रमपदं जगाम सह तैर्द्विजैः १
स गत्वा दूरमध्वानं नदीस्तीर्त्वा बहूदकाः ।
ददर्श विमलं शैलं महामेरुमिवोन्नतम् २
ततस्तदिक्ष्वाकुवरौ सततं विविधैर्द्रुमैः ।
काननं तौ विविशतुः सीतया सह राघवौ ३
प्रविष्टस्तु वनं घोरं बहुपुष्पफलद्रुमम् ।
ददर्शाश्रममेकान्ते चीरमालापरिष्कृतम् ४
तत्र तापसमासीनं मलपङ्कजधारिणम् ।
रामः सुतीक्ष्णं विधिवत्तपोधनमभाषत ५
रामोऽहमस्मि भगवन्भवन्तं द्रष्टुमागतः ।
तन्माभिवद धर्मज्ञ महर्षे सत्यविक्रम ६

ऋषि यासह सुतीक्ष्ण मुनींकडेच जावयास निघाला. ( २१–२६ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

शत्रुतापन राम भाऊ लक्ष्मण, सीता आणि ते ब्राम्हण यासह सुतीक्ष्ण असलेल्या मुनींच्या आश्रमाकडे निघाला बराच मार्ग आक्रमण करून भरपूर पाणी असलेल्या नद्या तरून गेल्यावर मेरुपर्वताप्रमाणें उंच असलेला एक निर्मल पर्वत त्यानें पाहिला व नंतर ते इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ राम-लक्ष्मण नानाप्रकारच्या वृक्षानीं गजबजलेल्या वनामध्यें सीतेसह प्रविष्ट झाले त्या घोर वनात प्रवेश केल्यावर एकांत प्रदेशामध्यें वल्कलें असलेला व विपुल पुष्पें व फलें यानीं संपन्न असलेल्या वृक्षानीं युक्त असा आश्रम रामानें पाहिला आणि सर्वपापनाशार्थ पद्मासन घालून समाधि लावणारे तपोधन सुतीक्ष्ण मुनि आत बसलेले असता राम योग्य रीतीनें त्यांच्या समीप जाऊन त्याना म्हणाला, " हे भगवन् ! मी राम आपल्या दर्शनाकरितां आलों आहे. म्हणून, हे धर्मज्ञ, हे महर्षे, हे अमोघ तपःसामर्थ्यवान् ! आपण माझ्याशीं बोला. " ( १–६ )

स निरीक्ष्य ततो धीरो रामं धर्मभृतां वरम् ।
समाश्लिष्य च बाहुभ्यामिदं वचनमब्रवीत् ७
स्वागतं ते रघुश्रेष्ठ राम सत्यभृतां वर ।
आश्रमोऽयं त्वयाक्रान्तः सनाथ इव सांप्रतम् ८
प्रतीक्षमाणस्त्वामेव नारोहेऽहं महायशः ।
देवलोकमितो वीर देहं त्यक्त्वा महीतले ९
चित्रकूटमुपादाय राज्यभ्रष्टोऽसि मे श्रुतः ।
इहोपयातः काकुत्स्थ देवराजः शतक्रतुः १०
उपागम्य च मे देवो महादेवः सुरेश्वरः ।
सर्वाँल्लोकाञ्जितानाह मम पुण्येन कर्मणा ११
तेषु देवर्षिजुष्टेषु जितेषु तपसा मया ।
मत्प्रसादात्सभार्यस्त्वं विहरस्व सलक्ष्मणः १२
तमुग्रतपसं दीप्तं महर्षिं सत्यवादिनम् ।
प्रत्युवाचात्मवान्रामो ब्रह्माणमिव वासवः १३

याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर धर्मनिष्ठामध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाकडे पाहून व त्याला हातानीं कवटाळून ते ज्ञानी सुतीक्ष्ण मुनि त्याला म्हणाले, " हे रघुवंशजोत्तमा ! हे सत्यनिष्ठामध्यें श्रेष्ठ रामा ! तुझें स्वागत असो. तुझे पाय लागल्यामुळें आज हा आश्रम सनाथ झाला आहे. हे महायशस्वी वीरा ! भूतलावर देहाचा त्याग करून येथून देवलोकीं न जाता तुझीच वाट पहात मी येथें बसलों आहें. स्वराज्यापासून भ्रष्ट होऊन तूं जेव्हां चित्रकूट पर्वतावर येऊन राहिलास, तेव्हांपासूनच तूं इकडे येणार येणार म्हणून मी ऐकलें होतें. असो मला ब्रह्मलोकीं जाण्याचें निमंत्रण देण्याकरिता हे रामा ! देवराज इंद्र येथें आला होता आणि येथें आल्यावर त्या तेजस्वी सुरश्रेष्ठ देवराज इंद्रानें "पुण्यकर्मानें आपण सर्व लोक संपादन केले आहेत" असें मला सांगितलें. तेव्हां हे रामा ! देवर्षि ज्यामध्यें वास्तव्य करतात असे जे लोक तपश्चर्येच्या योगानें मी मिळविले आहेत, त्या लोकांचा लक्ष्मण आणि सीता यासह माझ्या प्रसादानें तूंच उपभोग घे."
( ७-१२ )

अहमेवाहरिष्यामि स्वयं लोकान्महामुने ।
आवासं त्वहमिच्छामि प्रदिष्टमिह कानने १४
भवान्सर्वत्र कुशलः सर्वभूतहिते रतः ।
आख्यातं शरभङ्गेन गौतमेन महात्मना १५
एवमुक्तस्तु रामेण महर्षिर्लोकविश्रुतः ।
अब्रवीन्मधुरं वाक्यं हर्षेण महता युतः १६
अयमेवाश्रमो राम गुणवान्रम्यतामिति ।
ऋषिसङ्घानुचरितः सदा मूलफलैर्युतः १७
इममाश्रममागम्य मृगसङ्घा महीयसः ।
अहत्वा प्रतिगच्छन्ति लोभयित्वाकुतोभयाः १८
नान्यो दोषो भवेदत्र मृगेभ्योऽन्यत्र विद्धि वै ।
तच्छ्रुत्वा वचनं तस्य महर्षेर्लक्ष्मणाग्रजः १९
उवाच वचनं धीरो विगृह्य सशरं धनुः ।
तानहं सुमहाभाग मृगसङ्घान्समागतान् २०

असें त्यानीं सांगितल्यानंतर ब्रह्मदेवाशीं भाषण करणाऱ्या इंद्राप्रमाणें तो मनोनिग्रही राम त्या उग्र, तपस्वी, सत्यनिष्ठ व तेजस्वी सुतीक्ष्ण महर्षींना म्हणाला, "हे महामुने ! मी स्वत च तपश्चर्येच्या योगानें लोक संपादन करीन. या वनामध्यें आपण दर्शविलेल्या निवासस्थानाचीच मला अपेक्षा आहे 'आपण सर्वस्वी कुशल असून प्राणिमात्राच्या हिताविषयीं तत्पर आहात,' असें महात्म्या गौतमकुलोत्पन्न शरभंग महर्षींनीं मला सांगितलें आहे" याप्रमाणें राम म्हणाला असता त्या जगद्विख्यात सुतीक्ष्ण महर्षींना मोठा आनंद झाला आणि ते त्याच्याशीं मधुर भाषण करूं लागले, "हे रामा ! हाच आश्रम सोयींचा आहे, येथें तू आनंदानें रहा, येथें ऋषिसमुदाय रहात असून हा आश्रम नेहमीं फल-मूलांनीं संपन्न असतो या आश्रमामध्यें सर्वस्वी निर्भय असलेले हरिणाचे कळप मोठमोठ्यानाही लोभपाशात गुतवून त्याना पीडा न देता ते परत जातात हरिणाशिवाय दुसरा तिसरा दोष या आश्रमामध्यें कांहींएक नाहीं, असें तू समज ! " (१३–१९)

हें त्या महर्षींचें भाषण ऐकून तो विचारी राम त्याना म्हणाला, " हे भाग्य-

हन्यां निशितधारेण शरेणानतपर्वणा ।
भवांस्तत्राभिपज्येत किं स्यात्कृच्छ्रतरं ततः २१
एतस्मिन्नाश्रमे वासं चिरं तु न समर्थये ।
तमेवमुक्त्वोपरमं रामः संध्यामुपागमम् २२
अन्वास्य पश्चिमां संध्यां तत्र वासमकल्पयत् ।
सुतीक्ष्णस्याश्रमे रम्ये सीतया लक्ष्मणेन च २३
ततः शुभं तापसयोग्यमन्नं स्वयं सुतीक्ष्णः पुरुषर्षभाभ्याम् ।
ताभ्यां सुसत्कृत्य ददौ महात्मा संध्यानिवृत्तौ रजनीं समीक्ष्य२४
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तमः सर्गः ॥७॥ [२०१]

अष्टमः सर्गः ।

रामस्तु सहसौमित्रिः सुतीक्ष्णेनाभिपूजितः ।
परिणाम्य निशां तत्र प्रभाते प्रत्यबुध्यत १
उत्थाय च यथाकालं राघवः सह सीतया ।
उपस्पृश्य सुशीतेन तोयेनोत्पलगन्धिना २

---

वान् मुने ! ते हरिणसंघ जवळ आले असता बाणासह धनुष्य घेऊन मी त्यांचा वाकळ्या पेरांनीं युक्त असलेल्या तीक्ष्ण बाणानें वध करीन; आणि त्यांचा वध झाला असतां आपणाला दुःख होईल. तेव्हा यापेक्षा वाईट गोष्ट ती कोणती आहे ? याकरिता या आश्रमामध्यें फार दिवस राहण्याची माझी इच्छा नाहीं, '' याप्रमाणें त्या मुनींना सांगून राम संध्यावंदन करण्याकरिता गेला. सायंसंध्या केल्यावर त्या सुतीक्ष्ण मुनींच्या रम्य आश्रमामध्यें सीता आणि लक्ष्मण यासह राम राहिला व तदनंतर संध्याकाल संपून रात्र झाली असें पाहून महात्म्या सुतीक्ष्ण मुनींनीं तपस्वी लोकांना योग्य असें शुभ अन्न स्वतः त्या पुरुषश्रेष्ठ राम लक्ष्मणाना सत्कारपूर्वक अर्पण केलें (१९-२४)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत रामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥७॥

सुतीक्ष्ण मुनींकडून लक्ष्मणासह आदर-सत्कार झालेला राम त्या आश्रमात रात्र घालविल्यावर ,प्रभातकालीं जागा झाला आणि सीतेसह योग्य वेळीं

अथ तेऽग्निं सुरांश्चैव वैदेही रामलक्ष्मणौ।
काल्यं विधिवदभ्यर्च्य तपस्विशरणे वने ३
उदयन्तं दिनकरं दृष्ट्वा विगतकल्मषाः।
सुतीक्ष्णमभिगम्येदं श्लक्ष्णं वचनमब्रुवन् ४
सुखोषिताः स्म भगवंस्त्वया पूज्येन पूजिताः।
आपृच्छामः प्रयास्यामो मुनयस्त्वरयन्ति नः ५
त्वरामहे वयं द्रष्टुं कृत्स्नमाश्रममण्डलम्।
ऋषीणां पुण्यशीलानां दण्डकारण्यवासिनाम् ६
अभ्यनुज्ञातुमिच्छामः सहैभिर्मुनिपुंगवैः।
धर्मनित्यैस्तपोदान्तैर्विशिखैरिव पावकैः ७
अविषह्यातपो यावत्सूर्यो नातिविराजते।
अमार्गेणागतां लक्ष्मीं प्राप्येवान्वयवर्जितः ८
तावदिच्छामहे गन्तुमित्युक्त्वा चरणौ मुनेः।
ववन्दे सहसौमित्रिः सीतया सह राघवः ९

उठून कमलाचा वास येत असलेल्या चांगल्या पाण्यानें त्यानें स्नान केलें. नंतर सीता आणि रामलक्ष्मण ह्यानीं योग्य वेळीं ऋषींचें गृह असलेल्या त्या वनामध्यें अग्नीचें व देवाचें पूजन केलें आणि सूर्य उदयास येत असलेला पाहून ते रामप्रभृति निष्पाप त्रिवर्ग सुतीक्ष्ण मुनींकडे जाऊन गोड वाणीनें त्याना म्हणाले, " हे भगवन्! आम्ही येथें सुखानें राहिलो आणि आपण पूज्य असतानाही आमचा आदरसत्कार केलात, आता आम्ही आपला निरोप घेतों. कारण मुनि आम्हाला घाई करीत आहेत. दंडकारण्यातील पुण्यशील ऋषींचा संपूर्ण आश्रम-समुदाय पाहण्याकरिता आम्ही त्वरा करीत आहों. तेव्हा नित्य धर्मनिष्ठा, तपामुळें जितेंद्रिय आणि धूमरहित अग्नीप्रमाणें असलेल्या या मुनिश्रेष्ठासह आता जाण्याची अनुमति मिळावी, अशी आमची इच्छा आहे. याकरिता सूर्य अति प्रखर होऊन अन्यायानें ऐश्वर्य प्राप्त करून घेणाऱ्या हीन कुलात जन्मलेल्या प्रभूचा ताप ज्याप्रमाणें दुःसह होतो त्याप्रमाणें त्याचा ताप दुःसह झाला नाहीं, तोंच येथून जाण्याची आमची इच्छा आहे." असें म्हणून रामानें लक्ष्मण आणि

तौ संस्पृशन्तौ चरणावुत्थाप्य मुनिपुंगवः ।
गाढमाश्लिष्य सस्नेहमिदं वचनमब्रवीत्  १०
अरिष्टं गच्छ पन्थानं राम सौमित्रिणा सह ।
सीतया चानया सार्धं छाययेवानुवृत्तया  ११
पश्याश्रमपदं रम्यं दण्डकारण्यवासिनाम् ।
एषां तपस्विनां वीर तपसा भावितात्मनाम्  १२
सुप्राज्यफलमूलानि पुष्पितानि वनानि च ।
प्रशस्तमृगयूथानि शान्तपक्षिगणानि च  १३
फुल्लपङ्कजखण्डानि प्रसन्नसलिलानि च ।
कारण्डवविकीर्णानि तटाकानि सरांसि च  १४
द्रक्ष्यसे दृष्टिरम्याणि गिरिप्रस्रवणानि च ।
रमणीयान्यरण्यानि मयूराभिरुतानि च  १५
गम्यतां वत्स सौमित्रे भवानपि च गच्छतु ।
आगन्तव्यं च ते दृष्ट्वा पुनरेवाश्रमं प्रति  १६
एवमुक्तस्तथेत्युक्त्वा काकुत्स्थः सहलक्ष्मणः ।

सीता यासह त्या मुनींच्या चरणाना अभिवदन केलें (१-९)

*तेव्हा पायावर डोकें ठेवणाऱ्या त्या राम-लक्ष्मणाना उठवून व त्याना* कडकडून भेटून ते मुनिश्रेष्ठ सुतीक्ष्ण प्रेमपूर्वक म्हणाले, " हे रामा ! छाये-प्रमाणें अनुसरून वागणारी ही सीता आणि लक्ष्मण यासह तू उपद्रवरहित निर्विघ्न-पणें मार्गाला लाग आणि हे वीरा ! तपानें ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे, अशा या दंडकारण्यातील मुनींचे रम्य आश्रम तूं पहा फलमूलाची ज्यात समृद्धि आहे, मृगाचे मोठे कळप ज्यामध्यें आहेत आणि ज्यातील पक्षिगण शांत आहेत अशीं प्रफुल्लित वनें, प्रफुल्लित कमलें व निर्मल पाणी यानीं युक्त असून कारंडोल पक्ष्यानीं गजबजून गेलेलीं सरोवरें व तडाग, दृष्टीला मनोहर दिसणारे पर्वतावरील प्रवाह आणि मयूर पक्ष्यानीं नादित झालेलीं रमणीय अरण्यें तूं अवलोकन करशील. हे वत्सा ! जा; हे लक्ष्मणा ! तूंही जा. हे रामा ! ते आश्रम अवलोकन करून तूं पुनरपि माझ्या आश्रमाला परत येच." याप्रमाणें सुतीक्ष्णमुनीनीं सांगितलें असता

प्रदक्षिणं मुनिं कृत्वा प्रस्थातुमुपचक्रमे १७
ततः शुभतरे तूणी धनुषी चायतेक्षणा ।
ददौ सीता तयोर्भ्रात्रोः खड्गौ च विमलौ तत १८
आबध्य च शुभे तूणी चापे चादाय सस्वने ।
निष्क्रान्तावाश्रमाद्गन्तुमुभौ तौ रामलक्ष्मणौ १९
शीघ्रं तौ रूपसंपन्नावनुज्ञातौ महर्षिणा ।
प्रस्थितौ धृतचापासी सीतया सह राघवौ २०
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे अष्टम सर्ग ॥८॥[२२१]

नवम सर्ग ।

सुतीक्ष्णेनाभ्यनुज्ञातं प्रस्थितं रघुनन्दनम् ।
हृद्यया स्निग्धया वाचा भर्तारमिदमब्रवीत् १
अधर्मं तु सुसूक्ष्मेण विधिना प्राप्यते महान् ।
निवृत्तेन च शक्योऽयं व्यसनात्कामजादिह २

'ठीक आहे' असें म्हणून व त्या मुनींना प्रदक्षिणा करून लक्ष्मणासह राम पुढें जाण्यास निघाले. तेव्हा पहिल्यापेक्षा चागले भाते धनुष्यें आणि निर्मल खड्ग, दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेल्या सीतेनें त्या उभयता भ्रात्या राम-लक्ष्मणाना दिले नतर ते शुभ भाते पाठीशीं बाधून आणि टणत्कार करणारीं धनुष्यें हातात घेऊन दण्डकारण्यात जाण्याकरिता ते उभयता राम-लक्ष्मण आश्रमातून बाहेर निघाले आणि सुतीक्ष्ण महर्षींनीं अनुज्ञा दिल्यावर धनुष्य व खड्ग हातात घेऊन ते स्वरूपवान् रामलक्ष्मण सीतेसह सत्वर पुढें चालू लागले (१०-२०)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

सुतीक्ष्णमुनींनीं अनुज्ञा दिल्यावर चालू लागलेल्या भर्त्या रघुनदन रामाला मनोहर आणि सप्रेम अशा वाणीनें सीता म्हणाली, "सूक्ष्म मार्गानें विचार करून पाहिला असता अति दुर्लभ अशा मृगाच्या वधाची प्रतिज्ञा करून वनामध्यें आपण प्रवेश केलात, तर आपल्या हातून मोठा अधर्म होणार आहे आणि हा अधर्म कामजन्य व्यसनापासून आपण परावृत्त झाल्यास टळणें शक्य आहे

त्रीण्येव व्यसनान्यत्र कामजानि भवन्त्युत ।
मिथ्यावाक्यं तु परमं तस्माद्गुरुतरावुभौ　　३
परदाराभिगमनं विनावैरं च रौद्रता ।
मिथ्यावाक्यं न ते भूतं न भविष्यति राघव　　४
कुतोऽभिलषणं स्त्रीणां परेषां धर्मनाशनम् ।
तव नास्ति मनुष्येन्द्र न चाभूत्ते कदाचन　　५
मनस्यपि तथा राम न चैतद्विद्यते क्वचित् ।
स्वदारनिरतश्चैव नित्यमेव नृपात्मज　　६
धर्मिष्ठः सत्यसंधश्च पितुर्निर्देशकारकः ।
त्वयि धर्मश्च सत्यं च त्वयि सर्वं प्रतिष्ठितम्　　७
तच्च सर्वं महाबाहो शक्यं वोढुं जितेन्द्रियैः ।
तव वश्येन्द्रियत्वं च भूतानां शुभदर्शन　　८
तृतीयं यदिदं रौद्रं परप्राणाभिहिंसनम् ।
निर्वैरं क्रियते मोहात्तच्च ते समुपस्थितम्　　९

साम्प्रत तीनच व्यसनें कामापासून उत्पन्न होत असतात मिथ्या भाषण हें एक मुख्य व्यसन आहे आणि इतर दोन परस्त्रीसेवन आणि वैरावाचून क्रौर्याचें अवलंबन हीं त्याच्याहीपेक्षा भयंकर आहेत या तीन व्यसनांपैकीं, हे राघवा ! मिथ्याभाषण आपल्या हातून आजपर्यंत झालें नाहीं व पुढें होणार नाहीं धर्मनाशक असा परस्त्रियाचा अभिलाष तर कोठून असणार ? हे लोकनाथ ! तो तुम्हाला नाहीं व कधीं झालाही नाहीं इतकेंच नव्हे परंतु हे रामा ! परस्त्रीचा अभिलाष ही गोष्ट कधीं आपल्या मनामध्येंही नाहीं हे राजकुमार ! आपण नेहमीं स्वस्त्रीचेच ठिकाणीं रत आहा आपण पित्याची आज्ञा परिपालन करणारे असून धर्मनिष्ठ व सत्यप्रतिज्ञ आहात आणि धर्म व सत्य हे सर्व आपल्या ठिकाणींच अचल आहेत (१-७)

" आपल्या दर्शनानें प्राण्यांचें शुभ करणाऱ्या हे महा पराक्रमी राघवा ! जितेंद्रिय पुरुषाच्या हातून एकपत्नीव्रताचें परिपालन होणें व सत्य भाषण हें सर्व शक्य आहे. कारण इंद्रियें आपल्या स्वाधीन आहेत. परंतु मोहानें वैराशिवाय दुसऱ्या-

प्रतिज्ञातस्त्वया वीर दण्डकारण्यवासिनाम् ।
ऋषीणां रक्षणार्थाय वधः संयति रक्षसाम् १०
एतन्निमित्तं वचनं दण्डका इति विश्रुतम् ।
प्रस्थितस्त्वं सह भ्रात्रा धृतबाणशरासनः ११
ततस्त्वां प्रस्थितं दृष्ट्वा मम चिन्ताकुलं मनः ।
त्वद्वृत्तं चिन्तयन्त्या वै भवेन्निःश्रेयसं हितम् १२
नहि मे रोचते वीर गमनं दण्डकान्प्रति ।
कारणं तत्र वक्ष्यामि वदन्त्याः श्रूयतां मम १३
त्वं हि बाणधनुष्पाणिर्भ्रात्रा सह वनं गतः ।
दृष्ट्वा वनचरान्सर्वान्कच्चित्कुर्याः शरव्ययम् १४
क्षत्रियाणामिह धनुर्हुताशस्येन्धनानि च ।
समीपतः स्थितं तेजो बलमुच्छ्रयते भृशम् १५

प्राण्याची हिंसा करणें हें जें रौद्रसंज्ञक तिसरें व्यसन, तें आज आपणाला प्राप्त झालें आहे कारण हे वीरा ! दण्डकारण्यनिवासी ऋषींच्या संरक्षणाकरिता संग्रामामध्यें राक्षसाचा वध करण्याची आपण प्रतिज्ञा केली आहे. याकरिता दंडका या नावानें प्रसिद्ध असलेल्या वनामध्यें आपण भावासह धनुर्बाण घेऊन निघाला तेव्हा आपण निघाला असें पाहून आणि आपलें वचन खरें करून दाखविण्याचा आपला स्वभाव लक्षात आणून मी आपल्या पारलौकिक व ऐहिक सुखाचा विचार करूं लागलें म्हणजे माझें मन व्याकुल होतें सारांश, हे वीरा ! दंडकारण्यात जाणें मला रुचत नाहीं मी त्याचें कारण सांगतें, आपण तें माझ्या तोंडून ऐका (८-१३)

" आपण धनुर्बाण हातात घेऊन भावासह वनात गेल्यावर तेथील सर्व वनचर राक्षसाना अवलोकन करून कदाचित् बाणाचा व्यय कराल हेंच आधीं हिंसारूप अधर्मप्राप्तीचें कारण आहे बरें, बाण न सोडता आपण स्वस्थ बसाल म्हणावें तरी तेंही शक्य नाहीं, कारण ज्याप्रमाणें इंधनें अग्नीचे तेज अधिक वृद्धिंगत करतात, त्याप्रमाणें समीप असलेलें धनुष्य क्षत्रियाचें तेज व बल अत्यन्त वृद्धिंगत करीत असतें हे महापराक्रमी राघवा ! ज्यांतील पशुपक्षी शांत

पुरा किल महाबाहो तपस्वी सत्यवाक्शुचिः ।
कस्मिंश्चिदभवत्पुण्ये वने रतमृगद्विजे १६
तस्यैव तपसो विघ्नं कर्तुमिन्द्रः शचीपतिः ।
खड्गपाणिरथागच्छदाश्रमं भटरूपधृक् १७
तस्मिंस्तदाश्रमपदे निहितः खड्ग उत्तमः ।
स न्यासविधिना दत्तः पुण्ये तपसि तिष्ठतः १८
स तच्छस्त्रमनुप्राप्य न्यासरक्षणतत्परः ।
वने तु विचरत्येव रक्षन्प्रत्ययमात्मनः १९
यत्र गच्छत्युपादातुं मूलानि च फलानि च ।
न विना याति तं खड्गं न्यासरक्षणतत्परः २०
नित्यं शस्त्रं परिवहन्क्रमेण स तपोधनः ।
चकार रौद्रीं स्वां बुद्धिं त्यक्त्वा तपसि निश्चयम् २१
ततः स रौद्राभिरतः प्रमत्तोऽधर्मकर्षितः ।
तस्य शस्त्रस्य संवासाज्जगाम नरकं मुनिः २२

आहेत अशा एका पवित्र वनात पूर्वी एक सत्यनिष्ठ व शुचिर्भूत तपस्वी तपश्चर्या करीत होता, असें सांगतात त्याच्या तपाला विघ्न आणण्याकरितां शचीपति इंद्र हातांत खड्ग घेऊन व योद्ध्याचें रूप धारण करून त्याच्या आश्रमात आला आणि त्यानें त्या आश्रमामध्यें पुण्यकारक तपश्चर्या करणाऱ्या त्या मुनींपाशीं तो उत्कृष्ट खड्ग ठेव म्हणून दिला ( १४-१८ )

" तेव्हा तें शस्त्र प्राप्त झाल्यावर ते मुनि त्या ठेवीचें रक्षण करण्याविषयीं तत्पर राहून लोकामध्यें असलेल्या आपल्या विश्वासाचें रक्षण करीत करीतच वनामध्यें संचार करीत असत. मुळें व फळें आणण्याकरिता जिकडे जावयाचें असेल तिकडे ठेव रक्षण्याविषयीं तत्पर असलेले ते मुनि त्या खड्गावाचून जात नसत. परंतु नेहमीं शस्त्र बरोबर बाळगल्यामुळें त्या तपोधनाचा तपाविषयीं असलेला निश्चय शिथिल होऊन क्रूर बुद्धि त्याचे ठिकाणीं उत्पन्न झाली आणि तदनंतर बेफाम होऊन व अधर्मानें ग्रस्त होऊन क्रूर कर्माविषयीं तत्पर झालेले ते मुनि त्या शस्त्राच्या सहवासामुळें नरकाला गेले शस्त्रसंयोगासंबंधानें अशी गोष्ट

एवमेतत्पुरावृत्तं शस्त्रसंयोगकारणम् ।
अग्निसंयोगवद्धेतुः शस्त्रसंयोग उच्यते २३
स्नेहाच्च बहुमानाच्च स्मारये त्वां न शिक्षये ।
न कथंचन सा कार्या गृहीतधनुषा त्वया २४
बुद्धिर्वैरं विना हन्तुं राक्षसान्दण्डकाश्रितान् ।
अपराधं विना हन्तुं लोको वीर न मंस्यते २५
क्षत्रियाणां तु वीराणां वनेषु नियतात्मनाम् ।
धनुषा कार्यमेतावदार्तानामभिरक्षणम् २६
क्व च शस्त्रं क्व च वनं क्व च क्षात्रं तपः क्व च ।
व्याविद्धमिदमस्माभिर्देशधर्मस्तु पूज्यताम् २७
कदर्यकलुषा बुद्धिर्जायते शस्त्रसेवनात् ।
पुनर्गत्वा त्वयोध्यायां क्षत्रधर्मं चरिष्यसि २८

पूर्वी घडलेली आहे साराश अग्निसंयोग ज्याप्रमाणें काष्ठाचे ठिकाणीं विकृति उत्पन्न होण्याचें कारण आहे, त्याचप्रमाणें शस्त्रसंयोग हें पुरुषाचें मनामध्यें विकृति उत्पन्न होण्याचें कारण आहे. प्रेमामुळें आणि बहुमानामुळें मी आपणाला या गोष्टीचें स्मरण देत आहें. उपदेश करीत नाहीं, म्हणून दंडकारण्यात राहणाऱ्या राक्षसाचा वध वैरावाचून करण्याची ती बुद्धि हातात धनुष्य धारण करून आपण कधींही आणूं नका कारण हे वीरा! अपराधावाचून राक्षसाचा वध करणें लोकाना संमत होणार नाहीं (१८-२५)

"वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या जितेंद्रिय दुःखी जनाचें संरक्षण करणें एवढेंच वीर क्षत्रियाच्या धनुष्याचें काम आहे. शस्त्र कोणीकडे, वन कोणीकडे, क्षात्रधर्म कोणीकडे आणि तप कोणीकडे! आपण या परस्पर विरुद्ध धर्माचें सेवन करण्याचें सोडून जो देशधर्म असेल त्यालाच मान देणें योग्य आहे. म्हणजे तपोवन-धर्माचेंच सेवन करावें, हेंच योग्य आहे. शस्त्र धारण केल्यानें पुरुषाची बुद्धि कृपणाप्रमाणें कलुषित होते आतां आमचा क्षत्रधर्म असल्यामुळें शस्त्र धारण करणें हें आमचें कर्तव्यच आहे, असें आपण म्हणत असाल, तर अयोध्येमध्यें फिरून गेल्यावर आपण खुशाल त्या क्षत्रधर्मानें वागा. राज्याचा त्याग करून जर

अक्षया तु भवेत्प्रीतिः श्वश्रूश्वशुरयोर्मम ।
यदि राज्यं हि संन्यस्य भवेस्त्वं निरतो मुनिः २९
धर्मादर्थ प्रभवति धर्मात्प्रभवते सुखम् ।
धर्मेण लभते सर्वं धर्मसारमिदं जगत् ३०
आत्मानं नियमैस्तैस्तैः कर्षयित्वा प्रयत्नतः ।
प्राप्यते निपुणैर्धर्मो न सुखाल्लभते सुखम् ३१
नित्यं शुचिमतिः सौम्य चर धर्मं तपोवने ।
सर्वं तु विदितं तुभ्यं त्रैलोक्यमपि तत्त्वतः ३२
स्त्रीचापलादेतदुपाहृतं मे धर्मं च वक्तुं तव कः समर्थः ।
विचार्य बुद्धया तु सहानुजेन यद्रोचते तत्कुरु माचिरेण ३३

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे नवमः सर्गः ॥९॥[२५४]

---

आपण वनामध्येंच रत होऊन मुनिवृत्तीनें नेहमीं वागाल तर माझ्या सासूसासऱ्यांना आनंदच होईल (२६-२९)

" हिंसा करणें हा अधर्म असल्यामुळें ऋषिधर्मानें वागण्यातच कल्याण आहे, कारण धर्मापासूनच अर्थप्राप्ति होते व धर्मापासूनच सुखनिष्पत्ति होते साराश, धर्मानेंच सर्व कांहीं प्राप्त होत असून धर्म हाच एक या जगतामध्यें सार (सेवनीय पदार्थ) आहे प्रयत्नपूर्वक नाना-प्रकारच्या नियमांनीं देह कृश करून विचारानें मनाला स्वाधीन करून ठेवणाऱ्या समर्थ लोकांनाच धर्म प्राप्त होत असतो, सुखानें कधीं सुख साधन जो धर्म त्याची प्राप्ति होत नाहीं म्हणून, हे सौम्य ! आपण आपली मति नेहमीं शुद्ध ठेवून तपोवनामध्यें धर्माचें अनुष्ठान करीत असावें आपणाला सर्व त्रैलोक्याचीही खरीखुरी माहिती आहे स्त्रियांच्या उतावीळ स्वभावामुळें माझ्या तोंडून हें भाषण निघून गेलें, कारण आपणाला धर्माचा उपदेश करण्याला कोण समर्थ आहे ? तथापि लक्ष्मणासह मन पूर्वक याचा विचार करून जें रुचेल तें करण्याला आपण विलंब लावूं नये "(३०-३३)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

दशमः सर्गः ।

वाक्यमेतत्तु वैदेह्या व्याहृतं भर्तृभक्तया ।
श्रुत्वा धर्मे स्थितो रामः प्रत्युवाचाथ जानकीम् १
हितमुक्तं त्वया देवि स्निग्धया सदृशं वचः ।
कुलं व्यपदिशन्त्या च धर्मज्ञे जनकात्मजे २
किं नु वक्ष्याम्यहं देवि त्वयैवोक्तमिदं वचः ।
क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ३
ते चार्ता दण्डकारण्ये मुनयः संशितव्रताः ।
मां सीते स्वयमागम्य शरण्यं शरणं गताः ४
वसन्तः कालकालेषु वने मूलफलाशनाः ।
न लभन्ते सुखं भीरु राक्षसैः क्रूरकर्मभिः ।
भक्ष्यन्ते राक्षसैर्भीमैर्नरमांसोपजीविभिः ५
ते भक्ष्यमाणा मुनयो दण्डकारण्यवासिनः ।
अस्मानभ्यवपद्येति मामूचुर्द्विजसत्तमाः ६
मया तु वचनं श्रुत्वा तेषामेवं मुखाच्च्युतम् ।

भर्त्याचे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या सीतेचें हें भाषण ऐकून धर्मनिष्ठ राम त्या जनककन्येला म्हणाला, " हे देवि, हे धर्मवेत्ते, हे जनककन्ये ! क्षत्रियाचा कुलधर्म सांगण्याच्या हेतूनें माझे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या तूं केलेलें हें भाषण हिताचें असून तुलाच योग्य आहे हे देवि ! या तुझ्या म्हणण्याला मी आता काय बरें उत्तर देऊं ? रक्षण होत नसल्यामुळें लोकाना दुःखी होऊन रडत बसण्याची पाळी येऊं नये, याकरिता क्षत्रियानीं धनुष्य धारण करावयाचें, हें तूं सांगून टाकलें आहेस हे सीते ! प्रखर व्रत आचरणारे ते मुनि दंडकारण्यात दुःखी झाले आहेत आणि स्वतः माझी भेट घेऊन ते मला रक्षक म्हणून शरण आले आहेत. हे भीरु ! कंदफळें खाऊन सर्व काल वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या मुनींना क्रूर राक्षसामुळें सुख होत नाहीं, कारण नरमांस भक्षण करणारे क्रूर राक्षस त्याना खात असतात. त्यांना राक्षस खाऊं लागले असतां ते दण्डकारण्यवासी मुनि माझ्याकडे आले आणि " आमच्यावर अनुग्रह कर " असें ते द्विजश्रेष्ठ मला म्हणाले. ( १–६ )

कृत्वा वचनशुश्रूषां वाक्यमेतदुदाहृतम् ७
प्रसीदन्तु भवन्तो मेऽह्रीरेषा तु ममातुला ।
यदीदृशैरहं विप्रैरुपस्थेयैरुपस्थितः ८
किं करोमीति च मया व्याहृतं द्विजसंनिधौ ।
सर्वैरेव समागम्य वागियं समुदाहृता ९
राक्षसैर्दण्डकारण्ये बहुभिः कामरूपिभिः ।
अर्दिताः स्म भृशं राम भवान्नस्तत्र रक्षतु १०
होमकाले तु संप्राप्ते पर्वकालेषु चानघ ।
धर्षयन्ति स्म दुर्धर्षा राक्षसाः पिशिताशनाः ११
राक्षसैर्धर्षितानां च तापसानां तपस्विनाम् ।
गतिं मृगयमाणानां भवान्नः परमा गतिः १२
कामं तपःप्रभावेण शक्ता हन्तुं निशाचरान् ।
चिरार्जितं न चेच्छामस्तपः खण्डयितुं वयम् १३
बहुविघ्नं तपो नित्यं दुश्चरं चैव राघव ।

---

" तेव्हां याप्रमाणें त्याच्या मुखातून निघालेलें भाषण श्रवण करून आणि त्याच्या म्हणण्याकडे लक्ष देण्याचा विचार करून मी त्याना म्हटलें, " मी आपण होऊनच तुम्हांकडे यणें योग्य असता रक्षण करण्याविषयीं विनंति करण्याकरिता अशा प्रकारच्या ब्राम्हणाना माझ्याकडे येण्याचा प्रसंग आला हीच मला अत्यन्त लाजिरवाणी गोष्ट आहे. याकरिता आपण मजवर कृपा करा मी आपलें काय काम करूं ? " असें मी द्विजाशीं बोललों, तेव्हा ते सर्वही मुनि एकत्र जमून मला म्हणाले- " हे रामा ! इच्छानुसार रूप धारण करणाऱ्या असंख्य राक्षसानीं आम्हाला अतिशय गाजून सोडलें आहे, त्यापासून तू आमचें रक्षण कर हे निष्पापा ! होमकाल व पर्वकाल प्राप्त झाला असता ते मासभक्षक दुर्धर राक्षस अतिशय गर्दी करून आम्हाला चहूंकडून घेरून टाकतात राक्षसानीं घेरल्यामुळें त्राता शोधूं लागलेल्या आम्हा तपस्वी मुनींचा श्रेष्ठ त्राता तूंच आहेस मनात आणल्यास तप.सामर्थ्यानें आम्ही त्या राक्षसाचा वध करण्यास समर्थ आहों, परंतु पुष्कळ दिवसापासून संपादन केलेल्या तपाचा व्यय करण्याची आमची इच्छा

तेन शापं न मुञ्चामो भक्ष्यमाणाश्च राक्षसैः १४
तदर्द्यमानाद्रक्षोभिर्दण्डकारण्यवासिभिः ।
रक्षकस्त्वं सह भ्रात्रा त्वंनाथा हि वयं वने १५
मया चैतद्वचः श्रुत्वा कार्त्स्न्येन परिपालनम् ।
ऋषीणां दण्डकारण्ये संश्रुतं जनकात्मजे १६
संश्रुत्य च न शक्ष्यामि जीवमानः प्रतिश्रवम् ।
मुनीनामन्यथा कर्तुं सत्यमिष्टं हि मे सदा १७
अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्मणाम् ।
न तु प्रतिज्ञां संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः १८
तदवश्यं मया कार्यमृषीणां परिपालनम् ।
अनुक्तेनापि वैदेहि प्रतिज्ञाय कथं पुनः १९
मम स्नेहाच्च सौहार्दादिदमुक्तं त्वया वचः ।
परितुष्टोऽस्म्यहं सीते न ह्यनिष्टोऽनुशास्यते २०

नाहीं कारण हे राघवा ! तपामध्यें नेहमीं अनेक विघ्नें येत असतात व यामुळें तें साध्य होणें दुर्घट आहे म्हणून राक्षस आम्हाला भक्षण करीत असतानाही आम्ही शाप देत नाहीं. याकरितां दंडकारण्यवासी राक्षसांचा त्रास होत असलेल्या आमचें भ्रात्यासह तूं रक्षण कर, तूंच आमचा रक्षण करणारा आहेस असें समजून आम्ही वनात वास्तव्य करीत आहोंत " (७-१५)

" हें भाषण ऐकून हे जनककन्ये ! दंडकारण्यामध्यें ऋषींचें सर्वस्वी पालन करण्याची मी प्रतिज्ञा केली आहे आणि एकदा जी प्रतिज्ञा केली, त्या प्रतिज्ञेचें जिवात जीव आहे तोंपर्यंत माझ्यानें उल्लंघन होणें शक्य नाहीं कारण सत्य हें मला नेहमींच इष्ट आहे हे सीते ! मी आपल्या जीविताचा अथवा लक्ष्मणासह तुझादेखील त्याग करीन, परंतु केलेली प्रतिज्ञा आणि त्यातूनही विशेषत ब्राम्हणांना दिलेलें वचन मी मोडणार नाहीं. सारांश, हे सीते ! कोणी सांगण्याची अपेक्षा न धरताही ऋषींचें पालन मला अवश्य केलें पाहिजे तेव्हां प्रतिज्ञा करूनही तें कसें बरें न करावें ? हे सीते ! माझे ठिकाणीं तुझें प्रेम असल्यानें आणि माझ्याविषयीं तुझें हृदय सद्भावनेनें परिपूर्ण असल्यानें तूं हें भाषण केलें आहेस

सदृशं चानुरूपं च कुलस्य तव शोभने ।
सधर्मचारिणी मे त्वं प्राणेभ्योऽपि गरीयसी २१
इत्येवमुक्त्वा वचनं महात्मा सीतां प्रियां मैथिलराजपुत्रीम् ।
रामो धनुष्मान्सह लक्ष्मणेन जगाम रम्याणि तपोवनानि २२
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे दशमः सर्गः ॥१०॥ [२७६]

एकादश: सर्ग. ।

अग्रतः प्रययौ रामः सीता मध्ये सुशोभना ।
पृष्ठतस्तु धनुष्पाणिर्लक्ष्मणोऽनुजगाम ह १
तौ पश्यमानौ विविधाञ्शैलप्रस्थान्वनानि च ।
नदीश्च विविधा रम्या जग्मतुः सह सीतया २
सारसांश्चक्रवाकांश्च नदीपुलिनचारिणः ।
सरांसि च सपद्मानि युतानि जलजैः खगैः ३
यूथवन्धांश्च पृषतां मदोन्मत्तान्विषाणिनः ।
महिषांश्च वराहांश्च गजांश्च द्रुमवैरिणः ४

आणि ते ऐकून मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहे कारण जो अप्रिय असेल त्याला कोणी हिताचा उपदेश करीत नसतो हे कल्याणि ! हें तुझें भाषण तुझ्या प्रेमाला योग्य असून तुझ्या कुलालाही शोभणारें आहे आणि म्हणून सहधर्मचारिणी अशी तूं मला प्राणापेक्षांही प्रिय आहेस " (१६ २१)

असो, मैथिल राजकन्या प्रिया सीतेशीं हे व अशा प्रकारचें भाषण करून महात्म्या धनुर्धारी राम लक्ष्मणासह रम्य तपोवनामध्यें गेला. ( २२ )

याप्रमाणें वा मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

राम पुढें, महाकल्याणी सीता मध्यें चालूं लागली आणि धनुष्य हातात घेऊन लक्ष्मण मागून जाऊं लागला, नाना प्रकारचीं पर्वतशिखरें, वनें आणि अनेक प्रकारच्या रमणीय नद्या अवलोकन करीत करीत ते उभयता राम-लक्ष्मण सीतेसह पुढें जाऊं लागले आणि जाताना नद्यांच्या वाळवंटातून राहणारे सारस व चक्रवाक पक्षी, जलामध्यें राहणाऱ्या पक्ष्यांनीं व कमलांनी युक्त असलेलीं सरोवरें,

ते गत्वा दूरमध्वानं लम्बमाने दिवाकरे ।
ददृशुः सहिता रम्यं तटाकं योजनायतम् ५
पद्मपुष्करसंबाधं गजयूथैरलंकृतम् ।
सारसैर्हंसकादम्बैः संकुलं जलजातिभिः ६
प्रसन्नसलिले रम्ये तस्मिन्सरसि शुश्रुवे ।
गीतवादित्रनिर्घोषो न तु कश्चन दृश्यते ७
ततः कौतूहलाद्रामो लक्ष्मणश्च महारथः ।
मुनिं धर्मभृतं नाम प्रष्टुं समुपचक्रमे ८
इदमत्यद्भुतं श्रुत्वा सर्वेषां नो महामुने ।
कौतूहलं महज्जातं किमिदं साधु कथ्यताम् × ९
तेनैवमुक्तो धर्मात्मा राघवेण मुनिस्तदा ।

टोळ्या करून राहणारे पृषत मृग, मदोन्मत्त झालेले दाडांनीं युक्त रानरेडे, वराह आणि वृक्षशत्रु गज यानाही ते अवलोकन करीत चालले. जाता जाता दूर मार्ग आक्रमण केल्यानंतर सूर्य कलल्यावर सायंकालीं एक जुटीनें जात असलेल्या त्या त्रिवर्गांनीं प्रत्येक बाजूला एकेक योजन लांब असलेलें एक सरोवर अवलोकन केलें (१–५)

तें सरोवर तांबड्या व पांढऱ्या कमलांनीं गजबजून गेलें होतें, हत्तींच्या कळपांनीं तें भूषित झालेलें होतें व सारस, राजहंस आणि कलहंस आणि मत्स्यादि जलचर प्राणी यांनीं तें व्याप्त झालेलें होतें निर्मल जलानें युक्त असलेल्या त्या रम्य सरोवरांत गायनाचा व वाद्याचा सूर ऐकूं येत होता. परंतु तेथें कोणीही दृष्टोत्पत्तीत येत नव्हतें तेव्हां तें जाणण्याच्या उत्सुकतेमुळें राम व महारथि लक्ष्मण धर्मभृत नावाच्या मुनींना विचारूं लागले– " हे महामुने ! हें अत्यंत आश्चर्य श्रवण करून आम्हां सर्वांनाच मोठी उत्सुकता उत्पन्न झाली आहे. याकरितां, तें काय हें आपण आम्हांस सविस्तर सांगावें. " (६–९)

याप्रमाणें रामानें विनंति केली असतां ते धर्मात्मे मुनि त्या सरोवराचा

× नवव्या श्लोकांत " वक्तव्यं यदि चेत् विप्र नातिगुह्यमपि प्रभो " येवढा श्लोकार्ध गोविंद राजकीय प्रतींत अधिक आहे.

१०
प्रभावं सरसः क्षिप्रमाख्यातुमुपचक्रमे
इदं पञ्चाप्सरो नाम तटाकं सार्वकालिकम् * ।   ११
निर्मितं तपसा राम मुनिना माण्डकर्णिना
स हि तेपे तपस्तीव्रं माण्डकर्णिर्महामुनिः ।   १२
दशवर्षसहस्राणि वायुभक्षो जलाशये
ततः प्रव्यथिताः सर्वे देवाः साग्निपुरोगमाः ।   १३
अब्रुवन्वचनं सर्वे परस्परसमागताः
अस्माकं कस्यचित्स्थानमेष प्रार्थयते मुनिः ।   १४
इति संविग्नमनसः सर्वे तत्र दिवौकसः
ततः कर्तुं तपोविघ्नं सर्वदेवैर्नियोजिताः ।   १५
प्रधानाप्सरसः पञ्च विद्युच्चलितवर्चसः
अप्सरोभिस्ततस्ताभिर्मुनिर्दृष्टपरावरः ।   १६
नीतो मदनवश्यत्वं देवानां कार्यसिद्धये
ताश्चैवाप्सरसः पञ्च मुनेः पत्नीत्वमागताः ।   १७
तटाके निर्मितं तासां तस्मिन्नन्तर्हितं गृहम्

प्रभाव लागलीच सांगूं लागले- " हे रामा ! माडकर्णीमुनींनीं पंचाप्सर नावाचें
हें सार्वकालिक सरोवर तपानें निर्माण केलेलें आहे त्या माडकर्णी महामुनीनें वायु
भक्षण करून जलाशयामध्यें दहा हजार वर्षे प्रखर तप केलें तेव्हां अग्निप्रभृति
सर्व देव भ्याले आणि सर्वही एकत्र होऊन म्हणाले, " आपणापैकीं कोणाचें
स्थान घेण्याची तर हा मुनि इच्छा करीत नाहीं ना ? " अशा कल्पनेनें ते सर्व
मनामध्यें उद्विग्न झाले नंतर त्या मुनींच्या तपाला विघ्न करण्याकरितां चंचल
विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी असलेल्या पांच श्रेष्ठ अप्सरांची सर्व देवांनीं मिळून योजना
केली (१०-१५)

' त्या अप्सरांनीं ऐहिक व पारलौकिक धर्माधर्म माहीत असलेल्या त्या
मुनींला देवांचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां कामाधीन करून सोडलें त्याच पांच

* ' सर्वकालिकम् ' म्हणजे सदा सर्वदा उदकानें तुडुंब भरलेलें व कमळांनीं
फुललेलें असें

तत्रैवाप्सरसः पञ्च निवसन्त्यो यथासुखम् ।
रमयन्ति तपोयोगान्मुनिं यौवनमास्थितम् १८
तासां संक्रीडमानानामेष वादित्रनिःस्वनः ।
श्रूयते भूषणोन्मिश्रो गीतशब्दो मनोहरः १९
आश्चर्यमिति तस्यैतद्वचनं भावितात्मनः ।
राघवः प्रतिजग्राह सह भ्रात्रा महायशाः २०
एवं कथयमानः स ददर्शाश्रममण्डलम् ।
कुशचीरपरिक्षिप्तं ब्राह्मया लक्ष्म्या समावृतम् २१
प्रविश्य सह वैदेह्या लक्ष्मणेन च राघवः ।
तदा तस्मिन्स काकुत्स्थः श्रीमत्याश्रममण्डले २२
उषित्वा स सुखं तत्र पूज्यमानो महर्षिभिः ।
जगाम चाश्रमांस्तेषां पर्यायेण तपस्विनाम् २३
येषामुषितवान्पूर्वं सकाशे स महास्त्रवित् ।

अप्सरा त्या मुनीच्या पत्न्या झाल्या व त्याच्यासह क्रीडा करण्याकरितां त्या मुनींनें त्या सरोवरामध्यें एक गुप्त गृह निर्माण केलें. त्या गुप्त गृहामध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या पाच अप्सरा तपःसामर्थ्यामुळें तरुण असलेल्या त्या मुनीला यथेष्ट रमवीत आहेत व क्रीडा करीत असलेल्या त्या अप्सराच्याच वाद्याचा व भूषणध्वनीनें मिश्र झालेला गायनाचा मनोहर ध्वनि कानावर येत आहे." असें त्या धर्मभृत संज्ञक मुनींनें सांगितलें असता "आश्चर्य" असें म्हणून त्या जितेंद्रिय मुनीचें हें सांगणें भ्रात्यासह महायशस्वी रामानें ऐकून घेतलें (१६-२०)

याप्रमाणें तो राम त्या मुनींशीं संभाषण करीत असतांना ठिकठिकाणीं दर्भ व वल्कलें ज्यांत सर्वत्र पसरलेलीं आहेत आणि कृष्णाजिनप्रभृति ब्राम्हणाच्या संपत्तीनें जो व्याप्त झालेला आहे, असा एक आश्रमसमुदाय त्या रामानें अवलोकन केला. तेव्हां सीता आणि लक्ष्मण यासह ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्या वैभवसंपन्न आश्रममंडलांत प्रविष्ट होऊन आणि महर्षि मानसन्मान करीत असता तेथें राहिल्यावर क्रमानें त्या तपस्वी मुनींच्या आश्रमांत तो हिंडूं लागला. ज्या ऋषींच्या आश्रमामध्यें रामानें पूर्वी एकदा वास्तव्य केलें होतें, त्या मुनींच्याही आश्रमांत तो

क्वचित्परिदशान्मासानेकसंवत्सरं क्वचित् २४
क्वचिच्च चतुरो मासान्पञ्च षट् च परान्क्वचित् ।
अपरत्राधिकान्मासानध्यर्धमधिकं क्वचित् २५
त्रीन्मासानष्टमासांश्च राघवो न्यवसत्सुखम् २६
तत्र संवसतस्तस्य मुनीनामाश्रमेषु वै ।
रमतश्चानुकूल्येन ययुः संवत्सरा दश २७
परिसृत्य च धर्मज्ञो राघवः सह सीतया ।
सुतीक्ष्णस्याश्रमपदं पुनरेवाजगाम ह २८
स तमाश्रममागम्य मुनिभिः परिपूजितः ।
तत्रापि न्यवसद्रामः किञ्चित्कालमरिंदमः २९
अथाश्रमस्थो विनयात्कदाचित्तं महामुनिम् ।
उपासीनः स काकुत्स्थः सुतीक्ष्णमिदमब्रवीत् ३०
अस्मिन्नरण्ये भगवन्नगस्त्यो मुनिसत्तमः ।
वसतीति मया नित्यं कथाः कथयतां श्रुतम् ३१

महाब्रवेत्ता राम पुनरपि वास्तव्य करण्याकरिता गेला कोठें तो दहा महिने राहिला, कोठें एक वर्षभर त्यानें वास्तव्य केलें, कोठें त्यानें चार महिने काढले, कोठें पाच पाच सहा सहा महिने वास्तव्य केलें, दुसऱ्या काहीं आश्रमामध्यें वर्षा-पेक्षाही अधिक महिने तो राहिला, कोठें दीड वर्षापेक्षाही अधिक दिवस काढले, आणि कोठें तीन तीन महिने व कोठें आठ आठ महिने त्या राघवानें सुखानें वास्तव्य केलें. ( २१-२६ )

याप्रमाणें मुनींच्या आश्रमामध्यें राम आनंदानें राहूं लागला असता दहा वर्षे सुखानें गेलीं. तेव्हा सर्व आश्रम हिंडून तो धर्मज्ञ राम सीतेसह पुनरपि सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमाला आला त्या आश्रमाला आल्यावर मुनींनीं सर्व प्रकारें त्याचें आदरातिथ्य केलें व त्या ठिकाणींही काही दिवसपर्यंत तो शत्रु-दमन राम राहिला. नंतर आश्रमात रहात असलेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम एकदा सुतीक्ष्ण महामुनींजवळ बसला असताना विनयानें त्याना म्हणाला, " हे भगवन् ! मुनिश्रेष्ठ अगस्त्य या अरण्यात वास्तव्य करीत असतात, असें मी कथा

न तु जानामि तं देशं वनस्यास्य महत्तया ।
कुशाश्रमपदं रम्यं महर्षेस्तस्य धीमतः ३२
प्रसादार्थं भगवतः सानुजः सह सीतया ।
अगस्त्यमधिगच्छेयमभिवादयितुं मुनिम् ३३
मनोरथो महानेष हृदि संपरिवर्तते ।
यदहं तं मुनिवरं शुश्रूषेयमपि स्वयम् ३४
इति रामस्य स मुनिः श्रुत्वा धर्मात्मनो वचः ।
सुतीक्ष्णः प्रत्युवाचेदं प्रीतो दशरथात्मजम् ३५
अहमप्येतदेव त्वां वक्तुकामः सलक्ष्मणम् ।
अगस्त्यमभिगच्छेति सीतया सह राघव ३६
दिष्ट्या त्विदानीमर्थेऽस्मिन्स्वयमेव ब्रवीषि माम् ।
अयमाख्यामि ते राम यत्रागस्त्यो महामुनिः ३७
योजनान्याश्रमात्तात याहि चत्वारि वै ततः ।
दक्षिणेन महाञ्छ्रीमानगस्त्यभ्रातुराश्रमः ३८
स्थलीमायवनोद्देशे पिप्पलीवनशोभिते ।

---

सांगण्याच्या ऋषींपासून बरेच वेळा ऐकलें आहे. परंतु हें वन मोठें असल्यामुळें तो प्रदेश मला ठाऊक नाहीं आणि त्या विवेकी महर्षींचें तें रम्य आश्रमस्थान कोठें आहे, हेंही मला माहीत नाहीं. तथापि त्या भगवानांची कृपा व्हावी, एतदर्थ लक्ष्मण आणि सीता यासह त्या अगस्त्य मुनींना अभिवंदन करण्याकरितां मी जाणार आहें व त्या श्रेष्ठ मुनींची एकदा आपण स्वतः सेवा करावी, हा मोठा मनोरथ माझ्या हृदयामध्यें घोळत आहे." (२७-३४)

याप्रमाणें धर्मात्म्या रामाचें भाषण श्रवण करून ते सुतीक्ष्णमुनि त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्या दशरथपुत्राला म्हणाले, "हे राघवा ! सीतेसह अगस्त्य-मुनींकडे जा, हेंच लक्ष्मणासह तुला मी सांगणारच होतों, तें तूं स्वतःच याविषयीं मला विचारीत आहेस, हें फारच चांगलें आहे. हे रामा ! हा मी तुला महामुनि अगस्त्य कोठें राहतात तें सांगतों. रामा ! या आश्रमा-पासून चार योजनें तूं दक्षिणेस जा, म्हणजे अगस्त्य मुनींच्या भावाचा एक

बहुपुष्पफले रम्ये नानाविहगनादिते ३९
पद्मिन्यो विविधास्तत्र प्रसन्नसलिलाशयाः ।
हंसकारण्डवाकीर्णाश्चक्रवाकोपशोभिताः ४०
तत्रैकां रजनीं व्युष्य प्रभाते राम गम्यताम् ।
दक्षिणां दिशमास्थाय वनखण्डस्य पार्श्वतः ४१
तत्रागस्त्याश्रमपदं गत्वा योजनमन्तरम् ।
रमणीये वनोद्देशे बहुपादपशोभिते ४२
रंस्यते तत्र वैदेही लक्ष्मणश्च त्वया सह ।
स हि रम्यो वनोद्देशो बहुपादपसंयुतः ४३
यदि बुद्धिः कृता द्रष्टुमगस्त्यं तं महामुनिम् ।
अद्यैव गमने बुद्धिं रोचयस्व महामते ४४
इति रामो मुनेः श्रुत्वा सह भ्रात्राऽभिवाद्य च ।
प्रतस्थेऽगस्त्यमुद्दिश्य सानुजः सह सीतया ४५
पश्यन्वनानि चित्राणि पर्वतांश्चाभ्रसंनिभान् ।
सरांसि सरितश्चैव पथि मार्गवशानुगान् ४६

मोठा आश्रम तेथें आहे. पिप्पली वनानीं शोभित, नानाप्रकारच्या पक्ष्यानीं निनादित, भरपूर फलमूलानीं युक्त आणि रम्य अशा स्वाभाविक वनप्रदेशीं तो आश्रम आहे व त्या ठिकाणीं हंस व कारंडोल पक्ष्यानीं व्याप्त, चक्रवाक पक्ष्यानीं सुशोभित आणि निर्मल जलानें युक्त अशीं नानाप्रकारचीं कमलयुक्त सरोवरें आहेत. हे रामा! त्या ठिकाणीं एक रात्र रहा आणि पहाटे वनप्रदेशाच्या बाजूनें दक्षिण दिशेनें जा दक्षिण दिशेस एक योजन प्रदेश तू चालून गेलास म्हणजे विपुल वृक्षानीं सुशोभित अशा रम्य वनप्रदेशांत अगस्त्यमुनींचा आश्रम तूं पाहशील व तुझ्यासह लक्ष्मण आणि सीता यांची तेथें करमणूक होईल. कारण तो वनप्रदेश विपुल वृक्षानीं युक्त व रम्य आहे. तेव्हां त्या अगस्त्य महर्षीचें दर्शन घेण्याचा जर तुझा विचार झाला असेल तर, हे महामते! तूं आजच जाण्याचा बेत कर." (३५-४४)

याप्रमाणें सुतीक्ष्ण मुनींचें भाषण ऐकून लक्ष्मणासह रामानें त्याना अभि-

सुतीक्ष्णेनोपदिष्टेन गत्वा तेन पथा सुखम्।
इदं परमसंहृष्टो वाक्यं लक्ष्मणमब्रवीत् ४७
एतदेवाश्रमपदं नूनं तस्य महात्मनः।
अगस्त्यस्य मुनेर्भ्रातुर्दृश्यते पुण्यकर्मणः ४८
यथा हीमे वनस्यास्य ज्ञाताः पथि सहस्रशः।
संनताः फलभारेण पुष्पभारेण च द्रुमाः ४९
पिप्पलीनां च पक्वानां वनादस्मादुपागतः।
गन्धोऽयं पवनोत्क्षिप्तः सहसा कटुकोदयः ५०
तत्र तत्र च दृश्यन्ते संक्षिप्ताः काष्ठसंचयाः।
लूनाश्च परिदृश्यन्ते दर्भा वैदूर्यवर्चसः ५१
एतच्च वनमध्यस्थं कृष्णाभ्रशिखरोपमम्।
पावकस्याश्रमस्थस्य धूमाग्रं संप्रदृश्यते ५२
विविक्तेषु च तीर्थेषु कृतस्नाना द्विजातयः।
पुष्पोपहारं कुर्वन्ति कुसुमैः स्वयमर्जितैः ५३

वदन केलें आणि अगस्त्यमुनींकडे जाण्याचा हेतु मनात धरून लक्ष्मण व सीता यांसह तो राम तेथून निघाला. जाता जाता मार्गामध्यें लागलेलीं सुंदर वनें मेघासारखे पर्वत सरोवरें आणि नद्या पहात पहात तो मार्गानें चालला. याप्रमाणें सुतीक्ष्ण मुनींनीं सांगितलेल्या त्या मार्गानें निर्विघ्नपणें गेल्यावर राम अतिशय आनंदित होऊन लक्ष्मणाला म्हणाला, ' खरोखर त्या महात्म्या अगस्त्य मुनींच्या पुण्यवान् भ्रात्याचाच हा आश्रम दिसत आहे. कारण ज्या प्रकारचें वन आपण ऐकलें होतें तशाच प्रकारच्या फलभारानें लवलेले हे वृक्ष या वनाच्या मार्गामध्यें हजारोंनीं दिसून येत आहेत. तिखटपणा ज्यामध्यें आहे असा हा पक्क पिप्पली फलांचा गंध वायूमुळें या वनांतून येत आहे (४५-५०)

' ठिकठिकाणीं लाकडाचे ढीग रचून ठेवलेले दिसत आहेत आणि वैदूर्य मण्याप्रमाणें तेजस्वी दर्भही कापून नेलेले दिसत आहेत. कृष्णवर्ण मेघ आणि पर्वतशिखर यांचीच उपमा ज्याला योग्य आहे असा हा आश्रमीय अग्नीचा धूर वनामध्यें दिसत आहे. एकान्त प्रदेशांतील तीर्थामध्यें स्नान केलेले हे ब्राह्मण

ततः सुतीक्ष्णवचनं यथा सौम्य मया श्रुतम् ।
अगस्त्यस्याश्रमो भ्रातुर्नूनमेष भविष्यति ५४
निगृह्य तरसा मृत्युं लोकानां हितकाम्यया ।
यस्य भ्रात्रा कृतेयं दिक् शरण्या पुण्यकर्मणा ५५
इहैकदा किल क्रूरो वातापिरपि चेल्वलः ।
भ्रातरौ सहितावास्तां ब्राह्मणघ्नौ महासुरौ ५६
धारयन्ब्राह्मणं रूपमिल्वलः संस्कृतं वदन् ।
आमन्त्रयति विप्रान्स श्राद्धमुद्दिश्य निर्घृणः ५७
भ्रातरं संस्कृतं कृत्वा ततस्तं मेषरूपिणम् ।
तान्द्विजान्भोजयामास श्राद्धदृष्टेन कर्मणा ५८
ततो भुक्तवतां तेषां विप्राणामिल्वलोऽब्रवीत् ।
वातापे निष्क्रमस्वेति स्वरेण महता वदन् ५९
ततो भ्रातुर्वचः श्रुत्वा वातापिर्मेषवन्नदन् ।
भित्त्वा भित्त्वा शरीराणि ब्राह्मणानां विनिष्पतत् ६०

स्वसंपादित पुष्पानी पुण्यसंपादक असें देवपूजन करीत आहेत सारांश हे सौम्या! सुतीक्ष्णाचें सांगणें ज्याप्रमाणें मीं ऐकलें आहे, त्याप्रमाणें पाहता खरोखर हा अगस्त्य मुनींच्या भावाचाच आश्रम असला पाहिजे. या आश्रमातील अधिपतीच्या भ्रात्यानें म्हणजे अर्थात् पुण्यकर्म करणाऱ्या अगस्त्यमुनींनीं लोकांचें हित करण्याकरिता एका मृत्युतुल्य दैत्याचा स्वसामर्थ्यानें निग्रह करून ही दिशा लोकांनीं वास्तव्य करण्याला योग्य केली आहे. (५१-५५)

"इतिहासामध्यें असें सांगितलें आहे कीं, या ठिकाणीं एकदा क्रूर वातापी आणि इल्वल असे ब्राम्हणघातकी महादैत्य दोन भाऊ एकत्र रहात होते तो निर्दय इल्वल ब्राम्हणाचें रूप धारण करून आणि ब्राम्हणाप्रमाणें संस्कारयुक्त भाषण करून ब्राम्हणांना श्राद्धाकरिता निमंत्रण करीत असे आणि मेषरूप धारण केलेल्या आपल्या त्या वातापी भ्रात्याला शिजवून श्राद्धविधीनें तो त्या ब्राम्हणांना भोजन घालीत असे नंतर त्या विप्रांचें भोजन झाल्यावर, "हे वातापे! बाहेर नीघ" असे शब्द उच्च स्वरानें उच्चारीत उच्चारीत इल्वल त्याला हाक मारी आणि

ब्राह्मणानां सहस्राणि तैरेवं कामरूपिभिः ।
विनाशितानि संहत्य नित्यशः पिशिताशनै ६१
अगस्त्येन तदा देवैः प्रार्थितेन महर्षिणा ।
अनुभूय किल श्राद्धे भक्षितः स महासुरः ६२
ततः संपन्नमित्युक्त्वा दत्त्वा हस्ते वने जलम् ।
भ्रातरं निष्क्रमस्वेति इल्वलः समभाषत ६३
स तदा भाषमाणं तु भ्रातरं विप्रघातिनम् ।
अब्रवीत्प्रहसन्धीमानगस्त्यो मुनिसत्तमः ६४
कुतो निष्क्रमितु शक्तिर्मया जीर्णस्य रक्षसः ।
भ्रातुस्तु मेषरूपस्य गतस्य यमसादनम् ६५
अथ तस्य वचः श्रुत्वा भ्रातुर्निधनसंश्रितम् ।
प्रधर्षयितुमारेभे मुनिं क्रोधान्निशाचरः ६६
सोऽभ्यद्रवद्द्विजेन्द्रं तं मुनिना दीप्ततेजसा ।

भावाची ती हाक ऐकल्यावर मेषाप्रमाणें शब्द करणारा तो वातापी ब्राम्हणाचीं शरिरें फाडून बाहेर निघे इच्छेप्रमाणें रुप धारण करणाऱ्या त्या मांसभक्षक राक्षसांनीं नित्य याप्रमाणें हजारों ब्राम्हणांचा वध केला असतां, देवाच्या प्रार्थनेवरून अगस्त्य महर्षीनीं श्राद्धाचें निमंत्रण घेऊन खरोखर तो मोठा राक्षस भक्षण करून टाकला ( ५६-६२ )

"श्राद्धामध्यें भोजन झाल्यावर इल्वलानें अगस्त्यमुनींना " नित्य श्राद्ध संपन्नं ( म्हणजे मीं केलेलें नित्य श्राद्ध परिपूर्ण झालें ना ? )" असें विचारलें आणि " सुसंपन्नं " ( म्हणजे तुझें नित्यश्राद्ध चांगल्या रीतीनें शेवटास गेलें ) असें त्यांनीं सांगितल्यावर आपोशनाकरितां त्यांच्या हातावर उदक घालून त्या इल्वलानें " बाहेर ये " असें भ्रात्याला हाक मारून म्हटलें तेव्हां त्या भ्रात्याला हाक मारणाऱ्या ब्रह्मघातकी इल्वलाला ते बुद्धिमान् मुनिश्रेष्ठ अगस्त्य हंसत हंसत म्हणाले, " अरे, मी जिरवून टाकल्यामुळें यमसदनाला गेलेल्या तुझ्या मेषरूप राक्षस भ्रात्याला बाहेर येण्याला आता सामर्थ्य कोठें उरलें आहे ? " भ्रात्याच्या मरणासंबंधानें त्या अगस्त्यमुनींचें हें भाषण श्रवण केल्यावरोबर त्या निशाचर

चक्षुषानलकल्पेन निर्दग्धो निधनं गतः ६७
तस्यायमाश्रमो भ्रातुस्तटाकवनशोभितः।
विप्रानुकम्पया येन कर्मेदं दुष्करं कृतम् ६८
एवं कथयमानस्य तस्य सौमित्रिणा सह।
रामस्यास्तं गतः सूर्यः संध्याकालोऽभ्यवर्तत ६९
उपास्य पश्चिमां संध्यां सह भ्रात्रा यथाविधि।
प्रविवेशाश्रमपदं तमृषिं चाभ्यवादयत् ७०
सम्यक्प्रतिगृहीतस्तु मुनिना तेन राघवः।
न्यवसत्तां निशामेकां प्राश्य मूलफलानि च ७१
तस्यां रात्र्यां व्यतीतायामुदिते रविमण्डले।
भ्रातरं तमगस्त्यस्य आमन्त्रयत राघवः ७२
अभिवादये त्वा भगवन्सुखमस्म्युषितो निशाम्।
आमन्त्रये त्वां गच्छामि गुरुं ते द्रष्टुमग्रजम् ७३
गम्यतामिति तेनोक्तो जगाम रघुनन्दनः।
यथोद्दिष्टेन मार्गेण वनं तच्चावलोकयन् ७४

इल्वलानें क्रोधानें त्या मुनींना ठार मारण्याचा विचार केला आणि त्या द्विजश्रेष्ठाच्या अंगावर धावला; परंतु दैदीप्यमान् तेजानें युक्त असलेल्या त्या अगस्त्य मुनींनीं आपल्या अग्नितुल्य दृष्टीनेंच त्याला दग्ध करून टाकल्यामुळें तो मृत्यु पावला असो. ब्राम्हणाची दया येऊन ज्यांनीं हें दुष्कर कर्म केलें, त्या अगस्त्यमुनींच्या भ्रात्याचा हा सरोवरें व वन यांनीं सुशोभित झालेला आश्रम आहे." (६३-६८)

याप्रमाणें राम लक्ष्मणाला सांगत आहे, तोंच सूर्य अस्तंगत होऊन संध्याकाळ झाली तेव्हां लक्ष्मणासह यथाविधि सायं-संध्या करून रामानें त्या आश्रमात प्रवेश केला आणि त्या ऋषींना अभिवंदन केलें त्या मुनींनीं त्याचें उत्तम प्रकारें स्वागत केलें आणि मुळें व फळें भक्षण करून तो ती रात्र तेथें राहिला. नंतर ती रात्र संपून रविमंडलाचा उदय झाल्यावर राम त्या अगस्त्य-मुनींच्या भ्रात्याचा निरोप घेऊं लागला, " हे भगवन् ! मी आपल्याला अभिवंदन करतों. रात्रीं येथें माझें वास्तव्य सुखानें झालें. आतां आपली अनुज्ञा

नीवारान्पनसान्सालान्वञ्जुलांस्तिनिशांस्तथा ।
चिरिबिल्वान्मधूकांश्च बिल्वानथ च तिन्दुकान् ७५
पुष्पितान्पुष्पिताग्राभिर्लताभिरुपशोभितान् ।
ददर्श रामः शतशस्तत्र कान्तारपादपान् ७६
हस्तिहस्तैर्विमृदितान्वानरैरुपशोभितान् ।
मत्तैः शकुनिसङ्घैश्च शतशः प्रतिनादितान् ७७
ततोऽब्रवीत्समीपस्थं रामो राजीवलोचनः ।
पृष्ठतोऽनुगतं वीरं लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम् ७८
स्निग्धपत्रा यथा वृक्षा यथा क्षान्ता मृगद्विजाः ।
आश्रमो नातिदूरस्थो महर्षेर्भावितात्मनः ७९
अगस्त्य इति विख्यातो लोके स्वेनैव कर्मणा ।
आश्रमो दृश्यते तस्य परिश्रान्तश्रमापहः ८०
प्राज्यधूमाकुलवनश्चीरमालापरिष्कृतः ।
प्रशान्तमृगयूथश्च नानाशकुनिनादितः ८१

घेऊन आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या दर्शनाकरिता मी जातों " असें रामानें त्याना सांगितल्यावर " जा " म्हणून त्या मुनींनीं त्याला सांगितलें व नंतर तो रघुनंदन राम सुतीक्ष्णमुनींनीं सांगितलेल्या मार्गानें तें वन पहात पहात पुढें गेला जल-कदंब, फणस, सालवृक्ष, अशोक, तिवस, करज, मोहा आणि टेंभुर्णी असे प्रफुल्लित लतांनीं सुशोभित असलेले शेंकडों वनवृक्ष रामानें जातां जातां पाहिले आणि हत्तींच्या सोंडांनीं मुरगळलेले, वानरांनीं सुशोभित व मत्त पक्षिगणांनीं निनादित असेही शेंकडों वृक्ष त्यानें पाहिले. (६९–७७)

नंतर समीपच असलेल्या व बरोबर आलेल्या लक्ष्मीवर्धक वीर लक्ष्मणाला कमलनयन राम म्हणाला, " ज्याअर्थी स्निग्ध पानांनीं युक्त असलेले वृक्ष आणि शांत पशुपक्षी येथें दिसत आहेत, त्याअर्थी त्या जितेंद्रिय महर्षींचा आश्रम येथून फार दूर नाहीं अग् म्हणजे पर्वतांचें स्तंभन करणें या स्वतःच्याच कर्मानें जगतामध्यें अगस्त्य म्हणून हे मुनि प्रख्यात झाले आहेत आणि श्रमलेल्या लोकांचे श्रम परिहार करणारा हा त्यांचा आश्रम दिसत आहे. या आश्रमातील

निगृह्य तरसा मृत्युं लोकानां हितकाम्यया ।
दक्षिणा दिक् कृता येन शरण्या पुण्यकर्मणा ८२
तस्येदमाश्रमपदं प्रभावाद्यस्य राक्षसैः ।
दिगियं दक्षिणा त्रासाद् दृश्यते नोपभुज्यते ८३
यदा प्रभृति चाक्रान्ता दिगियं पुण्यकर्मणा ।
तदा प्रभृति निर्वैराः प्रशान्ता रजनीचराः ८४
नाम्ना चेयं भगवतो दक्षिणा दिक्प्रदक्षिणा ।
प्रथिता त्रिषु लोकेषु दुर्धर्षा क्रूरकर्मभिः ८५
मार्गं निरोद्धुं सततं भास्करस्याचलोत्तमः ।
संदेशं पालयंस्तस्य विन्ध्यशैलो न वर्धते ८६
अयं दीर्घायुषस्तस्य लोके विश्रुतकर्मणः ।

वन विपुल धुरानें व्यापलेलें आहे, वल्कलसमुदायानीं याला शोभा आलेली आहे, यातील मृगाचे कळप शांत आहेत आणि अनेक प्रकारच्या पक्ष्यांनीं हा नादित केलेला आहे. ज्या पुण्यवान् मुनींनीं लोकांचें हित करण्याकरितां मृत्युतुल्य दैत्याचा स्वसामर्थ्यानें निग्रह करून दक्षिण दिशा लोकांनीं वास करण्यास योग्य केली आणि ज्याच्या प्रभावामुळें राक्षस अजूनसुद्धां भीतीनें या दक्षिण दिशेचा स्वकीय प्रदेश म्हणून उपभोग घेण्यास धजत नाहींत व जिच्याकडे नुसतें पहात मात्र असतात, त्या मुनींचा हा आश्रम होय जेव्हांपासून ते पुण्यवान् मुनि या प्रदेशांत संचार करूं लागले, तेव्हांपासून येथील निशाचर प्राणी त्याच्या ठिकाणीं असलेल्या वैराचा आणि आपल्या क्रूर कर्माचा त्याग करून ते येथें राहिले आहेत. (७८–८४)

" त्या भगवान् अगस्त्य मुनींच्या केवळ नावाच्याच प्रभावानें हा दक्षिण दिशेंतील प्रदेश सरळ म्हणजे दुष्टाच्या अंतःकरणांतील वैर वगैरे नाहींसा करण्यास समर्थ झालेला असून क्रूरकर्मी लोकांनीं जिंकण्यास अशक्य म्हणून त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध आहे मेरुपर्वताशीं स्पर्धा करून सूर्याचा मार्ग नेहमीं आडवूं पाहणारा श्रेष्ठ पर्वत विंध्याद्रि त्या अगस्त्य मुनींची आज्ञा परिपालन करून राहिलेला असल्यामुळें अद्यापि वृद्धिंगत होत नाहीं. लोकांमध्यें ज्याचें कर्म

अगस्त्यस्याश्रमः श्रीमान्विनीतमृगसेवितः ८७
एष लोकार्चितः साधुर्हिते नित्यं रतः सताम् ।
अस्मानधिगतानेष श्रेयसा योजयिष्यति ८८
आराधयिष्याम्यत्राहमगस्त्यं तं महामुनिम् ।
शेषं च वनवासस्य सौम्य वत्स्याम्यहं प्रभो ८९
अत्र देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः ।
अगस्त्यं नियताहाराः सततं पर्युपासते ९०
नात्र जीवेन्मृषावादी क्रूरो वा यदि वा शठः ।
नृशंसः पापवृत्तो वा मुनिरेष यथाविधः ९१
अत्र देवाश्च यक्षाश्च नागाश्च पतगैः सह ।
वसन्ति नियताहारा धर्ममाराधयिष्णवः ९२
अत्र सिद्धा महात्मानो विमानैः सूर्यसंनिभैः ।
त्यक्त्वा देहान्नवैर्देहैः स्वर्याताः परमर्षयः ९३
यक्षत्वममरत्वं च राज्यानि विविधानि च ।

प्रख्यात आहे, अशा त्या दीर्घायु अगस्त्य मुनींचा हा निरुपद्रवी मृगानीं आश्रय केलेला भव्य आश्रम होय लोकाना पूज्य असलेले हे साधु सज्जनाचें हित करण्याविषयीं नेहमीं तत्पर असतात, तेव्हा येथें आलेल्या आपलेंही हे कल्याणच करतील. या आश्रमात राहून मी त्या अगस्त्य महर्षीची सेवा करीन आणि हे सौम्य व समर्थ लक्ष्मणा ! वनवासाचे अवशिष्ट राहिलेले दिवस मी येथेंच व्यतीत करीन. (८५–८९)

"या आश्रमामध्यें गंधर्वासह देव, सिद्ध आणि महर्षि पवित्र आहार करून नेहमीं अगस्त्य मुनींची सेवा करीत असतात. या आश्रमात असत्य भाषण करणारा, निर्दय, शठ, दुष्ट अथवा पापी मनुष्य जिवंत रहात नाहीं; कारण हे मुनीच तशा प्रकारचे आहेत या आश्रमामध्यें देव, यक्ष, गरुडप्रभृतीसह सर्प पुण्यसंपादन करण्याकरिता शुद्ध आहार करून रहात असतात. याच आश्रमामध्यें तपश्चर्येमुळें सिद्ध झालेले महात्मे श्रेष्ठ ऋषि जीर्ण देहाचा त्याग आणि नवीन देहाचा स्वीकार करून व सूर्यासारख्या तेजस्वी विमानामध्यें आरूढ होऊन

अत्र देवाः प्रयच्छन्ति भूतैराराधिताः शुभैः ९४
आगताः स्माश्रमपदं सौमित्रे प्रविशाग्रतः ।
निवेदयेह मां प्राप्तमृषये सह सीतया ९५

इत्यार्षे श्रीम० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे एकादशः सर्गः ॥११॥ [२७१]

द्वादशः सर्गः ।

स प्रविश्याश्रमपदं लक्ष्मणो राघवानुजः ।
अगस्त्यशिष्यमासाद्य वाक्यमेतदुवाच ह १
राजा दशरथो नाम ज्येष्ठस्तस्य सुतो बली ।
रामः प्राप्तो मुनिं द्रष्टुं भार्यया सह सीतया २
लक्ष्मणो नाम तस्याहं भ्राता त्ववरजो हितः ।
अनुकूलश्च भक्तश्च यदि ते श्रोत्रमागतः ३
ते वयं वनमत्युग्रं प्रविष्टाः पितृशासनात् ।
द्रष्टुमिच्छामहे सर्वे भगवन्तं निवेद्यताम् ४

स्वर्गाला गेले आहेत प्राण्यांनीं या आश्रमामध्यें देवाचें सत्कर्मांनीं आराधन केलें असता ते देव त्याना यक्षत्व, देवत्व आणि नानाप्रकारचीं राज्यें देतात असो. हे लक्ष्मणा ! आपण आश्रमाला येऊन पोंचलों प्रथम तूं आत प्रवेश कर आणि सीतेसह मी आल्याचें त्या ऋषींना साग " (९०-९५)

याप्रमाणे वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

रामाचा धाकटा भाऊ लक्ष्मण आश्रमांत गेला व अगस्त्य मुनींच्या एका शिष्याजवळ जाऊन त्याला म्हणाला, " दशरथ म्हणून जो राजा होऊन गेला, त्याचा बलाढ्य ज्येष्ठ पुत्र राम भार्या सीतेसह मुनींचें दर्शन घेण्याकरिता येथें आला आहे. अनुकूल, अनुरक्त व त्याच्या हिताविषयीं तत्पर असा मी त्याचा लक्ष्मण नावाचा कनिष्ठ भाऊ आहें आणि बरेंच दिवस मी वनवासात असल्यामुळें तुमच्याही ऐकण्यांत असल्याचा संभव आहे. ते आम्ही निवर्गे पित्याच्या आज्ञेमुळें अतिशय भयंकर अशा वनामध्यें प्रविष्ट झालों आहों आणि ऋषिवर्यांचें दर्शन घेण्याची आम्हा सर्वांची इच्छा आहे; आपण त्याना निवेदन करा. "

तस्य तद्वचनं श्रुत्वा लक्ष्मणस्य तपोधनः ।
तथेत्युक्त्वाग्निशरणं प्रविवेश निवेदितुम् ५
स प्रविश्य मुनिश्रेष्ठं तपसा दुष्प्रधर्षणम् ।
कृताञ्जलिरुवाचेदं रामागमनमञ्जसा ६
यथोक्तं लक्ष्मणेनैव शिष्योऽगस्त्यस्य संमतः ।
पुत्रौ दशरथस्येमौ रामो लक्ष्मण एव च ७
प्रविष्टावाश्रमपदं सीतया सह भार्यया ।
द्रष्टुं भवन्तमायातौ शुश्रूषार्थमरिंदमौ ८
यदत्रानन्तरं तत्त्वमाज्ञापयितुमर्हसि ।
ततः शिष्यादुपश्रुत्य प्राप्तं रामं सलक्ष्मणम् ९
वैदेहीं च महाभागामिदं वचनमब्रवीत् ।
दिष्ट्या रामश्चिरस्याद्य द्रष्टुं मां समुपागतः १०
मनसा काङ्क्षितं ह्यस्य मयाप्यागमनं प्रति ।
गम्यतां सत्कृतो रामः सभार्यः सह लक्ष्मणः ११

तें त्या लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून तो तपोधन शिष्य "ठीक आहे" असं म्हणून अगस्त्यमुनींना कळविण्यासाठीं होमशाळेंत गेला आणि आंत प्रवेश केल्यावर तपश्चर्येमुळें ज्याच्या समोर इतरांना जाणेंही अशक्य झालें होतें, अशा त्या मुनिश्रेष्ठ अगस्त्यांना हात जोडून त्यानें रामाच्या आगमनाची वार्ता सांगितली आणि अगस्त्य मुनींना संमत असलेल्या त्या शिष्यानें लक्ष्मणानें सांगितल्याप्रमाणें त्यांना कळविलें. तो म्हणाला– "हे दशरथाचे पुत्र राम लक्ष्मण रामपत्नी सीतेसह आश्रमांत आले आहेत. हे शत्रुदमन करणारे राम-लक्ष्मण आपलें दर्शन घेण्याकरितां आणि कांहीं वेळ आपली सेवा करण्याकरितां येथें आले आहेत. तेव्हां पुढें काय करावयाचें, याविषयीं आपण मला आज्ञा करावी" (१–९)

शिष्यापासून लक्ष्मणासह राम आणि महाभाग्यवती सीता आल्याचें ऐकून अगस्त्यमुनि म्हणाले, "अहोभाग्य माझें ! कीं पुष्कळ दिवसांनीं आज राम मला भेटावयाला आला आहे. त्याच्या आगमनाची मलाही मनापासून इच्छा झाली होती. याकरितां जा आणि भार्या व लक्ष्मण यांसह रामाचा सत्कार

प्रवेश्यतां समीपं मे किमसौ न प्रवेशितः ।
एवमुक्तस्तु मुनिना धर्मज्ञेन महात्मना १२
अभिवाद्याब्रवीच्छिष्यस्तथेति नियताञ्जलिः ।
तदा निष्क्रम्य संभ्रान्तः शिष्यो लक्ष्मणमब्रवीत् १३
क्वासौ* रामो मुनिं द्रष्टुमेतु प्रविशतु स्वयम् ।
ततो गत्वाश्रमपदं शिष्येण सह लक्ष्मणः १४
दर्शयामास काकुत्स्थं सीतां च जनकात्मजाम् ।
तं शिष्यः प्रश्रितं वाक्यमगस्त्यवचनं ब्रुवन् १५
प्रावेशयद्यथान्यायं सत्कारार्हं सुसत्कृतम् ।
प्रविवेश ततो रामः सीतया सह लक्ष्मणः १६
प्रशान्तहरिणाकीर्णमाश्रमं ह्यवलोकयन् ।
स तत्र ब्रह्मणः स्थानमग्नेः स्थानं तथैव च १७

---

करून त्याला माझ्याजवळ घेऊन ये. तूं त्याला आपल्या बरोबरच घेऊन का आला नाहींस ?" याप्रमाणें धर्मवेत्त्या महात्म्या अगस्त्यमुनींनीं सांगितलें असता तो शिष्य हात जोडून अभिवंदनपूर्वक 'आज्ञा गुरुजी' असें त्यांना म्हणाला आणि नंतर गोंधळून गेलेला तो शिष्य होमशाळेंतून बाहेर येऊन लक्ष्मणाला म्हणाला, "हा राम कोठें आहे ? त्यानें मुनींचें दर्शन करण्यासाठीं आश्रमांत खुशाल प्रवेश करावा" असें शिष्यानें सांगितल्यानंतर लक्ष्मण त्या शिष्यासह आश्रमाबाहेर गेला आणि त्याला ककुत्स्थकुलोत्पन्न राम व सीता हीं त्या लक्ष्मणानें दाखविलीं तेव्हां सत्कारास पात्र असलेल्या त्या रामाला अगस्त्य मुनींचें सप्रेम भाषण कथन करीत करीत त्याचा चांगला सत्कार करून तो शिष्य योग्य रीतीनें त्याला आंत घेऊन गेला (९-१६)

---

* श्लोक १४ मधील शिष्याच्या वाक्यावरून पाहतां त्याच शिष्यानें "कोऽसौ राम." असा प्रश्न लक्ष्मणास पुन: विचारण्याइतका अगस्तींचा शिष्य अडाणी असणें संभवत नाहीं. या ठिकाणीं गोविन्दराजीय प्रतींत "क्वासौ" असा पाठ आहे व तोच शुद्ध दिसत आहे. यास्तव गोविन्दराजीय प्रतीला अनुसरून पाठ शुद्ध केला आहे.

विष्णोः स्थानं महेन्द्रस्य स्थानं चैव विवस्वतः ।
सोमस्थानं भगस्थानं स्थानं कौवेरमेव च १८
धातुर्विधातुः स्थानं च वायोः स्थानं तथैव च ।
स्थानं च पाशहस्तस्य वरुणस्य महात्मनः १९
स्थानं तथैव गायत्र्या वसूनां स्थानमेव च ।
स्थानं च नागराजस्य गरुडस्थानमेव च २०
कार्तिकेयस्य च स्थानं धर्मस्थानं च पश्यति ।
ततः शिष्यैः परिवृतो मुनिरप्यभिनिष्पतत् २१
तं ददर्शाग्रतो रामो मुनीनां दीप्ततेजसम् ।
अब्रवीद्वचनं वीरो लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम् २२
एष लक्ष्मण निष्क्रामत्यगस्त्यो भगवानृषिः ।
औदार्येणावगच्छामि निधानं तपसामिदम् २३
एवमुक्त्वा महाबाहुरगस्त्यं सूर्यवर्चसम् ।
जग्राहापततस्तस्य पादौ च रघुनन्दनः २४
अभिवाद्य तु धर्मात्मा तस्थौ रामः कृताञ्जलिः ।

---

तेव्हा लक्ष्मण व सीता यासह तो राम शांत हरिणांनीं व्याप्त असलेला तो आश्रम पहात पहात आत गेला व जाता जाता ब्रह्मदेव, रुद्र, विष्णु, इंद्र, सूर्य, सोम, ( स्थूलमंडलाभिमानी ) भग, कुबेर, ब्रह्मदेव आणि विश्वकर्मा, वायु, हातात पाश घेतलेला महात्मा वरुण, गायत्री, अष्ट वसु, नागराज, गरुड, स्कंद आणि यमराज इत्यादि देवतांचीं स्थानें त्यानें पाहिलीं. असो. राम येत आहे असें पाहून शिष्यगणानीं परिवेष्टित असलेले मुनीही त्यास सामोरे येऊं लागले. तेव्हा मुनींच्या पुढें असलेले ते उज्ज्वल तेजस्वी अगस्त्य अवलोकन करून वीर राम लक्ष्मीवर्धक लक्ष्मणाला म्हणाला, "हे लक्ष्मणा ! भगवान् अगस्त्य ऋषि येत आहेत आणि हें तपाचें भांडारच असावें असें त्याच्या मुखावरच्या काहीं विलक्षण प्रकारच्या तेजावरून दिसत आहे." (१७-२३)

याप्रमाणें सूर्यासारख्या तेजस्वी अगस्त्यमुनींविषयीं लक्ष्मणाला सांगून महापराक्रमी रघुनंदन रामानें त्या सामोरे येणाऱ्या अगस्त्यमुनींचे पाय धरले

सीतया सह वैदेह्या तदा रामः सलक्ष्मणः २५
प्रतिगृह्य च काकुत्स्थमर्चयित्वासनोदकैः ।
कुशलप्रश्नमुक्त्वा च आस्यतामिति सोऽब्रवीत् २६
अग्निं हुत्वा प्रदायार्घ्यमतिथीन्प्रतिपूज्य च ।
वानप्रस्थेन धर्मेण स तेषां भोजनं ददौ २७
प्रथमं चोपविश्याथ धर्मज्ञो मुनिपुंगवः ।
उवाच राममासीनं प्राञ्जलिं धर्मकोविदम् २८
अन्यथा खलु काकुत्स्थ तपस्वी समुदाचरन् ।
दुःसाक्षीव परे लोके स्वानि मांसानि भक्षयेत् २९
राजा सर्वस्य लोकस्य धर्मचारी महारथः ।
पूजनीयश्च मान्यश्च भवान्प्राप्तः प्रियातिथिः ३०
एवमुक्त्वा फलैर्मूलैः पुष्पैश्चान्यैश्च राघवम् ।
पूजयित्वा यथाकामं ततोऽगस्त्यस्तमब्रवीत् ३१
इदं दिव्यं महच्चापं हेमवज्रविभूषितम् ।
वैष्णवं पुरुषव्याघ्र निर्मितं विश्वकर्मणा ३२

---

आणि त्याना अभिवंदन केल्यावर विदेहराजकन्या सीता आणि लक्ष्मण यासह तो धर्मात्मा राम हात जोडून उभा राहिला. तेव्हा रामाचें स्वागत करून व आसन, उदक इत्यादिकांनीं त्याचा सत्कार करून कुशल प्रश्न केल्यावर "बसावें" असें अगस्त्य मुनींनीं त्याना सांगितलें, नंतर वैश्वदेव करून आणि अर्घ्यांनीं वगैरे त्या अतिथींचा सत्कार करून वानप्रस्थ धर्मानें अगस्त्यमुनींनीं त्याना प्रथम भोजन घातलें आणि नंतर आसनावर बसून ते धर्मज्ञ मुनिश्रेष्ठ हात जोडून बसलेल्या धर्मवेत्त्या रामाला म्हणाले- "हे काकुत्स्था ! अशाप्रकारें अतिथींचें पूजन न करणारा पुरुष खोटी साक्ष देणाऱ्या पुरुषाप्रमाणें परलोकीं आपलेंच मांस भक्षण करतो. सर्व लोकांचा राजा, महारथी आणि धर्मप्रवर्तक असा तूं प्रिय अतिथि प्राप्त झाल्यामुळें मला प्रिय व मान्य आहेस." (२४-३०)

याप्रमाणें बोलून फळें, मुळें, पुष्पें आणि इतरही वस्तु यांनीं रामाचा स्वेच्छेनुरूप सत्कार केल्यावर अगस्त्य त्याला म्हणाले- "हे पुरुषश्रेष्ठा !

अमोघः सूर्यसंकाशो ब्रह्मदत्तः शरोत्तमः ।
दत्तो मम महेन्द्रेण तूणी चाक्षय्यसायकौ ३३
संपूर्णौ निशितैर्बाणैर्ज्वलद्भिरिव पावकैः ।
महाराजतकोशोऽयमसिर्हेमविभूषितः ३४
अनेन धनुषा राम हत्वा संख्ये महासुरान् ।
आजहार श्रियं दीप्तां पुरा विष्णुर्दिवौकसाम् ३५
तद्धनुस्तौ च तूणी च शरं खड्गं च मानद ।
जयाय प्रतिगृह्णीष्व वज्रं वज्रधरो यथा ३६
एवमुक्त्वा महातेजाः समस्तं तद्वरायुधम् ।
दत्त्वा रामाय भगवानगस्त्यः पुनरब्रवीत् ३७

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्वादशः सर्गः ॥१२॥[४०८]

त्रयोदशः सर्गः ।

*राम प्रीतोऽस्मि भद्रं ते परितुष्टोऽस्मि लक्ष्मण ।*
अभिवादयितुं यन्मा प्राप्तौ स्थः सह सीतया १

सुवर्ण आणि हिरे यांनीं भूषित असलेलें व विश्वकर्म्यानें निर्माण केलेलें हें मोठें वैष्णव दिव्य धनुष्य, कधींही व्यर्थ न जाणारा आणि सूर्याप्रमाणें तेजस्वी असा हा सर्वोत्कृष्ट ब्रह्मदत्त बाण, अग्नीप्रमाणें उज्वल असलेल्या तीक्ष्ण बाणानीं भरलेले व आंतील बाण कधींही न संपणारे असे हे दोन भाते व सुवर्णाच्या म्यानात असलेला आणि सुवर्णाची मूठ बसविलेला हा खड्ग, हीं मला इंद्रानें दिलीं आहेत. या धनुष्यानें हे रामा ! पूर्वी संग्रामात मोठमोठ्या दैत्याचा वध करुन विष्णूंनीं देवाचीं उज्वल संपत्ति परत आणली याकरिता इंद्र ज्याप्रमाणें वज्राचा स्वीकार करतो त्याप्रमाणें तेच हें धनुष्य, तेच हे भाते, तोच हा बाण आणि तेंच हें खड्ग याचा, हे सम्माननीय रामा ! तूं जयप्राप्तीकरिता स्वीकार कर." याप्रमाणें रामाला सागून आणि तीं संपूर्ण उत्कृष्ट आयुधें त्याला देऊन ते भगवान् महातेजस्वी अगस्त्यमुनि पुनरपि रामाला म्हणाले. (३१-३७)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

अध्वश्रमेण वां खेदो बाधते प्रचुरश्रमः ।
व्यक्तमुत्कण्ठते वापि मैथिली जनकात्मजा २
एषा च सुकुमारी च खेदैश्च न विमानिता ।
प्राज्यदोषं वनं प्राप्ता भर्तृस्नेहप्रचोदिता ३
यथैषा रमते राम इह सीता तथा कुरु ।
दुष्करं कृतवत्येषा वने त्वामभिगच्छती ४
एषा हि प्रकृतिः स्त्रीणामासृष्टे रघुनन्दन ।
समस्थमनुरज्यन्ते विषमस्थं त्यजन्ति च ५
शतह्रदाना लोलत्व शस्त्राणा तीक्ष्णतां तथा ।
गरुडानिलयोः शैघ्र्यमनुगच्छन्ति योषितः ६
इयं तु भवतो भार्या दोषैरेतैर्विवर्जिता ।
श्लाघ्या च व्यपदेश्या च यथा देवेष्वरुन्धती ७

---

" ज्याअर्थी सीतेसह तुम्ही मला अभिवदन करण्याकरिता येथें आला आहा, त्याअर्थी हे रामा ! तुझें कल्याण असो, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें आणि हे लक्ष्मणा ! तुजवरहा मी संतुष्ट झालों आहें. मार्गांतील दगदगीमुळें व श्रमामुळें तुम्ही दमला आहात आणि ही जनककन्या सीता तर विश्रांति घेण्याकरिता अगदीं उत्सुक झाल्यासारखी स्पष्टपणें दिसत आहे आजपर्यंत दु खाचा अनुभव नसलेली ही सुकुमार सीता केवळ पतिप्रेमामुळें विपुल दोषांनीं युक्त असलेल्या वनात आली आहे. तेव्हा हे रामा ! या आश्रमामध्यें ज्या रीतीनं सीतेची करमणूक होईल, त्या रीतीनें तू राहण्याची व्यवस्था ठेव तुझ्या बरोबर वनात येणाऱ्या या सातेनें हें कठीण कर्म केलें आहे. कारण हे रघुनंदना! पतीचें यथास्थित चालत असलें म्हणजे त्यावर प्रेम करावयाचे आणि त्याला विपन्नावस्था आली असता त्याची हेळसाड करावयाची, हा सृष्टीच्या आरंभापासून स्त्रियाचा स्वभावच आहे. विद्युल्लतांचें चापल्य, शस्त्राचा तीक्ष्णता आणि गरुड व वायु याची त्वरा (अनुक्रमें एक ठिकाणीं न राहण्यात फार दिवसांचें प्रेमबंधन तोडून टाकण्यात व निंद्य कार्य करण्याला प्रवृत्त होण्यात) स्त्रिया स्वीकारीत असतात परंतु या तुझ्या भार्येचे ठिकाणीं हे दोष नाहींत यामुळें [illegible]

अलंकृतोऽयं देशश्च यत्र सौमित्रिणा सह ।
वैदेह्या चानया राम वत्स्यसि त्वमरिंदम ८
एवमुक्तस्तु मुनिना राघवः संयताञ्जलिः ।
उवाच प्रश्रितं वाक्यमृषिं दीप्तमिवानलम् ९
धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे मुनिपुङ्गवः ।
गुणैः सभ्रातृभार्यस्य गुरुर्नः परितुष्यति १०
किं तु व्यादिश मे देशं सोदकं बहुकाननम् ।
यत्राश्रमपदं कृत्वा वसेयं निरतः सुखम् ११
ततोऽब्रवीन्मुनिश्रेष्ठः श्रुत्वा रामस्य भाषितम् ।
ध्यात्वा मुहूर्तं धर्मात्मा ततोवाच वचः शुभम् १२
इतो द्वियोजने तात बहुमूलफलोदकः ।
देशो बहुमृगः श्रीमान्पञ्चवट्यभिविश्रुतः १३

अरुंधति देवामध्यें प्रशंसेस पात्र आहे, त्याप्रमाणें ही प्रशंसेस पात्र असून पतिव्रतामध्यें प्रथम गणना करण्यास योग्य आहे. हे रामा ! तुमच्या आगमनामुळेंच हा आश्रमप्रदेश सुशोभित झाला आहे. तेव्हा ज्या ठिकाणीं सीता आणि लक्ष्मणासह तूं राहशील, तो प्रदेश हे शत्रुदमना ! रमणीय होईल, हें काय सांगावें ?" (१–८)

याप्रमाणें अगस्त्यमुनि म्हणाले असता अग्नीप्रमाणें दैदीप्यमान असलेल्या त्या मुनींना राम हात जोडून प्रेमपूर्वक म्हणाला– "ज्याअर्थी भ्राता आणि भार्या यासहच माझ्यावर मुनिश्रेष्ठ गुरु संतुष्ट झाले आहेत, *त्याअर्थी हा माझ्यावर* अनुग्रहच झाला असून मी धन्य आहें, आता मला असें विचारावयाचें आहे कीं, ज्या ठिकाणीं निवासस्थान तयार करून मला आनंदानें व सुखानें रहाता येईल असा एक पाणी आणि भरपूर वृक्ष यानीं युक्त असलेला प्रदेश आपण मला सांगावा." हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर त्या धर्मात्म्या मुनिश्रेष्ठ अगस्त्यानी क्षणभर विचार करून, त्याच्याशीं पुढीलप्रमाणें शुभ भाषण केलें. (९–१२)

ते म्हणाले, "बा रामा ! येथून दोन योजनावर पंचवटी म्हणून विख्यात

तत्र गत्वाऽऽश्रमपदं कृत्वा सौमित्रिणा सह ।
रमस्व त्वं पितुर्वाक्यं यथोक्तमनुपालयन् १४
विदितो ह्येष वृत्तान्तो मम सर्वस्तवानघ ।
तपसश्च प्रभावेण स्नेहाद्दशरथस्य च १५
हृदयस्थं च ते च्छन्दो विज्ञातं तपसा मया ।
इह वासं प्रतिज्ञाय मया सह तपोवने १६
अतश्च त्वामहं ब्रूमि गच्छ पञ्चवटीमिति ।
स हि रम्यो वनोद्देशो मैथिली तत्र रंस्यते १७
स देशः श्लाघनीयश्च नातिदूरे च राघव ।
गोदावर्याः समीपे च मैथिली तत्र रंस्यते १८
प्राज्यमूलफलैश्चैव नानाद्विजगणैर्युतः ।
विविक्तश्च महाबाहो पुण्यो रम्यस्तथैव च १९

असलेला एक संपन्न प्रदेश आहे. तेथें मृग पुष्कळ असून मुळें, फळें व उदक याचीही समृद्धि आहे. त्या ठिकाणीं लक्ष्मणासह जाऊन तूं आश्रम तयार कर आणि पित्याची प्रतिज्ञा त्याच्या सांगण्याप्रमाणें परिपालन करीत करीत तूं आनंदानें तेथें रहा हे निष्पाप रामा ! दशरथाचे ठिकाणीं माझें प्रेम असल्यानें तपःसामर्थ्यानें तुझा हा सर्व वृत्तान्त मला पूर्वीच माहीत झालेला आहे आणि तपोवनांतील या आश्रमात माझ्यासह राहण्याचें लक्ष्मणाशीं कबूल करूनही आता ' मला एखादी दुसरीकडे जागा सांगा, ' अशी विनंति करण्यात तुझ्या मनांतील उद्देश काय आहे, हेंही मी तपश्चर्येच्या योगानें जाणलें आहे. [ राक्षसांचा वध करण्याची तू प्रतिज्ञा केली आहेस आणि या माझ्या आश्रमामध्यें तर राक्षस येण्याचा संभव नाहीं तेव्हा ज्या ठिकाणीं ते येतील, असें एखादें स्थान तुला हवें आहे, हें मी जाणूनच आहें. ] आणि म्हणून ' पंचवटीमध्यें जा '' असें मी तुला सांगत आहें. तो वनप्रदेश रमणीय असल्यामुळें सीता आनंदानें तेथें राहील. हे राघवा ! गोदावरीचे समीप असलेला तो प्रशस्त देश येथून फार दूर नाहीं. तेथें सीतेच्या मनाला बरें वाटेल (१३-१८)

'' हे महापराक्रमी रामा ! विपुल मुळें, फळें आणि नानाप्रकारचे पक्षिगण

भवानपि सदाचारः शक्तश्च परिरक्षणे।
अपि चात्र वसन् राम तापसान्पालयिष्यसि २०
एतदालक्ष्यते वीर मधूकानां महावनम्।
उत्तरेणास्य गन्तव्यं न्यग्रोधमपि गच्छता २१
ततः स्थलमुपारुह्य पर्वतस्याविदूरतः।
ख्यातः पञ्चवटीत्येव नित्यपुष्पितकानन २२
अगस्त्येनैवमुक्तस्तु रामः सौमित्रिणा सह।
सत्कृत्यामन्त्रयामास तमृषिं सत्यवादिनम् २३
तौ तु तेनाभ्यनुज्ञातौ कृतपादाभिवन्दनौ।
तमाश्रमं पञ्चवटीं जग्मतुः सह सीतया २४
गृहीतचापौ तु नराधिपात्मजौ विषक्ततूणी समरेष्वकातरौ।
यथोपदिष्टेन पथा महर्षिणा प्रजग्मतुः पञ्चवटीं समाहितौ २५

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥१३॥ [४३३]

यानीं युक्त असलेला तो एकान्त प्रदेश पवित्र असल्यामुळें रमणीय असून तूही सदाचरणानें वागणारा त्याच रक्षण करण्यास समर्थ आहेस हे रामा ! त्या ठिकाणीं राहून तूं ऋषींचें पालन करशील. हे वीरा ! वटवृक्षानीं युक्त असलेल्या आश्रमाला जाणाऱ्यानें हें मोहाच्या झाडाचें मोठें वन दिसत आहे, त्याच्या उत्तर बाजूनें जावें आणि नंतर पर्वताच्या जवळच उघड्या प्रदेशावर चढून गेलें म्हणजे नित्य प्रफुल्ल वृक्षानीं युक्त असलेली वनें ज्यात आहेत, असा पंचवटी नावाचा प्रसिद्ध असलेला देश लागतो." याप्रमाणें अगस्त्यमुनींनी सांगितलें असता लक्ष्मणासह रामानें त्या सत्यवचनी ऋषींचा सत्कारपूर्वक निरोप घेतला आणि त्यानीं अनुज्ञा दिल्यानंतर त्याचें पादाभिवंदन करून ते राम, लक्ष्मण व सीतेसह त्या पंचवटीला गेले. साराश संग्रामात भय न बाळगणारे व अंतःकरणात स्वस्थ असलेले ते राजकुमार राम-लक्ष्मण भाते लटकावून आणि धनुष्यें हातात घेऊन महर्षीनीं सागितल्या मार्गानें पंचवटीला पोचले (१९-२५)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

चतुर्दशः सर्गः ।

अथ पञ्चवटीं गच्छन्नन्तरा रघुनन्दनः ।
आससाद महाकायं गृध्रं भीमपराक्रमम् १
तं दृष्ट्वा तौ महाभागौ वनस्थं रामलक्ष्मणौ ।
मेनाते राक्षसं पक्षिं ब्रुवाणौ को भवानिति २
ततो मधुरया वाचा सौम्यया प्रीणयन्निव ।
उवाच वत्स मां विद्धि वयस्यं पितुरात्मनः ३
स तं पितृसखं मत्वा पूजयामास राघवः ।
स तस्य कुलमव्ययमथ पप्रच्छ नाम च ४
रामस्य वचनं श्रुत्वा कुलमात्मानमेव च ।
आचचक्षे द्विजस्तस्मै सर्वभूतसमुद्भवम् ५
पूर्वकाले महाबाहो ये प्रजापतयोऽभवन् ।
तान्मे निगदतः सर्वानादितः शृणु राघव ६
कर्दमः प्रथमस्तेषां विकृतस्तदनन्तरम् ।
शेषश्च संश्रयश्चैव बहुपुत्रश्च वीर्यवान् ७
स्थाणुर्मरीचिरत्रिश्च क्रतुश्चैव महाबलः ।

---

पंचवटीला जाताना मार्गात रघुनंदन रामाला भयंकर पराक्रमी असा एक धिप्पाड गृध्र पक्षी आढळला तेव्हा वनातल्या त्या पक्ष्याला पाहून ते महाभाग्यवान् राम-लक्ष्मण त्याला राक्षस समजले आणि "तूं कोण?" असें त्यांनी त्या पक्ष्याला विचारलें तेव्हा मधुर आणि सौम्य वाणीनें रामाला प्रसन्न करीत करीत तो म्हणाला, "हे वत्सा! तुझ्या पित्याचा मी मित्र आहें, असें तूं समज." हें त्यानें सांगितल्यावर त्याला पित्याचा सखा समजून त्या रामानें त्याचें पूजन केलें आणि त्याचें कुल व नाव हें लक्षपूर्वक त्यानें त्याला विचारलें. तेव्हा रामाचें भाषण ऐकून त्या पक्ष्यानें आपण कोण व आपलें कुल कोणतें हें सांगून प्रसंगोपात्त सर्व भूताची उत्पत्तिही त्याला सांगितली. (१-५)

तो म्हणाला- "हे पराक्रमी रामा! पूर्वी जे प्रजापति होऊन गेले, ते सर्व मी तुला आरंभापासून सांगतों, तें तूं श्रवण कर. त्यापैकीं पहिला कर्दम,

पुलस्त्यश्चाङ्गिराश्चैव प्रचेताः पुलहस्तथा ८
दक्षो विवस्वानपरोऽरिष्टनेमिश्च राघव ।
कश्यपश्च महातेजास्तेषामासीच्च पश्चिमः ९
प्रजापतेस्तु दक्षस्य बभूवुरिति विश्रुताः ।
षष्टिर्दुहितरो राम यशस्विन्यो महायशः १०
कश्यपः प्रतिजग्राह तासामष्टौ सुमध्यमाः ।
अदितिं च दितिं चैव दनूमपि च कालकाम् ११
ताम्रां क्रोधवशां चैव मनुं चाप्यनलामपि ।
तास्तु कन्यास्ततः प्रीतः कश्यपः पुनरब्रवीत् १२
पुत्रांस्त्रैलोक्यभर्तृन्वै जनयिष्यथ मत्समान् ।
अदितिस्तन्मना राम दितिश्च दनुरेव च १३
कालका च महाबाहो शेषास्त्वमनसोऽभवन् ।
अदित्यां जज्ञिरे देवास्त्रयस्त्रिंशदरिंदम १४
आदित्या वसवो रुद्रा अश्विनौ च परंतप ।
दितिस्त्वजनयत्पुत्रान्दैत्यांस्तात यशस्विनः १५

त्याच्या नंतर विकृत, शेष, संश्रय, वीर्यवान् बहुपुत्र, स्थाणु, मरीचि, अत्रि, महाबलाढ्य क्रतु, पुलस्त्य, अंगिरा, प्रचेता, पुलह, दक्ष, विवस्वान्, अरिष्टनेमि आणि हे राघवा ! त्याच्यातील शेवटचा महातेजस्वी कश्यप होय. हे महायशस्वी रामा ! दक्षप्रजापतीला साठ यशस्विनी कन्या होत्या म्हणून प्रसिद्धि आहे. (६–१०)

" त्यापैकीं अदिति, दिति, दनू, कालका, ताम्रा, क्रोधवशा, मनु आणि अनला अशा आठ सुंदर कन्याचा कश्यपानीं स्वीकार केला आणि नंतर ते कश्यपमुनि प्रसन्न होऊन त्या कन्याना म्हणाले, " तुम्हाला माझ्यासारखे त्रैलोक्याधिपति पुत्र होतील. " हे रामा ! आदिति, दिति, दनु आणि कालका याना मात्र कश्यपाप्रमाणें पुत्र असावा अशी इच्छा झाली आणि हे महापराक्रमी रामा ! इतर चौघी त्याविषयीं उदासीन राहिल्या. अदितीचे ठिकाणीं द्वादशादित्य, अष्ट वसु, एकादश रुद्र आणि उभयता अश्विनी-कुमार असे तेहतीस देव उत्पन्न

तेषामियं वसुमती पुरासीत्सवनार्णवा ।
दनुस्त्वजनयत्पुत्रमश्वग्रीवमरिन्दम	१६
नरकं कालकं चैव कालकापि व्यजायत ।
क्रौञ्चीं भासीं तथा श्येनीं धृतराष्ट्रीं तथा शुकीम्	१७
ताम्रा तु सुषुवे कन्याः पञ्चैता लोकविश्रुताः ।
उलूकाञ्जनयत्क्रौञ्ची भासी भासान्व्यजायत	१८
श्येनी श्येनांश्च गृध्रांश्च व्यजायत सुतेजसः ।
धृतराष्ट्री तु हंसांश्च कलहंसांश्च सर्वशः	१९
चक्रवाकांश्च भद्रं ते विजज्ञे सापि भामिनी ।
शुकी नतां विजज्ञे तु नतायां विनता सुता	२०
दश क्रोधवशा राम विजज्ञेऽप्यात्मसंभवाः ।
मृगीं च मृगमन्दां च हरीं भद्रमदामपि	२१
मातङ्गीमथ शार्दूलीं श्वेतां च सुरभीं तथा ।
सर्वलक्षणसंपन्नां सुरसां कद्रुकामपि	२२
अपत्यं तु मृगाः सर्वे मृग्या नरवरोत्तम ।

---

झाले आणि दितीनें महायशस्वी अशा दैत्यांना जन्म दिला वनें व समुद्र यांसह ही पृथ्वी पूर्वी त्या दैत्यांचीच होती (११-१६)

"हे शत्रुदमना रामा ! दनूला अश्वग्रीव हा पुत्र झाला कालकेलाही नरक आणि कालक हे दोन पुत्र झाले आणि क्रौंची, भासी, श्येनी, धृतराष्ट्री व शुकी अशा पाच जगद्विख्यात कन्या ताम्रेला झाल्या त्यांपैकीं क्रौंचाला उलूकपक्षी व भासीला भासपक्षी झाले श्येनीला ससाणे व गृध्र असे महातेजस्वी पुत्र झाले, राजहंस आणि कलहंस हे सर्व पुत्र धृतराष्ट्रीला झाले आणि (तुझे देव कल्याण करो) चक्रवाक पक्षीही त्याच स्त्रीला झाले शुकीला नता ही कन्या झाली आणि त्या नतेचे ठिकाणीं विनता ही कन्या उत्पन्न झाली (१६-२०)

"हे रामा ! कश्यपाच्या क्रोधवशा नामक स्त्रीला मृगी, मृगमंदा, हरी, भद्रमदा, मातंगी, शार्दूली, श्वेता, सुरभी, सर्वलक्षणसंपन्न सुरसा आणि कद्रुका अशा दहा कन्या झाल्या हे श्रेष्ठ नरोत्तमा ! सर्व मृग ही मृगीची संतति होय

ऋक्षाश्च मृगमन्दायाः सृमराश्चमरास्तथा २३
ततस्त्विरावती नाम जज्ञे भद्रमदा सुताम्।
तस्यास्त्वैरावतः पुत्रो लोकनाथो महागजः २४
हर्याश्च हरयोऽपत्य वानराश्च तपस्विनः।
गोलाङ्गूलाश्च शार्दूली व्याघ्रांश्चाजनयत्सुतान् २५
मातङ्गयास्त्वथ मातङ्गा अपत्यं मनुजर्षभ।
दिशागजं तु काकुत्स्थ श्वेता व्यजनयत्सुतान् २६
ततो दुहितरौ राम सुरभिर्द्वेव्यजायत।
रोहिणीं नाम भद्रं ते गन्धर्वीं च यशस्विनीम् २७
रोहिण्यजनयद्गावो गन्धर्वी वाजिनः सुतान्।
सुरसाजनयन्नागान्राम कद्रूश्च पन्नगान् २८
मनुर्मनुष्याञ्जनयत्कश्यपस्य महात्मनः।
ब्राह्मणान्क्षत्रियान्वैश्याञ्छूद्रांश्च मनुजर्षभ २९
मुखतो ब्राह्मणा जाता उरसः क्षत्रियास्तथा।
ऊरुभ्यां जज्ञिरे वैश्या पद्भ्यां शूद्राः इति श्रुतिः ३०
सर्वान्पुण्यफलान्वृक्षाननलापि व्यजायत।

---

व ऋक्ष, समर आणि चमर हे मृगमदेचे पुत्र होत तदनंतर भद्रमदेला इरावती नांवाची एक कन्या झाली, तिलाच ऐरावत हा लोकनाथ महागज पुत्र झाला सिंह आणि तपस्वी वानर आणि गोलांगूल हीं हरीचीं अपत्यें असून व्याघ्र हे शार्दूलीचे पुत्र होत हे पुरुषश्रेष्ठा ! गज ही मातंगीची संतति होय आणि हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! दिग्गज हे श्वेतेचे पुत्र होत तदनंतर हे रामा ! ( तुझें देव कल्याण करो ) रोहिणी आणि यशस्विनी गंधर्वी अशा दोन कन्या सुरभी देवीला झाल्या (२१–२७)

" रोहिणीपासून गाई उत्पन्न झाल्या, गंधर्वीला अश्व हे पुत्र झाले आणि हे रामा ! सुरसेला नाग व कद्रूला सर्प असे पुत्र झाले. हे पुरुषश्रेष्ठा रामा ! महात्म्या कश्यपाच्या मनूनामक स्त्रीला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे मानव पुत्र झाले त्यापैकीं ब्राह्मण मुखापासून, क्षत्रिय बाहूंपासून, वैश्य मांड्यांपासून आणि शूद्र पायापासून उत्पन्न झाले, अशा आशयाची श्रुति आहे अनलेला सर्व

विनता च शुकीपौत्री कद्रूश्च सुरसा स्वसा ३१
कद्रूर्नागसहस्रं तु निजज्ञे धरणीधरान् ।
द्वौ पुत्रौ विनतायास्तु गरुडारुण एव च ३२
तस्माज्जातोऽहमरुणात्संपातिश्च ममाग्रजः ।
जटायुरिति मां विद्धि श्येनीपुत्रमरिंदम ३३
सोऽहं वाससहायस्ते भविष्यामि यदीच्छसि ।
सीतां च तात रक्षिष्ये त्वयि याते सलक्ष्मणे ३४
जटायुषं तु प्रतिपूज्य राघवो मुदा परिष्वज्य च संनतोऽभवत् ।
पितुर्हि शुश्राव सखित्वमात्मवाञ्जटायुषा संकथितं पुनः पुनः ३५
स तत्र सीतां परिदाय मैथिलीं सहैव तेनातिबलेन पक्षिणा ।
जगाम तां पञ्चवटीं सलक्ष्मणो रिपून्दिधक्षन्सवनानि पालयन् ३६
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुर्दशः सर्गः॥८॥[४६९]

चागलीं फलें धारण करणारे वृक्ष झाले विनता ही शुकीची नात होय आणि कद्रू व सुरसा या परस्पर भगिनी होत. पृथ्वी धारण करणारे असे सहस्र पुत्र कद्रूला झाले आणि गरुड व अरुण असे दोन पुत्र विनतेला झाले. त्या अरुणापासून मी उत्पन्न झालों आहें आणि संपाती हा माझा ज्येष्ठ बंधु आहे. हे शत्रुदमना रामा! जटायु म्हणून मी श्येनीचा पुत्र आहें असें तूं समज. तुझी इच्छा असेल तर निवासस्थानामध्यें मी तुला साहाय्य करणारा होईन आणि बा रामा! लक्ष्मणासह तूं बाहेर गेल्यावर मी सीतेचें रक्षण करीत जाईन " (२८-३४)

असो. जटायूनें आपल्या पित्याशीं असलेलें पितृत्वाचें नातें वारंवार कथन केलेलें श्रवण करून जितेंद्रिय रामानें जटायूचा सत्कार केला आणि त्याला आनंदानें आलिंगन दिल्यावर त्याच्यापुढें तो राम नम्र होऊन उभा राहिला व नंतर मिथिलराजकन्या सीता हिला रक्षणाकरिता त्या जटायूच्या स्वाधीन करून तपोवनाचें रक्षण करण्याकरिता व राक्षस शत्रूंचा वध करण्याच्या उद्देशानें त्या अतिबलाढ्य पक्ष्याला बरोबर घेऊनच तो राम लक्ष्मणासह त्या पंचवटीमध्यें गेला. (३५-३६)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं चौदावा सर्ग समाप्त झाला. ॥१४॥

पञ्चदशः सर्गः ।

ततः पञ्चवटीं गत्वा नानाव्यालमृगायुताम् ।
उवाच लक्ष्मणं रामो भ्रातरं दीप्ततेजसम् १
आगताः स्म यथोद्दिष्टं यं देशं मुनिरब्रवीत् ।
अयं पञ्चवटीदेशः सौम्य पुष्पितकाननः २
सर्वतश्चार्यतां दृष्टिः कानने निपुणो ह्यसि ।
आश्रमः कतरस्मिन्नो देशे भवति संमतः ३
रमते यत्र वैदेही त्वमहं चैव लक्ष्मण ।
तादृशो दृश्यतां देशः संनिकृष्टजलाशयः ४
वनरामण्यकं यत्र जलरामण्यकं तथा ।
संनिकृष्टं च यस्मिंस्तु समित्पुष्पकुशोदकम् ५
एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः संयताञ्जलिः ।
सीतासमक्षं काकुत्स्थमिदं वचनमब्रवीत् ६
परवानास्मि काकुत्स्थ त्वयि वर्षशतं स्थिते ।

तदनंतर नानाप्रकारचीं श्वापदें आणि मृग यानीं युक्त असलेल्या पंचवटीमध्यें गेल्यावर राम आपल्या उज्ज्वल तेजस्वी भ्रात्या लक्ष्मणाला म्हणाला, " महान् अगस्त्यमुनींनीं जो देश आपणाला सांगितला, त्या देशीं त्याच्या सांगण्याप्रमाणें आपण आलों. हे सत्त्वशील लक्ष्मणा ! प्रफुल्लित वनानीं युक्त असलेला हाच तो पंचवटी प्रदेश होय. आता वनामध्यें एकदा चोहोंकडे दृष्टि फेंक आणि कोणत्या जागीं आपल्या मनाप्रमाणें आश्रम स्थापता येईल हें पहा; कारण या कामात तूं चतुर आहेस हे लक्ष्मणा ! सीता, तूं व मी या सर्वांचें मन ज्या ठिकाणीं रमेल असा एकादा जलाशय जवळ असलेला प्रदेश शोधून काढ. वनाचें आणि त्याचप्रमाणें जलाचें रमणीयत्व जेथें असेल आणि ज्या ठिकाणीं लाकडें, फलें, कुश आणि उदक सन्निध असेल असाच प्रदेश शोधून काढ. " ( १–५ )

याप्रमाणें रामानें सांगितलें असता लक्ष्मण हात जोडून सीतेच्या समक्ष रामाला म्हणाला, " हे काकुत्स्था ! तू असताना मी शेंकडों वर्षें जरी तुझ्या

स्वयं तु रुचिरे देशे क्रियतामिति मां वद ७
सुप्रीतस्तेन वाक्येन लक्ष्मणस्य महाद्युतिः।
विमृशन्रोचयामास देशं सर्वगुणान्वितम् ८
स तं रुचिरमाक्रम्य देशमाश्रमकर्मणि।
हस्ते गृहीत्वा हस्तेन रामः सौमित्रिमब्रवीत् ९
अयं देशः समः श्रीमान्पुष्पितैस्तरुभिर्वृतः।
इहाश्रमपदं रम्यं यथावत्कर्तुमर्हसि १०
इयमादित्यसंकाशैः पद्मैः सुरभिगन्धिभिः।
अदूरे दृश्यते रम्या पद्मिनी पद्मशोभिता ११
यथाख्यातमगस्त्येन मुनिना भावितात्मना।
इयं गोदावरी रम्या पुष्पितैस्तरुभिर्वृता १२
हंसकारण्डवाकीर्णा चक्रवाकोपशोभिता।
नातिदूरे न चासन्ने मृगयूथनिपीडिता १३
मयूरनादिता रम्याः प्रांशवो बहुकंदराः।

जवळ असलों तरी तुझ्या स्वाधीनच आहें, मी कधींही स्वतंत्र होणार नाहीं तेव्हां मनोहर प्रदेश कोणता, हा स्वत च विचार करून "या मनोहर प्रदेशात आश्रम तयार कर," असें तूं मला सांग. लक्ष्मणाच्या भाषणानें महातेजस्वी राम अतिशय प्रसन्न झाला आणि आजूबाजूस पाहून सर्वगुणसपन्न असा एक प्रदेश त्याच्या मनाला पटला. नंतर आश्रमकर्माला योग्य अशा त्या मनोहर प्रदेशावर जाऊन व राम लक्ष्मणाचा हात धरून त्याला म्हणाला, "हा प्रदेश सपाट, टुमदार आणि प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त आहे तेव्हां या ठिकाणीं तू योग्य रीतीनें आश्रम तयार कर. पद्मशोभेनें युक्त आणि सूर्यासारख्या उज्ज्वल व सुगंधि कमलांनीं सपन्न असें हें रम्य सरोवर जवळच दिसत आहे आणि जितेंद्रिय अगस्त्य मुनींनीं सांगितल्याप्रमाणें प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेली ही रम्य गोदावरी दिसत आहे. (६-१२)

"येथून फार दूरही नाहीं व फार जवळही नाहीं अशा ठिकाणीं असलेली ही गोदावरी हंस व कारंडव पक्ष्यांनीं गजबजलेली आहे, चक्रवाक पक्ष्यांनीं

दृश्यन्ते गिरयः सौम्याः फुल्लैस्तरुभिरावृताः १४
सौवर्णै राजतैस्ताम्रैर्देशे देशे तथा शुभैः ।
गवाक्षिता इवाभान्ति गजाः परमभक्तिभिः १५
सालैस्तालैस्तमालैश्च खर्जूरैः पनसैर्द्रुमैः ।
नीवारैस्तिनिशैश्चैव पुंनागैश्चोपशोभिताः १६
चूतैरशोकैस्तिलकैः केतकैरपि चम्पकैः ।
पुष्पगुल्मलतोपेतैस्तैस्तैस्तरुभिरावृताः १७
स्यन्दनैश्चन्दनैर्नीपैः पनसैर्लकुचैरपि ।
धवाश्वकर्णखदिरैः शमीकिंशुकपाटलैः १८
इदं पुण्यमिदं रम्यमिदं बहुमृगद्विजम् ।
इह वत्स्याम सौमित्रे सार्धमेतेन पक्षिणा १९
एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः परवीरहा ।
अचिरेणाश्रमं भ्रातुश्चकार सुमहाबलः २०

सुशोभित झाली आहे आणि मृगाच्या कळपानीं अगदीं भरलेली आहे. मयूरपक्ष्यानीं नादित, अनेक गुहानीं युक्त आणि प्रफुल्लित वृक्षानीं व्याप्त असे हे उंच पर्वत रम्य व सौम्य दिसत आहेत आणि त्याचप्रमाणें सुवर्णवर्णें, रौप्यवर्णें आणि ताम्रवर्ण अशा शुभ वृक्षाच्या योगानें ठिकठिकाणीं हे पर्वत, उत्कृष्ट तऱ्हानीं शरिरावर चित्रें काढून शृंगारलेल्या हत्तीप्रमाणें, दिसत आहेत साल, ताल, तमाल, खर्जूर, फणस, जलकदब, तिवस आणि नागचाफा या वृक्षानीं हे पर्वत सुशोभित झालेले आहेत आम्र, अशोक, तिलक, केतक, चंपक पुष्पें, गुल्में आणि लता यानीं युक्त असलेले इतरही नानाप्रकारचे वृक्ष यानीं हे पर्वत व्याप्त झाले आहेत स्यदन, चंदन, कंदब, फणस, ओंट, सावई, धव, खदिर, शमी व पळस आणि लोध्र या वृक्षानीं हे पर्वत गजबजलेले आहेत हे लक्ष्मणा ! हें स्थल पवित्र आहे, रम्य आहे आणि नानाप्रकारच्या मृगानीं व पक्ष्यांनीं युक्त आहे याकरिता या जटायु पक्ष्यासह आपण येथेंच राहू " (१३–१९)

याप्रमाणें रामानें सांगितलें असता शत्रूकडील वीराचा नाश करणाऱ्या अति बलाढ्य लक्ष्मणानें भ्रात्याकरिता त्वरकर आश्रम तयार केला मातीच्या

पर्णशालां सुविपुलां तत्र संघातमृत्तिकाम् ।
सुस्तम्भां मस्करैर्दीर्घैः कृतवंशां सुशोभनाम् २१
शमीशाखाभिरास्तीर्य दृढपाशावपाशिताम् ।
कुशकाशशरैः पर्णैः सुपरिच्छादितां तथा २२
समीकृततलतां रम्यां चकार सुमहाबलः ।
निवासं राघवस्यार्थे प्रेक्षणीयमनुत्तमम् २३
स गत्वा लक्ष्मणः श्रीमान्नदीं गोदावरीं तदा ।
स्नात्वा पद्मानि चादाय सफलः पुनरागतः २४
ततः पुष्पबलिं कृत्वा शान्तिं च स यथाविधि ।
दर्शयामास रामाय तदाश्रमपदं कृतम् २५
स तं दृष्ट्वा कृतं सौम्यमाश्रमं सह सीतया ।
राघवः पर्णशालायां हर्षमाहारयत्परम् २६
सुसंहृष्टः परिष्वज्य बाहुभ्यां लक्ष्मणं तदा ।
अतिस्निग्धं च गाढं च वचनं चेदमब्रवीत् २७

भिंती रचलेली अशी एक फारच प्रशस्त व सुशोभित पर्णशाला त्यानें तयार केली. तिला चांगले खांब लावलेले होते आणि लांब लांब वावूंचे तिला वासे ठोकलेले होते. शमीच्या शाखा त्या वाशावर अंथरलेल्या होत्या, त्या ठिकाणीं बळकट बांधून ती पर्णशाला तयार केली होती कुशकाश, देवनळ आणि पानें यांच्या योगानें तिच्यावर उत्तम आच्छादन केलेलें होतें आणि तिची जमीन सपाट केलेली होती. साराश, अतिबलाढ्य लक्ष्मणानें रामाकरितां एक प्रेक्षणीय व अनुपम निवासस्थान तयार केलें होतें असो. याप्रमाणें निवासस्थान तयार केल्यानंतर श्रीमान् लक्ष्मण गोदावरी नदीवर गेला आणि तेथें स्नान करून व कमलें घेऊन फलासह पुनरपि परत आला तदनंतर पुष्पपूजा आणि वास्तुशांत यथाविधि केल्यावर रामाला त्यानें तें तयार केलेलें आश्रमस्थान दाखविलें. (२०-२५)

तेव्हां पर्णशालेमध्यें तयार केलेला तो सौम्य आश्रम पाहून सीतेसह रामाला पराकाष्ठेचा आनंद झाला आणि अत्यंत आनंदित झालेला तो राम अतिशय

प्रीतोऽस्मि ते महत्कर्म त्वया कृतमिदं प्रभो ।
प्रदेयो यन्निमित्तं ते परिष्वङ्गो मया कृतः २८
भावज्ञेन कृतज्ञेन धर्मज्ञेन च लक्ष्मण ।
त्वया पुत्रेण धर्मात्मा न संवृत्तः पिता मम २९
एवं लक्ष्मणमुक्त्वा तु राघवो लक्ष्मिवर्धनः ।
तस्मिन्देशे बहुफले न्यवसत्स सुखं सुखी ३०
कंचित्कालं स धर्मात्मा सीतया लक्ष्मणेन च ।
अन्वास्यमानो न्यवसत्स्वर्गलोके यथामरः ३१✓

इत्यार्षे श्रीम० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥१५॥ [५००]

षोडशः सर्गः ।

वसतस्तस्य तु सुखं राघवस्य महात्मनः ।
शरद्व्यपाये हेमन्त ऋतुरिष्टः प्रवर्तत १
स कदाचित्प्रभातायां शर्वर्यां रघुनन्दनः ।

प्रेमानें लक्ष्मणाला गाढ आलिंगन देऊन म्हणाला, "हे समर्थ लक्ष्मणा! मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. तूं हें मोठें काम केलें आहेस व याकरितां दुसरें कांहीं देण्याला मजपाशीं नसल्यामुळें देण्याला योग्य असें गाढ आलिंगनच मीं तुला दिलें आहे. हे लक्ष्मणा! अभिप्राय जाणणारा, कृतज्ञ आणि धर्मवेत्ता असा तूं पुत्र असल्यानें माझा धर्मात्मा पिता मृत झालाच नाहीं, असें मला वाटतें. कारण तूंच पित्याप्रमाणें माझें परिपालन करीत आहेस" याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून सुखी झालेला तो लक्ष्मीवर्धक राम विपुल फलांनीं युक्त असलेल्या त्या प्रदेशामध्यें सुखानें राहिला आणि सीता व लक्ष्मण त्याची शुश्रूषा करीत असल्यामुळें तो धर्मात्मा स्वर्गलोकांत राहणाऱ्या देवाप्रमाणेंच कांहीं कालपर्यंत तेथें राहिला. (२८–३१)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

तो महात्मा राम तेथें सुखानें राहूं लागला असतां शरदृतु संपून प्रिय असा हेमंत ऋतु सुरू झाला. एकदां रात्र संपून दिवस उजाडल्यावर तो रघुनंदन

प्रययावभिषेकार्थं रम्यां गोदावरीं नदीम् २
प्रह्वः कलशहस्तस्तु सीतया सह वीर्यवान्।
पृष्ठतोऽनुव्रजन्भ्राता सौमित्रिरिदमब्रवीत् ३
अयं स कालः संप्राप्तः प्रियो यस्ते प्रियंवद।
अलंकृत इवाभाति येन संवत्सरः शुभः ४
नीहारपरुषो लोकः पृथिवी सस्यमालिनी।
जलान्यनुपभोग्यानि सुभगो हव्यवाहनः ५
नवाग्रयणपूजाभिरभ्यर्च्य पितृदेवताः।
कृताग्रयणकाः काले सन्तो विगतकल्मषाः ६
प्राज्यकामा जनपदाः संपन्नतरगोरसाः।
विचरन्ति महीपाला यात्रार्थं विजिगीषवः ७
सेवमाने दृढं सूर्ये दिशमन्तकसेविताम्।
विहीनतिलकेव स्त्री नोत्तरा दिक्प्रकाशते ८
प्रकृत्या हिमकोशाढ्यो दूरसूर्यश्च सांप्रतम्।

राम स्नानाकरिता रम्य गोदावरी नदीला निघाला असता नम्र व हातात कलश घेऊन सीतेसह त्याच्या मागोमाग जाणारा शूर लक्ष्मण त्याला म्हणाला, "हे प्रिय भाषण करणाऱ्या रामा! तुला प्रिय असा हा काल प्राप्त झाला आहे आणि त्याच्या योगानें हा संवत्सर धान्यादिकाच्या समृद्धीमुळ भूषित झाल्यासारखा दिसत आहे दंवामुळें लोकाचीं शरीरें खडबडीत झालीं आहेत, भूमि धान्यराशींनीं युक्त झाली आहे, जलें उपभोग घेण्यास अयोग्य झालीं आहेत आणि अग्नि लोकाना आवश्यक झालेला आहे नवान्न-भक्षण करण्याकरिता अवश्य असलेल्या आग्रयण नावाच्या पूजानीं पितराचें व देवाचें सतर्पण करून वेळेवर आग्रयण केल्यामुळें लोक निष्पाप झालेले आहेत, देशात अन्नाची समृद्धि झालेली असून दुभत्याची चंगळ उडून गेली आहे आणि विजयेच्छु राजे स्वारी करण्याकरिता संचार करीत आहेत. (१-७)

"सूर्य दक्षिण दिशेकडे असल्यामुळें तिलकहीन झालेल्या स्त्रीप्रमाणें उत्तर दिशा शोभेनाशी झाली आहे स्वभावत च बर्फाच्या थरानीं संपन्न असलेला

यथार्थनामा सुव्यक्तं हिमवान्हिमवान्गिरिः ९
अत्यन्तसुखसंचारा मध्याह्ने स्पर्शतः सुखाः ।
दिवसाः सुभगादित्याश्छायाः सलिलदुर्भगाः १०
मृदुसूर्याः सनीहाराः पटुशीता समाहिताः ।
शून्यारण्या हिमध्वस्ता दिवसा भान्ति सांप्रतम् ११
निवृत्ताकाशशयनाः पुष्यनीता हिमारुणाः ।
शीतवृद्धतरायामास्त्रियामा यान्ति सांप्रतम् १२
रविसंक्रान्तसौभाग्यस्तुषारारुणमण्डलः ।
निश्वासान्ध इवादर्शश्चन्द्रमा न प्रकाशते १३
ज्योत्स्ना तुषारमलिना पौर्णमास्यां न राजते ।
सीतेव चातपश्यामा लक्ष्यते न च शोभते १४
प्रकृत्या शीतलस्पर्शो हिमविद्धश्च सांप्रतम् ।
प्रवाति पश्चिमो वायुः काले द्विगुणशीतलः १५

हिमालय पर्वत सूर्यापासून दूर झाला असल्यामुळें सांप्रत अगदीं हिमसंपन्न होऊन नांवानें यथार्थ झाला आहे. मध्यान्हसमयीं सूर्यकिरणाचा स्पर्श होत असल्यानें दिवस सुखजनक झाले असून यावेळीं ते संचारालाही अतिशय सुखावहच झाले आहेत. या दिवसात सूर्याचें ऊन फारच इष्ट झालेलें आहे आणि छाया व पाणी हीं मात्र अनिष्ट झालेलीं आहेत. या दिवसात सूर्य मृदु झाल्यासारखा भासत आहे, दंव फार पडत आहे, थंडी झोंबत आहे, थंडीनें पानें झडल्यामुळें अरण्यें शून्य होऊन कमलाचा विध्वंस झालेला आहे आणि स्वतः दिवसही लहान झाल्यासारखे दिसत आहेत. सांप्रत या दिवसात उघड्या प्रदेशामध्यें कोणीही शयन करीत नाहींत, सूर्य पुष्य नक्षत्रावर मावळत असतो, बर्फामुळें प्रदेश पांढरके दिसत आहेत व रात्री अतिशयच मोठ्या झाल्या असून त्यात थंडीही फार पडत आहे. ज्याचें उपभोग्यत्व सूर्याकडे गेलें आहे व बर्फाच्या तुषारामुळें ज्याचें मंडल पांढरकें दिसत आहे, असा चंद्र निःश्वासानें मलिन झालेल्या आरशाप्रमाणें प्रकाशित झालेला आहे. (८–१३)

" उन्हानें काळवंडून गेलेल्या सीतेप्रमाणें तुषारानें मलिन झालेली चांद्रिका

बाष्पच्छन्नान्यरण्यानि यवगोधूमवान्ति च ।
शोभन्तेऽभ्युदिते सूर्ये नदद्भिः क्रौञ्चसारसैः १६
खर्जूरपुष्पाकृतिभिः शिरोभिः पूर्णतण्डुलैः ।
शोभन्ते किंचिदालम्बाः शालयः कनकप्रभाः १७
मयूखैरुपसर्पद्भिर्हिमनीहारसंवृतैः ।
दूरमभ्युदितः सूर्यः शशाङ्क इव लक्ष्यते १८
आग्राह्यवीर्यः पूर्वाह्णे मध्याह्ने स्पर्शतः सुखः ।
संसक्तः किंचिदापाण्डुरातपः शोभते क्षितौ १९
अवश्यायनिपातेन किंचित्प्रक्लिन्नशाद्वला ।
वनानां शोभते भूमिर्निविष्टतरुणातपा २०
स्पृशन्सुविपुलं शीतमुदकं द्विरदः सुखम् ।
अत्यन्ततृषितो वन्यः प्रतिसंहरते करम् २१

नुसती दिसतच आहे; परंतु शोभत नाहीं स्वभावतःच शीतल स्पर्शानें युक्त आणि सांप्रत हिमानें युक्त असा पश्चिमेकडील वारा प्रातःकालीं दुप्पट गार वाहूं लागला आहे. सातू आणि गहूं यांच्या पिकानें युक्त असलेलीं व धुक्यानें आच्छादलेलीं अरण्यें सूर्योदय झाल्यावर किल् किल् करूं लागणाऱ्या क्रौंच व सारस पक्ष्यांमुळें शोभूं लागलीं आहेत. खर्जूरपुष्पाप्रमाणें लांब व पीतवर्ण आणि तंदुलांनीं परिपूर्ण अशा चवऱ्यांमुळें किंचित् नम्र होऊन सुवर्णासारखीं दिसत असलेलीं भातें शोभूं लागलीं आहेत सूर्याचीं बाहेर फाकणारीं किरणें, धुकें व दंव यांनीं व्याप्त झालीं असल्यामुळें दूर उदय पावलेला सूर्य त्याच्या योगानें चंद्रासारखा भासत आहे प्रातःकालीं ऊन पूर्णपणें घ्यावेंसें वाटतें, दुपारीं त्याचा स्पर्श सुखावह होतो आणि सायंकाळीं काहींसें पाढरकें असलेलें तें ऊन भूमीवर पडलें असतां शोभूं लागतें दंव पडल्यामुळें ज्याच्यातील गवत किंचित् भिजून गेलेलें आहे, अशा वनभूमीवर कोवळें ऊन पडलें असल्यानें शोभत आहे. (१४-२०)

"या दिवसांत अत्यंत तृषित झालेलाही वनगज प्रथम अगाध शीत उदकाला सुखानें सोंड लावतो; परंतु तें फार गार लागताच तो सट्दिशीं आखडून घेतो.

एते हि समुपासीना विहगा जलचारिणः ।
नावगाहन्ति सलिलमप्रगल्भा इवाहवम् २२
अवश्यायतमोनद्धा नीहारतमसावृताः ।
प्रसुप्ता इव लक्ष्यन्ते विपुष्पा वनराजयः २३
बाष्पसंछन्नसलिला रुतविज्ञेयसारसाः ।
हिमार्द्रवालुकास्तीरैः सरितो भान्ति सांप्रतम् २४
तुषारपतनाच्चैव मृदुत्वाद्भास्करस्य च ।
शैत्यादगाग्रस्थमपि प्रायेण रसवज्जलम् २५
जराजर्झरितैः पत्रैः शीर्णकेसरकर्णिकैः ।
नालशेषा हिमध्वस्ता न भान्ति कमलाकराः २६
अस्मिंस्तु पुरुषव्याघ्र काले दुःखसमन्वितः ।

हे जलचर पक्षी पाण्याजवळ बसले असताही, वयात न आलेले पुरुष ज्याप्रमाणें संग्रामामध्यें शिरत नाहींत, त्याप्रमाणें पाण्यात शिरत नाहींत. रात्रीं तुषाररूप तमानें जखडलेले आणि प्रातःकालीं अंधकारमय धुक्यानें आच्छादलेले पुष्परहित वनसमुदाय निद्रित झाल्यासारखे दिसत आहेत. सांप्रत नद्यांतील पाणी आतून निघणाऱ्या वाफांनीं आच्छादित झालेलें दिसतें, यामुळें तेथें असलेले सारसपक्षी शब्द करूं लागले तरच समजतें आणि भोंवतालीं असलेली वाळवंटेंही वर्फानें ओलीं झालेलीं असतात. यामुळें नद्या सांप्रत तीरावरूनच ओळखता येतात. बर्फ पडत असल्यानें व सूर्य सौम्य झाला असल्यानें पर्वताच्या शिखरावरीलही पाणी थंडीमुळें प्रायः पाऱ्यासारखेंच * दिसत असतें. बर्फानें दुर्दशा करून टाकल्यामुळें कमलाचे देठच ज्यामध्यें अवशिष्ट राहिले आहेत, अशीं सरोवरें आता शोभा देत नाहींत, कारण या ऋतूंमध्यें थंडीमुळें कमलाचे पराग

* या ठिकाणीं मुळामध्यें " रसवत् " असें पद आहे व त्याचा अर्थ वरील श्लोकांतील इतर पदाकडे लक्ष दिलें असतां आणि त्यातूनही विशेषत " तुषारपतनात " या पदाकडे लक्ष दिलें असता पारा असा केल्यावाचून गत्यंतरच नाहीं. तेव्हा प्राचीन ग्रंथांतून पाऱ्याचें नावच आढळत नाहीं, असें म्हणणाऱ्यांनीं या अतिप्राचीन ग्रंथांतील श्लोकाकडे लक्ष द्यावें.

तपश्चरति धर्मात्मा त्वद्भक्त्या भरतः पुरे २७
त्यक्त्वा राज्यं च मानं च भोगांश्च विविधान्बहून् ।
तपस्वी नियताहारः शेते शीते महीतले २८
सोऽपि वेलामिमां नूनमभिषेकार्थमुद्यतः ।
वृतः प्रकृतिभिर्नित्यं प्रयाति सरयूं नदीम् २९
अत्यन्तसुखसंवृद्धः सुकुमारो हिमार्दितः ।
कथं त्वपररात्रेषु सरयूमवगाहते ३०
पद्मपत्रेक्षणः श्यामः श्रीमान्निरुदरो महान् ।
धर्मज्ञः सत्यवादी च ह्रीनिषेधो जितेन्द्रियः ३१
प्रियाभिभाषी मधुरो दीर्घबाहुररिंदमः ।
संत्यज्य विविधान्सौख्यानार्यं सर्वात्मना श्रितः ३२
जितः स्वर्गस्तव भ्रात्रा भरतेन महात्मना ।
वनस्थमपि तापस्ये यस्त्वामनुविधीयते ३३

आणि कोश नाहींसे झालेले असतात आणि पानेंही जीर्णतेमुळें झडून गेलेलीं असतात (२१-२६)

"हे पुरुषश्रेष्ठा ! सध्या दु:खी असलेला धर्मात्मा भरत तुझ्या भक्तीनें नगरात तपश्चर्या करीत आहे आणि राज्य, मान व अनेक प्रकारच्या विपुल भोग्य वस्तु याचा त्याग करून शुद्ध आहार करणारा तो भरत थंड भूमीवर शयन करीत आहे. तोही खरोखर या वेळीं स्नानाला जाण्याकरितां उठत असेल आणि मंत्र्यांनीं परिवेष्टित असलेला तो नित्य सरयूनदीवर जात असेल परंतु अत्यंत सुखामध्ये वाढलेला आणि फारच सुकुमार असा तो भरत थंडीमुळें व्याकुल झाला असता उत्तर रात्रीं त्याच्यानें स्नान कसें बरें करवत असेल ? कमलपत्रासारख्या नेत्रांनीं युक्त, मेघश्याम, श्रीमान्, सडपातळ, भव्य, धर्मवेत्ता, सत्यवचनी, जितेंद्रिय आणि म्हणूनच परस्त्रीविषयीं लज्जेनें मनाचें संयमन केलेला, प्रियभाषी, मनोहर, आजानुबाहु आणि शत्रूंचें दमन करणारा तो भरत नानाप्रकारच्या सौख्याचा त्याग करून सर्वस्वी तुमचें अनुकरण करीत आहे. ज्याअर्थी वनात असलेल्याही तुझ्या तापस धर्माचें अवलंबन करून भरत अनुकरण करीत आहे, त्याअर्थी तुझ्या

न पित्र्यमनुवर्तन्ते मातृकं द्विपदा इति ।
ख्यातो लोकप्रवादोऽयं भरतेनान्यथा कृतः ३४
भर्ता दशरथो यस्याः साधुश्च भरतः सुतः ।
कथं नु साम्बा कैकेयी तादृशी क्रूरदर्शिनी ३५
इत्येवं लक्ष्मणे वाक्यं स्नेहाद्वदति धार्मिके ।
परिवादं जनन्यास्तमसहन्राघवोऽब्रवीत् ३६
न तेऽम्बा मध्यमा तात गर्हितव्या कदाचन ।
तामेवेक्ष्वाकुनाथस्य भरतस्य कथां कुरु ३७
निश्चितैव हि मे बुद्धिर्वनवासे दृढव्रता ।
भरतस्नेहसंतप्ता बालिशी क्रियते पुनः ३८
संस्मराम्यस्य वाक्यानि प्रियाणि मधुराणि च ।
हृद्यान्यमृतकल्पानि मनःप्रह्लादनानि च ३९
कदा ह्यहं समेष्यामि भरतेन महात्मना ।
शत्रुघ्नेन च वीरेण त्वया च रघुनन्दन ४०

त्या महात्म्या भरतानें स्वर्ग जिंकला आहे मनुष्यें पित्याच्या स्वभावाचें अनुकरण न करता मातेच्या स्वभावाचें अनुकरण करीत असतात, ही म्हण लोकांत प्रसिद्ध आहे. तथापि भरतानें ती आज खोटी केली आहे परंतु दशरथ जिचा भर्ता आणि सज्जन भरत जिचा पुत्र ती कैकेयी माता का बरें तशा प्रकारची क्रूर बुद्धीची असावी ?" (२७–३५)

याप्रमाणें धर्मनिष्ठ लक्ष्मण प्रेमानें बोलत असता मातेची ती निंदा सहन न होऊन राम त्याला म्हणाला, " बा लक्ष्मणा ! मधल्या मातेची यत्किंचितही निंदा न करता त्या इक्ष्वाकुवंशाधिपति भरताचीच गोष्ट तूं सांग. स्वीकारलेलें व्रत नेटानें चालवावयाचें हा माझ्या बुद्धीचा स्वभाव असून ती बुद्धि वनवासाविषयीं निश्चित झाली आहे, परंतु भरताचे ठिकाणीं असलेल्या प्रेमामुळें त्याचा वियोग सहन न होऊन ती पुनरपि चंचल होत आहे अरे ! प्रिय, मधुर, मनोहर, अमृततुल्य आणि मनाला आल्हाद देणाऱ्या अशा या भरताच्या भाषणाचें मला स्मरण होत आहे तेव्हां हे रघुनंदना ! तुझ्यासह माझी महात्म्या भरताशीं व

इत्येवं विलपंस्तत्र प्राप्य गोदावरीं नदीम् ।
चक्रेऽभिषेकं काकुत्स्थः सानुजः सह सीतया　४१
तर्पयित्वाथ सलिलैस्ते पितृन्दैवतानपि ।
स्तुवन्ति स्मोदितं सूर्यं देवताश्च तथानघाः　४२
कृताभिषेकः स रराज रामः सीताद्वितीयः सह लक्ष्मणेन ।
कृताभिषेकस्त्वगराजपुत्र्या रुद्रः सनन्दिर्भगवानिवेशः ४३
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे षोडशः सर्गः ॥१६॥[५४३]

सप्तदशः सर्गः ।

कृताभिषेको रामस्तु सीता सौमित्रिरेव च ।
तस्माद्गोदावरीतीरात्ततो जग्मुः स्वमाश्रमम्　१
आश्रमं तदुपागम्य राघवः सहलक्ष्मणः ।
कृत्वा पौर्वाह्णिकं कर्म पर्णशालामुपागमत् ।
उवास सुखितस्तत्र पूज्यमानो महर्षिभिः　२
स रामः पर्णशालायामासीनः सह सीतया ।

वीर शत्रुघ्नाशीं कधीं बरें भेट होईल ? " याप्रमाणें विलाप करीत करीत गोदावरी नदीवर आल्यावर सीता आणि लक्ष्मण यासह रामानें स्नान केलें. त्या उदकानें पितरांचें व देवांचें त्यानीं तर्पण केलें व नंतर त्या निष्पाप अशा रामप्रभृतींनीं उदय पावलेल्या सूर्याचें व देवतांचें स्तवन केलें. पार्वतीला बरोबर घेऊन स्नान करून निघालेला भगवान् प्रभु रुद्र जाऊं लागला असता ज्याप्रमाणें शोभतो, त्याप्रमाणें सीतेला बरोबर घेऊन लक्ष्मणासह राम स्नान करून जाऊं लागला असता शोभूं लागला. (३६-४३)

*याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला. ॥१६॥*

स्नान झाल्यावर राम, सीता आणि लक्ष्मण हे त्या गोदावरीच्या तीरावरून आपल्या आश्रमाला गेले. त्या आश्रमांत आल्यानंतर सकाळची स्नानसंध्या आटोपून राम लक्ष्मणासह बाहेर असलेल्या पर्णशालेमध्यें गेला आणि महर्षींकडून प्रशंसित असा तो राम पर्णशालेमध्यें सुखानें राहिला. तो महापराक्रमी

विरराज महाबाहुश्चित्रया चन्द्रमा इव ३
लक्ष्मणेन सह भ्रात्रा चकार विविधाः कथाः।
तथाऽऽसीनस्य रामस्य कथासंसक्तचेतसः ४
तं देशं राक्षसी काचिदाजगाम यदृच्छया।
सा तु शूर्पणखा नाम दशग्रीवस्य रक्षसः ५
भगिनी राममासाद्य ददर्श त्रिदशोपमम्।
दीप्तास्यं च महाबाहुं पद्मपत्रायतेक्षणम् ६
गजविक्रान्तगमनं जटामण्डलधारिणम्।
सुकुमारं महासत्त्वं पार्थिवव्यञ्जनान्वितम् ७
राममिन्दीवरश्यामं कंदर्पसदृशप्रभम्।
बभूवेन्द्रोपमं दृष्ट्वा राक्षसी काममोहिता ८
सुमुखं दुर्मुखी रामं वृत्तमध्यं महोदरी।
विशालाक्षं विरूपाक्षी सुकेशं ताम्रमूर्धजा ९
प्रियरूपं विरूपा सा सुस्वरं भैरवस्वना।

---

राम सीतेसह पर्णशालेंत बसला असता चित्रा नक्षत्रासह असलेल्या चंद्राप्रमाणें शोभूं लागला आणि भ्राता लक्ष्मणाशीं तो नानाप्रकारच्या गोष्टींबद्दल बोलूं लागला, याप्रमाणें गोष्टीकडे मन व्यग्र होऊन राम बसला असतांना कोणीएक राक्षसी स्वेच्छेनें त्या ठिकाणीं आली ती रावण राक्षसाची बहिण शूर्पणखा नावाची होती आणि रामाजवळ आल्यावर तिनें देवाप्रमाणें कान्तिमान् व सुन्दर अशा रामाला अवलोकन केलें, इतकेंच नव्हे तर देदीप्यमान मुख, आजानुबाहु, कमलपत्राप्रमाणें दीर्घ नेत्र, गजाप्रमाणें शौर्यदर्शक गति, सुकुमार, महाधैर्यवान्, जटामंडल आणि राजलक्षणें यानीं युक्त, नीलकमलाप्रमाणें श्यामवर्ण आणि मदनासारख्या कांतीनें युक्त व इन्द्रतुल्य अशा त्या रामाला अवलोकन करून ती राक्षसी कामानें मोहित झाली (१–८)

नंतर विकाळ मुख, मोठें पोट, विरूप नेत्र, ताम्रवर्ण केस, कुरूप मुद्रा, भयंकर स्वर, उग्र स्वभाव, वृद्ध वय, कुटिल भाषण, अतिशय दुष्ट वर्तन आणि उद्वेगजनक मुद्रा यानीं युक्त असलेली ती राक्षसी कामाधीन होऊन उत्कृष्ट मुख,

तरुणं दारुणा वृद्धा दक्षिणं वामभाषिणी १०
न्यायवृत्तं सुदुर्वृत्ता प्रियमप्रियदर्शना ।
शरीरजसमाविष्टा राक्षसी वाक्यमब्रवीत् ११
जटी तापसवेषेण सभार्यः शरचापधृक् ।
आगतस्त्वमिमं देशं कथं राक्षससेवितम् १२
किमागमनकृत्यं ते तत्त्वमाख्यातुमर्हसि ।
एवमुक्तस्तु राक्षस्या शूर्पणख्या परंतपः १३
ऋजुबुद्धितया सर्वमाख्यातुमुपचक्रमे ।
आसीद्दशरथो नाम राजा त्रिदशविक्रमः १४
तस्याहमग्रजः पुत्रो रामो नाम जनैः श्रुतः ।
भ्रातायं लक्ष्मणो नाम यवीयान्मामनुव्रतः १५
इयं भार्या च वैदेही मम सीतेति विश्रुता ।
नियोगात्तु नरेन्द्रस्य पितुर्मातुश्च यन्त्रित १६
धर्मार्थं धर्मकाङ्क्षी च वनं वस्तुमिहागतः ।
त्वां तु वेदितुमिच्छामि कस्य त्वं काऽसि कस्य वा १७

कृश उदर, विशाल नयन, सुंदर केस, सुरूप मुद्रा, मंजुळ स्वर, सौम्य स्वभाव, तरुण वय, सरल भाषण, न्यायाला अनुसरून असलेलें वर्तन आणि आल्हादकारक मुद्रा यांनीं युक्त असलेल्या रामाला म्हणाली, " धनुष्य व बाण धारण करणारा तू जटिल तपस्व्याचा वेष धारण करून भार्येसह या राक्षसांनीं आश्रय केलेल्या प्रदेशामध्यें कसा बरें आलास ? तू येथें येण्याचें कारण काय, तें मला खरें खरें सांग." (९-१३)

याप्रमाणें शूर्पणखा राक्षसीनें विचारलें असता तो शत्रुतापन राम सरळ स्वभावाचा असल्यामुळें सर्व सांगू लागला तो म्हणाला- "देवतुल्य पराक्रमी असा एक दशरथ नावाचा राजा होऊन गेला त्याचा मी ज्येष्ठ पुत्र आहें व मी लोकामध्यें राम या नावानें प्रख्यात आहें हा लक्ष्मण नावाचा माझा कनिष्ठ भ्राता असून तो मला अनुसरून वागत असतो ही सीता म्हणून प्रसिद्ध असलेली विदेह राजाची कन्या माझी पत्नी आहे नरेन्द्र अशा माझ्या पित्याची आणि

त्वं हि तावन्मनोज्ञाङ्गी राक्षसी प्रतिभासि मे।
इह वा किंनिमित्तं त्वमागता ब्रूहि तत्त्वतः १८
साऽब्रवीद्वचनं श्रुत्वा राक्षसी मदनार्दिता।
श्रूयतां राम तत्त्वार्थं वक्ष्यामि वचनं मम १९
अहं शूर्पणखा नाम राक्षसी कामरूपिणी।
अरण्यं विचरामीदमेका सर्वभयंकरा २०
रावणो नाम मे भ्राता यदि ते श्रोत्रमागतः।
प्रवृद्धनिद्रश्च सदा कुम्भकर्णो महाबलः २१
विभीषणस्तु धर्मात्मा न तु राक्षसचेष्टितः।
प्रख्यातवीर्यौ च रणे भ्रातरौ खरदूषणौ २२
तानहं समतिक्रान्ता राम त्वाऽपूर्वदर्शनात्।
समुपेतास्मि भावेन भर्तारं पुरुषोत्तमम् २३

मातेची आज्ञा झाल्यामुळें वचनबद्ध होऊन धर्माभिलाषी, धर्मपालनार्थ वनात राहण्याकरता मी येथें आलों आहे आता तुला जाणण्याची माझी इच्छा आहे तू कोण आहेस व कोणाची आहेस ? मला तर तूं मनोहर अवयवानीं युक्त असलेली राक्षसी भासत आहेस तेव्हा येथें कोणत्या कारणाकरता तूं आलीस हें मला खरें सांग " (१३–१८)

हें रामाचें भाषण ऐकल्यावर कामानें व्याकुल झालेली ती राक्षसी त्याला म्हणाली, " हे रामा ! माझें बोलणें ऐक; मी तुला खरें खरें सांगत आहें. इच्छेप्रमाणें रूप धारण करणारी मी शूर्पणखा नामक राक्षसी आहें मी सर्वांना भय उत्पन्न करणारी असून या अरण्यामध्यें एकटी संचार करीत असतें रावण नांवाचा माझा भ्राता आहे त्याचें नाव कदाचित् तूं ऐकलेंच असशील कुंभकर्ण नावाचा एक महाबलाढ्य व नेहमींच गाढ निद्रेंत असलेला एक दुसरा भ्राता आहे. विभीषण म्हणून जो तिसरा भ्राता आहे त्याचें वर्तन राक्षसासारखें नसून तो धर्मात्मा आहे आणि संग्रामात ज्याचें वीर्य प्रख्यात आहे असे दुसरे दोन भ्राते खर व दूषण म्हणून आहेत ( १९–२२ )

" हे रामा ! तुझें अपूर्व रूप दृष्टीस पडल्यामुळें तू पुरुषश्रेष्ठ माझा भर्ता

अहं प्रभावसंपन्ना स्वच्छन्दबलगामिनी ।
चिराय भव भर्ता मे सीतया किं करिष्यसि २४
विकृता च विरूपा च न सेयं सदृशी तव ।
अहमेवानुरूपा ते भार्यारूपेण पश्य माम् २५
इमां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् ।
अनेन सह ते भ्रात्रा भक्षयिष्यामि मानुषीम् २६
ततः पर्वतशृंगाणि वनानि विविधानि च ।
पश्यन्सह मया कामी दण्डकान्विचरिष्यसि २७
इत्येवमुक्तः काकुत्स्थः प्रहस्य मदिरेक्षणाम् ।
इदं वचनमारेभे वक्तुं वाक्यविशारदः २८

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे सप्तदशः सर्गः ॥१७॥[५७१]

अष्टदशः सर्गः ।

तां तु शूर्पणखां रामः कामपाशावपाशिताम् ।

म्हणून या हेतूनें त्या भ्रात्याची पर्वा न करिता मी प्रेमानें तुझ्याकडे आलें आहे. मी प्रभावसंपन्न असून स्वेच्छेनें व स्वसामर्थ्यानें सर्व लोकामध्यें गमन करणारी आहे याकरिता तूं माझा चिरकाल भर्ता हो, सीतेचा तुला काय उपयोग आहे? सीता विकृत व कुरूप असल्यामुळें तुला अनुरूप नाहीं. मीच तुला अनुरूप आहें. तेव्हां भार्या या नात्यानें तूं माझ्याकडे पहा विरूप, दुराचारिणी, अकाळविक्राळ आणि पोट अतिशय बखळीला गेलेली ही मनुष्य जातीची भार्या तुझ्या भ्रात्यासह मी भक्षण करून टाकीन व नंतर विषयोपभोगाची इच्छा धरून पर्वतशिखरें आणि नानाप्रकारचीं वनें पहात पहात तूं माझ्यासह दंडकारण्यात संचार करशील." (२३-२७)

याप्रमाणें तिनें सांगितलें असता ककुत्स्थकुलोत्पन्न राम मदिरेसारख्या नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या शूर्पणखेकडे पाहून हंसला आणि संभाषण करण्यांत निपुण असलेला तो राम तिच्याशीं बोलूं लागला. (२८)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाडांपैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

स्वेच्छया श्लक्ष्णया वाचा स्मितपूर्वमथाब्रवीत् १
कृतदारोऽस्मि भवति भार्येयं दयिता मम ।
त्वद्विधानां तु नारीणां सुदुःखा ससपत्नता २
अनुजस्त्वेष मे भ्राता शीलवान्प्रियदर्शनः ।
श्रीमानकृतदारश्च लक्ष्मणो नाम वीर्यवान् ३
अपूर्वी भार्यया चार्थी तरुणः प्रियदर्शनः ।
अनुरूपश्च ते भर्ता रूपस्यास्य भविष्यति ४
एनं भज विशालाक्षि भर्तारं भ्रातरं मम ।
असपत्ना वरारोहे मेरुमर्कप्रभा यथा ५
इति रामेण सा प्रोक्ता राक्षसी काममोहिता ।
विसृज्य रामं सहसा ततो लक्ष्मणमब्रवीत् ६
अस्य रूपस्य ते युक्ता भार्याऽहं वरवर्णिनी ।

मदनपाशानें बद्ध झालेल्या त्या शूर्पणखेला राम विनोदानें आणि हास्यपूर्वक मधुर वाणीनें म्हणाला, "बाई ! माझा विवाह झाला आहे, ही माझी प्रिय भार्या आहे आणि तुझ्यासारख्या स्त्रियांना सवत असणें फारच दुःखदायक आहे. हा माझा लक्ष्मण नावाचा कनिष्ठ भ्राता सुशील, वीर्यवान्, दिसण्याला मनोहर, वैभवशाली आणि अविवाहित * आहे याला आजपर्यंत कधीं भार्येचें सुख ठाऊक नाहीं आणि म्हणूनच भार्येची याला गरज आहे. तेव्हां तरुण आणि दिसण्यांतही मनोहर असल्यानें हा तुझ्या रूपाला योग्य असा पति होईल. म्हणून हे विशालनयने ! हे सुंदरि ! मेरुपर्वताची सेवा करणाऱ्या सूर्याच्या प्रभेप्रमाणें सवत नसलेली तूं या माझ्या भ्रात्याचा स्वीकार कर " (१-५)

याप्रमाणें रामानें सांगितलें असतां कामानें मोहित झालेली ती राक्षसी

* लक्ष्मणाचा विवाह झालेला असूनही तो अविवाहित आहे असें रामानीं शूर्पणखेला सांगितलें आहे, परंतु राम तिच्याशीं थट्टेनें बोलूं लागले असें आरंभींच सांगितलें आहे व थट्टेमध्यें केलेलें असत्य भाषण दोषास्पद होत नाहीं. कारण " न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन् विवाहकाले । प्राणात्यये सर्वधनापहारे पंचानृतान्याहुरपातकानि ॥ " असें वचन आहे.

मया सह सुखं सर्वान्दण्डकान्विचरिष्यसि ७
एवमुक्तस्तु सौमित्री राक्षस्या वाक्यकोविदः ।
ततः शूर्पणखीं स्मित्वा लक्ष्मणो युक्तमब्रवीत् ८
कथं दासस्य मे दासी भार्या भवितुमिच्छसि ।
सोऽहमार्येण परवान्भ्रात्रा कमलवर्णिनी ९
समृद्धार्थस्य सिद्धार्था मुदितामलवर्णिनी ।
आर्यस्य त्वं विशालाक्षि भार्या भव यवीयसी १०
एतां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् ।
भार्यां वृद्धां परित्यज्य त्वामेवैष भजिष्यति ११
को हि रूपमिदं श्रेष्ठं संत्यज्य वरवर्णिनि ।
मानुषीषु वरारोहे कुर्याद्भावं विचक्षणः १२
इति सा लक्ष्मणेनोक्ता कराला निर्णतोदरी ।
मन्यते तद्वचः सत्यं परिहासाविचक्षणा १३

रामाला सोडून देऊन लक्ष्मणाला एकदम म्हणाली– "मी श्रेष्ठ स्त्री तुझ्या रूपाला योग्य भार्या आहें. तूं माझ्यासह सर्व दंडकारण्यात सुखानें संचार करशील" याप्रमाणें ती राक्षसी लक्ष्मणाला म्हणाली असता संभाषण करण्यात प्रवीण असलेला तो लक्ष्मण हास्य करून शूर्पणखेला म्हणाला, " रक्तकमलासारख्या वर्णानें युक्त असलेली तूं मज दासाची भार्या होऊन दासी बनण्याची का बरें इच्छा करीत आहेस ? कारण मी आपल्या आर्यभ्रात्याच्या तंत्रानें वागणारा म्हणून परतंत्र आहें. तेव्हा हे विशालनयने ! निर्मल कांतीनें युक्त असलेली तूं उत्कृष्ट विषयवासनेनें युक्त असलेल्या आर्य रामाची कनिष्ठ भार्या होऊन कृतकृत्य व आनंदित हो. कुरूप, ओबडधोबड, कृशोदरी, दुराचरणी आणि वृद्ध अशा या भार्येचा त्याग करून हा तुझ्यावरच प्रेम करील. कारण हे श्रेष्ठ स्त्रिये, हे सुंदरि ! हे श्रेष्ठ रूप टाकून देऊन कोण बरें शहाणा पुरुष मनुष्यजातींतील स्त्रियावर प्रेम करील. ?" (६–१२)

याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असता थट्टा समजण्याइतकी चतुर नसलेली ती अक्राळविक्राळ व पोट खपाटीला गेलेली शूर्पणखा तें भाषण खरेंच मानू

सा रामं पर्णशालायामुपविष्टं परंतपम् ।
सीतया सह दुर्धर्षमब्रवीत्काममोहिता १४
इमां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् ।
वृद्धां भार्यामवष्टभ्य न मां त्वं बहु मन्यसे १५
अद्येमां भक्षयिष्यामि पश्यतस्तव मानुषीम् ।
त्वया सह चरिष्यामि निःसपत्ना यथासुखम् १६
इत्युक्त्वा मृगशावाक्षीमलातसदृशेक्षणा ।
अभ्यगच्छत्सुसंक्रुद्धा महोल्का रोहिणीमिव १७
तां मृत्युपाशप्रतिमामापतन्तीं महाबलः ।
निगृह्य रामः कुपितस्ततो लक्ष्मणमब्रवीत् १८
क्रूरैरनार्यैः सौमित्रे परिहासः कथंचन ।
न कार्यः पश्य वैदेहीं कथंचित्सौम्य जीवतीम् १९
इमां विरूपामसतीमतिमत्तां महोदरीम् ।

लागली आणि तेजामुळें ज्याच्या समोर इतरांनीं जाणेंही अशक्य होतें, असा तो शत्रुतापन राम पर्णशालेमध्यें सीतेसह बसला असताना काममोहित झालेली ती शूर्पणखा त्याला म्हणाली– "विरूप, दुराचारिणी, ओबडधोबड, पोट खपटाडीला गेलेली आणि वृद्ध अशी जी ही भार्या तिच्यावरील प्रेमामुळें तूं माझा अव्हेर करीत आहेस तेव्हां मी आज या तुझ्या मनुष्य जातीच्या स्त्रीला तुझ्या समक्ष भक्षण करून टाकीन आणि याप्रमाणें सवत नाहींशी झालेली मी तुझ्याबरोबर सुखानें संचार करीन." (१३–१६)

याप्रमाणें रामाला बोलून रोहिणीकडे धावणारी मोठी जळजळीत उल्काच की काय, अशा रीतीनें अलातचक्रासारख्या नत्रांनीं युक्त असलेली ती शूर्पणखा अत्यंत क्रुद्ध होऊन मृगलोचन हरणाच्या छाव्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशा सीतेच्या अंगावर धांवली. परंतु मृत्युपाशाप्रमाणें असलेली ती शूर्पणखा अंगावर धांवून येऊं लागली असतां क्रुद्ध झालेला महाबलाढ्य राम तिला दटावून लक्ष्मणाला म्हणाला, " हे लक्ष्मणा ! क्रूर आणि दुष्ट लोकांबरोबर थट्टा कधींही करूं नये. हे सत्त्वस्थ लक्ष्मणा ! आपल्या थट्टेमुळें ही राक्षसी, कशीतरी जीव

राक्षसीं पुरुषव्याघ्र विरूपयितुमर्हसि २०
इत्युक्तो लक्ष्मणस्तस्याः क्रुद्धो रामस्य पश्यतः।
उद्धृत्य खड्गं चिच्छेद कर्णनासे महाबलः २१
निकृत्तकर्णनासा तु विस्वरं सा विनद्य च।
यथागतं प्रदुद्राव घोरा शूर्पणखा वनम् २२
सा विरूपा महाघोरा राक्षसी शोणितोक्षिता।
ननाद विविधान्नादान्यथा प्रावृषि तोयदः २३
सा विक्षरन्ती रुधिरं बहुधा घोरदर्शना।
प्रगृह्य बाहू गर्जन्ती प्रविवेश महावनम् २४
ततस्तु सा राक्षससङ्घसंवृतं खरं जनस्थानगतं विरूपिता।
उपेत्य तं भ्रातरमुग्रतेजसं पपात भूमौ गगनाद्यथाशनिः २५
ततः सभार्यं भयमोहमूर्च्छिता सलक्ष्मणं राघवमागतं वनम्।
निरूपणं चात्मनि शोणितोक्षिता शशंस सर्वं भगिनी खरस्य सा २६
इत्यार्षे श्रीम० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे अष्टादश सर्ग ॥१८॥ [५९७]

---

धरून असलेल्या सीतेला खाण्याला प्रवृत्त झाली आहे आधींच कुरूप, दुराचारिणी, अतिशय मत्त आणि तुंदिल असलेल्या या राक्षसीला, हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा! तूं विरूप करून टाक" (१७-२०)

याप्रमाणें रामानें सांगितलें असता क्रुद्ध झालेल्या महाबलाढ्य लक्ष्मणानें रामासमक्षच खड्ग उपसून तिचे कान व नाक हीं कापून टाकलीं. तेव्हां कान व नाक तुटलेली ती घोर शूर्पणखा भेसूर रीतीनें ओरडली आणि आल्या वाटेनें वनांत पळून गेली. विरूप झाल्यामुळें अंगावर रक्ताचा सडा झालेल्या त्या महाघोर राक्षसीनें पर्जन्यकालीं गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें नानाप्रकारच्या गर्जना केल्या आणि अनेक प्रकारानीं रक्ताचा स्राव करणारी व घोर मुद्रेनें युक्त असलेली ती शूर्पणखा हात वर करून गर्जना करीत करीत महावनामध्यें शिरली. तदनंतर विरूप करून टाकलेली ती शूर्पणखा जनस्थानामध्यें राक्षससमुदायानीं परिवेष्टित असलेल्या त्या उग्र तेजस्वी भावाजवळ गेल्यावर आकाशातून कोसळणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें एकाएकीं भूमीवर पडली व नंतर भय आणि मोह

एकोनविंशः सर्गः ।

तां तथा पतितां दृष्ट्वा विरूपां शोणितोक्षिताम् ।
भगिनीं क्रोधसंतप्तः खरः पप्रच्छ राक्षसः १
उत्तिष्ठ तावदाख्याहि प्रमोहं जहि संभ्रमम् ।
व्यक्तमाख्याहि केन त्वमेवंरूपा विरूपिता २
कः कृष्णसर्पमासीनमाशीविषमनागसम् ।
तुदत्यभिसमापन्नमङ्गुल्यग्रेण लीलया ३
कालपाशं समासज्ज्य कण्ठे मोहान्न बुध्यते ।
यस्त्वामद्य समासाद्य पीतवान्विषमुत्तमम् ४
बलविक्रमसंपन्ना कामगा कामरूपिणी ।
इमामवस्थां नीता त्वं केनान्तकसमागता ५
देवगन्धर्वभूतानामृषीणां च महात्मनाम् ।
कोऽयमेवं महावीर्यस्त्वां विरूपां चकार ह ६

---

यानीं व्याप्त होऊन अंगावर रक्ताचा सडा झालेली ती खराची भगिनी शूर्पणखा, भार्या आणि लक्ष्मण यासह वनामध्यें राम आल्याचें व लक्ष्मणानें आपल्याला विरूप केल्याचें सर्व वृत्त त्याला सांगूं लागली ( २१-२६ )

*याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥१८॥*

अंगावर रक्ताचा सडा झालेली आणि विरूप केलेली ती आपली भगिनी तशा प्रकारें भूमीवर पडलेली पाहून खर राक्षस तिला म्हणाला, " ऊठ, मोह व भय सोडून दे आणि तुला अशी विरूप कोणी केली तें सांग ज्याच्या दाढेमध्यें विष आहे अशा संमुख बसलेल्या निरपराधी कृष्णसर्पाला लीलेनें कोण बरें बोटानें डिवचीत आहे ? ज्यानें आज तुझ्याशीं असा अति प्रसंग केला आहे, त्यानें गळ्यामध्यें कालपाश अडकवून जहर विष सेवन केलें आहे, हें त्याला मोहामुळें समजत नाहीं. बल आणि पराक्रम यानीं संपन्न, स्वेच्छेनें गमन करणारी, यथेष्ट रूप धारण करणारी आणि मृत्यूप्रमाणें असलेल्या तुझी ही दुर्दशा कोणी केली कीं ज्यामुळें तूं येथें आली आहेस ? तुलाही विरूप करून टाकून देणारा

नहि पश्याम्यहं लोके यः कुर्यान्मम विप्रियम् ।
अमरेषु सहस्राक्षं महेन्द्रं पाकशासनम् ७
अद्याहं मार्गणैः प्राणानादास्ये जीवितान्तगैः ।
सलिले क्षीरमासक्तं निष्पिबन्निव सारसः ८
निहतस्य मया संख्ये शरसंकृत्तमर्मणः ।
सफेनं रुधिरं कस्य मेदिनी पातुमिच्छति ९
कस्य पत्ररथाः कायान्मांसमुत्कृत्य संगताः ।
प्रहृष्टा भक्षयिष्यन्ति निहतस्य मया रणे १०
तं न देवा न गन्धर्वा न पिशाचा न राक्षसाः ।
मयापकृष्टं कृपणं शक्तास्त्रातुं महाहवे ११
उपलभ्य शनैः संज्ञां तं मे शंसितुमर्हसि ।
येन त्वं दुर्विनीतेन वने विक्रम्य निर्जिता १२
इति भ्रातुर्वचः श्रुत्वा क्रुद्धस्य च विशेषतः ।
ततः शूर्पणखा वाक्यं सबाष्पमिदमब्रवीत् १३

असा कोण वर्रे-देव, गंधर्व, इतर प्राणी आणि महात्मे ऋषि यामध्यें-महावीर्यवान् आहे ? (१-६)

" माझी कुचाळी काढणारा असा जगतामध्येंही मला कोणी दिसत नाहीं. पाक नावाच्या दैत्याचा वध करणाऱ्या सहस्रनयन इंद्रावाचून देवामध्येंही मला कोणी आढळत नाहीं. पाण्यात मिसळलेलें दूध पिणाऱ्या हंसपक्ष्याप्रमाणें मृत्यु आणणाऱ्या बाणांनीं मी आज हें कृत्य करणाऱ्याचे प्राण घेईन. संग्रामामध्यें माझ्या हातून बाणांनीं मर्मस्थानें तुटून मरून पडलेल्या कोणाचें बरें फेनयुक्त रक्त प्राशन करण्याची पृथ्वीला इच्छा आहे ? एकत्र जुळलेले बाण संग्रामांत माझ्या हातून वध पावून पडलेल्या कोणाच्या बरें शरीरांतून मांस बाहेर काढून आनंदानें भक्षण करणार आहेत ? महासंग्रामामध्यें माझ्या तावडींत सापडलेल्या त्या अनाथाचें रक्षण करण्यास देव, गंधर्व, पिशाचें आणि राक्षस यांपैकीं कोणीही समर्थ होणार नाहीं. म्हणून तूं अगोदर शान्त हो आणि ज्या उद्धटानें वनात येऊन तुला जिंकलें, त्याचें नाव मला सांग " (७-१२)

तरुणौ रूपसंपन्नौ सुकुमारौ महाबलौ ।
पुण्डरीकविशालाक्षौ चीरकृष्णाजिनाम्बरौ १४
फलमूलाशनौ दान्तौ तापसौ ब्रह्मचारिणौ ।
पुत्रौ दशरथस्यास्तां भ्रातरौ रामलक्ष्मणौ १५
गन्धर्वराजप्रतिमौ पार्थिवव्यञ्जनान्वितौ ।
देवौ वा दानवावेतौ न तर्कयितुमुत्सहे १६
तरुणी रूपसंपन्ना सर्वाभरणभूषिता ।
दृष्टा तत्र मया नारी तयोर्मध्ये सुमध्यमा १७
ताभ्यामुभाभ्यां संभूय प्रमदामधिकृत्य ताम् ।
इमामवस्थां नीताऽहं यथाऽनाथाऽसती तथा १८
तस्याश्चानृजुवृत्तायास्तयोश्च हतयोरहम् ।
सफेनं पातुमिच्छामि रुधिरं रणमूर्धनि १९
एष मे प्रथमः कामः कृतस्तत्र त्वया भवेत् ।
तस्यास्तयोश्च रुधिरं पिबेयमहमाहवे २०

याप्रमाणें विशेष क्रुद्ध झालेल्या त्या भ्रात्याचें भाषण श्रवण केल्यावर शूर्पणखा अश्रु ढाळीत ढाळीत त्याला म्हणाली, " तरुण, रूपवान्, सुकुमार, महाबलाढ्य, कमलपत्रासारख्या विशाल नेत्रांनीं आणि वल्कलें व कृष्णाजिनें याच वस्त्रांनीं युक्त, फलमूलावर उपजीविका करणारे, जितेंद्रिय, तपस्वी आणि ब्रह्मचारी असे दशरथाचे पुत्र भ्राते राम लक्ष्मण अरण्यामध्यें आले आहेत. राज-चिन्हांनीं युक्त आणि गंधर्वाधिपति चित्ररथाप्रमाणें असलेले हे राम-लक्ष्मण देव असावेत किंवा दानव असावेत, यासंबंधीं माझा कांहीं तर्क चालत नाहीं सारांश, दशरथाचे पुत्र म्हणून त्यांनींच जरी मला सांगितलें आहे तरी अमानुष कृत्य दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें ते वस्तुतः कोण असावेत, याविषयीं माझा निश्चय होत नाहीं त्याच्यामध्यें एक सुन्दर कटीनें युक्त असलेली स्त्री मी पाहिली ती तरुण व रूपवती असून सर्व अलंकारांनीं भूषित अशी आहे. त्या तरुण स्त्री-करितां त्या उभयतांनीं एकत्र होऊन माझी अशी अनाथ कुलटेसारखी अवस्था करून सोडली आहे त्या दुराचारिणी स्त्रीचें आणि त्या नीचांचें संग्रामांत फेस-

इति तस्यां ब्रुवाणायां चतुर्दश महाबलान् ।
व्यादिदेश खरः क्रुद्धो राक्षसानन्तकोपमान् २१
मानुषौ शस्त्रसंपन्नौ चीरकृष्णाजिनाम्बरौ ।
प्रविष्टौ दण्डकारण्यं घोरं प्रमदया सह २२
तौ हत्वा तां च दुर्वृत्तामुपावर्तितुमर्हथ ।
इयं च भगिनी तेषां रुधिरं मम पास्यति २३
मनोरथोऽयमिष्टोऽस्या भगिन्या मम राक्षसाः ।
शीघ्रं संपाद्यतां गत्वा तौ प्रमथ्य स्वतेजसा २४
युष्माभिर्निहतौ दृष्ट्वा तावुभौ भ्रातरौ रणे ।
इयं प्रहृष्टा मुदिता रुधिरं युधि पास्यति २५
इति प्रतिसमादिष्टा राक्षसास्ते चतुर्दश ।
तत्र जग्मुस्तया सार्धं घना वातेरिता इव २६

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनविंशः सर्गः ॥१९॥[१२३]

सहित रक्त पिण्याची माझी इच्छा आहे अरे, तिचें आणि त्याचें रक्त संग्रामात मी प्यावें, ही माझी उत्कट इच्छा तुझ्या हातून शेवटास जाईल तर बरें होईल " ( १३-२० )

याप्रमाणें ती बोलूं लागली असता क्रुद्ध झालेला खर राक्षस मृत्यूसारख्या चौदा महाबलाढ्य राक्षसांना म्हणाला, " सशस्त्र आणि वल्कलें व कृष्णाजिनें याच वस्त्रांनीं युक्त असलेले जे दोन मानव तरुण स्त्रीसह घोर दंडकारण्यांत प्रविष्ट झाले आहेत, त्यांचा आणि त्या दुराचारिणीचा वध करून तुम्ही परत या म्हणजे ही माझी बहीण त्यांचें रक्त प्राशन करील हे राक्षसहो ! तुम्ही जा आणि आपल्या सामर्थ्यानें त्यांचा वध करून या माझ्या बहिणीचा हा प्रिय मनोरथ लौकर परिपूर्ण करा. त्या उभयतां भ्रात्यांचा संग्रामात तुम्ही वध केलेला पाहून ही माझी बहिण हर्षानें व आनंदानें त्यांचें रक्त प्राशन करील. " (२१-२५)

याप्रमाणें आज्ञा झालेले ते चौदा राक्षस वायूनें हाकून नेलेल्या मेघाप्रमाणें तिकडे गेले ( २६ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥१९॥

विंशतिः सर्गः ।

ततः शूर्पणखा घोरा राघवाश्रममागता ।
राक्षसानाचचक्षे तौ भ्रातरौ सह सीतया १
ते रामं पर्णशालायामुपविष्टं महाबलम् ।
ददृशुः सीतया सार्धं लक्ष्मणेनापि सेवितम् २
तां दृष्ट्वा राघवः श्रीमानागतांस्तांश्च राक्षसान् ।
अब्रवीद्भ्रातरं रामो लक्ष्मणं दीप्ततेजसम् ३
मुहूर्तं भव सौमित्रे सीतायाः प्रत्यनन्तरः ।
इमानस्या वधिष्यामि पदवीमागतानिह ४
वाक्यमेतत्ततः श्रुत्वा रामस्य विदितात्मनः ।
तथेति लक्ष्मणो वाक्यं राघवस्य प्रपूजयन् ५
राघवोऽपि महच्चापं चामीकरविभूषितम् ।
चकार सज्यं धर्मात्मा तानि रक्षांसि चाब्रवीत् ६
पुत्रौ दशरथस्यावां भ्रातरौ रामलक्ष्मणौ ।
प्रविष्टौ सीतया सार्धं दुश्चरं दण्डकावनम् ७

नतर ती घोर शूर्पणखा रामाच्या आश्रमात आली आणि तेथें सीतेसह असलेल्या त्या भ्राला राम-लक्ष्मणाकडे बोट दाखवून तेच हे राम-लक्ष्मण म्हणून तिनें त्या राक्षसाना सागितलें तेव्हा लक्ष्मण ज्याची सेवा करीत आहे, असा महाबलाढ्य राम पर्णशालेमध्यें सीतेसह बसलेला त्यानीं पाहिला, परंतु तिला आणि त्या आलेल्या राक्षसाना पाहताच वैभवशाली रघुवंशज राम उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या भ्रात्या लक्ष्मणाला म्हणाला, " हे लक्ष्मणा! तूं क्षणभर सीतेजवळ रहा, मी शूर्पणखेचा अभिमान धरून तिच्या पाठोपाठ येथें आलेल्या राक्षसाचा वध करतों " हें सामर्थ्यानें महाशूर असलेल्या रघुवशज रामाचें भाषण ऐकल्यावर लक्ष्मण त्या भाषणाला मान देण्याकरिता " ठीक आहे " असें म्हणाला तेव्हा धर्मात्मा रामही आपल्या सुवर्णविभूषित प्रचंड धनुष्याला प्रत्यचा चढवून त्या राक्षसाना म्हणाला, ( १-६ )

" आम्ही दशरथाचे पुत्र भ्राते राम-लक्ष्मण सीतेसह या गहन दंडका-

फलमूलाशनौ दान्तौ तापसौ ब्रह्मचारिणौ ।
वसन्तौ दण्डकारण्ये किमर्थमुपहिंसथ ८
युष्मान्पापात्मकान्हन्तुं विप्रकारान्महाहवे ।
ऋषीणां तु नियोगेन संप्राप्तः सशरासनः ९
तिष्ठतैवात्र संतुष्टा नोपावर्तितुमर्हथ ।
यदि प्राणैरिहार्थो वो निवर्तध्वं निशाचराः १०
तस्य तद्वचनं श्रुत्वा राक्षसास्ते चतुर्दश ।
ऊचुर्वाचं सुसंक्रुद्धा ब्रह्मघ्नाः शूलपाणयः ११
संरक्तनयना घोरा रामं संरक्तलोचनम् ।
परुषा मधुराभाषं हृष्टाऽदृष्टपराक्रमम् १२
क्रोधमुत्पाद्य नो भर्तुः खरस्य सुमहात्मनः ।
त्वमेव हास्यसे प्राणान्सद्योऽस्माभिर्हतो युधि १३
का हि ते शक्तिरेकस्य बहूनां रणमूर्धनि ।
अस्माकमग्रतः स्थातुं किं पुनर्योद्धुमाहवे १४

रण्यात आलों आहों आणि आम्ही जितेंद्रिय, तपस्वी, ब्रह्मचारी असून या दंडकारण्यामध्यें फलमूलावर उपजीविका करून रहात आहोंत. तेव्हा तुम्ही आमचा वध काय म्हणून करावयास आला आहात ? सज्जनांना पीडा करणाऱ्या तुम्हां दुरात्म्यांचा महासंग्रामांत वध करण्याकरिता ऋषींच्या आज्ञेनें मी धनुष्यासह येथें आलों आहें तेव्हा तुम्ही संतुष्ट होऊन येथें उभेच रहा, परत फिरूं नका; परंतु हे निशाचरहो ! तुम्हाला जर प्राणाची अपेक्षा असेल तर तुम्ही येथून परत फिरा. " ( ७-१० )

हें त्याचें भाषण ऐकून ते घोर, तीक्ष्ण, आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त, ब्रह्मघातकी हातात शूल घेऊन आलेले व अत्यंत क्रुद्ध झालेले चौदाही राक्षस हर्षयुक्त होऊन ज्याचा पराक्रम माहीत नाहीं अशा त्या आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या मधुरभाषणी रामाला म्हणाले, " आमचा भर्ता जो महात्मा खर त्याला कोप आणल्यामुळें आज तूंच युद्धामध्यें आमच्या हातून वध पावून आताच प्राणांचा त्याग करशील, संग्रामांत युद्ध करण्याची तर गोष्टच नको आहे; परंतु रणामध्यें

पभिर्बाहुप्रयुक्तैश्च परिघैः शूलपट्टिशैः ।
प्राणांस्त्यक्ष्यसि वीर्यं च धनुश्च करपीडितम् १५
इत्येवमुक्त्वा संरब्धा राक्षसास्ते चतुर्दश ।
उद्यतायुधनिस्त्रिंशा राममेवाभिदुद्रुवुः १६
चिक्षिपुस्तानि शूलानि राघवं प्रति दुर्जयम् ।
तानि शूलानि काकुत्स्थ समस्तानि चतुर्दश १७
तावद्भिरेव चिच्छेद शरैः काञ्चनभूषितैः ।
ततः पश्चान्महातेजा नाराचान्सूर्यसंनिभान् १८
जग्राह परमक्रुद्धश्चतुर्दश शिलाशितान् ।
गृहीत्वा धनुरायम्य लक्ष्यानुद्दिश्य राक्षसान् १९
मुमोच राघवो बाणान्वज्रानिव शतक्रतुः ।
ते भित्त्वा रक्षसां वेगाद्वक्षांसि रुधिरप्लुताः २०
विनिष्पेतुस्तदा भूमौ वल्मीकादिव पन्नगाः ।
तैर्भग्नहृदया भूमौ छिन्नमूला इव द्रुमाः २१

आम्हां अनेकांच्या समोर नुसतें उभें राहण्याचें तरी तुझें एकट्याचें काय सामर्थ्य आहे ? हातांनीं सोडलेले हे परिघ, शूल व पट्टे यांच्यामुळें तू आपल्या प्राणांचा, वीर्याचा आणि हातात घेतलेल्या धनुष्याचा त्याग करशील." ( ११-१५ )

याप्रमाणें बोलल्यानंतर ते क्रुद्ध झालेले चौदा राक्षस आयुधें व खड्ग उगारून रामाच्याच अंगावर धावले आणि ते शूल त्यांनीं त्या अजिंक्य रामावर फेंकले, परंतु रामानें ते सर्व चौदाही शूल सुवर्णभूषित अशा चौदाच बाणांच्या योगानें तोडून टाकले नंतर अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या महातेजस्वी रामानें राक्षसांकडे पहात पहात शिळेवर घासलेले व सूर्यासारखे तेजस्वी असे चौदा नाराच बाण घेतले आणि ते घेतल्यावर धनुष्य लववून व त्या राक्षसावर नेम धरून वज्र सोडणाऱ्या इंद्राप्रमाणें ते बाण रामानें सोडले. तेव्हा ते बाण वेगानें राक्षसांचीं वक्षःस्थलें फोडून रक्तानें भरले आणि वारुळांतून बाहेर येणाऱ्या सर्पाप्रमाणें त्यांच्या वक्षःस्थलांतून बाहेर येऊन पृथ्वीवर पडले व त्याच वेळीं त्या बाणांनीं हृदयें विदीर्ण होऊन रक्तानें नाहलेले व विद्रूप होऊन गतप्राण झालेले ते

निपेतुः शोणितस्नाता विकृता विगतासवः ।
तान्भूमौ पतितान्दृष्ट्वा राक्षसी क्रोधमूर्छिता २२
उपगम्य खरं सा तु किंचित्संशुष्कशोणिता ।
पपात पुनरेवार्ता सनिर्यासेव वल्लरी २३
भ्रातुः समीपे शोकार्ता ससर्ज निनदं महत् ।
सस्वरं मुमुचे बाष्पं विवर्णवदना तदा २४
निपातितान्प्रेक्ष्य रणे तु राक्षसान्प्रधाविता शूर्पणखा पुनस्ततः ।
वधं च तेषां निखिलेन रक्षसां शशंस सर्वं भगिनी खरस्य सा २५
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे विंशतितमः सर्गः ॥२०॥[६४८]

एकविंशतिः सर्गः ।

स पुनः पतितां दृष्ट्वा क्रोधाच्छूर्पणखां पुनः ।
उवाच व्यक्तया वाचा तामनर्थार्थमागताम् १
मया त्विदानीं शूरास्ते राक्षसाः पिशिताशनाः ।

---

राक्षसही मुळें तुटलेल्या वृक्षाप्रमाणें भूमीवर पडले. ( १६-२२ )

तेव्हा त्याना भूमीवर पडलेले पाहून शूर्पणखा राक्षसी क्रोधानें बेफाम झाली आणि नाक व कान कापल्याला बराच वेळ झाल्यामुळें जिच्या जखमांतील रक्त किंचित् वाळलेलें आहे .अशी ती दु खित झालेली शूर्पणखा खराजवळ जाऊन पुनरपि डिंकानें भरलेल्या वेलीप्रमाणें भूमीवर पडली. तदनंतर मुख निस्तेज होऊन ती शोकाकुल झालेली शूर्पणखा भावाजवळ येऊन मोठा आक्रोश करूं लागली आणि हेल काढून अश्रु ढाळूं लागली. सारांश संग्रामात मारून टाकलेल्या राक्षसाना पाहून ती खराची भगिनी शूर्पणखा पुनः तेथून पळून परत आली आणि तिनें त्या राक्षसाच्या वधाचा सर्व वृत्तांत पूर्णपणें त्याला निवेदन केला. ( २२-२५ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥२०॥

पुनः तेथें पडलेल्या शूर्पणखेला पाहिल्यावर जणूं काय राक्षसकुलावर अनर्थ ओढवून घेण्याकरितांच आलेल्या त्या शूर्पणखेला तो खर रागारागानें

त्वत्प्रियार्थं विनिर्दिष्टाः किमर्थं रुद्यते पुनः २
भक्ताश्चैवानुरक्ताश्च हिताश्च मम नित्यशः ।
हन्यमाना न हन्यन्ते न न कुर्युर्वचो मम ३
किमेतच्छ्रोतुमिच्छामि कारणं यत्कृते पुनः ।
हा नाथेति विनर्दन्ती सर्पवच्चेष्टसे क्षितौ ४
अनाथवद्विलपसि किं नु नाथे मयि स्थिते ।
उत्तिष्ठोत्तिष्ठ मा मैवं वैक्लव्यं त्यज्यतामिति ५
इत्येवमुक्ता दुर्धर्षा खरेण परिसांत्विता ।
विमृज्य नयने सास्रे खरं भ्रातरमब्रवीत् ६
अस्मीदानीमहं प्राप्ता हतश्रवणनासिका ।
शोणितौघपरिक्लिन्ना त्वया च परिसांत्विता ७
प्रेषिताश्च त्वया शूरा राक्षसास्ते चतुर्दश ।
निहन्तुं राघवं घोरं मत्प्रियार्थं सलक्ष्मणम् ८

---

स्पष्ट वाणीनें म्हणाला," मी तर आताच त्या मांसभक्षक राक्षसांना तुझा मनोरथ परिपूर्ण करण्याकरिता रामप्रभृतींचा वध करण्याची आज्ञा देऊन पाठविले आहेत. मग तूं पुनः कां ओरडतेस ? ते राक्षस माझे भक्त आहेत, माझे ठिकाणीं अनुरक्त आहेत, नेहमीं माझें हित करणारे आहेत त्यांचा कोणी वध करूं लागला असतां ते वध पावणारे नाहींत आणि माझी आज्ञा शेवटास न नेणें हेंही त्यांच्यानें व्हावयाचें नाहीं, तेव्हां हें काय ? आणि ज्याकरितां पुनः " हे नाथ ! " म्हणून आक्रोश करीत करीत तूं सर्पाप्रमाणें पृथ्वीवर तडफडत आहेस, त्याचें कारण ऐकण्याची माझी इच्छा आहे. मी नाथ-संरक्षक असतांना तूं कां बरें अनाथाप्रमाणें विलाप करीत आहेस ? ऊठ, ऊठ, नको नको असा विलाप करूं हें दुःख करणें सोडून दे. " ( १-५ )

जिच्यासमोर इतरांनीं जाणेंही अशक्य आहे, अशा त्या शूर्पणखेचें याप्रमाणें खरानें सांत्वन केलें असतां आपले अश्रुयुक्त डोळे पुसून ती त्या खराला म्हणाली, " कान व नाक कापले गेल्यामुळें रक्तप्रवाहानें न्हालेली अशी मी तुझ्याजवळ येथें आलें होतें, तूं माझें सांत्वनही केलें होतेंस आणि माझा मनोरथ

ते तु रामेण सामर्षाः शूलपट्टिशपाणयः।
समरे निहताः सर्वे सायकैर्मर्मभेदिभिः ९
तान्भूमौ पतितान्दृष्ट्वा क्षणेनैव महाजवान्।
रामस्य च महत्कर्म महांस्त्रासोऽभवन्मम १०
साऽस्मि भीता समुद्विग्ना विषण्णा च निशाचर।
शरणं त्वां पुनः प्राप्ता सर्वतो भयदर्शिनी ११
विषादनक्राध्युषिते परित्रासोर्मिमालिनि।
किं मां न त्रायसे मग्नां विपुले शोकसागरे १२
एते च निहता भूमौ रामेण निशितैः शरैः।
ये च मे पदवीं प्राप्ता राक्षसाः पिशिताशनाः १३
मयि ते यद्यनुक्रोशो यदि रक्षःसु तेषु च।
रामेण यदि शक्तिस्ते तेजो वाऽस्ति निशाचर १४
दण्डकारण्यनिलयं जहि राक्षसकण्टकम्।
यदि राममभित्रघ्नं न त्वमद्य वधिष्यसि १५

-पूर्ण करण्याच्या उद्देशानें लक्ष्मणासह त्या घोर रामाचा वध करण्याकरिता ते चौदा शूर राक्षसही तूं पाठविले होतेस. परंतु शूल व पट्टे धारण केलेल्या त्या सर्व क्रुद्ध राक्षसांचा मर्मभेदक बाणांच्या योगानें संग्रामामध्यें रामानें वध केला. तेव्हां एका क्षणांत ते महावेगवान् राक्षस भूमीवर मरून पडलेले पाहून आणि रामाचें तें महत् कर्म अवलोकन करून मला मोठी भीति उत्पन्न झाली आहे आणि हे निशाचरा! चोहोंकडे रामाचें भय वाटत असलेली मी अत्यंत उद्विग्न, खिन्न व भयभीत होऊन पुनः तुला शरण आलें आहें! (९-११)

"अरे, विषादरूप नक्रांनीं वास्तव्य केलेल्या आणि भयरूप लाटांनीं युक्त असलेल्या अगाध शोकसागरामध्यें मी बुडत असतांना तूं माझें का बरें रक्षण करीत नाहींस? ज्यांनीं माझ्या मार्गाचें अवलंबन केलें, ते हे मांसभक्षक राक्षस तीक्ष्ण बाणांच्या योगानें रामानें मारून भूमीवर पाडले. याकरितां माझ्याबद्दल आणि त्या राक्षसांबद्दल जर तुला कांहीं दया असेल आणि रामाशीं युद्ध करण्याचें जर तुझ्या अंगीं सामर्थ्य अथवा तेज असेल तर, हे निशाचरा! दंडकारण्यांत

प्रशशंस पुनर्मौर्ख्याद्भ्रातरं रक्षसां वरम् ६
तया परुषितः पूर्वं पुनरेव प्रशंसितः ।
अब्रवीद् दूषणं नाम खरः सेनापतिं तदा ७
चतुर्दश सहस्राणि मम चित्तानुवर्तिनाम् ।
रक्षसां भीमवेगानां समरेष्वनिवर्तिनाम् ८
नीलजीमूतवर्णानां लोकहिंसाविहारिणाम् ।
सर्वोद्योगमुदीर्णानां रक्षसां सौम्य कारय ९
उपस्थापय मे क्षिप्रं रथं सौम्य धनूंषि च ।
शरांश्च चित्रान्खड्गांश्च शक्तीश्च विविधाः शिताः १०
अग्रे निर्यातुमिच्छामि पौलस्त्यानां महात्मनाम् ।
वधार्थं दुर्विनीतस्य रामस्य रणकोविद ११
इति तस्य ब्रुवाणस्य सूर्यवर्णं महारथम् ।
सदश्वैः शबलैर्युक्तमाचचक्षेऽथ दूषणः १२
तं मेरुशिखराकारं तप्तकाञ्चनभूषणम् ।

प्राशन करशील " हें खराच्या तोंडून निघालेलें भाषण श्रवण करून त्या शूर्पणखेला पुनः अतिशय आनंद झाला आणि मूर्खपणामुळें ती राक्षसामध्यें श्रेष्ठ असलेल्या आपल्या भावाची पुनः प्रशंसा करूं लागली. ( १–६ )

तेव्हा पूर्वी कठोर शब्द बोलून पुनरपि तिनें प्रशंसा केलेला तो खर दूषण नांवाच्या सेनापतीला म्हणाला, " प्राण्याची हिंसा हीच ज्याची क्रीडा आहे, नीलमेघाप्रमाणें ज्याचा वर्ण आहे, संग्रामामध्यें जे कधींही परावृत्त होत नाहींत आणि माझ्या इच्छेला अनुसरून जे वर्तन करीत असतात, असे जे भयंकर वेगवान् व खवळलेले चवदा हजार राक्षस त्यांच्याकडून तूं सर्व प्रकारें युद्धाची तयारी करव आणि हे सत्त्वशीला ! माझा रथ, धनुष्यें, बाण, अद्भुत खड्ग आणि नाना प्रकारच्या तीक्ष्ण शक्ति तूं सत्वर येथें घेऊन ये. हे संग्रामनिपुण सेनापते ! महात्म्या पौलस्त्य राक्षसाचा अग्रेसर होऊन मी त्या उद्धट रामाचा वध करण्याकरितां येथून जाण्याची इच्छा करीत आहें. " ( ७–११ )

याप्रमाणें तो खर बोलत असतांनाच सूर्यवर्ण महारथ चित्राविचित्र वर्णांनीं

हेमचक्रमसंबाधं वैदूर्यमयकूबरम् १३
मत्स्यैः पुष्पैर्द्रुमैः शैलैश्चन्द्रकान्तैश्च काञ्चनैः ।
माङ्गल्यैः पक्षिसङ्घैश्च ताराभिश्च समावृतम् १४
ध्वजनिस्त्रिंशसंपन्नं किंकिणीवरभूषितम् ।
सदश्वयुक्तं सोऽमर्षादारुरोह खरस्तदा १५
खरस्तु तन्महत्सैन्यं रथचर्मायुधध्वजम् ।
निर्यातेत्यब्रवीत्प्रेक्ष्य दूषणः सर्वराक्षसान् १६
ततस्तद्राक्षसं सैन्यं घोरचर्मायुधध्वजम् ।
निर्जगाम जनस्थानान्महानादं महाजवम् १७
मुद्गरैः पट्टिशैः शूलैः सुतीक्ष्णैश्च परश्वधैः ।
खड्गैश्चक्रै रथस्थैश्च भ्राजमानैः सतोमरैः १८
शक्तिभिः परिघैर्घोरैरतिमात्रैश्च कार्मुकैः ।
गदासिमुसलैर्वज्रैर्गृहीतैर्भीमदर्शनैः १९
राक्षसानां सुघोराणां सहस्राणि चतुर्दश ।

युक्त असलेले उत्तम अश्व जोडून तयार असल्याचें त्याला दूषणानें सांगितलें, तेव्हा मेरुपर्वताच्या शिखरासारखा आकार, उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें, सुवर्णाचीं चक्रें आणि वैदूर्य रत्नाच्या दाड्या यानीं युक्त, मंगलकारक व स्वर्णमय मत्स्य, पुष्पें, वृक्षाचे डहाळे, पाषाणमय चंद्रकांत, पक्षीगण व तारे यानीं सुशोभित केलेल्या, ध्वज आणि खड्ग यानीं युक्त, लहान लहान घंटानीं भूषित आणि उत्कृष्ट अश्व जोडलेल्या त्या विशाल रथावर तो खर रागारागानें आरूढ झाला आणि रथ, ढाली आयुधें व ध्वज यानीं युक्त असलेल्या त्या प्रचंड सैन्याला व सर्व राक्षसांना अवलोकन करून खरानें व दूषणानें त्याना "चला" अशी आज्ञा केली. नंतर भयंकर ढाली, आयुधें व ध्वज घेऊन तें राक्षसाचें सैन्य प्रचंड गर्जना करीत करीत मोठ्या वेगानें जनस्थानातून बाहेर निघालें. ( १२–१७ )

मुद्गल, पट्टे, शूल, अतिशय तीक्ष्ण धारेचे परशु, खड्ग, चक्र, रथावर असलेलें उज्ज्वल तोमर, शक्ति, घोर परिघ, प्रचंड धनुष्यें, गदा, तलवारी, मुसलें आणि दिसण्यांतही भयंकर अशीं हातात घेतलेलीं वज्रायुधें बरोबर घेऊन,

निर्यातानि जनस्थानात्खरचित्तानुवर्तिनाम् १०
तांस्तु निर्धावतो दृष्ट्वा राक्षसान्भीमदर्शनान् ।
खरस्याथ रथः किञ्चिज्जगाम तदनन्तरम् २१
ततस्ताञ्छबलानश्वांस्तप्तकाञ्चनभूषितान् ।
खरस्य मतमाज्ञाय सारथिः पर्यचोदयत् २२
संचोदितो रथः शीघ्रं खरस्य रिपुघातिनः ।
शब्देनापूरयामास दिशः सप्रदिशस्तथा २३
प्रवृद्धमन्युस्तु खरः खरस्वरो रिपोर्वधार्थं त्वरितो यथान्तकः ।
अचूचुदत्सारथिमुन्नदन्पुनर्महाबलो मेघ इवाश्मवर्षवान् २४

इत्यार्षे श्रीम० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे द्वाविंश सर्ग ॥२२॥ [६९४]

त्रयोविंश सर्ग ।

तत्प्रयातं बलं घोरमशिवं शोणितोदकम् ।
अभ्यवर्षन्महाघोरस्तुमुलो गर्दभारुणः १

---

खराच्या इच्छेप्रमाणें वागणारे अत्यंत घोर असे चौदा हजार राक्षस जनस्थानातून बाहेर पडले व दिसण्यात भयंकर असलेले ते राक्षस वेगानें जाऊ लागले आहेत असें पाहिल्यावर खराचा रथही, सर्व सेना निघाली किंवा नाहीं हें काहीं वेळ पाहून, चालू लागला सारांश चालू लागण्याविषयीं खराचा अभिप्राय समजून आल्यावर सारथ्यानें ते उत्कृष्ट सुवर्णांनीं भूषित झालेले चित्रविचित्र अश्व हाकले तेव्हा शत्रूचा घात करणाऱ्या खराचा रथ सत्वर हांकला असता तो ध्वनीनें दिशा व उपदिशा भरून काढू लागला कर्कश स्वरानें युक्त असलेला तो महाबलाढ्य खर मृत्यूप्रमाणें अत्यत क्रुद्ध होऊन शत्रूच्या वधाकरिता सत्वर निघाला आणि पाषाणवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें उच्च स्वरानें गर्जना करीत करीत त्वरा करण्याविषयीं सारथ्याला सागू लागला ( १८–२४ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥२२॥

तें घोर सैन्य चालू लागलें असता गर्दभासारख्या धूसर वर्णानें युक्त अशा तुमुल ध्वनि करणाऱ्या महाभयकर मेघानें अमगल सूचक रक्तमिश्र उदकाची वृष्टि

निपेतुस्तुरगास्तस्य रथयुक्ता महाजवाः ।
समे पुष्पचिते देशे राजमार्गे यदृच्छया २
श्यामं रुधिरपर्यन्तं बभूव परिवेषणम् ।
अलातचक्रप्रतिमं प्रतिगृह्य दिवाकरम् ३
ततो ध्वजमुपागम्य हेमदण्डं समुच्छ्रितम् ।
समाक्रम्य महाकायस्तस्थौ गृध्रः सुदारुणः ४
जनस्थानसमीपे च समाक्रम्य खरस्वनाः ।
विस्वरान्विविधांश्चक्रुर्मांसादा मृगपक्षिणः ५
व्याजह्रुरभिदीप्तायां दिशि वै भैरवस्वनम् ।
अशिवं यातुधानानां शिवा घोरा महास्वनाः ६
प्रभिन्नगजसंकाशास्तोयशोणितधारिणः ।
आकाशं तदनाकाशं चक्रुर्भीमाम्बुवाहकाः ७
बभूव तिमिरं घोरमुद्धतं रोमहर्षणम् ।
दिशो वा प्रदिशो वाऽपि सुव्यक्तं न चकाशिरे ८
क्षतजार्द्रसवर्णाभा संध्या कालं विना बभौ ।

त्या सैन्यावर केली. पुष्पयुक्त व सपाट प्रदेशावरील राजमार्गानें जाता-जाताच रथाला जोडलेले त्या खराचे ते महावेगवान् अश्व आपोआप खालीं पडले. रक्तवर्ण सीमेनें युक्त असे एक अलातचक्रासारखें श्यामवर्ण कडें सूर्याला व्यापून त्याच्या भोंवतालीं पडलें. तदनंतर एक महाभयंकर व धिप्पाड गृध्र पक्षी सुवर्ण दंडानें युक्त असलेल्या उन्नत ध्वजाजवळ आला आणि त्याच्यावर बसला. जनस्थाना-समीप जे राक्षस अवशिष्ट राहिले होते, त्याच्याजवळून कर्कश ध्वनि करणारे पशुपक्षी गेले आणि नानाप्रकारचे भेसुर शब्द करूं लागले. प्रदीप्त झाल्याप्रमाणें दिसत असलेल्या दिशेमध्यें घोर व मोठमोठ्यानें ओरडणाऱ्या कोल्ह्या राक्षसांना अशुभकारक असा भयंकर ध्वनि करूं लागल्या. गंडस्थलातून मदाचा प्रवाह चाललेल्या गजाप्रमाणें उदक व रक्त यांची वृष्टि करणाऱ्या घोर मेघानीं आकाश प्रकाशरहित करून टाकलें. अंगावर कांटा आणणारा भयंकर निबिड अंधकार पडला आणि दिशा अथवा उपदिशा स्पष्टपणें मुळींच प्रकाशेनाशा झाल्या. योग्य

खरं चाभिमुखं नेदुस्तदा घोरा मृगाः खगाः ९
कङ्कगोमायुगृध्राश्च चक्रुशुर्भयशंसिनः ।
नित्याशिवकरा युद्धे शिवा घोरनिदर्शनाः १०
नेदुर्बलस्याभिमुखं ज्वालोद्गारिभिराननैः ।
कवन्धः परिघाभासो दृश्यते भास्करान्तिके ११
जग्राह सूर्यं स्वर्भानूरपर्वणि महाग्रहः ।
प्रवाति मारुतः शीघ्रं निष्प्रभोऽभूद्दिवाकरः १२
उत्पेतुश्च विना रात्रिं ताराः खद्योतसप्रभाः ।
संलीनमीनविहगा नलिन्यः शुष्कपङ्कजाः १३
तस्मिन्क्षणे बभूवुश्च विना पुष्पफलैर्द्रुमाः ।
उद्धूतश्च विना वातं रेणुर्जलधरारुणः १४
चीचीकूचीति वाश्यन्तो बभूवुस्तत्र सारिकाः ।
उल्काश्चापि सनिर्घोषा निपेतुर्घोरदर्शनाः ।
प्रचचाल मही चापि सशैलवनकानना १५

काल प्राप्त झाल्यावाचून रक्तानें भिजलेल्या वस्त्राप्रमाणें मेघांचे ठिकाणीं संध्या दिसू लागली आणि घोर पशु व पक्षी खराकडे तोंड करून ओरडूं लागले.(१–९)

भयसूचक कंकपक्षी, कोल्हे व गृध्रपक्षी आक्रोश करूं लागले आणि युद्धामध्ये नेहमीं अशुभ सुचविणाऱ्या भयप्रदर्शक कोल्ह्या ज्याच्यांतून ज्वाला बाहेर निघत आहेत अशा मुखानीं सैन्याच्या पुढें ओरडूं लागल्या. सूर्याजवळ परिघाप्रमाणें एक मस्तकरहित मनुष्याकृति दिसूं लागली. त्या दिवशीं अमावास्या नसतानाच महाग्रह राहूनें सूर्याला ग्रासलें, वारा वेगानें वाहूं लागला आणि सूर्य निस्तेज झाला रात्र पडल्यावाचूनच काजव्यासारख्या तारा आकाशातून पडूं लागल्या आणि सरोवरातील कमलें शुष्क होऊन आतील मत्स्य व तीरावरील वृक्ष लपून बसूं लागले वृक्ष तत्क्षणीं पुष्परहित व फलरहित झाले आणि मेघाप्रमाणें धूसर रंगाची धूळ वाऱ्यावाचून उडूं लागली. चीची, कूची अशा प्रकारचा शब्द सारिका करूं लागल्या, निर्घोष ध्वनीसह भयसूचक उल्कापात होऊं लागले आणि पर्वत, वृक्षसमुदाय व अरण्यें यासह पृथ्वी हलूं लागली. (१०–१५)

खरस्य च रथस्थस्य नर्दमानस्य धीमतः। १६
प्राकम्पत भुजः सव्यः स्वरश्चास्यावसज्जत
साम्रा संपद्यते दृष्टिः पश्यमानस्य सर्वतः। १७
ललाटे च रुजो जाता न च मोहान्न्यवर्तत
तान्समीक्ष्य महोत्पातानुत्थितान्रोमहर्षणान्। १८
अब्रवीद्राक्षसान्सर्वान्प्रहसन्स खरस्तदा
महोत्पातानिमान्सर्वानुत्थितान्घोरदर्शनान्। १९
न चिन्तयाम्यहं वीर्याद्बलवान्दुर्बलानिव
तारा अपि शरैस्तीक्ष्णैः पातयेयं नभस्तलात्। २०
मृत्युं मरणधर्मेण संक्रुद्धो योजयाम्यहम्
राघवं तं बलोत्सिक्तं भ्रातरं चापि लक्ष्मणम्। २१
अहत्वा सायकैस्तीक्ष्णैर्नोपावर्तितुमुत्सहे
यन्निमित्तं तु रामस्य लक्ष्मणस्य विपर्ययः। २२
सकामा भगिनी मेऽस्तु पीत्वा तु रुधिरं तयो
न क्वचित्प्राप्तपूर्वो मे संयुगेषु पराजयः।

रथात बसून गर्जना करीत असलेल्या बुद्धिमान खर राक्षसाचा डावा बाहू स्फुरण पावूं लागला, शब्द खोल जाऊ लागला तो कोणीकडेही पाहूं लागला असता त्याच्या डोळ्यातून अश्रु येऊं लागले व कपाळामध्यें वेदना उत्पन्न झाल्या तथापि तो मोहामुळें परत फिरला नाहीं इतकेंच नव्हे, तर, अगावर रोमांच उठविणारे ते मोठाले उत्पात पाहून तो खर त्या सर्व राक्षसाना हंसत हंसत म्हणाला, "या सर्व उद्भवलेल्या मोठ्या भयसूचक उत्पाताना, दुर्बलाना न जुमानणाऱ्या बलवानाप्रमाणें, मी जुमानीत नाहीं, कारण मी क्रुद्ध झालों असतां तीक्ष्ण बाणाच्या योगानें आकाशापासून ताराही खालीं पाडीन आणि मृत्यूलाही ठार मारीन बलानें गर्विष्ठ झालेल्या त्या रामाचा आणि त्याच्या लक्ष्मण भ्रात्याचा तीक्ष्ण बाणानीं वध केल्यावाचून परत फिरण्याची माझी इच्छा नाहीं. राम व लक्ष्मण यानीं अत्यन्त क्रूरपणानें जिच्याशीं असें विपरीत वर्तन केलें आहे ती माझी भगिनी आज त्यांचें रक्त पिऊन कृतकृत्य होवो आजपर्यंत संग्रामा-

युष्माकमेतत्प्रत्यक्षं नानृतं कथयाम्यहम् २३
देवराजमपि क्रुद्धो मत्तैरावतगामिनम् ।
वज्रहस्तं रणे हन्यां किं पुनस्तौ च मानवौ २४
सा तस्य गर्जितं श्रुत्वा राक्षसानां महाचमूः ।
प्रहर्षमतुलं लेभे मृत्युपाशावपाशिता २५
समेयुश्च महात्मानो युद्धदर्शनकाङ्क्षिणः ।
ऋषयो देवगन्धर्वाः सिद्धाश्च सह चारणैः २६
समेत्य चोचुः सहितास्तेऽन्योन्यं पुण्यकर्मणः ।
स्वस्ति गोब्राह्मणेभ्यस्तु लोकानां ये च संमताः २७
जयतां राघवो युद्धे पौलस्त्यान् रजनीचरान् ।
चक्रहस्तो यथा विष्णुः सर्वानसुरसत्तमान् २८
एतच्चान्यच्च बहुशो ब्रुवाणाः परमर्षयः ।
जातकौतूहलास्तत्र विमानस्थाश्च देवताः २९
ददृशुर्वाहिनीं तेषां राक्षसानां गतायुषाम् ।
रथेन तु खरो वेगात्सैन्यस्याग्राद्विनि सृतः ३०

त माझा कधींही पराजय झालेला नाहीं, हें तुम्हाला प्रत्यक्ष विदितच आहे; मी काहीं असत्य भाषण करीत नाहीं. मी क्रुद्ध झालों असता मत्त ऐरावतावर आरूढ होऊन जाणाऱ्या वज्रपाणी देवराज इंद्राचाही समामात वध करीन, मग त्या मानवाची कथा काय ?" ( १६-२४ )

ही त्याची गर्जना ऐकून राक्षसाच्या त्या मृत्युपाशानें जखडलेल्या मोठया सेनेला अनुपम हर्ष झाला. युद्ध पाहण्याच्या इच्छेनें महात्मे ऋषि, देव, गंधर्व, सिद्ध आणि चारण एकत्र जुळून तेथें आले आणि एकत्र आलेले ते पुण्य कर्म करणारे ऋषि एकमेकाला म्हणाले, "लोकाना संमत असलेल्या गोब्राह्मणाचें कल्याण असो आणि चक्रपाणी विष्णु ज्याप्रमाणें सर्व असुरश्रेष्ठाचा पराजय करतो, त्याप्रमाणें राम युद्धात पौलस्त्य राक्षसाचा पराजय करो!" हें व अशाच प्रकारचें भाषण अनेक प्रकारानीं महर्षि करूं लागले आणि युद्ध पाहण्याची उत्कंठा उत्पन्न झाल्यामुळें देवही विमानात बसून तेथें आले व त्यानीं आयुष्य

श्येनगामी पृथुग्रीवो यज्ञशत्रुर्विहङ्गमः ।
दुर्जयः करवीराक्षः परुषः कालकार्मुकः ३१
हेममाली महामाली सर्पास्यो रुधिराशनः ।
द्वादशैते महावीर्याः प्रतस्थुरभितः खरम् ३२
महाकपालः स्थूलाक्षः प्रमाथस्त्रिशिरास्तथा ।
चत्वार एते सेनाऽग्रे दूषणं पृष्ठतोऽन्वयुः ३३
सा भीमवेगा समराभिकाङ्क्षिणी सुदारुणा राक्षसवीरसेना ।
तौ राजपुत्रौ सहसाऽभ्युपेता माला ग्रहाणामिव चन्द्रसूर्यौ ।३४।
इत्यार्षे श्रीमद्रा०वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥२३॥[७२८]

चतुर्विंशः सर्गः ।

आश्रमं प्रतियाते तु खरे खरपराक्रमे ।
तानेवौत्पातिकान् रामः सह भ्रात्रा ददर्श ह १
तानुत्पातान्महाघोरान् रामो दृष्ट्वाऽत्यमर्षणः ।
प्रजानामहितान्दृष्ट्वा वाक्यं लक्ष्मणमब्रवीत् २

---

संपलेल्या त्या राक्षसांची सेना पाहिली. खर तर रथांत बसून वेगानें सैन्याच्या पुढें चालला होता आणि श्येनगामी, पृथुग्रीव, यज्ञशत्रु, विहंगम, दुर्जय, करवीराक्ष, परुष, कालकार्मुक, हेममाली, महामाली, सर्पास्य व रुधिराशन हे महावीर्यवान् बारा अमात्य खराच्या भोंवतालीं चालूं लागले. महाकपाल, स्थूलाक्ष, प्रमाथ व त्रिशिरा असे चौघे सेनेच्या, पुढें दूषणाच्या मागून चालले आणि ग्रहमाला ज्याप्रमाणें सूर्य चंद्रासमीप जाते, त्याप्रमाणें भयंकर वेगानें युक्त असलेली व संग्रामाची इच्छा करणारी ती अत्यंत भयंकर राक्षसवीरांची सेना एकदम त्या राजपुत्रांसमोर गेली. ( २५-३४ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

भयंकर पराक्रमी खर राक्षस रामाच्या आश्रमाकडे जावयास निघाल्यावर झालेले उत्पात भ्रात्यासह रामानें अवलोकन केले आणि प्रजांना अहितकारक असे ते महाभयंकर उत्पात पाहून रामाचें चित्त अतिशय अस्वस्थ झालें

इमान्पश्य महाबाहो सर्वभूतापहारिणः ।
समुत्थितान्महोत्पातान्संहर्तुं सर्वराक्षसान् ३
अमी रुधिरधारास्तु विसृजन्ते खरस्वनाः ।
व्योम्नि मेघा विवर्तन्ते परुषा गर्दभारुणाः ४
सधूमाश्च शराः सर्वे मम युद्धाभिनन्दिताः ।
रुक्मपृष्ठानि चापानि विचेष्टन्ते विचक्षण ५
यादृशा इह कूजन्ति पक्षिणो वनचारिणः ।
अग्रतो नोऽभयं प्राप्तं संशयो जीवितस्य च ६
संप्रहारस्तु सुमहान्भविष्यति न संशयः ।
अयमाख्याति मे बाहुः स्फुरमाणो मुहुर्मुहुः ७
संनिकर्षे तु नः शूर जयं शत्रोः पराजयम् ।
सुप्रभं च प्रसन्नं च तव वक्त्रं हि लक्ष्यते ८
उद्यतानां हि युद्धार्थं येषां भवति लक्ष्मण ।
निष्प्रभं वदनं तेषां भवत्यायुःपरिक्षयः ९

आणि तो लक्ष्मणाला म्हणाला, " हे महापराक्रमी लक्ष्मणा ! सर्व प्राण्यांचा संहार सुचविणारे जे हे मोठे उत्पात राक्षसांचा संहार करण्याकरिता उद्भवले आहेत, ते तू अवलोकन कर भयंकर गर्जना करणारे, गर्दभाप्रमाणें धूसर वर्णानें युक्त असलेले आणि रक्ताचा वर्षाव करणारे हे घोर मेघ आकाशांत फिरत आहेत. माझे सर्व बाण धूमयुक्त झाले असल्यामुळें युद्धाकरितां आनंदित झाल्यासारखे दिसत आहेत आणि हे चतुर लक्ष्मणा ! सुवर्णभूषित पृष्ठभागानीं युक्त असलेलीं धनुष्येंही स्फुरण पावत आहेत हे वनचर पक्षी येथें आपल्यापुढें ज्या प्रकारें शब्द करीत आहेत, त्यावरून आपणाला अभय असून आपल्या शत्रूंना जीविताचें भय प्राप्त होणार आहे असें दिसतें संहार तर मोठाच होईल, यांत संशय नाहीं हा माझा वारंवार स्फुरण पावू लागलेला दक्षिण बाहु, हे शूरा लक्ष्मणा ! लवकरच आपला जय व शत्रूचा पराजय होणार असल्याचें सुचवीत आहे आणि तुझें मुखही सतेज व प्रसन्न दिसत आहे हे लक्ष्मणा! युद्धाला उद्युक्त झालेल्या ज्या पुरुषाचें मुख निस्तेज होतें, त्याच्या आयुष्याचा क्षय झाला असें

रक्षसां नर्दतां घोषः श्रूयतेऽयं महाध्वनिः ।
आहतानां च भेरीणां राक्षसैः क्रूरकर्मभिः १०
अनागतविधानं तु कर्तव्यं शुभमिच्छता ।
आपदाशङ्कमानेन पुरुषेण विपश्चिता ११
तस्माद्गृहीत्वा वैदेहीं शरपाणिर्धनुर्धरः ।
गुहामाश्रय शैलस्य दुर्गां पादपसंकुलाम् १२
प्रतिकूलितुमिच्छामि न हि वाक्यमिदं त्वया ।
*शापितो मम पादाभ्यां गम्यतां वत्स मा चिरम्* १३
त्वं हि शूरश्च बलवान्हन्या एतान्न संशयः ।
स्वयं निहन्तुमिच्छामि सर्वानेव निशाचरान् १४
एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः सह सीतया ।
शरानादाय चापं च गुहां दुर्गां समाश्रयत् १५
तस्मिन्प्रविष्टे तु गुहां लक्ष्मणे सह सीतया ।
हन्त निर्युक्तमित्युक्त्वा रामः कवचमाविशत् १६
स तेनाग्निनिकाशेन कवचेन विभूषितः ।

समजावें. ( १-९ )

"गर्जना करीत असलेल्या राक्षसांचा आणि क्रूरकर्मी राक्षसांनी वाजविलेल्या दुंदुभींचा हा महाध्वनि ऐकूं येत आहे. संकटाची शंका आलेल्या दूरदर्शी कल्याणेच्छु पुरुषानें भावी अनर्थ टाळण्याचा उपाय अवश्य करावा. म्हणून धनुष्य धारण करून हातांत बाण घे आणि सीतेला घेऊन वृक्षांनीं गजबजलेल्या अशा एखाद्या पर्वताच्या गहन गुहेचा आश्रय कर. माझ्या या सांगण्याचे विरुद्ध तूं वागावेंस अशी माझी इच्छा नाहीं. माझ्या पायांची तुला शपथ आहे; हे वत्सा ! तूं सीतेला घेऊन जा; विलंब लावूं नकोस. तूं शूर व बलवान् आहेस आणि म्हणूनच तूं यांचा वध करशील यांत संशय नाहीं, परंतु या सर्व राक्षसांचा स्वतःच वध करण्याची माझी इच्छा आहे. " ( १०-१४ )

याप्रमाणें रामानें सांगितलें असतां धनुर्बाण घेऊन लक्ष्मणानें सीतेसह पर्वताच्या एका गहन गुहेचा आश्रय केला लक्ष्मण सीतेसह गुहेंत गेल्यावर

बभूव रामस्तिमिरे महानग्निरिवोत्थितः १७
स चापमुद्यम्य महच्छरानादाय वीर्यवान्।
संबभूवास्थितस्तत्र ज्यास्वनैः पूरयन्दिशः १८
ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च सह चारणैः।
समेयुश्च महात्मानो युद्धदर्शनकाङ्क्षया १९
ऋषयश्च महात्मानो लोके ब्रह्मर्षिसत्तमाः।
समेत्य चोचुः सहितास्तेऽन्योऽन्यं पुण्यकर्मणः २०
स्वस्ति गोब्राह्मणानां च लोकानां चेति संस्थिताः।
जयतां राघवो युद्धे पौलस्त्यान् रजनीचरान् २१
चक्रहस्तो यथा युद्धे सर्वानसुरपुङ्गवान्।
एवमुक्त्वा पुनः प्रोचुरालोक्य च परस्परम् २२
चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम्।
एकश्च रामो धर्मात्मा कथं युद्धं भविष्यति २३
इति राजर्षयः सिद्धाः सगणाश्च द्विजर्षभाः।

---

" वाहवा, छान झालें ! " असें म्हणून रामानें कवच चढविलें व त्या अग्नी-सारख्या तेजस्वी कवचानें भूषित झालेला तो राम अंधारात उत्पन्न झालेल्या मोठया अग्नीप्रमाणें दिसूं लागला. नंतर प्रचंड धनुष्य उचलून धरून आणि बाण हातात घेऊन प्रत्यंचेच्या टणत्कारांनीं दिशा दणाणून टाकीत टाकीत तो वीर्यवान् राम तेथें उभा राहिला असता, युद्ध पाहण्याच्या इच्छेनें महात्मे देव गंधर्व आणि सिद्ध चारणासह तेथें आले व त्रैलोक्यामध्येंही श्रेष्ठ, महर्षि म्हणून प्रसिद्ध असलेले व पुण्य कर्म करणारे ऋषि एकत्र जमून तेथें आले आणि एकमेकाला म्हणाले, " गोब्राम्हणाचें आणि तशाच प्रकारच्या लोकाचें कल्याण व्हावें, या इच्छेनें आपण येथें जमलों आहोंत. चक्रपाणि विष्णु ज्याप्रमाणें सर्व मोठया असुराचा पराजय करतो, त्याप्रमाणें युद्धात राम पौलस्त्य राक्षसाचा पराजय करो. " ( १५-२२ )

याप्रमाणें बोलणें झाल्यावर एकमेकाकडे पाहून ते पुन्हां म्हणूं लागले, " एकीकडे क्रूर कर्म करणारे चौदा हजार राक्षस आहेत आणि एकीकडे धर्मात्मा

जातकौतूहलास्तस्थुर्विमानस्थाश्च देवताः २४
आविष्टं तेजसा रामं संग्रामशिरसि स्थितम् ।
दृष्ट्वा सर्वाणि भूतानि भयाद्विव्यथिरे तदा २५
रूपमप्रतिमं तस्य रामस्याक्लिष्टकर्मणः ।
बभूव रूपं क्रुद्धस्य रुद्रस्येव महात्मनः २६
इति संभाष्यमाणे तु देवगन्धर्वचारणैः ।
ततो गम्भीरनिर्ह्रादं घोरचर्मायुधध्वजम् २७
अनीकं यातुधानानां समन्तात्प्रत्यपद्यत ।
वीरालापान्विसृजतामन्योन्यमभिगच्छताम् २८
चापानि विस्फारयतां जृम्भतां चाप्यभीक्ष्णशः ।
विप्रघुष्टस्वनानां च दुन्दुभींश्चाभिनिघ्नताम् २९
तेषां सुविपुलः शब्दः पूरयामास तद्वनम् ३०
तेन शब्देन वित्रस्तास्त्रासिता वनचारिणः ।
दुद्रुवुर्यत्र निःशब्दं पृष्ठतो नावलोकयन् ३१

राम एकटा आहे, तेव्हा यांचें युद्ध होईल तरी कसें ? ” याप्रमाणें युद्ध पाहण्याची उत्कंठा उत्पन्न झालेले राजर्षि, चारणांसह सिद्ध, द्विजश्रेष्ठ आणि देव विमानांत आरूढ होऊन तेथें उभे राहिले तेजानें व्याप्त झालेल्या रामाला संग्रामाकरिता उद्युक्त पाहून सर्व भूतें भयभीत झालीं. कारण अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या महात्म्या रामाचें अप्रतिम रूप क्रुद्ध झालेल्या रुद्राच्या रूपाप्रमाणें दिसत होतें. वर सांगितल्याप्रमाणें देव, गंधर्व आणि चारण यांचें बोलणें चाललें असतां गंभीर गर्जना करीत करीत भयंकर ढाली, आयुधें आणि ध्वज घेतलेलें राक्षसाचें सैन्य चोहोंकडून तेथें येऊन पोंचलें ते राक्षस वीराला योग्य अशीं संभाषणें करूं लागले असता, एकमेकांकडे जाऊं लागले असता, धनुष्यें ओढूं लागले असता, वारंवार जांभया देऊं लागले असतां, अतिशय घोष करूं लागले असता आणि दुंदुभि वाजवूं लागले असता, त्यांच्या त्या अति प्रचंड ध्वनीनें तें वन भरून गेलें (२२–३०)

राक्षसांशीं झालेल्या संग्रामामुळें आधींच त्रस्त झालेले वनचर

तच्चानीकं महावेगं रामं समनुवर्तत ।
घृतनानाप्रहरणं गम्भीरं सागरोपमम् ३२
रामोऽपि चारयंश्चक्षुः सर्वतो रणपण्डितः ।
ददर्श खरसैन्यं तद्युद्धायाभिमुखो गतः ३३
वितत्य च धनुर्भीमं तूण्याश्चोद्धृत्य सायकान् ।
क्रोधमाहारयत्तीव्रं वधार्थं सर्वरक्षसाम् ३४
दुष्प्रेक्ष्यश्चाभवत्क्रुद्धो युगान्ताग्निरिव ज्वलन् ।
तं दृष्ट्वा तेजसाविष्टं प्राव्यथन्वनदेवताः ३५
तस्य रुष्टस्य रूपं तु रामस्य ददृशे तदा ।
दक्षस्येव क्रतुं हन्तुमुद्यतस्य पिनाकिनः ३६
तत्कार्मुकैराभरणै रथैश्च तद्वर्मभिश्चाग्निसमानवर्णैः ।
बभूव सैन्यं पिशिताशनानां सूर्योदये नीलमिवाभ्रजालम् ३७

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुर्विंश. सर्गः ॥२४॥[७६५]

प्राणी त्या ध्वनीनें अधिकच त्रस्त झाले आणि भीतीमुळें मार्गे न पाहता जिकडे शब्द निघत नव्हता तिकडे पळाले व इतक्यात नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेलें तें सागरासारखें मोठें व महावेगवान् राक्षससैन्य रामाकडे वळलें, तेव्हा तो संग्रामनिपुण राम चोहोंकडे दृष्टि देऊं लागला असता तें खरसैन्य त्याच्या दृष्टीस पडलें आणि तें दृष्टीस पडल्यावर युद्ध करण्याकरिता तो त्या सैन्याच्या समोर गेला. राक्षसासमोर गेल्यानंतर भयंकर धनुष्य ओढून आणि भात्यातून बाण काढून सर्व राक्षसांच्या वधाकरिता रामानें प्रचंड क्रोधाचा अवलंब केला असता युगान्तकालीं प्रज्वलित झालेल्या अग्नीप्रमाणें त्या क्रुद्ध रामाकडे पाहणेंही अशक्य झालें आणि तेजानें व्याप्त झालेल्या त्या रामाला पाहून वनदेवताही भयभीत झाल्या. कारण दक्षयज्ञाचा विध्वंस करण्याकरिता उद्युक्त झालेल्या पिनाकपाणि रुद्राप्रमाणें रुष्ट झालेल्या त्या रामाचें रूप दिसूं लागलें होतें असो. इकडे रामानें याप्रमाणें क्रुद्ध मुद्रा धारण केली असता धनुष्यें, भूषणें, रथ आणि तीं अग्नितुल्य तेजस्वी कवचें यांच्या योगानें तें राक्षसाचें सैन्य, सूर्योदयसमयीं दिसणाऱ्या नीलवर्ण मेघसमुदायाप्रमाणें दिसूं लागलें. ( ३१-३७ )

पञ्चविंशतिः सर्गः ।

अवष्टब्धधनुं रामं क्रुद्धं तं रिपुघातिनम् ।
ददर्शाश्रममागम्य खरः सह पुरःसरैः १
तं दृष्ट्वा सगुणं चापमुद्यम्य खरनिःस्वनम् ।
रामस्याभिमुखं सूतं चोद्यतामित्यचोदयत् २
स खरस्याज्ञया सूतस्तुरगान्समचोदयत् ।
यत्र रामो महाबाहुरेको धुन्वन्धनुः स्थितः ३
तं तु निष्पतितं दृष्ट्वा सर्वतो रजनीचराः ।
मुञ्चमाना महानादं सचिवाः पर्यवारयन् ४
स तेषां यातुधानानां मध्ये रथगतः खरः ।
बभूव मध्ये ताराणां लोहिताङ्ग इवोद्गतः ५
ततः शरसहस्रेण राममप्रतिमौजसम् ।
अर्दयित्वा महानादं ननाद समरे खरः ६
ततस्तं भीमधन्वानं क्रुद्धाः सर्वे निशाचराः ।

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडपैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

सेनानायकासह खर राक्षस रामाच्या आश्रमाला आल्यानंतर धनुष्य धारण करून उभ्या असलेल्या त्या क्रुद्ध व शत्रुघातक रामाला त्यानें पाहिलें आणि त्याला अवलोकन करताच भयंकर ध्वनीनें युक्त असलेलें आपलें प्रत्यंचा चढविलेलें धनुष्य उचलून घेऊन " रामाचे समोर रथ हाक " अशी खरानें सारथ्याला आज्ञा केली त्याप्रमाणें महापराक्रमी राम एकटा धनुष्य हालवीत बसला होता, तिकडे त्या सारथ्यानें खराच्या आज्ञेनें घोडे हाकले व तो खर पुढें सरसावलेला पाहून त्याचे सर्वही राक्षसमंत्री मोठी गर्जना करीत करीत त्याच्या सभोंवतीं चालूं लागले आणि याप्रमाणें रथावर आरूढ झालेला तो खर नक्षत्रामध्यें असलेल्या क्रूर मंगळाप्रमाणें त्या राक्षसामध्यें दिसूं लागला. नंतर अतुल सामर्थ्यवान् रामाला सहस्र बाणांनीं पीडित करून संग्रामामध्यें त्या खरानें मोठी गर्जना केली व नंतर उग्र धनुष्य धारण करणाऱ्या त्या

रामं नानाविधैः शस्त्रैरभ्यवर्षन्त दुर्जयम् ७
मुद्गरैरायसैः शूलैः प्रासैः खड्गैः परश्वधैः।
राक्षसाः समरे शूरं निजघ्नू रोषतत्पराः ८
ते बलाहकसंकाशा महाकाया महाबलाः।
अभ्यधावन्त काकुत्स्थं रथैर्वाजिभिरेव च ९
गजैः पर्वतकूटाभै रामं युद्धे जिघांसवः।
ते रामे शरवर्षाणि व्यसृजन् रक्षसां गणाः १०
शैलेन्द्रमिव धाराभिर्वर्षमाणा महाघनाः।
सर्वैः परिवृतो रामो राक्षसैः क्रूरदर्शनैः ११
तिथिष्विव महादेवो वृत्तः पारिषदां गणैः।
तानि मुक्तानि शस्त्राणि यातुधानैः स राघवः १२
प्रतिजग्राह विशिखैर्नद्योघानिव सागरः।
स तैः प्रहरणैर्घोरैर्भिन्नगात्रो न विव्यथे १३
रामः प्रदीप्तैर्बहुभिर्वज्रैरिव महाचलः।
स विद्धः क्षतजादिग्धः सर्वगात्रेषु राघवः १४

---

अजिंक्य रामावर सर्व राक्षसांनीं क्रुद्ध होऊन नानाप्रकारच्या शस्त्रांचा वर्षाव केला. ( १-७ )

लोखंडी मुद्गल, शूल, भाले, खड्ग आणि फरश या आयुधांनीं क्रोधाविष्ट झालेल्या राक्षसांनीं संग्रामांत शूर अशा रामावर प्रहार केले आणि मेघाप्रमाणें धिप्पाड व महाबलाढ्य असलेले ते राक्षस रथ, अश्व व पर्वतशिखरासारखे गज घेऊन रामावर धावले आणि युद्धांत रामाचा वध करण्याचा हेतु असलेल्या त्या राक्षसगणांनीं जलधारांच्या योगानें हिमालय पर्वतावर वर्षाव करणाऱ्या महा-मेघाप्रमाणें रामावर बाणांचे वर्षाव केले. त्या वेळीं भयंकर मुद्रेनें युक्त असलेल्या सर्व राक्षसांनीं वेढलेला तो राम प्रदोषीं पार्षदगणांनीं वेढलेल्या महादेवाप्रमाणें दिसला व सागर ज्याप्रमाणें नद्यांच्या प्रवाहाचा स्वीकार करतो, त्याप्रमाणें त्या रामानें राक्षसांनीं सोडलेल्या त्या शस्त्रांचा बाणांनीं स्वीकार केला; इतकेंच नव्हे तर उज्वल असंख्य वज्रेंच कीं काय अशा त्या घोर शस्त्रांनीं त्या रामाचे अवयव

बभूव रामः संध्याभ्रैर्दिवाकर इवावृतः ।
विषेदुर्देवगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः  १५
एकं सहस्रैर्बहुभिस्तदा दृष्ट्वा समावृतम् ।
ततो रामस्तु संक्रुद्धो मण्डलीकृतकार्मुकः  १६
ससर्ज निशितान्बाणाञ्छतशोऽथ सहस्रशः ।
दुरावारान्दुर्विषहान्कालपाशोपमान् रणे  १७
मुमोच लीलया कङ्कपत्रान्काञ्चनभूषणान् ।
ते शराः शत्रुसैन्येषु मुक्ता रामेण लीलया  १८
आददू रक्षसां प्राणान्पाशाः कालकृता इव ।
भित्त्वा राक्षसदेहांस्तांस्ते शरा रुधिराप्लुताः  १९
अन्तरिक्षगता रेजुर्दीप्ताग्निसमतेजसः ।
असंख्येयास्तु रामस्य सायकाश्चापमण्डलात्  २०
विनिष्पेतुरतीवोग्रा रक्षःप्राणापहारिणः ।
तैर्धनूंषि ध्वजाग्राणि चर्माणि कवचानि च  २१
बाहून्सहस्ताभरणानूरून्करिकरोपमान् ।

---

फुटले असताही महापर्वताप्रमाणें तो यत्किंचितही डगमगला नाहींत (८–१४)

याप्रमाणें शत्रांनीं विद्ध झाल्यामुळें सर्व शरीर रक्तानें माखलेला तो राम संध्याकाळच्या मेघांनीं व्याप्त झालेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला. असो. त्या समयीं हजारों राक्षसांनीं घेरून टाकलेल्या एकट्या रामाला पाहून देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षि खिन्न झाले; तेव्हां राम अधिकच क्रुद्ध झाला आणि आपलें धनुष्य अतिशय ओढून मंडलाकार करून कंकपक्ष्याच्या पिसांनीं युक्त, सुवर्णानें भूषित, दुःसह, अप्रतिहत आणि तीक्ष्ण असे शेंकडों हजारों बाण तो राक्षसांवर टाकूं लागला असता शत्रुसैन्यावर रामानें सहज सोडलेल्या त्या बाणांनीं कालानें सोडलेल्या पाशाप्रमाणें राक्षसांचे प्राण हरण केले. राक्षसांचे देह फोडून गेल्यामुळें रक्तानें भरलेले ते बाण अंतरिक्षांत गेले असतां प्रदीप्त अग्नीसारखे तेजस्वी दिसूं लागले. राक्षसांचे प्राण हरण करणारे अत्यंत उग्र बाण रामाच्या धनुर्मंडलापासून असंख्य सुटले आणि त्या बाणांनीं धनुष्यें, ध्वजाचीं अग्रें, ढाली, कवचें,

चिच्छेद रामः समरे शतशोऽथ सहस्रशः २२
हयान्काञ्चनसंनाहान् रथयुक्तान्ससारथीन्।
गजांश्च सगजारोहान्सहयान्सादिनस्तदा २३
चिच्छिदुर्बिभिदुश्चैव रामबाणा गुणच्युताः।
पदातीन्समरे हत्वा अनयद्यमसादनम् २४
ततो नालीकनाराचैस्तीक्ष्णाग्रैश्च विकर्णिभिः।
भीममार्तस्वरं चक्रुश्छिद्यमाना निशाचराः २५
तत्सैन्यं विविधैर्बाणैरर्दितं मर्मभेदिभिः
न रामेण सुखं लेभे शुष्कं वनमिवाग्निना २६
केचिद्भीमबलाः शूराः प्रासाञ्शूलान्परश्वधान्।
चिक्षिपुः परमक्रुद्धा रामाय रजनीचराः २७
तेषां बाणैर्महाबाहुः शस्त्राण्यावार्य वीर्यवान्।
जहार समरे प्राणांश्चिच्छेद च शिरोधरान् २८
ते छिन्नशिरसः पेतुश्छिन्नचर्मशरासनाः।

---

हस्तभूषणासह हात, आणि गजशुंडेप्रमाणें असलेल्या शेंकडों हजारों मांड्या रामानें संग्रामात तोडून टाकल्या (१५-२२)

त्याचप्रमाणें सुवर्णाचें सामान घालून रथाला जोडलेले सारथ्यासह अश्व, स्वाऱ्यासह गज आणि अश्वासह स्वार, प्रत्यंचेपासून सुटलेल्या रामाच्या बाणांनीं छिन्नभिन्न करून टाकले आणि रामानें संग्रामात पायदळालाही मारून यमसदनाला पाठविलें. तदनंतर तीक्ष्ण अग्रांनीं युक्त असलेले नालीक+ नाराच⊛ आणि विकर्ण× या बाणांनीं ते राक्षस छिन्नभिन्न होऊं लागले असता भयंकर आक्रोश करूं लागले. अग्नीनें होरपळून टाकलेल्या वनाप्रमाणें नानाप्रकारच्या मर्मभेदक बाणांनीं रामानें पीडित केलेल्या त्या सैन्याला सुख मिळेनासें झालें. कांहीं प्रचंड बलवान् शूर राक्षस पराकाष्ठेचे क्रुद्ध होऊन रामाकडे भाले, शूल आणि परशु फेंकूं लागले, परंतु बाणाच्या योगानें महापराक्रमी वीर्यवान् रामानें त्याच्या शस्त्रांचें निवारण करून संग्रामात त्यांचे प्राण हरण केले व त्यांच्या माना तोडून

---

+तोंडाशींच लोखंड लावलेले ⊛ सर्व लोखंडी × अग्राशीं अंकुशासारखे असलेले.

सुपर्णवातविक्षिप्ता जगत्यां पादपा यथा २९
अवशिष्टाश्च ये तत्र विषण्णास्ते निशाचराः ।
खरमेवाभ्यधावन्त शरणार्थं शराहताः ३०
तान्सर्वान्धनुरादाय समाश्वास्य च दूषणः ।
अभ्यधावत्सुसंक्रुद्धः क्रुद्धं क्रुद्ध इवान्तकः ३१
निवृत्तास्तु पुनः सर्वे दूषणाश्रयनिर्भयाः ।
राममेवाभ्यधावन्त सालतालशिलायुधाः ३२
शूलमुद्गरहस्ताश्च पाशहस्ता महाबलाः ।
सृजन्तः शरवर्षाणि शस्त्रवर्षाणि संयुगे ३३
द्रुमवर्षाणि मुञ्चन्तः शिलावर्षाणि राक्षसाः ।
तद्बभूवाद्भुतं युद्धं तुमुलं रोमहर्षणम् ३४
रामस्यास्य महाघोरं पुनस्तेषां च रक्षसाम् ।
ते समन्तादभिक्रुद्धा राघवं पुनरार्दयन् ३५
ततः सर्वा दिशो दृष्ट्वा प्रदिशश्च समावृताः ।

---

टाकल्या तेव्हां अमृत हरण करण्याकरितां जात असतांना गरुडाच्या पखाच्या वाऱ्यानें ज्याप्रमाणें नंदनवनांतील वृक्ष मोडून पृथ्वीवर पडले, त्याप्रमाणें ढाली व धनुष्यें छिन्नभिन्न होऊन मान तुटलेले ते राक्षस भूमीवर पडले आणि बाणाचे तडाके बसलेले जे राक्षस अवशिष्ट राहिले होते ते खिन्न होऊन आश्रयाकरितां खराकडे धावले ( २३-३० )

तेव्हां धनुष्य घेऊन आणि त्या सर्वांचें सांत्वन करून क्रुद्ध झालेल्या मृत्यूप्रमाणें अत्यंत संतप्त झालेला तो दूषण रुष्ट झालेल्या रामावर धावला, तेव्हां दूषणाचा आश्रय मिळाल्यामुळें निर्भय झालेले ते सर्व राक्षस पुनरपि परत फिरले आणि सालवृक्ष, तालवृक्ष आणि शिला हीच आयुधें घेऊन रामावर धावले व शूल, मुद्गल आणि पाश हातांत घेऊन ते महाबलाढ्य राक्षस संग्रामांत बाण, शस्त्रें, वृक्ष आणि पाषाण यांचा वर्षाव करूं लागले असतां पुनरपि रामाचें आणि त्या राक्षसांचें, अंगावर कांटा आणणारें महाघोर तुमुल युद्ध झालें व त्या क्रुद्ध झालेल्या राक्षसांनीं चोहों बाजूनीं पुनरपि रामावर मारा चालविला नंतर सर्व

राक्षसैः सर्वतः प्राप्तैः शरवर्षाभिरावृतः ३६
स कृत्वा भैरवं नादमस्त्रं परमभास्वरम् ।
समयोजयद्गान्धर्वं राक्षसेषु महाबलः ३७
ततः शरसहस्राणि निर्ययुश्चापमण्डलात् ।
सर्वा दश दिशो बाणैरापूर्यन्त समागतैः ३८
नाददानं शरान्घोरान्विमुञ्चन्तं शरोत्तमान् ।
विकर्षमाणं पश्यन्ति राक्षसास्ते शरार्दिताः ३९
शरान्धकारमाकाशमावृणोत्सदिवाकरम् ।
बभूवावस्थितो रामः प्रक्षिपन्निव तान्छरान् ४०
युगपत्पतमानैश्च युगपच्च हतैर्भृशम् ।
युगपत्पतितैश्चैव विकीर्णा वसुधाऽभवत् ४१
निहता पतिताः क्षीणाश्छिन्ना भिन्ना विदारिताः ।
तत्र तत्र स्म दृश्यन्ते राक्षसास्ते सहस्रशः ४२
सोष्णीषैरुत्तमाङ्गैश्च साङ्गदैर्बाहुभिस्तथा ।
ऊरुभिर्बाहुभिश्छिन्नैर्नानारूपैर्विभूषणैः ४३

---

बाजूनीं आलेल्या राक्षसानीं घेरून टाकलेल्या त्या महाबलाढ्य रामानें भयंकर गर्जना करून राक्षसावर अत्यंत उज्ज्वल अशा गांधर्व अस्त्राची योजना केली. नंतर त्याच्या धनुर्मंडलापासून हजारों बाण सुटले आणि त्या सुटलेल्या बाणांनीं दाही दिशा भरून गेल्या ( ३१–३८ )

बाणांनीं विद्ध झालेल्या त्या राक्षसांना राम घोर बाण घेतो केव्हा आणि धनुष्याला लावतो केव्हा हें कांहीं एक न दिसता एकसारखें धनुष्य ओढीतच आहे एवढेंच काय तें दिसत असे. बाणांनीं झालेल्या अंधकारानें सूर्यासह आकाश आच्छादित होऊन गेलें तरी राम ते बाण तसाच सोडीत राहिला होता. तेव्हा एकाच वेळीं पडणाऱ्या, वध पावलेल्या आणि पडलेल्या राक्षसांनीं सर्व पृथ्वी भरून गेली आणि ठिकठिकाणीं नुकतेच मारलेले, पडल्यानंतर मेलेले, कष्टीं प्राण आलेले, दोन तुकडे झालेले, मोडून पडलेले आणि विदीर्ण झालेले ते हजारों राक्षस दिसू लागले शिरस्त्राणासह मस्तकें, बाहुभूषणासह हात, दोन

हयैश्च द्विपमुख्यैश्च रथैर्भिन्नैरनेकशः ।
चामरव्यजनैश्छत्रैर्ध्वजैर्नानाविधैरपि ॥ ४४
रामेण बाणाभिहतैर्विच्छिन्नैः शूलपट्टिशैः ।
विच्छिन्नैः समरे भूमिर्विस्तीर्णाऽभूद्भयंकरा ॥ ४५
तान्दृष्ट्वा निहतान्सर्वे राक्षसाः परमातुराः ।
न तत्र चलितुं शक्ता रामं परपुरंजयम् ॥ ४६

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चविंशः सर्गः ॥२५॥[८११]

षड्विंशः सर्गः ।

दूषणस्तु स्वकं सैन्यं हन्यमानं विलोक्य च ।
संदिदेश महाबाहुर्भीमवेगान्दुरासदान् ॥ १
राक्षसान्पञ्चसाहस्रान्समरेष्वनिवर्तिनः ।
ते शूलैः पट्टिशैः खड्गैः शिलावर्षैर्द्रुमैरपि ॥ २
शरवर्षैरविच्छिन्नं ववर्षुस्तं समन्ततः ।
तद् द्रुमाणां शिलानां च वर्षं प्राणहरं महत् ॥ ३
प्रतिजग्राह धर्मात्मा राघवस्तीक्ष्णसायकैः ।
प्रतिगृह्य च तद्वर्षं निमीलित इवर्षभः ॥ ४

दोन तुकडे होऊन पडलेल्या मांड्या व बाहु, नानाप्रकारचीं भूषणें, तुकडे तुकडे झालेले अश्व, मुख्य मुख्य गज, रथ, चौऱ्या, मोर्चेलें, छत्रें, नानाप्रकारचे ध्वज आणि रामाचे बाण लागल्यामुळें दोन दोन तुकडे झालेले शूल व पट्टे यांच्या योगानें संग्रामांतील विस्तीर्ण भूमि भयंकर दिसू लागली व त्यांचा वध झालेला पाहून अत्यंत व्याकुल झालेले अवशिष्ट सर्वही राक्षस शत्रुसमुदाय जिंकणाऱ्या रामाचे समोर जाण्यासही समर्थ झाले नाहींत. ( ३९-४६ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायणनावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडपैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥२५॥

आपलें सैन्य मरत आहे असें पाहिल्यावर महापराक्रमी दूषणानें भयंकर वेगवान्, जिंकण्यास अशक्य आणि संग्रामांत पराङ्मुख न होणाऱ्या अशा पांच हजार राक्षसांना आज्ञा केली तेव्हां शूल, पट्टे, खङ्ग, वृक्ष आणि बाणवृष्टि यांचा

रामः क्रोधं परं लेभे वधार्थं सर्वरक्षसाम् ।
ततः क्रोधसमाविष्टः प्रदीप्त इव तेजसा ५
शरैरभ्यकिरत्सैन्यं सर्वतः सहदूषणम् ।
ततः सेनापतिः क्रुद्धो दूषणः शत्रुदूषणः ६
शरैरशनिकल्पैस्तं राघवं समवारयत् ।
ततो रामः सुसंक्रुद्धः क्षुरेणास्य महद्धनुः ७
चिच्छेद समरे वीरश्चतुर्भिश्चतुरो हयान् ।
हत्वा चाश्वाञ्शरैस्तीक्ष्णैरर्धचन्द्रेण सारथेः ८
शिरो जहार तद्रक्षस्त्रिभिर्विव्याध वक्षसि ।
स छिन्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः ९
जग्राह गिरिशृङ्गाभं परिघं लोमहर्षणम् ।
वेष्टितं काञ्चनैः पट्टैर्देवसैन्याभिमर्दनम् १०
आयसैः शङ्कुभिस्तीक्ष्णैः कीर्णं परवसोक्षितम् ।
वज्राशनिसमस्पर्शं परगोपुरदारणम् ११

त्यानीं त्या रामावर एकसारखा वर्षाव केला, परंतु वृक्ष आणि पाषाण याचा तो प्राणघातक प्रचंड वर्षावही धर्मात्म्या रामानें तीक्ष्ण बाणाच्या योगानें अडवून धरला आणि डोळे मिटून पर्जन्यवृष्टि सहन करणाऱ्या बलाप्रमाणें त्या वृष्टीचा निरोध करून राम सर्व राक्षसाच्या वधाकरता अत्यंत क्रुद्ध झाला आणि क्रोधानें व्याप्त होऊन तेजानें जसा काहीं जळूं लागलेला तो राम दूषणासह त्या सैन्यावर सर्व बाजूंनीं बाणवृष्टि करूं लागला तदनंतर शत्रुनाशक सेनापति क्रुद्ध झाला आणि वज्रतुल्य बाणाच्या योगानें तो रामाचें निवारण करूं लागला, तेव्हा वीर रामही अतिशय क्रुद्ध झाला. क्षुर नावाच्या बाणानें त्यानें त्या दूषणाचें मोठें धनुष्य तोडून टाकलें, चार बाणानीं चार अश्व मारले. तीक्ष्ण बाणानीं अश्व मारल्यावर अर्धचंद्र बाणानें दूषणाच्या सारथ्याचें डोकें उडविलें आणि त्या दूषण राक्षसालाही तीन बाणानीं वक्ष स्थलाचे ठिकाणीं वेध केला. ( १–९ ,

तेव्हां धनुष्य तुटून, अश्व नष्ट होऊन, रथ आणि सारथी यानीं तो हीन झाला असता रोमांच उत्पन्न करणारा, सुवर्णाच्या पट्टयानीं वेष्टिलेला, देवसेनेचें

तं महोरगसंकाशं प्रगृह्य परिघं रणे ।
दूषणोऽभ्यपतद्रामं क्रूरकर्मा निशाचरः ११
तस्याभिपतमानस्य दूषणस्य च राघवः ।
द्वाभ्यां शराभ्यां चिच्छेद सहस्ताभरणौ भुजौ १३
भ्रष्टस्तस्य महाकायः पपात रणमूर्धनि ।
परिघश्छिन्नहस्तस्य शक्रध्वज इवाग्रतः १४
कराभ्यां च विकीर्णाभ्यां पपात भुवि दूषणः ।
विषाणाभ्यां विशीर्णाभ्यां मनस्वीव महागजः १५
दृष्ट्वा तं पतितं भूमौ दूषणं निहतं रणे ।
साधु साध्विति काकुत्स्थं सर्वभूतान्यपूजयन् १६
एतस्मिन्नन्तरे क्रुद्धास्त्रयः सेनाग्रयायिनः ।
संहत्याभ्यद्रवन् रामं मृत्युपाशावपाशिताः १७
महाकपालः स्थूलाक्षः प्रमाथी च महाबलः ।
महाकपालो विपुलं शूलमुद्यम्य राक्षसः १८

मर्दन करणारा, सर्वांगभर लोहाचे तीक्ष्ण शंकु (खिळे) असलेला, शत्रूच्या अंगातील चरबीनें माखलेला, स्पर्शानें इद्रान्या वज्रासारखा कठिण, शत्रूंचीं शरीरें किंवा नगर-द्वारें विदारण करणारा आणि पर्वताच्या शिखरासारखा असा एक परिघ त्यानें हातात घेतला, अशा प्रकारचा तो महाभुजंगासारखा परिघ घेऊन क्रूरकर्मी दूषण रामाचे अंगावर धावला. परंतु तो दूषण अंगावर धावून येत असताना रामानें दोन बाणानीं हस्तभूषणासह त्याचे दोन्ही हात तोडून टाकले तेव्हा हात तुटल्यानंतर त्याचा तो प्रचंड परिघ इंद्रध्वजाप्रमाणें पुढें पडला आणि हात भूमीवर अस्ताव्यस्त पडल्यानंतर दोन्ही दात पडलेल्या धैर्यवान् हत्तीप्रमाणें तो दूषण भूमीवर पडला तेव्हा संग्रामात मरून भूमीवर पडलेल्या त्या दूषणाला पाहताच सर्व प्राणी " धन्य धन्य " म्हणून रामाची प्रशंसा करूं लागले. (९–१६)

इतक्यात महाकपाल, स्थूलाक्ष आणि महाबलाढ्य प्रमाथी हे सैन्याच्या पुढें चालणारे तीन सेनापति मृत्युपाशानें जखडून ओढून आणल्याप्रमाणेंच जणूं काय क्रुद्ध होऊन एकजुटीनें रामावर धावले महाकपाल राक्षस मोठा शूल

स्थूलाक्षः पट्टिशं गृह्य प्रमाथी च परश्वधम्।
दृष्ट्वैवापततस्तांस्तु राघवः सायकैः शितैः १९
तीक्ष्णाग्रैः प्रतिजग्राह संप्राप्तानतिथीनिव।
महाकपालस्य शिरश्चिच्छेद रघुनन्दनः २०
असंख्येयैस्तु बाणौघैः प्रममाथ प्रमाथिनम्।
स्थूलाक्षस्याक्षिणी स्थूले पूरयामास सायकैः २१
स पपात हतो भूमौ विटपीव महाद्रुमः।
दूषणस्यानुगान्पञ्चसाहस्रान्कुपितः क्षणात् २२
हत्वा तु पञ्चसाहस्रैरनयद्यमसादनम्।
दूषणं निहतं श्रुत्वा तस्य चैव पदानुगान् २३
व्यादिदेश खरः क्रुद्धः सेनाध्यक्षान्महाबलान्।
अयं विनिहतः संख्ये दूषणः सपदानुगः २४
महत्या सेनया सार्धं युद्ध्वा रामं कुमानुषम्।
शस्त्रैर्नानाविधाकारैर्हनध्वं सर्वराक्षसाः २५
एवमुक्त्वा खरः क्रुद्धो राममेवाभिदुद्रुवे।

---

उगारून रामावर धावला, स्थूलाक्ष पट्टा घेऊन रामाच्या अंगावर गेला आणि प्रमाथीनें हातात परशु घेऊन रामावर चाल केली, परंतु ते धावून येत आहेत असें पाहतांच आलेल्या अतिथीप्रमाणें तीक्ष्ण अग्रानीं युक्त अशा घासलेल्या बाणानीं रामानें त्याचें स्वागत केलें महाकपालाचें तर रामानें डोकेंच उडविलें, असंख्य बाणसमुदायानीं प्रमाथीचा वध केला आणि स्थूलाक्षाचे स्थूल नेत्र बाणानीं भरून काढले, तेव्हा मोठमोठ्या शाखानीं युक्त असलेल्या महावृक्षाप्रमाणें तो स्थूलाक्ष भूमीवर पडला आणि क्रुद्ध झालेल्या रामानें पाच हजार बाणानीं दूषणाचे पाच हजार अनुयायीही एका क्षणात यमसदनाला पाठविले (१७–२३)

*नंतर दूषण आणि त्याचे अनुयायी याचा वध झाल्याचें ऐकल्यावर* खर क्रुद्ध झाला आणि महाबलाढ्य सेनाध्यक्षाना म्हणाला, " या दूषणाचा अनुयाया-सह संग्रामात वध झाला आहे तेव्हा हे सर्व राक्षसहो! तुम्ही मोठी सेना बरोबर घेऊन आणि त्या नीच मनुष्य रामाशीं युद्ध करून नानाप्रकारच्या शस्त्रानीं त्याचा

श्येनगामी पृथुग्रीवो यज्ञशत्रुर्विहंगमः २६
दुर्जयः करवीराक्षः परुषः कालकार्मुकः ।
हेममाली महामाली सर्पास्यो रुधिराशनः २७
द्वादशैते महावीर्या बलाध्यक्षाः ससैनिकाः ।
राममेवाभ्यधावन्त विसृजन्त. शरोत्तमान् २८
ततः पावकसंकाशैर्हेमवज्रविभूषितैः ।
जघान शेषं तेजस्वी तस्य सैन्यस्य सायकैः २९
ते रुक्मपुङ्खा विशिखाः सधूमा इव पावकाः ।
निजघ्नुस्तानि रक्षांसि वज्रा इव महाद्रुमान् ३०
रक्षसां तु शतं रामः शतेनैकेन कर्णिना ।
सहस्रं तु सहस्रेण जघान रणमूर्धनि ३१
तैर्भिन्नवर्माभरणाच्छिन्नभिन्नशरासनाः ।
निपेतुः शोणितादिग्धा धरण्यां रजनीचराः ३२
तैर्मुक्तकेशैः समरे पतितैः शोणितोक्षितैः ।
विस्तीर्णा वसुधा कृत्स्ना महावेदिः कुशैरिव ३३

वध करा.'' याप्रमाणें त्याना सांगून तो क्रुद्ध झालेला खर राक्षस थेट रामावरच धावला आणि श्येनगामी, पृथुग्रीव, यज्ञशत्रु, विहंगम, दुर्जय, करवीराक्ष, परुष, कालकार्मुक, हेममाली, महामाली, सर्पास्य आणि रुधिराशन, हे बारा महावीर्यवान् सेनाधिपतिही उत्कृष्ट बाण सोडीत सोडीत सैनिकासह रामावरच धावले, तेव्हा तेजस्वी रामानें त्या राक्षससैन्याच्या अवशिष्ट राहिलेल्या तेवढ्या भागाचा सुवर्ण व हिरे यांनीं भूषित केलेल्या अग्नितुल्य बाणानीं फडशा पाडला सुवर्णभूषित पिसानीं युक्त आणि मधून अग्नीप्रमाणें दिसणाऱ्या त्या बाणानीं मोठ्या वृक्षाचा नाश करणाऱ्या वज्राप्रमाणें त्या राक्षसांचा वध केला ( २३–३० )

कर्णि नावाच्या शंभर बाणानीं शंभर राक्षसाचा आणि हजार बाणानीं हजार राक्षसांचा राम संग्रामात वध करू लागला असता त्या बाणामुळें ज्याच्या कवचाचें व भूषणाचे तुकडे तुकडे झालेले आहेत, ज्याचीं धनुष्यें छिन्नभिन्न झालेलीं आहेत आणि ज्याचीं शरीरें रक्तानें माखलीं गेलीं आहेत, असे ते राक्षस भूमीवर

तत्क्षणे तु महाघोरं वनं निहतराक्षसम् ।
बभूव निरयप्रख्यं मांसशोणितकर्दमम् ३४
चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ।
हतान्येकेन रामेण मानुषेण पदातिना ३५
तस्य सैन्यस्य सर्वस्य खरः शेषो महारथः
राक्षसस्त्रिशिराश्चैव रामश्च रिपुसूदनः ३६
शेषा हता महावीर्या राक्षसा रणमूर्धनि ।
घोरा दुर्विषहाः सर्वे लक्ष्मणस्याग्रजेन ते ३७
ततस्तु तद्भीमबलं महाहवे समीक्ष्य धर्मेण हतं बलीयसा ।
रथेन रामं महता खरस्ततः समाससादेन्द्र इवोद्यताशनिः ३८

इत्यार्षे श्रीमद्रा०वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे षड्विंशः सर्ग. ॥२६॥ [८४९]

सप्तविंश सर्गः ।

खरं तु रामाभिमुखं प्रयान्तं वाहिनीपतिः ।

पडले तेव्हां शरीर रक्तानें भरून व केंस मोकळे सुटून संग्राममध्यें पडलेल्या त्या राक्षसानीं आच्छादित झालेली ती संपूर्ण रणभूमि दर्भानीं आच्छादलेल्या महावेदीप्रमाणें दिसूं लागली व राक्षस मरून मांस व रक्त याचा खच ज्याच्यामध्यें पडला आहे, असें तें *महाघोर वन तत्क्षणीं नरक लोकासारखें दिसूं लागलें.* याप्रमाणें मानव आणि पदाति अशा एकट्या रामानें भयंकर पराक्रम करणाऱ्या चौदा हजार राक्षसांचा वध केला असता त्या सर्व सैन्यापैकीं आपापल्या मुख्य सैन्यासह महारथी खर व त्रिशिरा राक्षस हे आणि शत्रुनाशक राम एवढेच अवशिष्ट राहिले व बाकीचे महावीर्यवान् घोर आणि अत्यंत दुःसह असे ते *सर्वही राक्षस लक्ष्मणाच्या ज्येष्ठ भ्रात्यानें समरांगणात मारले.* नंतर बलिष्ठ रामानें क्षात्रधर्माला अनुसरून महासंग्रामात मारलेलें तें प्रचंड सैन्य पाहून हातात वज्र घेऊन येणारा इंद्रच कीं काय असा तो खर राक्षस मोठ्या रथावर आरूढ होऊन रामावर चालून आला ( ३१-३८ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

राक्षसस्त्रिशिरा नाम सन्निपत्येदमब्रवीत् १
मां नियोजय विक्रांत त्वं निवर्तस्व साहसात्।
पश्य रामं महाबाहुं संयुगे विनिपातितम् २
प्रतिजानामि ते सत्यमायुधं चाहमालभे।
यथा रामं वधिष्यामि वधार्हं सर्वरक्षसाम् ३
अहं वास्य रणे मृत्युरेष वा समरे मम।
विनिवर्त्य रणोत्साहं मुहूर्तं प्राश्निको भव ४
रहृष्टो वा हते रामे जनस्थानं प्रयास्यसि।
ायि वा निहते रामं संयुगाय प्रयास्यसि ५
ब्ररस्त्रिशिरसा तेन मृत्युलोभात्प्रसादितः।
ाच्छ युद्ध्येत्यनुज्ञातो राघवाभिमुखो ययौ ६
त्रिशिरास्तु रथेनैव वाजियुक्तेन भास्वता।
अभ्यद्रवद्रणे रामं त्रिशृङ्ग इव पर्वतः ७
शरधारासमूहान्स महामेघ इवोत्सृजन्।

---

खर रामाने समोर जाऊं लागला असतां सेनापति त्रिशिरा राक्षस त्वरेनें जवळ येऊन त्याला म्हणाला, " तूं साहस करूं नकोस; पराक्रमी अशा मला आज्ञा कर आणि महापराक्रमी राम संग्रामात पडलेला पहा. मी हातात शस्त्र घेऊन तुला सत्य सांगत आहें, सर्व राक्षसांनीं वध करण्यास योग्य अशा रामाचा मी वध करीन. सारांश, संग्रामात मी तरी रामाचा वध करीन किंवा राम तरी माझा वध करील. याकरिता संग्रामाचा उत्साह बाजूला सारून तूं एक क्षणभर मध्यस्थ होऊन रहा. रामाचा वध झाला तर आनंदित होऊन जनस्थानाला परत जाशील अथवा माझा वध झाला तर युद्ध करण्याकरिता तूं रामावर चाल करून जाशील. " याप्रमाणें मृत्यूचा लोभ सुटल्यामुळेंच कीं काय त्या त्रिशिरा राक्षसानें खराची प्रार्थना केली असतां " जा आणि युद्ध कर " अशी खराची अनुज्ञा झाल्यावर तो त्रिशिरा राक्षस रामावर चालून गेला (१-६)

सारांश तीन शिखरांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें दिसत असलेला तो त्रिशिरा राक्षस अश्व जोडलेल्या त्या उज्वल रथात बसून संग्रामात रामावर

व्यसृजत्सदृशं नादं जलार्द्रस्येव दुन्दुभेः ८
आगच्छतं त्रिशिरसं राक्षसं प्रेक्ष्य राघवः ।
धनुषा प्रतिजग्राह विधुन्वन्सायकाञ्शिताञ् ९
स संप्रहारस्तुमुलो रामत्रिशिरसोस्तदा ।
संबभूवातिबलिनोः सिंहकुञ्जरयोरिव १०
ततस्त्रिशिरसा बाणैर्ललाटे ताडितस्त्रिभिः ।
अमर्षी कुपितो रामः संरब्ध इदमब्रवीत् ११
अहो विक्रमशूरस्य राक्षसस्येदृशं बलम् ।
पुष्पैरिव शरैर्योऽहं ललाटेऽस्मि परिक्षतः ।
ममापि प्रतिगृह्णीष्व शरांश्चापगुणाच्च्युताञ् १२
एवमुक्तस्तु संरब्धः शरानाशीविषोपमान् ।
त्रिशिरो वक्षसि क्रुद्धो निजघान चतुर्दश १३
चतुर्भिस्तुरगानस्य शरैः संनतपर्वभिः ।
न्यपातयत तेजस्वी चतुरस्तस्य वाजिनः १४

धावला आणि पाण्यानें भिजलेली नौबद जशी बदबद वाजूं लागते, तशा जल-धारा सोडणाऱ्या महामेघाप्रमाणें बाणरूप भाराचे समुदाय सोडणारा तो त्रिशिरा-राक्षस गर्जना करूं लागला आणि त्रिशिरा राक्षस येत आहे असें पाहून धनुष्यानें तीक्ष्ण बाण सोडीत सोडीत रामानें त्याचा सत्कार केला. तेव्हां अतिबलाढ्य सिंह व गज याप्रमाणें राम आणि त्रिशिरा यांचें तुमुल युद्ध झालें. तदनंतर त्रिशिरा राक्षसानें रामाला ललाटाचे ठिकाणीं तीन बाणांनीं वेध केल्यावर तो सहन न होऊन क्रुद्ध झालेला राम त्याला म्हणाला, " पुष्पासारख्या बाणांनीं ललाटाचे ठिकाणीं मला वेध झालेला आहे तेव्हां या रणशूर राक्षसाच्या अशा प्रकारच्या बलाची काय ही प्रशंसा करावी ? आता धनुष्याच्या प्रत्यंचेपासून सुटलेल्या माझ्याही बाणाचा तूं स्वीकार कर. " ( ७–१२ )

याप्रमाणें त्रिशिरा राक्षसाला सांगितल्यानंतर क्षुब्ध व क्रुद्ध झालेल्या रामानें त्रिशिरा राक्षसाच्या वक्ष स्थलावर भुजंगासारखे चौदा बाण मारले, सरळ उतरत्या पेरांनीं युक्त असलेल्या चार बाणांनीं तेजस्वी रामानें चार वेगवान् अश्व

अष्टभिः सायकैः सूतं रथोपस्थे न्यपातयत् ।
रामश्चिच्छेद बाणेन ध्वजं चास्य समुच्छ्रितम् १५
ततो हतरथात्तस्मादुत्पतन्तं निशाचरम् ।
चिच्छेद रामस्तं बाणैर्हृदये सोऽभवज्जडः १६
सायकैश्चाप्रमेयात्मा सामर्षात्तस्य रक्षसः ।
शिरांस्यपातयत्त्रीणि वेगवद्भिस्त्रिभिः शरैः १७
सधूमशोणितोद्गारी रामबाणाभिपीडितः ।
न्यपतत्पतितैः पूर्वं समरस्थो निशाचरः १८
हतशेषास्ततो भग्ना राक्षसा खरसंश्रयाः ।
द्रवन्ति स्म न तिष्ठन्ति व्याघ्रत्रस्ता मृगा इव १९
तान्खरो द्रवतो दृष्ट्वा निवर्त्य रुषितस्त्वरन् ।
राममेवाभिदुद्राव राहुश्चन्द्रमसं यथा २०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तविंश. सर्ग ॥२७॥ [८६९]

मारले, आठ बाणानीं रथावर बसलेला सारथी खालीं पाडला आणि एका बाणानें त्याचा उच्च ध्वज रामानें तोडून टाकला नंतर मोडतोड झालेल्या त्या रथातून तो त्रिशिरा राक्षस उडी मारू लागला असता रामानें हृदयाचे ठिकाणीं त्याला बाणानीं वेध केला. तेव्हां त्वरा करून त्याला हातामध्यें आयुध घेता आलें नाहीं. नंतर अतुल सामर्थ्यांनीं युक्त असलेल्या रामानें क्रोधामुळें त्या राक्षसाचीं तिन्हीं मस्तकें तीन वेगवान् बाणानीं तोडून टाकलीं तेव्हा समरांगणामध्यें असलेला तो राक्षस रामाच्या बाणानीं व्याकुल झाल्यामुळें पूर्वी तुटून पडलेल्या मस्तकाच्या द्वारानें ( अर्थात धडावर राहिलेल्या मस्तकाच्या छिद्रातून ) धुमासह रक्ताच्या गुळण्या टाकीत टाकीत भूमीवर पडला. असा प्रकार झाल्यावर वध पावलेल्या सैन्यातून अवशिष्ट राहिलेल्या खराचा आश्रय करून राहणाऱ्या राक्षसांचा मोड झाला आणि ते जाग्यावर न ठरतां पारध्यानीं त्रस्त केलेल्या मृगाप्रमाणें पळत सुटले तेव्हां धावत असलेल्या त्या राक्षसांना पाहून त्वर क्रुद्ध होऊन संग्रामाकडे वळला आणि चंद्रावर चालून जाणाऱ्या राहूप्रमाणें तो रामावर चालून गेला. (१३-२०)

अष्टविंशः सर्गः।

निहतं दूषणं दृष्ट्वा रणे त्रिशिरसा सह।
खरस्याप्यभवत्त्रासो दृष्ट्वा रामस्य विक्रमम् १
स दृष्ट्वा राक्षसं सैन्यमविषह्यं महाबलम्।
हतमेकेन बाणेन दूषणस्त्रिशिरा अपि २
तद्बलं हतभूयिष्ठं विमनाः प्रेक्ष्य राक्षसः।
आससाद खरो रामं नमुचिर्वासवं यथा ३
विकृष्य बलवच्चापं नाराचान्रक्तभोजनान्।
खरश्चिक्षेप रामाय क्रुद्धानाशीविषानिव ४
ज्यां विधुन्वन्सुबहुशः शिक्षयास्त्राणि दर्शयन्।
चचार समरे मार्गाञ्शरै रथगतः खरः ५
स सर्वाश्च दिशो बाणैः प्रदिशश्च महारथः।
पूरयामास तं दृष्ट्वा रामोऽपि सुमहद्धनुः ६
स सायकैर्दुर्विषहैर्विस्फुलिङ्गैरिवाग्निभिः।
नभश्चकाराविवरं पर्जन्य इव वृष्टिभिः ७

---

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

संग्रामात त्रिशिरा राक्षसासह दूषणाचा वध झालेला पाहून रामाचा पराक्रम लक्षात आल्यावर खरालाही भय वाटलें. राक्षसाचें तें महाबलाढ्य दु:सह सैन्य, दूषण व त्रिशिरा यांचा एकट्या रामानें वध केल्याचें अवलोकन करून आणि ज्यातील पुष्कळ भागाचा नाश झाला आहे अशा त्या अवशिष्ट राहिलेल्या सैन्याकडे दृष्टि देऊन खिन्न झालेला तो खर राक्षस इंद्रावर चालून जाणाऱ्या नमुचि दैत्याप्रमाणें रामावर चालून गेला प्रचंड धनुष्य ओढून त्या खरानें क्रुद्ध सर्पच कीं काय असे रक्तशोषक नाराच बाण रामावर सोडले. नानाप्रकारानीं धनुष्य चाळवून धनुर्विद्येच्या अभ्यासामुळें शरसंधानाचे वगैरे अनेक प्रकार व अस्त्रें बाणाच्या योगानें दर्शविणारा तो रथारूढ खर रणभूमीवर संचार करूं लागला, आणि बाणाच्या योगानें सर्व दिशा व उपदिशा त्या महारथि खरानें भरून

तद्बभूव शितैर्बाणैः खररामविसर्जितैः ।
पर्याकाशमनाकाशं सर्वतः शरसंकुलम् ८
शरजालावृतः सूर्यो न तदा स्म प्रकाशते ।
अन्योन्यवधसंरम्भादुभयोः संप्रयुध्यतोः ९
ततो नालीकनाराचैस्तीक्ष्णाग्रैश्च विकर्णिभिः ।
आजघान रणे रामं तोत्रैरिव महाद्विपम् १०
तं रथस्थं धनुष्पाणिं राक्षसं पर्यवस्थितम् ।
ददृशुः सर्वभूतानि पाशहस्तमिवान्तकम् ११
हन्तारं सर्वसैन्यस्य पौरुषे पर्यवस्थितम् ।
परिश्रान्तं महासत्त्वं मेने रामं खरस्तदा १२
तं सिंहमिव विक्रान्तं सिंहविक्रान्तगामिनम् ।
दृष्ट्वा नोद्विजते रामः सिंहः क्षुद्रमृगं यथा १३
ततः सूर्यनिकाशेन रथेन महता खरः ।

---

टाकल्या त्याला पाहून महाधनुर्धारी रामानेंही जलवृष्टीच्या योगानें ज्याप्रमाणें पर्जन्य आकाश भरून काढतो, त्याप्रमाणें अग्निकणासारख्या दु सह बाणाच्या योगानें आकाश गच्च भरून काढलें. (१-७)

तेव्हां खर आणि राम यानीं सोडलेल्या तीक्ष्ण बाणानीं सर्व बाजूंनीं बाणमय होऊन गेलेलें तें आकाश प्रकाशरहित झालें आणि एकमेकाचा वध करण्याची ईर्षा धरून ते उभयता युद्ध करूं लागले असता बाणसमूहानीं झाकून गेलेला सूर्य प्रकाशेनासा झाला नंतर अंकुशानीं ज्याप्रमाणें मोठ्या गजाला वेध करावा, त्याप्रमाणें तीक्ष्ण अग्रानीं युक्त अशा नालीक, नाराच आणि विकर्ण बाणानीं संग्रामात खरानें रामाला वेध केला असता, हातात धनुष्य घेऊन व रथावर आरूढ होऊन रणामध्यें उभा असलेला तो खर सर्व प्राण्याना हातात पाश घेतलेल्या मृत्यूप्रमाणें दिसला. सर्व राक्षससैन्याचा वध करणारा महाधैर्यवान् राम जरी पराक्रम करीतच होता तरी तो श्रांत झाला आहे असें खराला वाटलें. परंतु सिंहासारख्या शौर्यदर्शक गतीनें युक्त असलेला तो खर सिंहाप्रमाणें चालून येत आहे असें आढळून आल्यावरही क्षुद्र मृगाला अवलोकन केल्यावर [illegible]

आससादाथ तं रामं पतङ्ग इव पावकम् १४
ततोऽस्य सशरं चापं मुष्टिदेशे महात्मनः ।
खरश्चिच्छेद रामस्य दर्शयन्हस्तलाघवम् १५
स पुनस्त्वपरान्सप्त शरानादाय मर्मणि ।
निजघान रणे क्रुद्धः शक्राशनिसमप्रभान् १६
ततः शरसहस्रेण राममप्रतिमौजसम् ।
अर्दयित्वा महानादं ननाद समरे खरः १७
ततस्तत्प्रहतं बाणैः खरमुक्तैः सुपर्वभिः ।
पपात कवचं भूमौ रामस्यादित्यवर्चसम् १८
स शरैरर्दितः क्रुद्धः सर्वगात्रेषु राघवः ।
रराज समरे रामो विधूमोऽग्निरिव ज्वलन् १९
ततो गम्भीरनिर्ह्रादं रामः शत्रुनिबर्हणः ।
चकारान्ताय स रिपोः सज्यमन्यन्महद्धनुः २०

सिंह उद्विग्न होत नाहीं, त्याप्रमाणें रामही उद्विग्न झाला नाहीं. तेव्हां अग्नीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें, मोठया सूर्यतुल्य तेजस्वी रथात आरूढ होऊन तो खर रामावर चालून आला. (८–१४)

समीप आल्यावर हस्तकौशल्य दर्शवीत दर्शवीत त्या खरानें महात्म्या रामाचें धनुष्य बाण चढलेला असतानाच हातात धरण्याचें ठिकाणींच तोडून टाकलें, व पुनरपि इंद्राच्या वज्राप्रमाणें सतेज असलेले सात बाण घेऊन त्या क्रुद्ध झालेल्या खरानें रामाच्या मर्मावर मारले आणि हजार बाणांनी त्या अतुल सामर्थ्यवान् रामाला वेध करून खरानें मोठी गर्जना केली. तेव्हां उत्कृष्ट पर्वांनीं युक्त अशा त्या खरानें सोडलेल्या बाणाचा भडिमार झाल्यामुळें रामाचें तें सूर्यासारखें तेजस्वी कवच खालीं भूमीवर पडलें आणि त्या वेळीं सर्व अवयवांचे ठिकाणीं बाण रुतून राहिले असता तो क्रुद्ध राम जळत असलेल्या धूमरहित अग्नीप्रमाणें शोभूं लागला. (१५–१९)

नंतर त्या शत्रुनाशक रामानें गंभीर ध्वनीनें युक्त असलेल्या दुसऱ्या मोठया धनुष्याला शत्रूचा अंत करण्याकरिता प्रत्यंचा चढविली आणि अगस्त्य

सुमहद्वैष्णवं यत्तदतिसृष्टं महर्षिणा ।
वरं तद्धनुरुद्यम्य खरं समभिधावतः ॥ २१
ततः कनकपुङ्खैस्तु शरैः सन्नतपर्वभिः ।
चिच्छेद रामः संक्रुद्धः खरस्य समरे ध्वजम् ॥ २२
स दर्शनीयो बहुधा विच्छिन्नः काञ्चनो ध्वजः ।
जगाम धरणीं सूर्यो देवतानामिवाज्ञया ॥ २३
तं चतुर्भिः खरः क्रुद्धो रामं गात्रेषु मार्गणैः ।
विव्याध हृदि मर्मज्ञो मातङ्गमिव तोमरैः ॥ २४
स रामो बहुभिर्बाणैः खरकार्मुकनिःसृतैः ।
विद्धो रुधिरसिक्ताङ्गो बभूव रुषितो भृशम् ॥ २५
स धनुर्धन्विनां श्रेष्ठं संगृह्य परमाहवे ।
मुमोच परमेष्वासः षट् शरानभिलक्षितान् ॥ २६
शिरस्येकेन बाणेन द्वाभ्यां बाह्वोरथार्पयत् ।
त्रिभिश्चन्द्रार्धवक्त्रैश्च वक्षस्यभिजघान ह ॥ २७

महर्षींनीं दिलेलें तें प्रचंड व श्रेष्ठ वैष्णव धनुष्य हातात घेऊन राम खराचे अंगावर धावून गेला व नंतर क्रुद्ध झालेल्या रामानें सुवर्णभूषित पिसें आणि नम्र पर्वें यानीं युक्त असलेल्या बाणान्च्या योगानें खराचा ध्वज तोडून टाकला असता देवताच्या आज्ञेनें पृथ्वीवर अलेला सूर्यच कीं काय, असा तो अनेक प्रकारानीं दर्शनीय असलेला सुवर्णध्वज छिन्न होऊन भूमीवर पडला तेव्हा अङ्कुशानें ज्याप्रमाणें हत्तीला वेध करावा, त्याप्रमाणें त्या क्रुद्ध झालेल्या मर्मज्ञ खरानें चार बाणाच्या योगानें रामाला हृदयाचे ठिकाणीं आणि इतर अवयवाचे ठिकाणीं वेध केला व याप्रमाणें खराच्या धनुष्यापासून सुटलेल्या अनेक बाणानीं विद्ध झाल्यामुळे सर्वांग रक्तानें न्हाऊन निघालेला तो राम अतिशय क्रुद्ध झाला आणि धनुर्धरामध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या महाधनुर्धारी रामानें परीक्षा केलेले साहांचे सहा बाण घेऊन खरावर सोडले. (२०-२६)

त्यापैकीं एका बाणानें खराच्या मस्तकाचे ठिकाणीं, दोहोंनीं बाहूंचे ठिकाणीं आणि अर्धचंद्राकृति तीन बाणाच्या योगानें वक्ष स्थलाचे ठिकाणीं रामानें वेध

ततः पश्चान्महातेजा नाराचान्भास्करोपमान्।
जघान राक्षसं क्रुद्धस्त्रयोदश शिलाशितान् २८
रथस्य युगमेकेन चतुर्भिः शबलान्हयान्।
षष्ठेन च शिरः संख्ये चिच्छेद खरसारथेः २९
त्रिभिस्त्रिवेणून्बलवान्द्वाभ्यामक्षं महाबलः।
द्वादशेन तु बाणेन खरस्य सशरं धनुः ३०
छित्त्वा वज्रनिकाशेन राघवः प्रहसन्निव।
त्रयोदशेनेन्द्रसमो बिभेद समरे खरम् ३१
प्रभग्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः।
गदापाणिरवप्लुत्य तस्थौ भूमौ खरस्तदा ३२
तत्कर्म रामस्य महारथस्य समेत्य देवाश्च महर्षयश्च।
अपूजयन्प्राञ्जलयः प्रहृष्टास्तदा विमानाग्रगताः समेताः ३३
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डेऽष्टाविंश सर्गः ॥२८॥ [१०२]

केला व नतर क्रुद्ध झालेल्या त्या महातेजस्वी रामानें पुनरपि शिळेवर घासलेले आणि सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेले तेरा नाराच बाण घेऊन त्यानीं त्या खर राक्षसाला वेध केला त्यापैकीं एका बाणानें रथाचें जूं मोडून पाडलें, चार बाणानीं चित्रविचित्र वर्णांचे चार अश्व मारले, सहाव्या बाणानें खराच्या सारथ्याचें मस्तक उडविलें, तीन बाणानीं बलवान् रामानें जूं बांधण्याच्या तीन दाड्या तोडून टाकल्या, दोन बाणानीं महाबलाढ्य रामानें कण्याचे तुकडे केले आणि बाराव्या बाणानें खर राक्षसाचें धनुष्य त्यावर बाण चढलेला असतानाच तोडून टाकून त्या इंद्रतुल्य रामानें हसत हसत वज्रासारख्या तेराव्या बाणानें वक्ष स्थलाचे ठिकाणीं खराला वेध केला तेव्हा ज्याचें धनुष्य मोडून गेलें आहे, आणि अश्व व सारथि याचा वध होऊन जो विरथ झाला आहे, असा तो खर हातात गदा घेऊन व रथातून उडी मारून भूमीवर उभा राहिला. असो. विमानाच्या अग्रभागीं बसून पहात असलेले देव आणि महर्षि आनंदित होऊन, एकत्र जमून व हात जोडून प्रशंसेस पात्र असलेल्या त्या रामाची प्रशंसा करूं

एकोनत्रिंशः सर्गः ।

खरं तु विरथं रामो गदापाणिमवस्थितम् ।
मृदुपूर्वं महातेजाः परुषं वाक्यमब्रवीत् १
गजाश्वरथसंबाधे बले महति तिष्ठता ।
कृतं ते दारुणं कर्म सर्वलोकजुगुप्सितम् २
उद्वेजनीयो भूतानां नृशंसः पापकर्मकृत् ।
त्रयाणामपि लोकानामीश्वरोऽपि न तिष्ठति ३
कर्म लोकविरुद्धं तु कुर्वाणं क्षणदाचर ।
तीक्ष्णं सर्वजनो हन्ति सर्पं दुष्टमिवागतम् ४
लोभात्पापानि कुर्वाणः कामाद्वा यो न बुध्यते ।
हृष्टः पश्यति तस्यान्तं ब्राह्मणी करकादिव ५
वसतो दण्डकारण्ये तापसान्धर्मचारिणः ।

लागले. (१७-३३)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

रथ मोडून गेल्यावरही हातात गदा घेऊन संग्रामात उभा राहिलेल्या खराला मृदु स्वरानें परंतु मर्मभेदक शब्दांनीं महातेजस्वी राम म्हणाला, "गज अश्व आणि रथ यांनीं पूर्ण असलेल्या प्रचंड सैन्याचा अधिपति असताना सर्व लोकांच्या निंदेस पात्र असें दारुण कर्म तू केलेंस, त्यामुळें तुझा असा नाश झाला. कारण प्राण्यांचे ठिकाणीं उद्वेग उत्पन्न करणारा, क्रूर आणि पापकर्मी पुरुष त्रैलोक्याचा अधिपति जरी असला तरी फार दिवस टिकत नाहीं. हे निशाचरा ! दुष्ट सर्प आला असता ज्याप्रमाणें त्याला सर्व लोक ठार मारतात, त्याचप्रमाणें लोकविरुद्ध कर्म करणाऱ्या क्रूर पुरुषाचा सर्व लोक वध करतात ज्याप्रमाणें लाल सोंपदीची ब्राह्मणी ( सरड्याची एक जात ) लोभामुळें पावसातल्या गारा खाऊन आपणच आपल्यावर मृत्यु ओढून घेते, त्याप्रमाणें परिणामाकडे दृष्टि न देता लोभामुळें अथवा कामामुळें जो पापें करतो, त्याचा नाश लोक आनंदित होऊन पाहतात. हे राक्षसा ! दंडकारण्यांत राहणाऱ्या धर्मनिष्ठ महाभाग मुनींचा

किं नु हत्वा महाभागान्फलं प्राप्स्यसि राक्षस ६
न चिरं पापकर्माणः क्रूरा लोकजुगुप्सिताः।
ऐश्वर्यं प्राप्य तिष्ठन्ति शीर्णमूला इव द्रुमाः ७
अवश्यं लभते कर्ता फलं पापस्य कर्मणः।
घोरं पर्यागते काले द्रुमः पुष्पमिवार्तवम् ८
न चिरात्प्राप्यते लोके पापानां कर्मणां फलम्।
सविषाणामिवान्नानां भुक्तानां क्षणदाचर ९
पापमाचरतां घोरं लोकस्याप्रियमिच्छताम्।
अहमासादितो राजा प्राणान्हन्तुं निशाचर १०
अद्य भित्त्वा मया मुक्ताः शराः काञ्चनभूषणाः।
विदार्यापि पतिष्यन्ति वल्मीकमिव पन्नगाः ११
ये त्वया दण्डकारण्ये भक्षिता धर्मचारिणः।
तानद्य निहतः संख्ये ससैन्योऽनुगमिष्यसि १२
अद्य त्वां निहतं बाणैः पश्यन्तु परमर्षयः।
निरयस्थं विमानस्था ये त्वया निहताः पुरा १३

वध करून तुला काय बरें फल प्राप्त होणार आहे? मुळें तुटून गेलेल्या वृक्षाप्रमाणें ऐश्वर्य प्राप्त झाल्यावर पापकर्म करणारे, म्हणूनच लोकनिंदेस पात्र झालेले क्रूर लोक फार दिवस जगत नाहींत. (१-७)

"वृक्षाला ज्याप्रमाणें ऋतूला अनुसरून फूल येतें, त्याप्रमाणें वेळ आली म्हणजे पापकर्माचें घोर फल कर्त्याला अवश्य मिळतें. हे निशाचरा! भक्षण केलेल्या सविष अन्नाचा परिणाम होण्यास जसा फार वेळ लागत नाहीं, तसा जगतामध्यें पाप कर्माचें फल प्राप्त होण्यासही फार वेळ लागत नाहीं. हे राक्षसा! घोर पापें करून लोकांना उपद्रव देण्याची इच्छा करणाऱ्याचे प्राण हरण करण्याकरितां राजा या नात्यानें माझी योजना झाली आहे. तेव्हां सुवर्णभूषणांनीं युक्त असे मीं सोडलेले बाण आज तुझ्या शरीराचा भेद करून वारुळांत जाणाऱ्या सर्पाप्रमाणें पृथ्वीलाही फोडून जातील. दंडकारण्यांतील जे धर्माचरणी पुरुष तूं ठार मारले आहेस, त्यांच्या मागोमाग तूं आज सैन्यासह वध पावून इहलोकांतून

प्रहरस्व यथाकामं कुरु यत्नं कुलाधम ।
अद्य ते पातयिष्यामि शिरस्तालफलं यथा १४
एवमुक्तस्तु रामेण क्रुद्धः संरक्तलोचनः ।
प्रत्युवाच ततो रामं प्रहसन्क्रोधमूर्च्छितः १५
प्राकृतान्राक्षसान्हत्वा युद्धे दशरथात्मज ।
आत्मना कथमात्मानमप्रशस्यं प्रशंससि १६
विक्रान्ता बलवन्तो वा ये भवन्ति नरर्षभाः ।
कथयन्ति न ते किञ्चित्तेजसा चातिगर्विताः १७
प्राकृतास्त्वकृतात्मानो लोके क्षत्रियपांसनाः ।
निरर्थकं विकत्थन्ते यथा राम विकत्थसे १८
कुलं व्यपदिशन्वीरः समरे कोऽभिधास्यति ।
मृत्युकाले तु संप्राप्ते स्वयमप्रस्तवे स्तवम् १९
सर्वथा तु लघुत्वं ते कत्थनेन विदर्शितम् ।

---

जाशील पूर्वी ज्यांचा तूं वध केला आहेस, ते विमानात बसलेले महर्षि बाणांनीं वध पावून नरकात गेलेल्या तुला आज पाहतील हे कुलाधमा राक्षसा ! तू आपल्या इच्छेप्रमाणें माझ्यावर प्रहार कर आणि हवी तितकी तडफड कर, परंतु तालवृक्षाच्या फलाप्रमाणें मी आज तुझें मस्तक खालीं पाडीन " (८-१४)

याप्रमाणें रामानें म्हटलें असता क्रुद्ध झालेल्या त्या खराचे डोळे लाल झाले व क्रोधानें बेभान होऊन हसत हसत तो रामाला म्हणाला, "हे दशरथपुत्रा ! युद्धात क्षुद्र राक्षसांचा वध करून प्रशंसेस पात्र नसलेल्याही आपली तूं स्वत कशी प्रशंसा करीत आहेस ? जे पुरुषश्रेष्ठ पराक्रमी अथवा बलाढ्य असतात, ते आपल्या बलाचा गर्व वहात असतात, तथापि ते आपल्याच तोंडानें आपल्या बढाया सांगत नाहीत हे रामा ! तूं जशा फुशारक्या मारीत आहेस तशा, जगतामध्यें जे हलकट, क्षुद्र मनाचे आणि क्षत्रियजातीला कलंक लावणारे लोक असतात, ते मात्र व्यर्थ फुशारक्या मारीत असतात समरांगणांत मृत्युसमय प्राप्त झाला असता आपलें मोठें कुळ सांगून कोण बरें वार पुरुष आपल्याच मुखानें आपली अप्रासंगिक आत्मप्रशंसा करणार आहे ? (१५-१९)

सुवर्णप्रतिरूपेण तप्तेनेव कुशाग्निना २०
न तु मामिह तिष्ठन्तं पश्यसि त्वं गदाधरम् ।
धराधरमिवाकम्प्यं पर्वतं धातुभिश्चितम् २१
पर्याप्तोऽहं गदापाणिर्हन्तुं प्राणान्रणे तव ।
त्रयाणामपि लोकानां पाशहस्त इवान्तकः २२
कामं बह्वपि वक्तव्यं त्वयि वक्ष्यामि न त्वहम् ।
अस्तं प्राप्नोति सविता युद्धविघ्नस्ततो भवेत् २३
चतुर्दश सहस्राणि राक्षसानां हतानि ते ।
तद्विनाशात्करोम्यद्य तेषामश्रुप्रमार्जनम् २४
इत्युक्त्वा परमक्रुद्धः स गदां परमाङ्गदाम् ।
खरश्चिक्षेप रामाय प्रदीप्तामशनिं यथा २५
खरबाहुप्रमुक्ता सा प्रदीप्ता महती गदा ।
भस्म वृक्षांश्च गुल्मांश्च कृत्वाऽगात्तत्समीपतः २६

"सुवर्णासारखें दिसत असलेलें पितळ ज्याप्रमाणें धातुशोधित अग्नीनें तप्त झालें असता लघुत्व दाखवितें, त्याचप्रमाणें आत्मप्रशंसेच्या योगानें तूं आपलें सर्वस्वीं लघुत्व प्रकट केलें आहेस. धातूंनीं व्यापलेल्या भूधर पर्वताप्रमाणें हातात गदा घेऊन या संग्रामात निश्चल राहिलेल्या माझ्या स्वरूपाची ओळख तुला झाली नाहीं, म्हणून तुझ्या या वल्गना चालल्या आहेत. परंतु हातात पाश घेतलेल्या मृत्यूप्रमाणें हातात गदा धारण केलेला मी तुझेच नव्हे परंतु त्रैलोक्याचेही प्राण हरण करण्यास समर्थ आहें. खरोखर तुला आणखी पुष्कळ सांगण्यासारखें आहे; परंतु मी तें सांगत नाहीं. कारण, सूर्य अस्ताला जात आहे, तेव्हां तें सांगत बसल्यानें युद्धाला अडथळा येईल. तूं ज्या चौदा हजार मुख्य मुख्य राक्षसांचा वध केला आहेस, त्यांच्या नातेवाईकांचे अश्रु तुझ्या वधानें मी आज पुसून टाकीन." (२०—२४)

याप्रमाणें भाषण केल्यावर अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या खरानें उज्ज्वल वज्रच की काय अशी ती उत्कृष्ट सुवर्णवलयानीं मढवलेली गदा रामावर फेंकली. खराच्या हातांतून सुटलेली ती देदीप्यमान प्रचंड गदा वृक्ष आणि झुडपें यांचें

तामापतन्तीं महतीं मृत्युपाशोपमां गदाम् ।
अन्तरिक्षगतां रामश्चिच्छेद बहुधा शरैः  २७
सा विशीर्णा शरैर्भिन्ना पपात धरणीतले ।
गदा मन्त्रौषधिबलैर्व्यालीव विनिपातिता  २८

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनत्रिंशः सर्गः॥२९॥ [९३०]

त्रिंशः सर्गः ।

भित्त्वा तु तां गदां बाणै राघवो धर्मवत्सलः ।
स्मयमान इदं वाक्यं संरब्धमिदमब्रवीत्  १
एतत्ते बलसर्वस्वं दर्शितं राक्षसाधम ।
शक्तिहीनतरो मत्तो वृथा त्वमुपगर्जसि  २
एषा बाणविनिर्भिन्ना गदा भूमितलं गता ।
अभिधानप्रगल्भस्य तव प्रत्ययघातिनी  ३
यत्त्वयोक्तं विनष्टानामिदमश्रुप्रमार्जनम् ।
राक्षसानां करोमीति मिथ्या तदपि ते वचः  ४

भस्म करीत करीत रामाचे समीप आली. परंतु मृत्युपाशाप्रमाणें भयंकर असलेली ती प्रचंड गदा येत असतांना अंतरिक्षामध्यें आहे तोंच रामानें बाणाच्या योगानें तिचे तुकडेतुकडे केले. तेव्हां बाणांनीं विदीर्ण झाल्यामुळे तुकडे उडालेली ती गदा मंत्र आणि औषधि यांच्या सामर्थ्यामुळे खालीं पाडलेल्या सर्पिणीप्रमाणें भूतलावर पडली. (२५-२८)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकोणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

धर्मवत्सल राम, बाणानें ती गदा फोडून रागाच्या आवेशानें खराखुरा हंसत हंसत म्हणाला, " हे राक्षसाधमा ! ही आपली काय ती सामर्थ्याची पुंजी तूं दर्शविलीस तेव्हां माझ्यापेक्षां सामर्थ्यानें अतिशयच कमी असलेला तू वृथा गर्जना मात्र करीत आहेस. बोलण्यांत मात्र केवळ प्रगल्भ असलेल्या तुझ्या विश्वासाचा घात करणारी ही तुझी गदा माझ्या बाणांनीं विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडली आहे " मृत झालेल्या राक्षसांचा सूड घेईन " असें जें तूं भाषण केलेंस

नीचस्य क्षुद्रशीलस्य मिथ्यावृत्तस्य रक्षसः।
प्राणानपहरिष्यामि गरुत्मानमृतं यथा ५
अद्य ते भिन्नकण्ठस्य फेनबुद्बुदभूषितम्।
विदारितस्य मद्बाणैर्मही पास्यति शोणितम् ६
पांसुरूषितसर्वाङ्गः स्रस्तन्यस्तभुजद्वयः।
स्वप्स्यसे गां समाश्लिष्य दुर्लभां प्रमदामिव ७
प्रवृद्धनिद्रे शयिते त्वयि राक्षसपांसने।
भविष्यन्ति शरण्यानां शरण्या दण्डका इमे ८
जनस्थाने हतस्थाने तव राक्षस मच्छरैः।
निर्भया विचरिष्यन्ति सर्वतो मुनयो वने ९
अद्य विप्रसरिष्यन्ति राक्षस्यो हतबान्धवाः।
बाष्पार्द्रवदना दीना भयादन्यभयावहाः १०
अद्य शोकरसज्ञास्ता भविष्यन्ति निरर्थिकाः।

तेंही तुझें भाषण खोटें आहे आता गरुडानें ज्याप्रमाणें अमृत हरण केलें, त्याप्रमाणें स्वभावानें हलकट, नीच आणि असत्याचरण करणाऱ्या तुज राक्षसाचे प्राण मी हरण करीन. (१–५)

"माझ्या बाणानीं विदीर्ण होऊन शिरच्छेद झालेल्या तुझे फेन व बुडबुडे यानीं भूषित झालेलें रक्त आज पृथ्वी प्राशन करील. ज्याचें सर्वांग धुळीनें भरलें आहे आणि ज्यानें स्थानभ्रष्ट झालेले आपले दोन्ही बाहु भूमीवर ठेविले आहेत असा तूं, प्राप्त झालेल्या दुर्लभ स्त्रीप्रमाणें पृथ्वीला आलिंगन देऊन शयन करशील राक्षसानाही कलंक लावणारा तूं शयन करून महानिद्रेचा अनुभव घेऊं लागलास म्हणजे सर्व लोकाना आश्रयभूत असलेल्या तपस्व्याना हें दंडकारण्य सुखानें वास करण्यास योग्य होईल हे राक्षसा! माझ्या बाणानीं तुझ्या जनस्थानातील राक्षसाचें वास्तव्य नाहींसें झालें म्हणजे मुनि चोहोंकडे वनात निर्भय होऊन संचार करू लागतील दुसऱ्याना भयावह असलेल्या राक्षसी बंधु बांधवाचा वध झाल्यामुळें आज दीन होतील आणि अश्रूंनीं मुखें आर्द्र झालीं असताना जनस्थानातून पळत सुटतील (६–१०)

अनुरूपकुलाः पत्न्यो यासां त्वं पतिरीदृशः ११
नृशंसशील क्षुद्रात्मन्नित्यं ब्राह्मणकण्टक ।
त्वत्कृते शङ्कितरग्नौ मुनिभिः प्राप्यते हविः १२
तमेवमभिसंरब्धं ब्रुवाणं राघवं वने ।
खरो निर्भर्त्सयामास रोषात्खरतरस्वरः १३
दृढं खल्ववलिप्तोऽसि भयेष्वपि च निर्भयः ।
वाच्यावाच्यं ततो हि त्वं मृत्योर्वश्यो न बुध्यसे १४
कालपाशपरिक्षिप्ता भवन्ति पुरुषा हि ये ।
कार्याकार्यं न जानन्ति ते निरस्तषडिन्द्रियाः १५
एवमुक्त्वा ततो रामं संरुध्य भ्रुकुटिं ततः ।
स ददर्श महासालमविदूरे निशाचरः १६
रणे प्रहरणस्यार्थे सर्वतो ह्यवलोकयन् ।
स तमुत्पाटयामास संदष्टदशनच्छदम् १७

" ज्याचा तू पापकर्मी पति आहेस आणि त्यामुळेंच ज्याच्या कामादि पुरुषार्थांचा नि शेष नाश झाला आहे, अशा तुझ्यासारख्याच अधम कुलामध्यें उत्पन्न झालेल्या त्या तुझ्या स्त्रिया आज शोकरस कसा असतो, तें स्वानुभवानें जाणतील हे दुष्टा ! हे क्षुद्रा ! हे ब्राह्मणकंटका ! तुझ्यामुळें मुनि भयभीत होऊनच अग्नीमध्यें नेहमीं हवन करीत असतात. " (११-१२)

याप्रमाणें अत्यंत क्षुब्ध होऊन राम बोलू लागला असता अतिशय भयंकर स्वरानें युक्त असलेला खर क्रोधानें त्याची निर्भर्त्सना करू लागला तो म्हणाला, " तूं अतिशयच गर्विष्ठ झाला आहेस आणि यामुळें भयकारक गोष्टींचेही तुला भय वाटेनासें झालें आहे व त्याचप्रमाणें तूं मृत्यूच्या आधीन झालेला असूनही बोलावें काय आणि न बोलावें काय, हेंही तुला समजेनासें झालें आहे. जे पुरुष कालपाशानें ग्रस्त झालेले असतात, त्याना अंत करण आणि पंचज्ञानेंद्रियें यांनीं सोडलें असल्यामुळें कार्याकार्यांचा विचार रहात नाहीं. " याप्रमाणें भिंवया चढवून रामाला बोलत असता त्या राक्षसाची जवळच असलेल्या एका मोठ्या सालवृक्षाकडे दृष्टि गेली रामावर प्रहार करण्याकरिता चोहोंकडे पहात असलेल्या

तं समुत्क्षिप्य बाहुभ्यां विनर्दित्वा महाबलः।
राममुद्दिश्य चिक्षेप हतस्त्वमिति चाब्रवीत् १८
तमापतन्तं बाणौघैश्छित्त्वा रामः प्रतापवान्।
रोषमाहारयत्तीव्रं निहन्तुं समरे खरम् १९
जातस्वेदस्ततो रामो रोषरक्तान्तलोचनः।
निर्बिभेद सहस्रेण बाणानां समरे खरम् २०
तस्य बाणान्तराद्रक्तं बहु सुस्राव फेनिलम्।
गिरेः प्रस्रवणस्येव धाराणां च परिस्रवः २१
विकलः स कृतो बाणैः खरो रामेण संयुगे।
मत्तो रुधिरगन्धेन तमेवाभ्यद्रवद् द्रुतम् २२
तमापतन्तं संक्रुद्धं कृतास्त्रो रुधिराप्लुतम्।
अपासर्पद् द्वित्रिपदं किंचित्त्वरितविक्रमः २३
ततः पावकसंकाशं वधाय समरे शरम्।
खरस्य रामो जग्राह ब्रह्मदण्डमिवापरम् २४

---

त्या खरानें दात-ओंठ खाऊन तो वृक्ष उपटला आणि हातांनीं गरगर फिरवून व मोठी गर्जना करून त्या महाबलाढ्य खरानें तो रामावर फेंकला आणि तो फेंकताना " तूं मेलास " असें तो म्हणाला. (१३-१८)

परंतु तो वृक्ष अंगावर येऊं लागला असता प्रतापी रामानें बाणसमुदायानीं त्याला तोडून टाकून खराचा वध करण्याकरितां तीव्र रोष धारण केला रोषानें घाम येऊन नेत्रप्रांत आरक्तवर्ण झाले असता रामानें हजार बाणांनीं खराला वेध केला, तेव्हा प्रस्रवण पर्वतावरील जलधाराच्या प्रवाहाप्रमाणें त्या खराच्या शरिराला बाणांनीं पडलेल्या क्षतांतुन पुष्कळच फेंसाळलेलें रक्त वाहूं लागलें. परंतु बाणांनीं रामानें जरी याप्रमाणें त्या खराला अगदीं कुंठित करून सोडलें होतें, तरी रक्ताच्या गंधानें तो मत्त होऊन पुनरपि त्या रामावरच धावला तेव्हा रक्तानें भरून गेलेला तो क्रुद्ध राक्षस धावून येत आहे असें पाहून बाण मारता यावा एतदर्थ किंचित् चपळाई करून तो कृतास्त्र राम दोन तीन पावलें मागें सरला आणि खराच्या वधाकरिता प्रति ब्रह्मास्त्रच की काय असा

स तद्दत्तं मघवता सुरराजेन धीमता ।
संदधे च स धर्मात्मा मुमोच च खरं प्रति २५
स विमुक्तो महाबाणो निर्घातसमनिःस्वनः ।
रामेण धनुरायम्य खरस्योरसि चापतत् २६
स पपात खरो भूमौ दह्यमानः शराग्निना ।
रुद्रेणेव विनिर्दग्धः श्वेतारण्ये यथान्धकः २७
स वृत्र इव वज्रेण फेनेन नमुचिर्यथा ।
बलो वेन्द्राशनिहतो निपपात हतः खरः २८
एतस्मिन्नन्तरे देवाश्चारणैः सह संगताः ।
दुन्दुभींश्चाभिनिघ्नन्तः पुष्पवर्षं समन्ततः २९
रामस्योपरि संहृष्टा ववर्षुर्विस्मितास्तदा ।
अर्धाधिकमुहूर्तेन रामेण निशितैः शरैः ३०
चतुर्दशसहस्राणि रक्षसां कामरूपिणाम् ।
खरदूषणमुख्यानां निहतानि महामृधे ३१

---

एक अग्नीसारखा तेजस्वी बाण रामानें घेतला आणि बुद्धिवान् देवराज इंद्रानें अगस्त्य मुनींच्या द्वारें दिलेला तो बाण धनुष्याला लावून त्या महात्म्या रामानें खर राक्षसावर सोडला. (१९-२५)

रामानें धनुष्य आकर्षण करून सोडलेला तो प्रचंड बाण, वायूवर वायु आदळून होणाऱ्या प्रचंड ध्वनीप्रमाणें गर्जना करीत करीत खर राक्षसाच्या वक्षःस्थलावर जाऊन पडला, तेव्हा रुद्रानें दग्ध केलेला अंधकासुर ज्याप्रमाणें श्वेतारण्यात पडला, त्याप्रमाणें बाणरूप अग्नीनें जळू लागलेला तो खर भूमीवर पडला. वज्रानें वध पावलेल्या वृत्रासुराप्रमाणें, जलफेनानें वध पावलेल्या नमुचि दैत्याप्रमाणें अथवा अशनि नावाच्या आयुधानें वध पावलेल्या बल दैत्याप्रमाणें रामबाणानें वध पावलेला तो खर पृथ्वीवर पडला या वेळीं चारणासह एकत्र जमलेले देव दुंदुभि वाजवून आनंदानें रामावर सर्व बाजूंनीं विस्मयपूर्वक पुष्पवृष्टि करूं लागले आणि म्हणाले, " दीड मुहूर्तामध्यें रामानें तीक्ष्ण बाणानीं यथेष्ट रूप धारण करणाऱ्या खर-दूषण-इत्यादि चौदा हजार राक्षसांचा महासंग्रामांत वध

अहो वत महत्कर्म रामस्य विदितात्मनः ।
अहो वीर्यमहो दार्ढ्यं विष्णोरिव हि दृश्यते ३२
इत्येवमुक्त्वा ते सर्वे ययुर्देवा यथागतम् ३३
ततो राजर्षयः सर्वे संगताः परमर्षयः ।
सभाज्य मुदिता रामं सागस्त्या इदमब्रुवन् ३४
एतदर्थं महातेजा महेन्द्रः पाकशासनः ।
शरभङ्गाश्रमं पुण्यमाजगाम पुरंदरः ३५
आनीतस्त्वमिमं देशमुपायेन महर्षिभिः ।
एषां वधार्थं शत्रूणां रक्षसां पापकर्मणाम् ३६
तदिदं नः कृतं कार्यं त्वया दशरथात्मज ।
स्वधर्मं प्रचरिष्यन्ति दण्डकेषु महर्षयः ३७
एतस्मिन्नन्तरे वीरो लक्ष्मणः सह सीतया ।
गिरिदुर्गाद्विनिष्क्रम्य संविवेशाश्रमे सुखी ३८
ततो रामस्तु विजयी पूज्यमानो महर्षिभिः ।
प्रविवेशाश्रमं वीरो लक्ष्मणेनाभिपूजितः ३९
तं दृष्ट्वा शत्रुहन्तारं महर्षीणां सुखावहम् ।

केला. तव्हा पराक्रमानें विख्यात झालेल्या या रामाचें काय हो तरी हें महत्कर्म ! अहो, याचें वीर्य आणि धैर्य विष्णुप्रमाणें दिसत आहे " (२६—३२)

असें म्हणून ते सर्व देव आले तसे निघून गेले नंतर सर्व राजर्षि आणि महर्षि अगस्त्यमुनींसह आनंदित होऊन तेथें आले व रामाची प्रशंसा करून म्हणाले, " याचकरिता पाक दैत्याचा वध करणारा महातेजस्वी महेन्द्र शरभंग मुनींच्या पवित्र आश्रमीं आला होता. या पापकर्मी राक्षस शत्रूंचा वध करण्याकरिता महर्षींनीं उपाय योजून तुला या प्रदेशांत आणलें होतें. तें हें आमचें कार्य, हे दशरथपुत्रा रामा ! तू शेवटास नेलें आहेस व यामुळें दंडकारण्यात महर्षींना स्वधर्माचें आचरण करिता येईल." हें त्याच बोलणें चाललें आहे तोंच वीर लक्ष्मण सीतेसह पर्वताच्या गुहेंतून बाहेर निघून आनंदानें आश्रमांत आला नंतर महर्षि ज्याची प्रशंसा करीत आहेत असा तो विजयी वीर राम आश्रमांत

बभूव हृष्टा वैदेही भर्तारं परिषस्वजे  ४०
मुदा परमया युक्ता दृष्ट्वा रक्षोगणान्हतान् ।
रामं चैवाव्यथं दृष्ट्वा तुतोष जनकात्मजा  ४१
ततस्तु तं राक्षससङ्घमर्दनं सपूज्यमानं मुदितैर्महात्मभिः ।
पुनः परिष्वज्य मुदान्वितानना बभूव हृष्टा जनकात्मजा तदा ४२
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रिंशः सर्गः ॥३०॥ [९७२]

एकत्रिंशः सर्गः ।

त्वरमाणस्ततो गत्वा जनस्थानादकम्पनः ।
प्रविश्य लङ्कां वेगेन रावणं वाक्यमब्रवीत्  १
जनस्थानस्थिता राजन्राक्षसा बहवो हताः ।
खरश्च निहतः संख्ये कथंचिदहमागतः  २
एवमुक्तो दशग्रीवः क्रुद्धः संरक्तलोचनः ।
अकम्पनमुवाचेदं निर्दहन्निव तेजसा  ३

आला असता लक्ष्मणानें त्याची स्तुति केली महर्षीना सुख देणाऱ्या त्या शत्रुनाशक पतीला अवलोकन केल्यावर आनंदित झालेली सीता त्याला कडकडून भेटली आणि पराकाष्ठेच्या आनंदानें युक्त झालेल्या त्या जनककन्या सीतेला, राक्षसगणाचा वध होऊन राम कुशल आहे असें आढळून आल्यावर अत्यन्त आनंद झाला. नंतर आनंदित झालेले महात्मे मुनि ज्याची प्रशंसा करीत आहेत अशा त्या आपल्या राक्षससमुदायाचें मर्दन करणाऱ्या पतीला पुनरपि आलिंगन देऊन आधींच आनंदी मुद्रेनें युक्त झालेल्या जनककन्येला आणखी हर्ष झाला (३३-४२)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकाण्डापैकीं तीसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

जनस्थानांतील युद्धांतून पळालेला अकंपन राक्षस धावत धावत लंकेला गेला आणि रावणाला म्हणाला– " हे राजा ! जनस्थानांत असलेल्या असंख्य राक्षसांचा व खराचा संग्रामांत वध झाला. मी प्रेक्षक असल्यानें बाणाच्या तावडींत न सांपडल्यामुळे जीव धरून कसा तरी जीव वाचवून येथें आलों " याप्रमाणें

केन भीमं जनस्थानं हतं मम परासुना।
को हि सर्वेषु लोकेषु गतिं नाधिगमिष्यति ४
न हि मे विप्रियं कृत्वा शक्यं मघवता सुखम्।
प्राप्तुं वैश्रवणेनापि न यमेन च विष्णुना ५
कालस्य चाप्यहं कालो दहेयमपि पावकम्।
मृत्युं मरणधर्मेण संयोजयितुमुत्सहे ६
वातस्य तरसा वेगं निहन्तुमपि चोत्सहे।
दहेयमपि संक्रुद्धस्तेजसाऽऽदित्यपावकौ ७
तथा क्रुद्धं दशग्रीवं कृताञ्जलिरकम्पनः।
भयात्संदिग्धया वाचा रावणं याचतेऽभयम् ८
दशग्रीवोऽभयं तस्मै प्रददौ रक्षसां वरः।
स विस्रब्धोऽब्रवीद्वाक्यमसंदिग्धमकम्पनः ९
पुत्रो दशरथस्यास्ते सिंहसंहननो युवा।

अकपनानें सांगितलें असता रावण क्रुद्ध झाला, त्याचे नेत्र लाल झाले आणि तेजानें जळतच कीं काय तो अकपनाला म्हणाला—" ज्यानें माझें भयंकर जनस्थान नष्ट करून टाकलें आहे, तो खरोखर गतप्राण झालाच आहे असें मी समजतों कारण असें कर्म करणारा कोण बरें, सर्व लोकामध्यें जरी हिंडला तरी, प्राप्त होणारें मरण टाळण्यास समर्थ होणार आहे ? फार कशाला, माझें अप्रिय करून इंद्राला, कुबेराला, यमाला अथवा विष्णूलाही सुख प्राप्त होणें अशक्य आहे कालाचाही मी काल आहें, अग्नीलाही मी दग्ध करून टाकीन, मृत्यूलाही मारण्याचें माझें सामर्थ्य आहे. जोरानें वायूचा वेगही नाहींसा करण्यास मी तयार आहे आणि क्रुद्ध झालों असता तेजाच्या योगानें सूर्य व अग्नि ह्यानाही मी जाळून टाकीन " (१–७)

याप्रमाणें दशानन रावण क्रुद्ध झाला असता अकंपनानें हात जोडून भयामुळें अडखळत अडखळत त्या रावणापाशीं अभय मिळण्याविषयीं प्रार्थना केली तेव्हा राक्षसामध्यें श्रेष्ठ असलेल्या रावणानें त्याला अभय दिल्यावर धीर आलेला तो अकपन निःसन्देहपणें रावणाला म्हणाला " दशरथाचा एक राम

रामो नाम महास्कन्धो वृत्तायतमहाभुजः १०
श्यामः पृथुयशाः श्रीमानतुल्यबलविक्रमः ।
हतस्तेन जनस्थाने खरश्च सहदूषणः ११
अकम्पनवचः श्रुत्वा रावणो राक्षसाधिपः ।
नागेन्द्र इव निःश्वस्य इदं वचनमब्रवीत् १२
स सुरेन्द्रेण संयुक्तो रामः सर्वामरैः सह ।
उपयातो जनस्थानं ब्रूहि कच्चिदकम्पन १३
रावणस्य पुनर्वाक्यं निशम्य तदकम्पनः ।
आचचक्षे बलं तस्य विक्रमं च महात्मनः १४
रामो नाम महातेजाः श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ।
दिव्यास्त्रगुणसंपन्नः परं धर्मं गतो युधि १५
तस्यानुरूपो बलवान्रक्ताक्षो दुन्दुभिस्वनः ।
कनीयाँल्लक्ष्मणो भ्राता राकाशशिनिभाननः १६

म्हणून तरुण पुन आहे, उत्कृष्ट अवयव आणि सौंदर्य यांनीं तो युक्त आहे; याचे खांदे मोठे मोठे आहेत, बाहु वाटोळे, विस्तीर्ण आणि दीर्घ आहेत *कातीनें तो महायशस्वी राम श्यामवर्ण आहे व त्या श्रीमान् रामाच्या बलाला व* पराक्रमाला कोठेंच तोड नाहीं आणि त्यानेंच जनस्थानामध्यें दूषणासह खराचा वध केला आहे " हें अकंपनाचें भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण नागराजाप्रमाणें सुस्कारा टाकून म्हणाला–" हे अकंपना ! तो राम इंद्रासह सर्व देवांना बरोबर घेऊन जनस्थानामध्यें आला होता कीं काय, तें मला सांग " (८–१३)

हा रावणाचा दुसरा प्रश्न ऐकून घेऊन अकंपन त्या महात्म्या रामाचा पराक्रम व सामर्थ्य त्याला सांगू लागला तो म्हणाला— " राम महातेजस्वी असून सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ आहे दिव्यास्त्ररूप साधनांनीं तो संपन्न आहे आणि युद्धांत पराकाष्ठेचें शौर्य गाजविणारा आहे त्याला योग्य असाच त्याचा एक लक्ष्मण नावाचा बलाढ्य कनिष्ठ भ्राता आहे त्याचे नेत्र आरक्तवर्ण असून आवाज दुंदुभीप्रमाणें गंभीर आहे आणि पौर्णिमच्या चंद्रासारखें त्याचें मुख आहे.

स तेन सह संयुक्तः पावकेनानिलो यथा ।
श्रीमान्राजवरस्तेन जनस्थानं निपातितम् १७
नैव देवा महात्मानो नात्र कार्या विचारणा ।
शरा रामेण तूत्सृष्टा रुक्मपुङ्खा पतत्रिणः १८
सर्पाः पञ्चानना भूत्वा भक्षयन्ति स्म राक्षसान् ।
येन येन च गच्छन्ति राक्षसा भयकर्षिताः १९
तेन तेन स्म पश्यन्ति राममेवाग्रतः स्थितम् ।
इत्थं विनाशितं तेन जनस्थानं तवानघ २०
अकम्पनवचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् ।
गमिष्यामि जनस्थानं रामं हन्तुं सलक्ष्मणम् २१
अथैवमुक्ते वचने प्रोवाचेदमकम्पनः ।
शृणु राजन्यथावृत्तं रामस्य बलपौरुषम् २२
असाध्यः कुपितो रामो विक्रमेण महायशाः ।
आपगायास्तु पूर्णाया वेगं परिहरेच्छरैः २३
सताराग्रहनक्षत्रं नभश्चाप्यवसादयेत् ।

अग्नीशीं संयुक्त होणाऱ्या वायूप्रमाणें तो श्रीमान् राजाधिराज राम लक्ष्मणाशीं संयुक्त झाला आहे आणि त्यानेंच जनस्थानाचा नि पात केला आहे. महात्मे देव तेथें मुळींच आले नाहींत, त्यांच्या येण्याविषयीं मुळींच शंका नको सुवर्णभूषित पिसांनीं युक्त असलेले बाण एकटा रामच सोडीत होता आणि तेच बाण पंचमुखी सर्प होऊन राक्षसांना भक्षण करीत होते भयग्रस्त झालेले राक्षस जिकडे-जिकडे जात असत तिकडे-तिकडे समोर उभा असलेला रामच त्यांच्या दृष्टीस पडे. याप्रमाणें हे निष्पापा ! त्यानें जनस्थानाचा नाश केला " (१४–२०)

हें अकंपनाचें भाषण ऐकून " मी लक्ष्मणासह रामाचा वध करण्याकरितां जनस्थानामध्यें जातों " असें रावण त्याला म्हणाला; परंतु रावण असें बोलल्यावर अकंपन त्याला म्हणाला— " हे राजा ! रामाचें वर्तन, बल व पराक्रम तूं श्रवण कर. राम क्रुद्ध झाला असता पराक्रम करून त्याचा पराजय करणें अशक्य आहे, कारण भरून चाललेल्या नदीचाही वेग तो बाणाच्या योगानें .

अस्तौ रामस्तु सीदन्तीं श्रीमानभ्युद्धरेन्महीम् २४
भित्त्वा वेलां समुद्रस्य लोकानाप्लावयेद्विभुः ।
वेगं वापि समुद्रस्य वायुं वा विधमेच्छरैः २५
संहृत्य वा पुनर्लोकान्विक्रमेण महायशाः ।
शक्तः श्रेष्ठः स पुरुषः स्रष्टुं पुनरपि प्रजाः २६
नहि रामो दशग्रीव शक्यो जेतुं रणे त्वया ।
रक्षसां वापि लोकेन स्वर्गः पापजनैरिव २७
न तं वध्यमहं मन्ये सर्वैर्देवासुरैरपि ।
अयं तस्य वधोपायस्तन्ममैकमनाः शृणु २८
भार्या तस्योत्तमा लोके सीता नाम सुमध्यमा ।
श्यामा समविभक्ताङ्गी स्त्रीरत्नं रत्नभूषिता २९
नैव देवी न गन्धर्वी नाप्सरा न च पन्नगी ।
तुल्या सीमन्तिनी तस्य मानुषी तु कुतो भवेत् ३०

परत फिरवील. तारा, ग्रह आणि नक्षत्रें यासह आकाशही खालीं पाडील आणि हा श्रीमान् राम पृथ्वी रसातळाला जाऊं लागली असता तिचाही उद्धार करील. समुद्राची मर्यादा नाहींशी करून हा समर्थ राम लोकांना बुडवून टाकील आणि बाणाच्या योगानें समुद्राचा वेगही नाहींसा करून वायूलाही उडवून देईल. इतकेंच नव्हे, स्वपराक्रमानें लोकांचा संहार करून तो महायशस्वी श्रेष्ठ पुरुष राम पुनरपि प्रजा उत्पन्न करण्यास समर्थ आहे (२१-२६,

"हे दशानना! पापी लोकांना स्वर्ग प्राप्त होणें ज्याप्रमाणें अशक्य आहे, त्याचप्रमाणें संग्रामांत तुझ्या हातून अथवा राक्षससमुदायाच्या हातून रामाचा पराजय होणें अशक्य आहे सर्व देवदैत्यांच्या हातूनही संग्रामांत त्याचा वध होईल असें मला वाटत नाहीं. त्याच्या वधाचा हा एक उपाय आहे, तो तूं एकचित्तानें माझ्यापासून श्रवण कर. सीता नावाची त्याची एक अतिशय सुंदर व जगतामध्यें उत्कृष्ट भार्या आहे. ती नेहमीं तरुण राहणारी आहे, तिच्या अवयवांची ठेवण मारखी व रेखलेली आहे आणि रत्नानीं ती भूषित झालेली असून सर्व स्त्रियांमध्यें उत्कृष्ट आहे. देवांगना, गंधर्व-स्त्री, अप्सरा अथवा नाग-

तस्यापहर भार्यां त्वं त प्रमथ्य महावने ।
सीतया रहितो रामो न चैव हि भविष्यति ३१
अरोचयत तद्वाक्यं रावणो राक्षसाधिपः ।
चिन्तयित्वा महाबाहुरकम्पनमुवाच ह ३२
बाढं कल्यं गमिष्यामि एकः सारथिना सह ।
आनेष्यामि च वैदेहीमिमां हृष्टो महापुरीम् ३३
तदेवमुक्त्वा प्रययौ खरयुक्तेन रावणः ।
रथेनादित्यवर्णेन दिशः सर्वाः प्रकाशयन् ३४
स रथो राक्षसेन्द्रस्य नक्षत्रपथगो महान् ।
चञ्चूर्यमाणः शुशुभे जलदे चन्द्रमा इव ३५
स दूरे चाश्रमं गत्वा ताटकेयमुपागमत् ।
मारीचेनार्चितो राजा भक्ष्यभोज्यैरमानुषैः ३६
तं स्वयं पूजयित्वा तु आसनेनोदकेन च ।
अर्थोपहितया वाचा मारीचो वाक्यमब्रवीत् ३७

---

कन्या यातहा तिच्यासारखी कोणी नाहीं, मग मनुष्यजातींत तर तिच्यासारखी स्त्री कोठून असणार ? तेव्हा कोणत्या तरी उपायानें महावनात त्याचें उच्चाटण करून तू त्याची भार्या हरण कर, कारण सीतेचा विरह झाला असता राम जिवंतच राहणार नाहीं " (२७-३१)

हें त्याचें भाषण राक्षसाधिपति रावणाला रुचलें आणि तो महापराक्रमी रावण विचार करून त्याला म्हणाला, " ठीक आहे मी प्रात काळीं सारथ्यासह एकटाच जाईन आणि आनदानें या मोठ्या नगरीमध्यें सीतेला घेऊन येईन " याप्रमाणें अकंपनाला सांगितल्यावर तो रावण गाढवें जोडलेल्या आणि सूर्यासारख्या तेजस्वी असलेल्या रथांत आरूढ होऊन सर्व दिशा प्रकाशित करीत करीत निघाला तेव्हा राक्षसाधिपति रावणाचा नक्षत्रमार्गानें जाणारा तो रथ मेघातून एकसारख्या जाणाऱ्या चद्राप्रमाणें शोभू लागला तो रावण दूर असलेल्या मारीचाश्रमाला गेल्यावर ताटकापुत्र मारीचाकडे गेला असता त्या मारीचानें मनुष्य लोकात अप्राप्य अशा भक्ष्य व भोज्य पदार्थांनीं त्या राजाचा सत्कार

कच्चित्सुकुशलं राजँल्लोकानां राक्षसाधिप ।
आशङ्के नाधिजाने त्वं यतस्तूर्णमुपागतः ३८
एवमुक्तो महातेजा मारीचेन स रावणः ।
ततः पश्चादिदं वाक्यमब्रवीद्वाक्यकोविदः ३९
आरक्षो मे हतस्तात रामेणाक्लिष्टकारिणा ।
जनस्थानमवध्यं तत्सर्वं युधि निपातितम् ४०
तस्य मे कुरु साचिव्यं तस्य भार्यापहारणे ।
राक्षसेन्द्रवचः श्रुत्वा मारीचो वाक्यमब्रवीत् ४१
आख्याता केन वा सीता मित्ररूपेण शत्रुणा ।
त्वया राक्षसशार्दूल को न नन्दति नन्दितः ४२
सीतामिहानयस्वेति को ब्रवीति ब्रवीहि मे ।
रक्षोलोकस्य सर्वस्य कः शृङ्गं छेत्तुमिच्छति ४३

केला आणि याप्रमाणें आसन, उदक वगैरे देऊन त्याचें स्वत. पूजन केल्यावर अर्थसंपन्न वाणीनें मारीच त्याला, म्हणाला " हे राक्षसाधिपते राजा! राक्षस लोकाचें कुशल आहे ना? ज्याअर्थी तूं त्वरेनें येथें आला आहेस, त्याअर्थी मला ते कुशल आहेत असें दिसत नाहीं; मला भयाची शंका येत आहे." (३२-३८)

याप्रमाणें मारीच बोलला असता संभाषण करण्यात प्रवीण असलेला तो रावण त्याचें बोलणें ऐकून घेतल्यानंतर त्याला म्हणाला— " बा मारीचा! माझ्या सीमारक्षकाचा, अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या रामानें वध केला असून युद्धांत अवध्य असलेल्या त्या सर्व जनस्थानाचाही नि पात करून टाकला आहे. यास्तव त्याची भार्या हरण करण्याकरितां तू मला सहाय्य कर." हें राक्षसाधिपति रावणाचें भाषण ऐकल्यावर मारीच म्हणाला— " हे राक्षसश्रेष्ठा! कोणत्या मित्ररूप शत्रूनें तुला सीता हरण करण्यास सांगितलें आहे! अरे, दानादिकाच्या योगानें तूं संतुष्ट केलेला असा कोण पुरुष तुझ्याशीं द्वेष करीत आहे? " येथें सीतेला घेऊन ये " असें कोण म्हणत आहे, तें मला सांग. सर्व राक्षस लोकाची उन्नति नाहींशी करण्याची कोण इच्छा करीत आहे? तें एकदां मला

प्रोत्साहयति यश्च त्वां स च शत्रुरसंशयम् ।
आशीविषमुखाद्दंष्ट्रामुद्धर्तुं चेच्छति त्वया 88
कर्मणानेन केनासि कापथं प्रतिपादितः ।
सुखसुप्तस्य ते राजन्प्रहृतं केन मूर्धनि ४५
विशुद्धवंशाभिजनाग्रहस्ततेजोमदः संस्थितदोर्विषाणः ।
उदीक्षितुं रावण नेह युक्तः स संयुगे राघवगन्धहस्ती ४६
असौ रणान्तःस्थितिसंधिवालो विदग्धरक्षोमृगहा नृसिंहः ।
सुप्तस्त्वया बोधयितुं न शक्यः शराङ्गपूर्णो निशितासिदंष्ट्रः४७
चापापहारे भुजवेगपङ्के शरोर्मिमाले सुमहाहवौघे ।
न रामपातालमुखेऽतिघोरे प्रस्कन्दितुं राक्षसराज युक्तम् ४८
प्रसीद लङ्केश्वर राक्षसेन्द्र लङ्कां प्रसन्नो भव साधु गच्छ ।

कळूं दे या कृत्याविषयीं जो तुला प्रोत्साहन देत आहे तो नि संशय तुझा शत्रु आहे आणि तुझ्याकडून सर्पाच्या मुखातील दाढ उपटून काढण्याची तो इच्छा करीत आहे ह्या कर्माचा उपदेश करून तुला कोणी नाशाच्या मार्गाला लावून दिलें आहे ? व हे राजा ! तू सुखानें निजला असताना तुझ्या मस्तकावर कोणी प्रहार केला आहे हें मला समजू दे (३९–४४)

" शुद्ध कुलामध्यें जन्म हीच ज्याची शुंडा, प्रताप हाच ज्याचा मद आणि बाधेसूद बाहू हेच ज्याचें दात अशा त्या रामरूप मत्त गजाकडे संग्रामात नुसतें पाहणेंही हितकारक नाहीं, मग हे रावणा ! त्याच्याशीं युद्ध करण्याची तर गोष्टच कशाला पाहिजे ? रणामध्यें असणें हेंच ज्याचे संधि व केश आहेत, रणशूर राक्षसरूप मृगाचा जो वध करणारा आहे, बाणरूप अंगानीं जो परिपूर्ण आहे आणि तीक्ष्ण खड्गरूप दंष्ट्रानीं जो युक्त आहे, अशा या घोरत पडलेल्या पुरुषसिंह रामाला उठवणें योग्य नाहीं. हे राक्षसराजा ! धनुष्य हाच ज्यातील प्राणहारक नक्र आहे, भुजाचा वेग हाच ज्यातील चिखल आहे, बाण हाच ज्यांतील लाटा आहेत व प्रचंड संग्राम हाच ज्यातील जलप्रवाह आहे, अशा या पातालापर्यंत प्रविष्ट झालेल्या रामरूप महाभयकर सागराच्या वडवानलरूप मुखामध्यें जाऊन पडणें योग्य नाहीं हे लंकाधिपते ! तू प्रसन्न हो आणि हे

त्वं स्वेषु दारेषु रमस्व नित्यं रामः सभार्यो रमतां वनेषु ४९
एवमुक्तो दशग्रीवो मारीचेन स रावणः ।
न्यवर्तत पुरीं लङ्कां विवेश च गृहोत्तमम्  ५०
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥३१॥[१०२२]

द्वात्रिंशः सर्गः ।

ततः शूर्पणखा दृष्ट्वा सहस्राणि चतुर्दश ।
हतान्येकेन रामेण रक्षसां भीमकर्मणाम्  १
दूषणं च खरं चैव हतं त्रिशिरसं रणे ।
दृष्ट्वा पुनर्महानादान्ननाद जलदो यथा  २
सा दृष्ट्वा कर्म रामस्य कृतमन्यैः सुदुष्करम् ।
जगाम परमोद्विग्ना लङ्कां रावणपालिताम्  ३
सा ददर्श विमानाग्रे रावणं दीप्ततेजसम् ।
उपोपविष्टं सचिवैर्मरुद्भिरिव वासवम्  ४
आसीनं सूर्यसङ्काशे काञ्चने परमासने ।
रुक्मवेदिगतं प्राज्यं ज्वलन्तमिव पावकम्  ५

राक्षसराजा! आपलें मन निर्मल करून तू खुशाल लंकेला जा तूं स्वस्त्रीचे ठिकाणीं नेहमीं रममाण होत जा आणि रामालाही वनामध्यें आपल्या भार्येसह रममाण होऊं दे " याप्रमाणें मारीचानें दशकंठ रावणाला सांगितलें असता तो लंकानगरीला परत गेला आणि आपल्या उत्कृष्ट गृहांत प्रविष्ट झाला (४६-५०)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

नंतर एकट्या रामानें भयंकर कर्म करणाऱ्या चौदा हजार राक्षसांचा आणि दूषण, खर व त्रिशिरा यांचाही संग्रामांत वध केल्याचें पाहून ती [illegible] पुनरपि मेघासारख्या मोठमोठ्यानें गर्जना करूं लागली आणि इतरांना [illegible] दुष्कर असें रामानें केलेलें तें कृत्य पाहून अत्यंत उद्विग्न झालेली ती [illegible] रावणानें परिपालन केलेल्या लंकेंत गेली व मरुद्गणासह असणाऱ्या [illegible] सचिवासह सात मजली वाड्याच्या गच्चीवर बसलेल्या उज्ज्वल व [illegible]

देवगन्धर्वभूतानामृषीणां च महात्मनाम् ।
अजेयं समरे घोरं व्यात्ताननमिवान्तकम् ६
देवासुरविमर्देषु वज्राशनिकृतव्रणम् ।
ऐरावतविषाणाग्रैरुत्कृष्टकिणवक्षसम् ७
विंशद्भुजं दशग्रीवं दर्शनीयपरिच्छदम् ।
विशालवक्षसं वीरं राजलक्षणलक्षितम् ८
नद्धवैदूर्यसंकाशं तप्तकाञ्चनभूषणम् ।
सुभुजं शुक्लदशनं महास्यं पर्वतोपमम् ९
विष्णुचक्रनिपातैश्च शतशो देवसंयुगे ।
अन्यैः शस्त्रैः प्रहारैश्च महायुद्धेषु ताडितम् १०
आहताङ्गं समस्तैस्तं देवप्रहरणैस्तदा ।
अक्षोभ्याणां समुद्राणां क्षोभणं क्षिप्रकारिणम् ११

रावणाला तिनें पाहिलें ज्याच्यामध्यें पुष्कळ तुपाचा होम केलेला आहे आणि म्हणूनच जो प्रज्वलित आहे, अशा सुवर्णनिर्मित स्थंडिलावर असलेल्या अग्नीप्रमाणें सुवर्णनिर्मितच व प्रभेनें सूर्यासारख्या असलेल्या उत्कृष्ट आसनावर बसलेला तो रावण दिसत होता. देव, गंधर्व, भूतें आणि महात्मे ऋषि याना समरांगणात अजिंक्य असलेला तो भयंकर रावण जबडा पसरलेल्या मृत्यूप्रमाणें भासत होता. देवदैत्याच्या युद्धामध्यें वज्र आणि अशनि या आयुधानीं त्याला जखमा झालेल्या होत्या आणि ऐरावत गजाच्या दाताचे अग्रानीं झालेल्या खुणा त्याच्या वक्षस्थलावर होत्या (१-७)

वास बाहु, दहा कंठ, दर्शनीय सरंजाम, विशाल वक्षःस्थल आणि राजचिन्हें यानीं तो वीर युक्त होता. शरिरावर घातलेल्या वैदूर्यमण्याप्रमाणें त्याची कांति होती, उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें त्यानें धारण केलीं होतीं, त्याचे भुज उत्कृष्ट होते, दंत शुभ्रवर्ण होते, मुख विशाल होतें आणि शरीर पर्वतासारखें धिप्पाड होतें, देवाच्या युद्धात विष्णूच्या सुदर्शन चक्राचे शेकडों प्रहार त्याच्या अंगावर झालेले होते व महायुद्धात इतर शस्त्रांचेही वार त्याला लागलेले होते. ज्याच्या सर्वांगावर देवाच्या शस्त्रास्त्राचे आघात झालेले आहेत व जो निश्चित कार्यास तडका-

क्षेप्तारं पर्वताग्राणां सुराणां च प्रमर्दनम् ।
उच्छेत्तारं च धर्माणां परदाराभिमर्शनम् १२
सर्वदिव्यास्त्रयोक्तारं यज्ञविघ्नकरं सदा ।
पुरीं भोगवतीं गत्वा पराजित्य च वासुकिम् १३
तक्षकस्य प्रियां भार्यां पराजित्य जहार यः ।
कैलासं पर्वतं गत्वा विजित्य नरवाहनम् १४
विमानं पुष्पकं तस्य कामगं वै जहार यः ।
वनं चैत्ररथं दिव्यं नलिनीं नन्दनं वनम् १५
विनाशयति यः क्रोधाद्देवोद्यानानि वीर्यवान् ।
चन्द्रसूर्यौ महाभागावुत्तिष्ठन्तौ परन्तपौ १६
निवारयति बाहुभ्यां यः शैलशिखरोपमः ।
दशवर्षसहस्राणि तपस्तप्त्वा महावने १७
पुरा स्वयंभुवे धीरः शिरांस्युपजहार यः ।
देवदानवगन्धर्वपिशाचपतगोरगैः १८

फडकीं आरंभ करणारा असून कधींही न क्षोभणाऱ्या समुद्रानाही क्षोभ उत्पन्न करणारा होता, तो पर्वतशिखरें फेंकून देणारा होता, देवाचें मर्दन करणारा होता, धर्मांचा उच्छेदक होता आणि बलात्कारानें परस्त्रियाचें हरण करणारा होता तो सर्व दिव्य अस्त्रें योजणारा असून नेहमीं यज्ञाला विघ्न करणारा होता त्यानें एकदा पातालामध्यें भोगवती नगरीला जाऊन आणि वासुकीचा पराजय करून तक्षकाची प्रिय भार्या जिंकून आणली होती (८-१४)

त्याचप्रमाणें कैलास पर्वतावर जाऊन आणि कुबेराला जिंकून बसणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें गमन करणारें त्याचें पुष्पक विमान त्यानें हरण करून आणलें होतें दिव्य चैत्ररथवन, तेथील सरोवर, नंदनवन आणि देवाच्या बागा याचा तो वीर्यवान् रावण नाश करीत असे. दानूना ताप देणारे महाभाग्यवान् चंद्र-सूर्य उदय पावूं लागले असता, पर्वतशिखराप्रमाणें असलेला जो रावण आपल्या बाहूंनीं त्याचें निवारण करीत असे दहा हजार वर्षें महावनामध्यें तपश्चर्या करून पूर्वी स्वयंभू शंकराला त्या ज्ञानी रावणानें आपलीं मस्तकें अर्पण केलीं होतीं.

अभयं यस्य संग्रामे मृत्युतो मानुषादृते ।
मन्त्रैरभिष्टुतं पुण्यमध्वरेषु द्विजातिभिः १९
हविर्धानेषु यः सोममुपहन्ति महाबलः ।
प्राप्तयज्ञहरं दुष्टं ब्रह्मघ्नं क्रूरकारिणम् २०
कर्कशं निरनुक्रोशं प्रजानामहिते रतम् ।
रावणं सर्वभूतानां सर्वलोकभयावहम् २१
राक्षसी भ्रातरं क्रूरं सा ददर्श महाबलम् ।
तं दिव्यवस्त्राभरणं दिव्यमाल्योपशोभितम् २२
आसने सूपविष्टं तं कालेऽकालमिवोद्यतम् ।
राक्षसेन्द्रं महाभागं पौलस्त्यकुलनन्दनम् २३
उपगम्याब्रवीद्वाक्यं राक्षसी भयविह्वला ।
रावणं शत्रुहन्तारं मन्त्रिभिः परिवारितम् २४
तमब्रवीद्दीप्तविशाललोचनं प्रदर्शयित्वा भयलोभमोहिता ।
सुदारुणं वाक्यमभीतचारिणी महात्मना शूर्पणखा विरूपिता २५

एक मनुष्याखेरीज देव, दानव, गंधर्व, पिशाच, पक्षी आणि उरग यांच्याशीं संग्राम करण्यात त्याला मृत्यूचें मुळींच भय नव्हतें; यज्ञात ब्राम्हणानीं मंत्रांच्या योगानें स्तुति केलेल्या पवित्र सोमाचा तो महाबलाढ्य रावण हविर्धान संज्ञक यज्ञशालामध्यें नाश करीत असे, उपस्थित झालेला यज्ञ उध्वस्त करीत असे व तो दुष्ट आणि ब्रम्हघातकी असून क्रूर कर्में करणारा होता. इतकेंच नव्हे तर तो निष्ठुर, निर्दय, सर्व लोकांना भय उत्पन्न करणारा आणि सर्व प्राण्याना आक्रोश करावयाला लावणारा व लोकांच्या अहिताविषयीं तत्पर असे. (१५-२१)

असा तो महाबलाढ्य क्रूर भ्राता रावण दिव्य वस्त्रें व भूषणें धारण करून दिव्य पुष्पमालानीं भूषित झालेला त्या शूर्पणखा राक्षसीनें पाहिला आणि प्रलयकालीं संहार करण्यास सिद्ध झालेल्या कालाप्रमाणें तो पौलस्त्य कुलनंदन महाभाग्यवान् राक्षसाधिपति रावण सिंहासनावर बसलेला असतांना भयानें विव्हल झालेली ती शूर्पणखा राक्षसी त्याच्याजवळ गेली आणि मंत्र्यांनीं परिवेष्टित असलेल्या त्या शत्रुघातक रावणाला तिनें तो वृत्तान्त सांगितला. सारांश

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥३२॥[१०४७]

त्रयस्त्रिंशः सर्गः ।

ततः शूर्पणखा दीना रावणं लोकरावणम् ।
अमात्यमध्ये संक्रुद्धा परुषं वाक्यमब्रवीत् १
प्रमत्तः कामभोगेषु स्वैरवृत्तो निरंकुशः ।
समुत्पन्नं भयं घोरं बोद्धव्यं नावबुध्यसे २
सक्तं ग्राम्येषु भोगेषु कामवृत्तं महीपतिम् ।
लुब्धं न बहु मन्यन्ते श्मशानाग्निमिव प्रजाः ३
स्वयं कार्याणि यः काले नानुतिष्ठति पार्थिवः ।
स तु वै सह राज्येन तैश्च कार्यैर्विनश्यति ४
अयुक्तचारं दुर्दर्शमस्वाधीनं नराधिपम् ।
वर्जयन्ति नरा दूरान्नदीपङ्कमिव द्विपाः ५

सर्व लोकामध्यें निर्भयपणें संचार करणारी, महात्म्या लक्ष्मणानें विरूप करून टाकलेली आणि रामविषयक भयानें व लोभानें मोहित झालेली ती शूर्पणखा आपली विरूपता दाखवून देदीप्यमान आणि विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या रावणाशीं फारच कठोर भाषण करूं लागली. (२२-२५)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥३२॥

नंतर रागानें तांबडी लाल झालेली ती शूर्पणखा लोकांना आक्रोश करावयाला लावणाऱ्या, अमात्यामध्यें बसलेल्या रावणाला मर्मभेदक शब्दांनीं म्हणाली, " विषयोपभोगांत अत्यंत आसक्त, स्वैरवृत्ति आणि निरंकुश असा तूं असल्यामुळें प्राप्त झालेलें घोर भय जें तुला आधींच कळावयास हवें, त्याची तुला दादही नाहीं. विषयोपभोगामध्यें आसक्त होऊन स्वैर आचरण करणाऱ्या राजाला स्मशानांतील अग्नीप्रमाणें प्रजाजन मान देत नाहींत. जो पृथ्वीपति राज्यांतील कामें वेळच्यावेळीं स्वतः निकालास लावीत नाहीं, त्याचा तीं कार्यें आणि राज्य यासह नाश होतो. योग्य ठिकाणीं योग्य हेर न ठेवणाऱ्या, योग्य कालीं प्रजाजनांना दर्शन न देणाऱ्या व स्वाधीन झालेल्या नराधिपाला, हत्ती

ये न रक्षन्ति विषयमस्वाधीनं नराधिपाः ।
ते न वृद्धया प्रकाशन्ते गिरयः सागरे यथा ६
आत्मवद्भिर्विगृह्य त्वं देवगन्धर्वदानवैः ।
अयुक्तचारश्चपलः कथं राजा भविष्यसि ७
त्वं तु बालस्वभावश्च बुद्धिहीनश्च राक्षस ।
ज्ञातव्यं तं न जानीषे कथं राजा भविष्यसि ८
येषां चाराश्च कोशाश्च नयश्च जयतां वर ।
अस्वाधीना नरेन्द्राणां प्राकृतैस्ते जनैः समाः ९
यस्मात्पश्यन्ति दूरस्थान्सर्वानर्थान्नराधिपाः ।
चारेण तस्मादुच्यन्ते राजानो दीर्घचक्षुषः १०
अयुक्तचारं मन्ये त्वां प्राकृतैः सचिवैर्वृतम् ।
स्वजनं च यतः स्थानं निहतं नावबुध्यसे ११

ज्याप्रमाणें नदीच्या दलदलीला दुरूनच टाकून जातात, त्याप्रमाणें लोक दुरूनच त्या राजाच्या दृष्टीला टाळून जातात. जे भूपति प्रथमतः आपल्या ताब्यातून गेलेल्या देशाचें तो पुनः आपल्या ताब्यात घेऊन रक्षण करीत नाहींत, ते किती जरी संपन्न असले तथापि समुद्रात बुडालेल्या पर्वताप्रमाणें प्रकाशमान होत नाहींत तुझा प्रतिकार करण्याविषयीं नित्य प्रयत्नशील व बलवान् अशा देव, गंधर्व व दानव यांशीं वैर माजवून योग्य ठिकाणीं योग्य माणसाची हेराच्या कामावर योजना न करता चचल वृत्ति धारण करणारा तूं राज्यावर कसा टिकून राहूं शकशील ? (१-७)

"हे राक्षसा ! तू पोरकट स्वभावाचा व बुद्धिहीन असून जें अवश्य जाणण्यास पाहिजे, तें जाणत नाहींस, तेव्हा तूं राज्यावर कसा टिकून राहूं शकशील ? हे शत्रूंना जिंकणाऱ्यामध्यें श्रेष्ठ रावणा ! गुप्त हेर, खजिना आणि न्यायखातें हीं ज्या भूपतींच्या स्वाधीन नाहींत, ते राज्यसूत्रें चालविण्यास अयोग्य असलेल्या सामान्य प्रजाजनासारखेच होत राजे लोक हेररूपी चक्षूंच्य योगानें दूरदूरच्या सर्व गोष्टी पाहतात म्हणून त्याना दीर्घचक्षु म्हणतात. तुझ्या सैन्याचा नाश करून तुझें ठाणें शत्रूनें मारल्याची तुला वार्ताही नाहीं, यावरून तूं

चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ।
हतान्येकेन रामेण खरश्च सहदूषणः १२
ऋषीणामभयं दत्तं कृतक्षेमाश्च दण्डकाः ।
धर्षितं च जनस्थानं रामेणाक्लिष्टकारिणा १३
त्वं तु लुब्धः प्रमत्तश्च पराधीनश्च राक्षस ।
विषये स्वे समुत्पन्नं यद्भयं नावबुध्यसे १४
तीक्ष्णमल्पप्रदातारं प्रमत्तं गर्वितं शठम् ।
व्यसने सर्वभूतानि नाभिधावन्ति पार्थिवम् १५
अतिमानिनमग्राह्यमात्मसंभावितं नरम् ।
क्रोधनं व्यसने हन्ति स्वजनोऽपि नराधिपम् १६
नानुतिष्ठति कार्याणि भयेषु न बिभेति च ।
क्षिप्रं राज्याच्च्युतो दीनस्तृणैस्तुल्यो भवेदिह १७
शुष्ककाष्ठैर्भवेत्कार्यं लोष्ठैरपि च पांसुभिः ।

अविद्वान् व क्षुद्र अशा मंत्रि लोकांनीं वेढलेला आहेस व हेराच्या कामावर योग्य माणसें नेमिलीं नाहींस असें वाटतें. अरे! एकट्या रामचंद्रानें भयंकर कर्म करणारे चौदा हजार राक्षस आणि दूषणासह खर याचा वध करून व ऋषींना अभय देऊन दंडकारण्य सुखरूप करून टाकलें आणि अप्रतिहत पराक्रम करणाऱ्या रामानें जनस्थानाचा विध्वंस केला. परंतु हे राक्षसा! तूं तर अत्यन्त बेसावध व विवेकशून्य असून केवळ विषयोपभोगाच्या आधीन झालेला आहेस, ज्यामुळें आपल्या देशातच उत्पन्न झालेल्या भयाची तुला खबरही नाहीं. (८-१४)

"स्वभावानें क्रूर, योग्यतेपेक्षा अत्यन्त कमी मोबदला देणारा ( कृपण ), उन्मत्त, गर्विष्ठ व लबाड अशा राजाकडे संकटसमयीं साहाय्य करण्यास कोणीही धाऊन जात नाहींत. अत्यंत अभिमानी, स्वकीय जनानाही जवळ जाण्यास अशक्य असलेला, स्वतःलाच मोठा समजणारा आणि विनाकारण रागावणारा असा जो पुरुष असेल तो संकटांत सांपडला असतां त्याचे स्वत.चेच आप्त स्वकीय जनसुद्धां त्याचा वध करतात. जो राजा आपलीं कर्तव्यकर्मे करीत नाहीं आणि भयंकर प्रसंग उपस्थित झाले असतां त्यांचें भय बाळगीत नाहीं, तो सत्वरच राज्यापासून भ्रष्ट

न तु स्थानात्परिभ्रष्टैः कार्यं स्याद्वसुधाधिपैः १८
उपभुक्तं यथा वासः स्रजो वा मृदिता यथा।
एवं राज्यात्परिभ्रष्टः समर्थोऽपि निरर्थकः १९
अप्रमत्तश्च यो राजा सर्वज्ञो विजितेन्द्रियः।
कृतज्ञो धर्मशीलश्च स राजा तिष्ठते चिरम् २०
नयनाभ्यां प्रसुप्तो वा जागर्ति नयचक्षुषा।
व्यक्तक्रोधप्रसादश्च स राजा पूज्यते जनैः २१
त्वं तु रावण दुर्बुद्धिर्गुणैरेतैर्विवर्जितः।
यस्य तेऽविदितश्चारै रक्षसां सुमहान्वधः २२
परावमन्ता विषयेषु सङ्गवान्न देशकालप्रविभागतत्त्ववित्।
अयुक्तबुद्धिर्गुणदोषनिश्चये विपन्नराज्यो नचिराद्विपत्स्यसे २३

होऊन अगदीं दीन होऊन जातो व जगात तो तृणवत् तुच्छ लेखला जातो; कारण शुष्क काष्ठें, मातीचीं ढेकळें आणि धूळ याचाही उपयोग होत असतो, परंतु स्थानभ्रष्ट झालेल्या राजाचा काहींही उपयोग होत नाहीं, ज्याप्रमाणें वापरलेलें वस्त्र अथवा चुरगळून टाकलेल्या फुलाच्या माळा निरुपयोगी होतात, त्याचप्रमाणें राज्यापासून भ्रष्ट झालेला पुरुष समर्थ असूनही निरुपयोगी होतो. (१५-१९)

"स्वकार्यदक्ष, गुप्त हेराचे द्वारा राज्यातील सर्व बित्तंबातमी जाणणारा, जितेंद्रिय, कृतज्ञ आणि धर्मशील असा जो राजा असतो, तोच पुष्कळ दिवसपर्यंत राज्यावर टिकून राहतो. डोळे मिटून निजला तरी न्यायदृष्टि उघडी ठेऊन जो जागृत असतो आणि योग्य ठिकाणींच ज्याचा क्रोध व कृपा हीं व्यक्त होत असतात, त्याच राजाला लोक मान देत असतात परंतु हे राजा! राक्षसाचा अतिशय मोठा संहारही ज्या तुला हेराच्या द्वारानें समजला नाहीं, तो तूं या गुणांनीं रहित असून मदमती आहेस हें उघड होत आहे. दुसऱ्याचा अवमान करणारा, विषयाचे ठिकाणी आसक्त, कोणत्या ठिकाणीं व कोणत्या वेळीं काय करावें याचें तत्त्व न जाणणारा आणि चांगलें काय व वाईट काय, याचा निर्णय करण्याकडे लक्ष न देणारा तूं असल्यामुळें तूं राज्यापासून भ्रष्ट होऊन लवकरच

इति स्वदोषान्परिकीर्तितांस्तया समीक्ष्य बुद्ध्या क्षणदाचरेश्वरः।
धनेन दर्पेण बलेन चान्वितो विचिन्तयामास चिरं स रावणः २४
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥३३॥[१०७१]

चतुस्त्रिंशः सर्गः ।

ततः शूर्पणखां दृष्ट्वा ब्रुवतीं परुषं वचः ।
अमात्यमध्ये संक्रुद्धः परिपप्रच्छ रावणः　१
कश्च रामः कथंवीर्यः किंरूपः किंपराक्रमः ।
किमर्थं दण्डकारण्यं प्रविष्टश्च सुदुस्तरम्　२
आयुधं किं च रामस्य येन ते राक्षसा हताः ।
खरश्च निहतः संख्ये दूषणस्त्रिशिरास्तथा ।
तत्त्वं ब्रूहि मनोज्ञाङ्गि केन त्वं च विरूपिता　३
इत्युक्त्वा राक्षसेन्द्रेण राक्षसी क्रोधमूर्च्छिता ।
ततो रामं यथान्यायमाख्यातुमुपचक्रमे　४

नाश पावशील " याप्रमाणें तिनें उच्चारलेले आपले दोष बुद्धिपूर्वक लक्षात घेऊन धन, गर्व आणि बल यांनीं युक्त असलेला तो राक्षसाधिपति रावण पुष्कळ वेळपर्यंत विचार करूं लागला (२०–२४)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥३३॥

नंतर शूर्पणखा मर्मभेदक भाषण करीत आहे, असें आढळून आल्यावर अमात्यामध्यें असलेल्या रावणानें क्रुद्ध होऊन विचारलें, "राम कोण आहे ? त्याचें सामर्थ्य कसें आहे ? त्याचें स्वरूप कसें आहे ? त्याचा पराक्रम कसा आहे आणि अतिशय गहन अशा दण्डकारण्यात तो कशाकरिता आला आहे ? ज्याच्या योगानें संग्रामात खर, दूषण व त्रिशिरा यासह चौदा हजार राक्षस मारले, असें त्या रामाचें तें आयुध तरी कोणतें आहे ? हें मला सांग आणि हे सुंदरि ! तुला विरूप कोणी केलें हेंही सांग." याप्रमाणें राक्षसाधिपति रावणानें विचारलें असतां रागानें बेभान झालेली ती राक्षसी यथायोग्य रीतीनें रामाची माहिती सांगूं लागली. (१–४)

दीर्घबाहुर्विशालाक्षश्चीरकृष्णाजिनाम्बरः ।
कन्दर्पसमरूपश्च रामो दशरथात्मजः ५
शक्रचापनिभं चापं विकृष्य कनकाङ्गदम् ।
दीप्तान्क्षिपति नाराचान्सर्पानिव महाविषान् ६
नाददानं शरान्घोरान्विमुञ्चन्तं महाबलम् ।
न कार्मुकं विकर्षन्तं रामं पश्यामि संयुगे ७
हन्यमानं तु तत्सैन्यं पश्यामि शरवृष्टिभिः ।
इन्द्रेणेवोत्तमं सस्यमाहतं त्वश्मवृष्टिभिः ८
रक्षसां भीमवीर्याणां सहस्राणि चतुर्दश ।
निहतानि शरैस्तीक्ष्णैस्तेनैकेन पदातिना ९
अर्धाधिकमुहूर्तेन खरश्च सहदूषणः ।
ऋषीणामभयं दत्तं कृतक्षेमाश्च दण्डकाः १०
एका कथंचिन्मुक्ताऽहं परिभूय महात्मना ।
स्त्रीवधं शङ्कमानेन रामेण विदितात्मना ११

ती म्हणाली— "आजानुबाहु, विशालनयन, वल्कलें व कृष्णाजिन हीं वस्त्रें आणि मदनासारखें रूप यांनीं युक्त असलेला राम दशरथाचा पुत्र आहे. सुवर्णवलयांनीं भूषित असें इंद्रधनुष्यासारखें धनुष्य आकर्षण करून महाविषारी सर्पाप्रमाणें देदीप्यमान नाराच बाण तो सोडीत असतो. संग्रामांत महाबलाढ्य राम भयंकर बाण घेतो केव्हां, सोडतो केव्हां आणि धनुष्य ओढतो केव्हां, हें माझ्या तर पाहण्यांतच आलें नाहीं. इंद्रानें पाषाणवृष्टींच्या योगानें नाहींसा केलेल्या पिकाप्रमाणें बाणवृष्टींच्या योगानें सैन्याचा वध होत आहे, इतकें मात्र माझ्या दृष्टीस पडत होतें. स्वतः पदाती असूनदेखील त्या एकट्या रामानें, तीक्ष्ण बाणांच्या योगानें भयंकर सामर्थ्यवान् अशा चौदा हजार राक्षसांचा वध केला. दूषणासह खराचाही वध केला आणि इतकें करून दीड मुहूर्तामध्यें आटोपून त्यानें ऋषींना अभय दिलें व दण्डकारण्य अगदीं निर्भय केलें. स्त्रीवधाची भीति बाळगणाऱ्या त्या महात्म्या रामाच्या हातून मी नुसती कर्ण नासिका-छेदनाचा अपमान पावूनच एकटी कशी तरी सुटलें. (५–११)

भ्राता चास्य महातेजा गुणतस्तुल्यविक्रमः ।
अनुरक्तश्च भक्तश्च लक्ष्मणो नाम वीर्यवान् १२
अमर्षी दुर्जयो जेता विक्रान्तो बुद्धिमान्बली ।
रामस्य दक्षिणो बाहुर्नित्यं प्राणो बहिश्चरः १३
रामस्य तु विशालाक्षी पूर्णेन्दुसदृशानना ।
धर्मपत्नी प्रिया नित्यं भर्तुः प्रियहिते रता १४
सा सुकेशी सुनासोरुः सुरूपा च यशस्विनी ।
देवतेव वनस्यास्य राजते श्रीरिवापरा १५
तप्तकाञ्चनवर्णाभा रक्ततुङ्गनखी शुभा ।
सीता नाम वरारोहा वैदेही तनुमध्यमा १६
नैव देवी न गन्धर्वी न यक्षी न च किंनरी ।
तथारूपा मया नारी दृष्टपूर्वा महीतले १७
यस्य सीता भवेद्भार्या यं च हृष्टा परिष्वजेत् ।
अभिजीवेत्स सर्वेषु लोकेष्वपि पुरंदरात् १८

"त्याचा लक्ष्मण म्हणून एक वीर्यवान् भ्राता आहे तो गुणानीं रामासारखा असून त्याचे ठिकाणीं अनुरक्त, त्याचा भक्त आणि महातेजस्वी आहे. तो तापट, जिंकण्यास अशक्य, शत्रूंना जिंकणारा, पराक्रमी, बुद्धिमान् व बलाढ्य रामाचा उजवा हात आहे आणि देहाबाहेर संचार करणारा रामाचा प्राणच कीं काय, असा आहे. विशालनयन आणि पूर्णचंद्रासारखें आल्हादकारक मुख यांनीं युक्त असलेली रामाची प्रिय धर्मपत्नी आपल्या भर्त्याचें प्रिय आणि हित करण्याविषयीं नेहमीं तत्पर असते आणि उत्कृष्ट केश, सुंदर नासिका व मांड्या आणि मनोहर रूप यांनीं युक्त असलेली आणि दुसरी लक्ष्मीच कीं काय अशी भासणारी ती यशस्विनी या दंडकारण्याच्या देवतेप्रमाणें शोभत आहे. विदेहराजकन्या जी सुलक्षणी सीता तिचा वर्ण तप्त सुवर्णाप्रमाणें आहे, नखें आरक्त वर्ण असून उन्नत आहेत, कटिप्रदेश उत्कृष्ट आहे आणि उदर कृश आहे. देव, गंधर्व, यक्ष आणि किंनर या जातींतही तशी रूपवती स्त्री आजपर्यंत भूतलावर माझ्या पाहण्यांत आली नाहीं. सीता ज्याची भार्या होईल आणि ज्याला ती आनंदानें

सा सुशीला वपुःश्लाघ्या रूपेणाप्रतिमा भुवि।
तवानुरूपा भार्या सा त्वं च तस्याः पतिर्वरः १९
तां तु विस्तीर्णजघनां पीनोत्तुङ्गपयोधराम्।
भार्यार्थे तु तवानेतुमुद्यताऽहं वराननाम् २०
विरूपिताऽस्मि क्रूरेण लक्ष्मणेन महाभुज २१
तां तु दृष्ट्वाऽद्य वैदेहीं पूर्णचन्द्रनिभाननाम्।
मन्मथस्य शराणां च त्वं विधेयो भविष्यसि २२
यदि तस्यामभिप्रायो भार्यात्वे तव जायते।
शीघ्रमुद्ध्रियतां पादो जयार्थमिह दक्षिणः २३
रोचते यदि ते वाक्यं ममैतद्राक्षसेश्वर।
क्रियतां निर्विशङ्केन वचनं मम रावण २४
विज्ञायैषामशक्तिं च क्रियतां च महाबल।
सीता तवानवद्याङ्गी भार्यात्वे राक्षसेश्वर २५

आलिंगन देईल, तो कोणत्याही काळीं आणि कोणत्याही लोकात इंद्रापेक्षाही अधिक सुखानें राहील. सुशील, शरिराच्या बांध्यामुळें लोकप्रशंसेस पात्र आणि रूपानें तर पृथ्वीमध्येंही अनुपम अशी ती सीता तुला भार्या योग्य असून तूंही तिला पति उत्कृष्ट आहेस (१२-१९)

"विशाल कटिप्रदेश, पुष्ट व उन्नत स्तन आणि उत्कृष्ट मुख यानीं युक्त असलेली ती स्त्री तुझी भार्या व्हावी, एतदर्थ मी तिला आणण्यास उद्युक्त झालें असताना हे महापराक्रमी रावणा! क्रूर लक्ष्मणानें मला विरूप करून टाकलें. पूर्णचंद्राप्रमाणें जिचें मुख आल्हादकारक आहे, अशा त्या वैदेहीला अवलोकन करितांच तूं मदनबाणाच्या आधीन होऊन राहशील. तेव्हा ती बायको आपणाला असावी अशी इच्छा जर तुझ्या मनांत उत्पन्न होत असेल, तर या कामांत *जय येण्याकरिता तूं आपला उजवा पाय सत्वर उचल.* हे राक्षसाधिपते रावणा! हें माझें सांगणें तुला रुचत असेल तर तूं त्या माझ्या सांगण्याप्रमाणें निःशंकपणानें वाग. साराश हे महाबलाढ्य राक्षसाधिपा! राज्य वगैरे कांहींएक नसल्यामुळें त्या रामादिकाची सामर्थ्यहीनता लक्षात घेऊन मनोहर अवयवानीं युक्त

निशम्य रामेण शरैरजिह्मगैर्हताञ्जनस्थानगतान्निशाचरान् ।
खरं च दृष्ट्वा निहतं च दूषणं त्वमद्य कृत्यं प्रतिपत्तुमर्हसि २६

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥३४॥[१०९७]

पञ्चत्रिंशः सर्गः ।

ततः शूर्पणखावाक्यं तच्छ्रुत्वा रोमहर्षणम् ।
सचिवानभ्यनुज्ञाय कार्यं बुद्ध्वा जगाम ह　१
तत्कार्यमनुगम्यान्तर्यथावदुपलभ्य च ।
दोषाणां च गुणानां च संप्रधार्य बलाबलम्　२
इतिकर्तव्यमित्येव कृत्वा निश्चयमात्मनः ।
स्थिरबुद्धिस्ततो रम्यां यानशालां जगाम ह　३
यानशालां ततो गत्वा प्रच्छन्नं राक्षसाधिपः
सूतं संचोदयामास रथः संयुज्यतामिति　४
एवमुक्तः क्षणेनैव सारथिर्लघुविक्रमः ।
रथं संयोजयामास तस्याभिमतमुत्तमम्　५

---

असलेली सीता भार्या या नात्यानें तुला मिळेल, अशी तू तजवीज कर तात्पर्य सरळ जाणाऱ्या बाणाच्या योगानें जनस्थानातील राक्षसांचा रामानें वध केल्याचें ऐकून आणि खर दूषणाचा त्यानें वध केल्याचें लक्षात घेऊन या प्रसंगाला उचित असें कृत्य निश्चयपूर्वक विचार करून तू आज कर " (२०-२६)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं चौतीसावा सर्ग समाप्त झाला ॥३४॥

नंतर रोमाच उठविणारें तें शूर्पणखेचें भाषण ऐकल्यावर त्यानें त्या कार्याविषयीं सचिवाचें अनुमोदन घेतलें आणि तें कार्य करण्याचा निश्चय करून तो मारीचाच्या आश्रमाकडे जावयास निघाला प्रथमत तें कृत्य मनात आणून, पूर्णपणें त्याचा विचार करून गुणदोषाच्या बलाबलाचा निश्चय करून आणि अशीच गोष्ट करावयाची, असा आपला विचार ठरवून बुद्धीचा पक्का निश्चय झाल्यावर तो आपल्या रमणीय रथखान्यात गेला आणि अगदीं गुप्तपणें त्या राक्षसाधिपति रावणानें " रथ जोड " म्हणून सारथ्याला आज्ञा केली याप्रमाणें

कामगं रथमास्थाय काञ्चनं रत्नभूषितम् ।
पिशाचवदनैर्युक्तं खरैः कनकभूषणैः ६
मेघप्रतिमनादेन स तेन धनदानुजः ।
राक्षसाधिपतिः श्रीमान्ययौ नदनदीपतिम् ७
स श्वेतवालव्यजनः श्वेतच्छत्रो दशाननः ।
स्निग्धवैदूर्यसंकाशस्तप्तकाञ्चनभूषणः ८
दशग्रीवो विंशतिभुजो दर्शनीयपरिच्छदः ।
त्रिदशारिर्मुनीन्द्रघ्नो दशशीर्ष इवाद्रिराट् ९
कामगं रथमास्थाय शुशुभे राक्षसाधिपः ।
विद्युन्मण्डलवान्मेघः सबलाक इवाम्बरे १०
सशैलसागरानूपं वीर्यवानवलोकयन् ।
नानापुष्पफलैर्वृक्षैरनुकीर्णं सहस्रशः ११
शीतमङ्गलतोयाभिः पद्मिनीभिः समन्ततः ।

रावणाची आज्ञा झाल्यावर त्या चलाख सारथ्यानें एका क्षणात त्या रावणाला संमत असा उत्कृष्ट रथ जोडून तयार केला. तेव्हां सुवर्णाचे अलंकार घातलेले आणि पिशाचासारख्या मुखानीं युक्त असलेले गर्दभ जोडलेल्या सुवर्णमय, रत्नभूषित व स्वेच्छाचारी रथात चढून तो कुबेराचा कनिष्ठ भ्राता वैभवशाली राक्षसाधिपति रावण त्या मेघतुल्य गंभीर नादानें युक्त असलेल्या रथाच्या योगानें समुद्र तरून गेला. (१–७)

श्वेतवर्ण केशाचे चामर, श्वेतवर्ण छत्र, पाणीदार, वैदूर्य मण्यासारखी कांति, उत्कृष्ट सुवर्ण भूषणें, दहा मुखें, दहा कंठ, वीस हात व मनोहर सामानसुमान यानीं युक्त, देवशत्रु, मुनिश्रेष्ठाचा वध करणारा आणि दहा मस्तकानीं युक्त असलेला हिमालयपर्वतच की काय असा दिसणारा तो राक्षसाधिपति रावण यथेष्ट गमन करणाऱ्या रथावर आरूढ झाला असता बगळ्याचे समुदाय आणि विद्युन्मण्डल ह्यानीं युक्त असलेल्या आकाशातील मेघाप्रमाणें शोभूं लागला. तो वीर्यवान् रावण पर्वतासह समुद्रतीर पाहत पाहत चालला. तें तीर नानाप्रकारच्या पुष्पयुक्त व फलयुक्त हजारों वृक्षानीं गजबजलेलें होतें. शीत

विशालैराश्रमपदैर्वेदिमद्भिरलंकृतम् १२
कदल्यटविसंशोभं नारिकेलोपशोभितम् ।
सालैस्तालैस्तमालैश्च तरुभिश्च सुपुष्पितैः १३
अत्यन्तनियताहारैः शोभितं परमर्षिभिः ।
नागैः सुपर्णैर्गन्धर्वैः किन्नरैश्च सहस्रशः १४
जितकामैश्च सिद्धैश्च चारणैश्चोपशोभितम् ।
आजैर्वैखानसैर्माषैर्वालखिल्यैर्मरीचिपैः १५
दिव्याभरणमाल्याभिर्दिव्यरूपाभिरावृतम् ।
क्रीडारतविधिज्ञाभिरप्सरोभिः सहस्रशः १६
सेवितं देवपत्नीभिः श्रीमतीभिरुपासितम् ।
देवदानवसङ्घैश्च चरितं त्वमृताशिभिः १७
हंसक्रौञ्चप्लवाकीर्णं सारसैः संप्रसादितम् ।
वैदूर्यप्रस्तरं स्निग्धं सान्द्रं सागरतेजसा १८

आणि मंगलकारक उदक ज्यात आहे, अशीं सरोवरें आणि स्थण्डिलें ज्यात आहेत असे विशाल आश्रम यांच्या योगानें तें तीर सभोंवतीं भूषित झालेलें होतें, केळींच्या वनानीं त्याला शोभा आलेली होती; नारळींनीं तें सुशोभित झालें होतें; साल, ताल, तमाल इत्यादि प्रफुल्लित वृक्षांनीं तें सुंदर दिसत होतें अत्यंत नियमित आहार करणाऱ्या महर्षींनीं तें शोभविलेलें होतें, हजारों नाग, सुपर्ण, गंधर्व, किन्नर आणि जितेंद्रिय सिद्ध, चारण, ब्रह्मपुत्र, वैखानस, वालखिल्य, मरीचिप आणि माष नावाचे महर्षि यांनीं तें सुशोभित झालेलें होतें (८-१५)

क्रीडा आणि रतिधर्म याचे प्रकार ज्याना माहीत आहेत अशा दिव्य भूषणें धारण केलेल्या आणि दिव्य रूपानीं युक्त असलेल्या हजारों अप्सरानीं तें तीर व्याप्त झालेलें होतें वैभवसंपन्न स्त्रियानीं त्याचा आश्रय केलेला होता, देवा-गनांनींही त्याचें अवलंबन केलेलें होतें आणि अमृत भक्षण करणारे देवदैत्याचे समुदाय तेथें संचार करीत होते हंस, क्रौंच आणि बेडूक यानीं तें गजबजलेलें होतें, सारसपक्ष्यांनीं तें निर्मल केलेलें होतें, वैदूर्य मण्यासारख्या वाळमर गवतानें तें आच्छादित झालेलें होतें आणि समुद्राच्या तेजानें तें स्निग्ध व शीतल दिसत

पाण्डुराणि विशालानि दिव्यमाल्ययुतानि च ।
तूर्यगीताभिजुष्टानि विमानानि समन्ततः १९
तपसा जितलोकानां कामगान्यभिसंपतन् ।
गन्धर्वाप्सरसश्चैव ददर्श धनुदानुजः २०
निर्यासरससमूलानां चन्दनानां सहस्रशः ।
वनानि पश्यन्सौम्यानि घ्राणतृप्तिकराणि च २१
अगुरूणां च मुख्यानां वनान्युपवनानि च ।
तक्कोलानां च जात्यानां फलानां च सुगन्धिनाम् २२
पुष्पाणि च तमालस्य गुल्मानि मरिचस्य च ।
मुक्तानां च समूहानि शुष्यमाणानि तीरतः २३
शैलानि प्रवरांश्चैव प्रवालनिचयांस्तथा ।
काञ्चनानि च शृङ्गाणि राजतानि तथैव च २४
प्रस्रवाणि मनोज्ञानि प्रसन्नान्यद्भुतानि च ।
धनधान्योपपन्नानि स्त्रीरत्नैरावृतानि च २५
हस्त्यश्वरथगाढानि नगराणि विलोकयन् ।
तं समं सर्वतः स्निग्धं मृदुसंस्पर्शमारुतम् २६

होतें असो श्वेतवर्ण, विशाल, दिव्य पुष्पानीं युक्त वाद्यें आणि गायन यानीं संपन्न व यथेष्ट गमन करणारीं अशीं तपश्चर्येनें उत्तम लोक संपादन केलेल्या पुरुषाचीं चोहोंकडे असलेलीं विमानें व गंधर्व आणि अप्सरा याना जाता जाता त्या रावणानें पाहिलें (१६-२०)

डिंक हा रस ज्याच्या मुळाशीं आहे, अशीं हजारों चंदन वृक्षाचीं सौम्य व घ्राणेंद्रियें तृप्त करणारीं वनें अवलोकन करीत करीत तो रावण चालला त्याच-प्रमाणें श्रेष्ठ अगुरूचीं वनें, उत्कृष्ट तक्कोल वृक्षाचीं उपवनें, सुगंधि फलाचीं अरण्यें, तमाल पुष्पें, मिऱ्याचीं झुडुपें, तीरावर सुकत पडलेल्या मोत्याच्या राशी, पाषाणाचे ढीग, उत्कृष्ट पोवळ्याच्या राशी, रौप्यवर्ण व सुवर्णवर्ण शिखरें, निर्मल जलानें युक्त, आश्चर्यकारक आणि मनोहर असे प्रवाह व धनधान्यानीं समृद्ध, स्त्रीरत्नानीं व्याप्त आणि हत्ती, अश्व व रथ यांनीं गजबजलेली नगरें अवलोकन

अनूपे सिन्धुराजस्य ददर्श त्रिदिवोपमम् ।
तत्रापश्यत्स मेघाभं न्यग्रोधं मुनिभिर्वृतम् २७
समन्तायस्य ताः शाखाः शतयोजनमायताः ।
यस्य हस्तिनमादाय महाकायं च कच्छपम् १८
भक्षार्थं गरुडः शाखामाजगाम महाबलः ।
तस्य तां सहसा शाखां भारेण पतगोत्तमः २९
सुपर्णः पर्णबहुलां बभञ्जाथ महाबलः ।
तत्र वैखानसा माषा वालखिल्या मरीचिपाः ३०
आजा बभूवुर्धूम्राश्च संगताः परमर्षयः ।
तेषां दयार्थं गरुडस्तां शाखां शतयोजनाम् ३१
भग्नामादाय वेगेन तौ चोभौ गजकच्छपौ ।
एकपादेन धर्मात्मा भक्षयित्वा तदामिषम् ३२
निषादविषयं हत्वा शाखया पतगोत्तमः ।

करीत जाता-जातां समुद्राचें तीरीं ज्याचा स्पर्श मृदु आहे, अशा वायूनें युक्त व सर्व बाजूंनीं स्निग्ध असा तो स्वर्गतुल्य सपाट प्रदेश रावणानें पाहिला व त्या प्रदेशावर मुनींनीं व्याप्त झालेला मेघतुल्य वटवृक्ष त्या रावणानें अवलोकन केला. (२१–२७)

त्या वृक्षाच्या त्या शाखा सभोंवतीं शंभर शंभर योजनें दूर दूर गेलेल्या होत्या. प्रचंड शरीरानें युक्त असलेला हत्ती व कासव भक्षणाकरितां घेऊन महाबलाढ्य गरुड त्याच वृक्षाच्या एका शाखेवर येऊन बसला असतां त्याची ती विपुल पानांनीं युक्त असलेली शाखा पक्षिश्रेष्ठ महाबलाढ्य गरुडानें आपल्या भाराच्या योगानें मोडून टाकली. त्या वेळीं त्या मोडलेल्या शाखेच्या खालीं वैखानस, माष, वालखिल्य, मरीचिप, अज आणि धूम्र हे महर्षि एकत्र जमून बसलेले होते. तेव्हां त्याची दया आल्यामुळें शंभर योजनें लांब असलेली ती मोडकी फांदी आणि ते उभयतां गज व कूर्म यांना घेऊन तो गरुड वेगानें तेथून निघाला व मध्यंतरीं ती फांदी व ते गज-कूर्म एका पायानें धरून व आकाशांतून जातां जातां तें आमिष ( हत्ती व कासव ) खाऊन आणि त्या शाखेनें निषाद

प्रहर्षमतुलं लेभे मोक्षयित्वा महामुनीन् ३३
स तु तेन प्रहर्षेण द्विगुणीकृतविक्रमः ।
अमृतानयनार्थं वै चकार मतिमान्मतिम् ३४
अयोजालानि निर्मथ्य भित्त्वा रत्नगृहं वरम् ।
महेन्द्रभवनाद्गुप्तमाजहारामृतं ततः ३५
तं महर्षिगणैर्जुष्टं सुपर्णकृतलक्षणम् ।
नाम्ना सुभद्रं न्यग्रोधं ददर्श धनदानुजः ३६
तं तु गत्वा परं पारं समुद्रस्य नदीपतेः ।
ददर्शाश्रममेकान्ते पुण्ये रम्ये वनान्तरे ३७
तत्र कृष्णाजिनधरं जटामण्डलधारिणम् ।
ददर्श नियताहारं मारीचं नाम राक्षसम् ३८
स रावणः समागम्य विधिवत्तेन रक्षसा ।
मारीचेनार्चितो राजा सर्वकामैरमानुषैः ३९
तं स्वयं पूजयित्वा च भोजनेनोदकेन च ।

---

देशाचा नाश करून व त्या महर्षींना मृत्यूपासून वाचविल्याचा त्या श्रेष्ठ पक्ष्याला अतुल हर्ष झाला, तेव्हा त्या हर्षामुळें ज्याच्या गतीचा जोर दुप्पट झालेला आहे, *अशा त्या बुद्धिमान् गरुडानें अमृत आणण्याचा विचार केला आणि* पक्ष्याचा प्रवेश होऊं नये म्हणून घरावरून पक्की बसविलेली लोखंडाची जाळी तोडून आणि तें श्रेष्ठ रत्नमय गृह फोडून त्या इंद्राच्या गृहात रक्षण करून ठेविलेलें अमृत त्यानें हरण केलें (२८-३५)

असो गरुडानें शाखा मोडून ज्याला खूण केलेली आहे आणि महर्षि-समुदायानीं जो सेवित आहे, असा तो सुभद्र नावाचा वटवृक्ष रावणानें पाहिला. नंतर नदीपति समुद्राच्या पलीकडल्या तीराला गेल्यावर एकान्त, रम्य व पवित्र अशा वनामध्यें एक आश्रम त्यानें पाहिला व त्या आश्रमात कृष्णाजिनें आणि जटामंडल धारण करून शुद्ध आहार करणाऱ्या मारीच राक्षसाची त्यानें भेट घेतली. तेव्हा रावण तेथें आल्यावर त्या मारीच राक्षसानें अमानुष अशा सर्व भोग्य वस्तूंनीं पुनरपि त्या राजाचा यथाविधि सत्कार केला आणि भोजन व

अर्थोपहितया वाचा मारीचो वाक्यमब्रवीत् ४०
कच्चित्ते कुशलं राजँल्लङ्कायां राक्षसेश्वर ।
केनार्थेन पुनस्त्वं वै तूर्णमेव इहागतः ४१
एवमुक्तो महातेजा मारीचेन स रावणः ।
ततः पश्चादिदं वाक्यमब्रवीद्वाक्यकोविदः ४२

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः॥३५॥[११३९]

षट्त्रिंशः सर्गः ।

मारीच श्रूयतां तात वचनं मम भाषतः ।
आर्तोऽस्मि मम चार्तस्य भवान्हि परमा गतिः १
जानीषे त्वं जनस्थाने भ्राता यत्र खरो मम ।
दूषणश्च महाबाहुः स्वसा शूर्पणखा च मे २
त्रिशिराश्च महाबाहू राक्षसः पिशिताशनः ।
अन्ये च बहवः शूरा लब्धलक्षा निशाचराः ३
वसन्ति मन्नियोगेन अधिवासं च राक्षसाः ।
बाधमाना महारण्ये मुनीन्ये धर्मचारिणः ४

उदक यांच्या योगानें त्याचा स्वतः सत्कार केल्यावर अर्थपूर्ण वाणीनें मारीच राक्षसानें त्याला विचारलें. " हे राक्षसाधिपते राजा ! तुझ्या लंकेंत सर्व क्षेम आहे ना ? तूं येथें कोणत्या उद्देशानें पुनरपि इतका लवकर आला आहेस ? " याप्रमाणें मारीचानें विचारल्यावर संभाषण करण्यांत कुशल असलेला तो महा-तेजस्वी रावण त्याला असें म्हणाला. (३६-४२)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यातील अरण्य-काण्डापैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

रावण म्हणाला–"बा मारीचा ! मी सागतों तें तूं माझें बोलणें ऐकून घे. मी दुःखित झालों आहें आणि अशा दुःखित स्थितींत तूंच माझा मुख्य आधार आहेस. जनस्थान तुला माहीतच आहे. त्या ठिकाणीं माझा भ्राता खर व महा-पराक्रमी दूषण, माझी भगिनी शूर्पणखा, महापराक्रमी मांसभक्षक त्रिशिराराक्षस आणि इतरही युद्धाचा उत्साह असलेले पुष्कळ शूर निशाचर राक्षस माझ्या

चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ।
शूराणां लब्धलक्षाणां खरचित्तानुवर्तिनाम् ५
ते त्विदानीं जनस्थाने वसमाना महाबलाः ।
संगताः परमायत्ता रामेण सह संयुगे ६
नानाशस्त्रप्रहरणाः खरप्रमुखराक्षसाः ।
तेन संजातरोषेण रामेण रणमूर्धनि ७
अनुक्त्वा परुषं किंचिच्छरैर्व्यापारितं धनुः ।
चतुर्दशसहस्राणि रक्षसामुग्रतेजसाम् ८
निहतानि शरैर्दीप्तैर्मानुषेण पदातिना ।
खरश्च निहतः संख्ये दूषणश्च निपातितः ९
हत्वा त्रिशिरसं चापि निर्भया दण्डकाः कृताः ।
पित्रा निरस्तः क्रुद्धेन सभार्यः क्षीणजीवितः १०
स हन्ता तस्य सैन्यस्य रामः क्षत्रियपांसनः ।
अशीलः कर्कशस्तीक्ष्णो मूर्खो लुब्धोऽजितेन्द्रियः ११

---

आज्ञेनें महारण्यात धर्मनिष्ठ मुनींना पीडा करण्याकरितां वास्तव्य करीत आहेत. युद्धाचा उत्साह असलेले आणि खराच्या इच्छेला अनुसरून वागणारे असे जे भयंकर पराक्रमी व युद्धासाठीं नेहमीं तयार असलेलें महाबलाढ्य चौदा हजार राक्षस जनस्थानात रहात होते, ते एकत्र जमून रामाशीं युद्ध करण्यास त्यावर चालून गेले. त्या खरप्रमुख राक्षसांपाशीं नानाप्रकारचीं शस्त्रें व आयुधेंही होतीं; परंतु कांहीं एक मर्मभेदक भाषण न उच्चारतां क्रुद्ध झालेल्या त्या रामानें संग्रामात धनुष्याच्या योगानें बाणाची वृष्टि केली आणि ते भयंकर तेजस्वी चौदा हजार राक्षस त्या पदाति मानवानें पेटलेल्या जळजळीत बाणाच्या योगानें मारले. (१–९)

" त्याचप्रमाणें संग्रामात त्यानें खराचा वध केला, दूषणाचा निःपात केला, आणि त्रिशिरा राक्षसालाही मारून दंडकारण्य निर्भय केलें. आयुष्याचा क्षय झालेल्या त्या रामाला क्रुद्ध झालेल्या त्याच्या पित्यानें बायकोसह नगरांतून हाकून दिलें आहे व त्या सैन्याचा वध करणारा तो राम क्षत्रियांना कलंक लावणारा,

त्यक्तधर्मा त्वधर्मात्मा भूतानामहिते रतः ।
येन वैरं विनारण्ये सत्त्वमास्थाय केवलम् ॥ १२
कर्णनासापहारेण भगिनी मे विरूपिता ।
अस्य भार्यां जनस्थानात्सीतां सुरसुतोपमाम् ॥ १३ ॥
आनयिष्यामि विक्रम्य सहायस्तत्र मे भव ।
त्वया ह्यहं सहायेन पार्श्वस्थेन महाबल ॥ १४
भ्रातृभिश्च सुरान्सर्वान्नाहमत्राभिचिन्तये ।
तत्सहायो भव त्वं मे समर्थो ह्यसि राक्षस ॥ १५.
वीर्ये युद्धे च दर्पे च न ह्यस्ति सदृशस्तव ।
उपायतो महाञ्शूरो महामायाविशारदः ॥ १६
एतदर्थमहं प्राप्तस्त्वत्समीपं निशाचर ।
शृणु तत्कर्म साहाय्ये यत्कार्यं वचनान्मम ॥ १७
सौवर्णस्त्वं मृगो भूत्वा चित्रो रजतबिन्दुभिः ।
आश्रमे तस्य रामस्य सीतायाः प्रमुखे चर ॥ १८

दुःशील, कर्कश, तीक्ष्ण, मूर्ख, लुब्ध, अजितेंद्रिय, धर्माचा त्याग केलेला व अधर्मनिष्ठ असून प्राण्यांच्या अहिताविषयीं जो तत्पर आहे व त्यानेंच अरण्यांत वैरावांचून केवळ शक्तीच्या जोरावर कर्ण व नासिका कापून माझी भगिनी विरूप केली आहे. तेव्हां देवकन्येसमान असलेल्या त्याच्या सीता नांवाच्या भार्येला जनस्थानांतून मी पराक्रमानें घेऊन येणार आहें. त्याविषयीं तुझें मला साहाय्य हवें हे महाबलाढ्य मारीचा ! तूं एक साहाय्य करणारा माझ्या जवळ असलास म्हणजे कुंभकर्णप्रभृति भ्रात्यांसह मी देवांचीही या दुर्नियेंत पर्वा करीत नाहीं. यास्तव हे राक्षसा ! तूं मला साहाय्य दे. तूं समर्थ आहेस (९-१५)

सामर्थ्यांत, युद्धकौशल्यांत, अनेक उपाय-योजना करण्यांत कुशल व स्वाभिमानी असा तुझ्यासारखा कोणी नाहीं. तूं मोठा शूर असून महामायावी आहेस; हे राक्षसा ! याकरितां मी तुझ्या समीप आलों आहें. आतां साहाय्या-संबंधानें माझ्या सांगण्यावरून तूं काय कर्म करावयाचें तें ऐक. रौप्यबिंदूंनीं युक्त

त्वां तु निःसंशयं सीता दृष्ट्वा तु मृगरूपिणम् ।
गृह्यतामिति भर्तारं लक्ष्मणं चाभिधास्यति १९
ततस्तयोरपाये तु शून्ये सीतां यथासुखम् ।
निराबाधो हरिष्यामि राहुश्चन्द्रप्रभामिव २०
ततः पश्चात्सुखं रामे भार्याहरणकर्शिते ।
विस्रब्धं प्रहरिष्यामि कृतार्थेनान्तरात्मना २१
तस्य रामकथां श्रुत्वा मारीचस्य महात्मनः ।
शुष्कं समभवद्वक्त्रं परित्रस्तो बभूव च २२
ओष्ठौ परिलिहञ्शुष्कौ नेत्रैरनिमिषैरिव ।
मृतभूत इवार्तस्तु रावणं समुदैक्षत २३
स रावणं त्रस्तविषण्णचेता महावने रामपराक्रमज्ञः ।
कृताञ्जलिस्तत्त्वमुवाच वाक्यं हितं च तस्मै हितमात्मनश्च २४
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥३६॥[११६३]

असा तूं एक सोन्याचा अद्भुत मृग हो आणि त्या रामाच्या आश्रमात सीतेच्या दृष्टीसमोर तूं हिंडूं फिरूं लाग. म्हणजे मृगरूपी तुला पाहतात सीता, "हा मृग धरा" म्हणून भर्त्याला आणि लक्ष्मणाला निःसंशय सांगेल व असें तिनें सांगितल्यानंतर ते दुघ्या मागोमाग निघून गेले म्हणजे शून्य झालेल्या त्या आश्रमात जाऊन चंद्रप्रभा हरण करणाऱ्या राहूप्रमाणें काहीं एक अडथळा न येता सीतेला मी सुखानें हरण करून नेईन. नंतर भार्येचा अपहार झाल्यामुळें राम कृश झाला, असतां मी अंतःकरणात कृतकृत्य होऊन अनायासानें गुप्तपणें रामावर प्रहार करीन.' (१६-२१)

याप्रमाणें रामाशीं प्रसंग येणार असल्याचें श्रवण करून त्या महात्म्या मारीच राक्षसाचें तोंड सुकून गेलें व तो भयभीत झाला. भयानें व्याकुल होऊन मृतप्राय झालेला तो मारीच राक्षस डोळ्याच्या पापण्या न हालविता शुष्क ओंठ चाटीत चाटीत रावणाकडे पाहूं लागला व रामाच्या पराक्रमाची आधींपासूनच पूर्णपणें जाणीव असल्यामुळें ज्याचें मन त्रस्त व खिन्न झालें आहे, असा तो मारीच राक्षस त्याला व आपणाला हितकारक असें खरें खरें भाषण, हात

सप्तत्रिंश. सर्ग ।

तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रस्य वाक्यं वाक्यविशारदः ।
प्रत्युवाच महातेजा मारीचो राक्षसेश्वरम् १
सुलभाः पुरुषा राजन्सततं प्रियवादिनः ।
अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः २
न नूनं बुध्यसे रामं महावीर्यगुणोन्नतम् ।
अयुक्तचारश्चपलो महेन्द्रवरुणोपमम् ३
अपि स्वस्ति भवेत्तात सर्वेषामपि रक्षसाम् ।
अपि रामो न संक्रुद्धः कुर्याल्लोकानराक्षसान् ४
अपि ते जीवितान्ताय नोत्पन्ना जनकात्मजा ।
अपि सीता निमित्तं च न भवेद्व्यसनं महत् ५
अपि त्वामीश्वरं प्राप्य कामवृत्तं निरङ्कुशम् ।
न विनश्येत्पुरी लङ्का त्वया सह सराक्षसा ६

जोडून, त्या महावनात रावणाशी कद लागला (२२–२४.)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डांपैकी छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

राक्षसाधिपति रावणाचें तें भाषण ऐकून महायशस्वी व सभाषणकुशल मारीच त्या राक्षसराजाला म्हणाला–" हे राजा! नेहमीं प्रिय भाषण करणारे पुरुष पाहिजे तितके मिळणारे आहेत, परंतु अप्रिय जरीं असलें तरी हितकारक भाषण करणारा वक्ता आणि तें ऐकून घेऊन ग्रहण करणारा श्रोता हे दुर्लभ आहेत तू हेराचे कामावर योग्य माणसाची योजना केलेली नाहींस आणि स्वत अविचारी आहेस, यामुळे मोठें वीर्य आणि मोठे गुण यांनीं योग्यतेला चढलेल्या व इंद्रवरुणाची बरोबरी करणाऱ्या रामासंबधानें तुला खरी माहिती मिळाली नाहीं रावणा! तुझी ही दुर्बुद्धि पालटून सर्व राक्षसाचें कल्याण होईल काय? आणि राम क्रुद्ध होऊन तीनही लोक राक्षसशून्य करणार नाहीं ना? अरे, तुझ्या जीविताच्या अंताकरिता तर जनककन्या उत्पन्न झाली नाहीं ना? आणि सीतेमुळें आपणावर मोठें सकट तर गुदरणार नाहीं ना! स्वेच्छाचारी आणि निरंकुश

त्वद्विधः कामवृत्तो हि दुःशीलः पापमन्त्रितः ।
आत्मानं स्वजनं राष्ट्रं स राजा हन्ति दुर्मतिः ७
न च पित्रा परित्यक्तो नामर्यादः कथंचन ।
न लुब्धो न च दुःशीलो न च क्षत्रियपांसनः ८
न च धर्मगुणैर्हीनः कौसल्यानन्दवर्धनः ।
न च तीक्ष्णो हि भूतानां सर्वभूतहिते रतः ९
वञ्चितं पितरं दृष्ट्वा कैकेय्या सत्यवादिनम् ।
करिष्यामीति धर्मात्मा ततः प्रव्राजितो वनम् १०
कैकेय्याः प्रियकामार्थं पितुर्दशरथस्य च ।
हित्वा राज्यं च भोगांश्च प्रविष्टो दण्डकावनम् ११
न रामः कर्कशस्तात नाविद्वान्नाजितेन्द्रियः ।
अनृतं न श्रुतं चैव नैवं त्वं वक्तुमर्हसि १२

असा तुझ्यासारखा अधिपति प्राप्त झाल्यामुळें तुझ्याबरोबरच सर्व राक्षसांसह ही लंका-नगरी नाहींशी तर होणार नाहीं ना ! (१–६)

"तुझ्यासारखा स्वेच्छाचारी, दुःशील आणि दुष्ट मंत्र्यांचा सल्ला मिळालेला जो दुष्टबुद्धि राजा असतो, तो स्वतःचा, स्वजनांचा आणि राष्ट्राचाही घात करतो. रामाचा पित्यानें त्याग केलेला नाहीं, तो मर्यादा सोडून कदापि वागणार नाहीं, तो लुब्ध नाहीं, त्याचें शील वाईट नाहीं, तो क्षत्रियाना कलंक लावणारा नाहीं आणि धर्मसंबंधीं गुणाचा त्याचे ठिकाणीं अभाव नाहीं व तो प्राण्यांशीं निष्ठुरपणानें वागणाराही नाहीं, तर कौसल्येचा आनंद द्विगुणित करणारा तो राम सर्व भूतांच्या हिताविषयीं तत्पर आहे. कैकेयीनें पित्याला फसविल्याचें अवलोकन केल्यावर " मी पित्याचें वचन खरें करीन " असा उद्देश मनात धरून तो धर्मात्मा वनांत निघून आला. सारांश, कैकेयीचा आणि पिता दशरथ-याचा प्रिय मनोरथ परिपूर्ण करण्याकरितां राज्य आणि भोग यांचा त्याग करून तो दंडकारण्यांत आला आहे. रावणा ! राम निर्दय नाहीं, अविद्वान् नाहीं, तो अजितेंद्रिय नाहीं आणि त्यानें अनृत भाषण केल्याचें कधीं ऐकिलेंही नाहीं. तेव्हां याप्रमाणें त्याला दोष देणें योग्य नाहीं. (७–१२)

रामो विग्रहवान्धर्मः साधुः सत्यपराक्रम ।
राजा सर्वस्य लोकस्य देवानामिव वासवः १३
कथं तु तस्य वैदेहीं रक्षितां स्वेन तेजसा ।
इच्छसे प्रसभं हर्तुं प्रभामिव विवस्वतः १४
शरार्चिषमनाधृष्यं चापखड्गेन्धनं रणे ।
रामाग्निं सहसा दीप्तं न प्रवेष्टुं त्वमर्हसि १५
धनुर्व्यादितदीप्तास्यं शरार्चिषममर्षणः ।
चापबाणधरं तीक्ष्णं शत्रुसेनापहारिणम् १६
राज्यं सुखं च संत्यज्य जीवितं चेष्टमात्मन. ।
नात्यासादयितुं तात रामान्तकमिहार्हसि १७
अप्रमेयं हि तत्तेजो यस्य सा जनकात्मजा ।
न त्वं समर्थस्तां हर्तुं रामचापाश्रयां वने १८
तस्य वै नरसिंहस्य सिंहोरस्कस्य भामिनी ।

"अमोघपराक्रम सज्जन राम मूर्तिमान् धर्म आहे आणि इंद्र ज्याप्रमाणें देवांचा राजा आहे, त्याप्रमाणें तो सर्व लोकाचा राजा आहे तेव्हां सूर्याच्या प्रभेप्रमाणें स्वतःच्या तेजानें सुरक्षित असलेल्या त्याच्या वैदेही भार्येला बलात्कारानें हरण करून आणण्याची तू कशी इच्छा करीत आहेस? बाण या ज्याच्या ज्वाला आहेत आणि धनुष्यें व खड्ग हीं ज्याचीं इंधनें आहेत व ज्याच्यासमोर जाणेंही दुर्घट आहे, अशा रामरूप प्रदीप्त अग्नींत-रणांत अविचारानें प्रवेश करणें तुला योग्य नाहीं. बाणरूप ज्वालानीं युक्त असलेलें धनुष्य हेंच ज्याचें पसरलेलें ज्वालायुक्त मुख आहे व धनुर्बाण धारण करून शत्रुसैन्याचा जो संहार करणारा आहे, अशा रामरूप प्रचंड मृत्यूशीं जनस्थानातील राक्षसांचा वध सहन न झाल्यामुळें आपलें राज्य, सुख आणि प्रिय जीवित यांचा त्याग करून, हे रावणा ! येथें अतिशय झगडणें तुला योग्य नाहीं ती जनककन्या ज्याची भार्या आहे, त्याचें तेज कांहीं अतर्क्य आहे व यामुळें वनांत रामधनुष्याच्या आश्रयाला असलेल्या त्या सीतेला हरण करण्यास तूं समर्थ नाहींस (१३-१८)

प्राणेभ्योऽपि प्रियतरा भार्या नित्यमनुव्रता १९
न सा धर्षयितुं शक्या मैथिल्योजस्विनः प्रिया ।
दीप्तस्येव हुताशस्य शिखा सीता सुमध्यमा २०
किमुद्यमं व्यर्थमिमं कृत्वा ते राक्षसाधिप ।
दृष्टश्चेत्त्वं रणे तेन तदन्तमुपजीवितम् २१
जीवितं च सुखं चैव राज्यं चैव सुदुर्लभम् ।
स सर्वैः सचिवैः सार्धं विभीषणपुरस्कृतैः २२
मन्त्रयित्वा स धर्मिष्ठैः कृत्वा निश्चयमात्मनः।
दोषाणां च गुणानां च संप्रधार्य बलाबलम् २३
आत्मनश्च बलं ज्ञात्वा राघवस्य च तत्त्वतः ।
हितं हि तव निश्चित्य क्षमं त्वं कर्तुमर्हसि २४
अहं तु मन्ये तव न क्षमं रणे समागमे कोसलराजसूनुना ।
इदं हि भूयः शृणु वाक्यमुत्तमं क्षमं च युक्तं च निशाचराधिप २५
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तत्रिंशः सर्ग ॥३७॥[११८८]

"सिंहासारखें ज्याचें वक्षःस्थल आहे, अशा त्या पुरुषसिंहाची ती भार्या नेहमी त्याला अनुसरणारी असल्यामुळें त्याला प्राणापेक्षाही प्रिय आहे प्रदीप्त अग्नीची ज्वाला धरणें ज्याप्रमाणें अशक्य आहे, त्याप्रमाणें तेजस्वी रामाच्या त्या प्रिय व सौंदर्यसंपन्न मिथिलराजकन्या सीता नावाच्या भार्येवर हात टाकता येणें अशक्य आहे. तेव्हा हे राक्षसाधिपा ! हा व्यर्थ उद्योग करून तुला काय प्राप्त होणार आहे ? रणात तूं जर त्याच्या दृष्टीस पडलास तर त्याच क्षणीं तुझ्या जीविताचा अंतच आहे असें समज. या करिता जीवित, सुख आणि अत्यंत दुर्लभ राज्य यासंबंधानें बिभीषण वगैरे सर्व धर्मनिष्ठ मंत्र्यासह विचार करून नंतर आपला निश्चय करून, या कृत्यापासून आपलें हित किती आहे व अहित किती आहे, याचा नीट विचार करून गुणदोषाचें बलाबल लक्षात घेऊन व आपलें बल आणि रामाचें बल किती आहे, हें तन्तोतन्त माहीत करून घेऊन 'हें करणें हितावह आहे' असा निश्चय झाल्यावर मग जें योग्य असेल तें तूं कर. कोसलदेशाधिपति दशरथ राजाच्या पुत्राची रणात गांठ घेणें तुला केव्हांही

अष्टत्रिंशः सर्गः ।

कदाचिदप्यहं वीर्यात्पर्यटन्पृथिवीमिमाम् ।
बलं नागसहस्रस्य धारयन्पर्वतोपमः १
नीलजीमूतसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः ।
भयं लोकस्य जनयन्किरीटी परिघायुधः २
व्यचरन्दण्डकारण्यमृषिमांसानि भक्षयन् ।
विश्वामित्रोऽथ धर्मात्मा मद्वित्रस्तो महामुनिः ३
स्वयं गत्वा दशरथं नरेन्द्रमिदमब्रवीत् ।
अयं रक्षतु मां रामः पर्वकाले समाहितः ४
मारीचान्मे भयं घोरं समुत्पन्नं नरेश्वर ।
इत्येवमुक्तो धर्मात्मा राजा दशरथस्तदा ५
प्रत्युवाच महाभागं विश्वामित्रं महामुनिम् ।
ऊनद्वादशवर्षोऽयमकृतास्त्रश्च राघवः ६

योग्य होणार नाहीं, असें मला वाटतें. हे राक्षसाधिपते ! हें मी योग्य व सयुक्तिक असें जें पुनरपि उत्कृष्ट भाषण करीत आहें, तें तू ऐक (१९-२५)

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

"सहस्र गजाचें सामर्थ्य असलेला, नीलमेघाप्रमाणें कांति असलेला, उत्कृष्ट सुवर्णाचीं कुंडलें धारण केलेला व परिघ नावाचें आयुध हातात घेऊन मस्तकीं किरिट घातलेला मी पर्वतप्राय मारीच अंगात बळ खेळत असल्यामुळे या पृथ्वीवर पर्यटण करीत असताना ऋषिमांस भक्षण करीत करीत दण्डकारण्यांत संचार करूं लागलों असता माझ्यामुळें त्रासून गेलेला धर्मात्मा विश्वामित्र महर्षि स्वतः दशरथ राजाकडे गेला आणि म्हणाला, "पर्वदिवशीं (योगसमयीं) रामानें दक्ष राहून माझें रक्षण करावें. हे राजा ! मारीच राक्षसापासून मला घोर भय उत्पन्न झालें आहे." (१-५)

"याप्रमाणें त्यानें सांगितलें असता धर्मात्मा दशरथ राजा भाग्यवान् विश्वामित्र महर्षींना म्हणाला, 'हा माझा रघुवंशज राम अद्याप पुरा बारा

कामं तु मम तत्सैन्यं मया सह गमिष्यति ।
बलेन चतुरङ्गेण स्वयमेत्य निशाचरम् ७
वधिष्यामि मुनिश्रेष्ठ शत्रुं तव यथेप्सितम् ।
एवमुक्तः स तु मुनी राजानमिदमब्रवीत् ८
रामाच्चान्यद्बलं लोके पर्याप्तं तस्य रक्षसः ।
देवतानामपि भवान्समरेष्वभिपालकः ९
आसीत्तव कृतं कर्म त्रिलोकाविदितं नृप ।
काममस्ति महत्सैन्यं तिष्ठत्विह परंतप १०
बालोऽप्येष महातेजाः समर्थस्तस्य निग्रहे ।
गमिष्ये राममादाय स्वस्ति तेऽस्तु परंतप ११
इत्येवमुक्त्वा स मुनिस्तमादाय नृपात्मजम् ।
जगाम परमप्रीतो विश्वामित्रः स्वमाश्रमम् १२
तं तथा दण्डकारण्ये यज्ञमुद्दिश्य दीक्षितम् ।
बभूवोपस्थितो रामश्चित्रं विस्फारयन्धनुः १३

वर्षांचाही झालेला नसून अस्त्रविद्येंतही निपुण नाहीं तेव्हां माझ्यासह तें माझें सैन्य आपल्या इच्छेप्रमाणें तिकडे येईल आणि हे मुनिश्रेष्ठ ! चतुरंग सैन्यासह *मी स्वतःच येऊन आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या त्या राक्षसशत्रूचा वध करीन.'* याप्रमाणें दशरथानें सांगितलें असता तो मुनि त्या राजाला म्हणाला, 'त्या राक्षसाचा वध करण्याला समर्थ असें रामावाचून या जगतांत दुसरें बल नाहीं संग्रामांत देवांचेंही तूं रक्षण करणारा होतास. हे राजा ! त्रैलोक्यांत तूं केलेलें कर्म विदितही आहे आणि हे शत्रुतापना ! तुझ्यापाशीं खरोखर मोठें सैन्यही आहे; परंतु तें तुझें सैन्य येथेंच असूं दे हा राम बाल जरी आहे तरी महातेजस्वी असून त्या राक्षसाचा निग्रह करण्यास समर्थ आहे. तेव्हां हे शत्रुतापना ! *मी रामाला घेऊन जातों तुझें कल्याण असो.'* (५–११)

याप्रमाणें दशरथाला सांगितल्यावर तो विश्वामित्र मुनि त्या राजकुमाराला घेऊन अत्यंत आनंदानें आपल्या आश्रमाला गेला नंतर तो विश्वामित्र मुनि दण्डकारण्यांत यज्ञाकरितां दीक्षा घेऊन बसला असतांना राम आपलें अद्भुत

अजातव्यञ्जनः श्रीमान्बालः श्यामः शुभेक्षणः।
एकवस्त्रधरो धन्वी शिखी कनकमालया, १४
शोभयन्दण्डकारण्यं दीप्तेन स्वेन तेजसा।
अदृश्यत तदा रामो बालचन्द्र इवोदितः १५
ततोऽहं मेघसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः।
बली दत्तवरो दर्पादाजगामाश्रमान्तरम् १६
तेन दृष्टः प्रविष्टोऽहं सहसैवोद्यतायुधः।
मां तु दृष्ट्वा धनुः सज्यमसंभ्रान्तश्चकार ह १७
अवजानन्नहं मोहाद्बालोऽयमिति राघवम्।
विश्वामित्रस्य तां वेदिमभ्यधावं कृतत्वरः १८
तेन मुक्तस्ततो बाणः शितः शत्रुनिबर्हणः।
तेनाहं ताडितः क्षिप्तः समुद्रे शतयोजने १९
नेच्छता तात मां हन्तुं तदा वीरेण रक्षितः।

धनुष्य लवचीत त्याच्या समीप उभा राहिला. त्यावेळीं एकच वस्त्र धनुष्य व झुलपें धारण करून सुवर्णमालेनें भूषित, शुभ नेत्रांनीं युक्त व वैभवशाली आणि श्यामवर्ण असलेला तो राम बालक असल्यामुळें त्याचे ठिकाणीं श्मश्रु इत्यादि चिन्हेंही उत्पन्न झालीं नव्हतीं आणि आपल्या उज्ज्वल तेजानें दण्डकारण्य सुशोभित करीत असलेला राम उदय पावलेल्या बालचंद्राप्रमाणें दिसत होता. नंतर मेघतुल्य, शुद्ध सुवर्णाचीं कुडलें धारण केलेला आणि बलाढ्य असा मी देवाला अवध्य म्हणून ब्रह्मदेवाचा वर प्राप्त झाला असल्यामुळें गर्वानें आश्रमात आलों. त्या आश्रमात परिघ नावाचें आयुध हातात घेऊन एकाएकीं आलेल्या मला त्यानें पाहिलें व मला पाहताच त्यानें यत्किंचितही न घाबरता आपल्या धनुष्याला प्रत्यंचा चढविली; तथापि हा बालक आहे असे समजून अज्ञानानें रामाला न जुमानतां त्वरा करून मी विश्वामित्राच्या त्या वेदीकडे धावलों. (१२-१८)

"परंतु त्या रामानें एक शत्रुनाशक तीक्ष्ण बाण सोडला व त्या बाणाच्या आघातानें मीं समुद्रात शंभर योजनें दूर फेकला गेलों. तेव्हा रामाच्या बाण

यदीच्छसि चिरं भोक्तुं मा कृथा रामविप्रियम् ३२
निवार्यमाणः सुहृदा मया भृशं प्रसह्य सीतां यदि धर्षयिष्यसि ।
गमिष्यसि क्षीणबलः सबान्धवो यमक्षयं रामशरास्तजीवितः ३३

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टत्रिंशः सर्ग. ॥३८॥[१२२१]

नवत्रिंशः सर्गः ।

एवमस्मि तदा मुक्तः कथंचित्तेन संयुगे ।
इदानीमपि यद्वृत्तं तच्छृणुष्व यदुत्तरम् १
राक्षसाभ्यामहं द्वाभ्यामनिर्विण्णस्तथाकृतः ।
सहितो मृगरूपाभ्यां प्रविष्टो दण्डकावने २
दीप्तजिह्वो महादंष्ट्रस्तीक्ष्णशृङ्गो महाबलः ।
व्यचरन्दण्डकारण्यं मांसभक्षो महामृगः ३
अग्निहोत्रेषु तीर्थेषु चैत्यवृक्षेषु रावण ।
अत्यन्तघोरो व्यचरंस्तापसांस्तान्प्रधर्षयन् ४

---

याचें रक्षण कर. सारांश, सौम्य स्त्रिया आणि मित्रगण याचा चिरकाल उपभोग घेण्याची जर तुला इच्छा असेल, तर तू रामाचा अपराध करूं नकोस मी सुहृद् वारंवार 'नको नको' म्हणत असतानाही अविचारानें जर तूं सीतेवर हात टाकशील, तर रामबाणाच्या योगानें तुझ्या जीविताचा अंत होऊन व सैन्याचा नाश होऊन तूं बाधवांसह यमसदनाला जाशील ( ३८-३३ )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकी अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥३८॥

" याप्रमाणें त्या युद्धामध्यें मी कसा तरी त्या रामाच्या हातून सुटलों; पण आता ही लोकोत्तर अशी जी एक गोष्ट घडून आली आहे ती तूं ऐक. पूर्वी माझी रामानें तशी अवस्था केली असतानाही पापकर्माचा कंटाळा न आलेला मी मृगरूप धारण केलेल्या दोन राक्षसासह दंडकारण्यात प्रविष्ट झालों होतों प्रदीप्त जिव्हा, मोठ्या मोठ्या दाढा, तीक्ष्ण शिंगें आणि प्रचंड बल यानीं युक्त असलेला मांसभक्षक मी मोठ्या मृगाचें रूप धारण करून दंडकारण्यांत संचार करीत होतों. हे रावणा ! मी अत्यंत घोर मृग, त्या तापसांना त्रास देण्याकरिता

निहत्य दण्डकारण्ये तापसान्धर्मचारिणः ।
रुधिराणि पिबंस्तेषां तन्मांसानि च भक्षयन् ५
ऋषिमांसाशनः क्रूरस्त्रासयन्वनगोचरान् ।
तदा रुधिरमत्तोऽहं व्यचरं दण्डकावनम् ६
तदाऽहं दण्डकारण्ये विचरन्धर्मदूषकः ।
आसादयं तदा रामं तापसं धर्ममाश्रितम् ७
वैदेहीं च महाभागां लक्ष्मणं च महारथम् ।
तापसं नियताहारं सर्वभूतहिते रतम् ८
सोऽहं वनगतं रामं परिभूय महाबलम् ।
तापसोऽयमिति ज्ञात्वा पूर्ववैरमनुस्मरन् ९
अभ्यधावं सुसंक्रुद्धस्तीक्ष्णशृङ्गो मृगाकृतिः ।
जिघांसुरकृतप्रज्ञस्तं प्रहारमनुस्मरन् १०
तेन त्यक्तास्त्रयो बाणाः शिताः शत्रुनिबर्हणाः ।
विकृष्य सुमहच्चापं सुपर्णानिलतुल्यगाः ११
ते बाणा वज्रसंकाशाः सुघोरा रक्तभोजनाः ।

अग्निहोत्रें, तीर्थें आणि देवताधिष्ठित वृक्ष यांचे ठिकाणीं संचार करीत होतों आणि दंडकारण्यांत धर्माचरण करणाऱ्या मुनींचा वध करून मी त्यांचें रक्त प्राशन करीत होतों व त्यांचें मांस भक्षण करीत होतों सारांश ऋषिमांस भक्षण करणारा मी क्रूर मृग रुधिरप्राशनानें मस्त होऊन वनांत राहणाऱ्या मुनींना त्रस्त करीत दण्डकारण्यांत संचार करीत होतों. (१-६)

"तेव्हां दंडकारण्यांत संचार करतां करतां धर्मविध्वंसक मी मुनिधर्माचें अवलंबन करणारा राम, महाभाग्यवती वैदेही, आणि शुद्ध आहार करणारा, सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं तत्पर आणि तपस्वी अशा महारथि लक्ष्मण यांजवळ आलों. नंतर वनांत आलेल्या महाबलाढ्य रामाला न जुमानतां हा तपस्वी आहे असें समजून पूर्व वैर लक्षांत घेऊन आणि तो प्रहार मनांत आणून तीक्ष्ण शिंगांनीं युक्त, अविचारी व मृगरूप धारण केलेला असा मी अत्यंत क्रुद्ध होऊन त्याचा वध करण्याच्या उद्देशानें ( मृगरूप धारण केलेल्या

यदीच्छसि चिरं भोक्तुं मा कृथा रामविप्रियम् ३२
निवार्यमाणः सुहृदा मया भृशं प्रसह्य सीतां यदि धर्षयिष्यसि ।
गमिष्यसि क्षीणबलः सबान्धवो यमक्षयं रामशरास्तजीवितः ३३
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ॥३८॥[१२२१]

नवत्रिंशः सर्गः ।

एवमस्मि तदा मुक्तः कथंचित्तेन संयुगे ।
इदानीमपि यद्वृत्तं तच्छृणुष्व यदुत्तरम् १
राक्षसाभ्यामहं द्वाभ्यामनिर्विण्णस्तथाकृतः ।
सहितो मृगरूपाभ्यां प्रविष्टो दण्डकावने २
दीप्तजिह्वो महादंष्ट्रस्तीक्ष्णशृङ्गो महाबलः ।
व्यचरन्दण्डकारण्यं मांसभक्षो महामृगः ३
अग्निहोत्रेषु तीर्थेषु चैत्यवृक्षेषु रावण ।
अत्यन्तघोरो व्यचरंस्तापसांस्तान्प्रधर्षयन् ४

---

याचें रक्षण कर. साराश, सौम्य स्त्रिया आणि मित्रगण याचा चिरकाल उपभोग घेण्याची जर तुला इच्छा असेल, तर तूं रामाचा अपराध करूं नकोस मी सुहृद् वारंवार 'नको नको' म्हणत असतानाही अविचारानें जर तूं सीतेवर हात टाकशील, तर रामबाणाच्या योगानें तुझ्या जीविताचा अंत होऊन व सैन्याचा नाश होऊन तूं बाधवांसह यमसदनाला जाशील. ( २८–३३ )

*याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥३८॥*

"याप्रमाणें त्या युद्धामध्यें मी कसा तरी त्या रामाच्या हातून सुटलों; पण आता ही लोकोत्तर अशी जी एक गोष्ट घडून आली आहे ती तूं ऐक. पूर्वी माझी रामानें तशी अवस्था केली असतांनाही पापकर्माचा कंटाळा न आलेला मी मृगरूप धारण केलेल्या दोन राक्षसांसह दंडकारण्यात प्रविष्ट झालों होतों. प्रदीप्त जिव्हा, मोठ्या मोठ्या दाढा, तीक्ष्ण शिंगें आणि प्रचंड बल यानीं युक्त असलेला मासभक्षक मी मोठ्या मृगाचें रूप धारण करून दंडकारण्यांत संचार करीत होतों. हे रावणा ! मी अत्यंत घोर मृग, त्या तापसांना त्रास देण्याकरिता

निहत्य दण्डकारण्ये तापसान्धर्मचारिणः ।
रुधिराणि पिबंस्तेषां तन्मांसानि च भक्षयन् ५
ऋषिमांसाशनः क्रूरस्त्रासयन्वनगोचरान् ।
तदा रुधिरमत्तोऽहं व्यचरं दण्डकावनम् ६
तदाऽहं दण्डकारण्ये विचरन्धर्मदूषकः ।
आसादयं तदा रामं तापसं धर्ममाश्रितम् ७
वैदेहीं च महाभागां लक्ष्मणं च महारथम् ।
तापसं नियताहारं सर्वभूतहिते रतम् ८
सोऽहं वनगतं रामं परिभूय महाबलम् ।
तापसोऽयमिति ज्ञात्वा पूर्ववैरमनुस्मरन् ९
अभ्यधावं सुसंक्रुद्धस्तीक्ष्णशृङ्गो मृगाकृतिः ।
जिघांसुरकृतप्रज्ञस्तं प्रहारमनुस्मरन् १०
तेन त्यक्तास्त्रयो बाणाः शिताः शत्रुनिबर्हणाः ।
विकृष्य सुमहच्चापं सुपर्णानिलतुल्यगाः ११
ते बाणा वज्रसंकाशाः सुघोरा रक्तभोजनाः ।

अग्निहोत्रें, तीर्थें आणि देवताधिष्ठित वृक्ष याचे ठिकाणीं संचार करीत होतों आणि दंडकारण्यात धर्माचरण करणाऱ्या मुनींचा वध करून मी त्याचें रक्त प्राशन करीत होतों व त्याचें मांस भक्षण करीत होतों सारांश ऋषिमांस भक्षण करणारा मी क्रूर मृग रुधिरप्राशनानें मत्त होऊन वनात राहणाऱ्या मुनींना त्रस्त करीत दण्डकारण्यात संचार करीत होतों. (१–६)

"तेव्हा दंडकारण्यात संचार करता करता धर्मविध्वंसक मी मुनि-धर्माचें अवलंबन करणारा राम, महाभाग्यवती वैदेही, आणि शुद्ध आहार करणारा, सर्व प्राण्याच्या हिताविषयीं तत्पर आणि तपस्वी असा महारथि लक्ष्मण याजवळ आलों. नंतर वनात आलेल्या महाबलाढ्य रामाला न जुमानता हा तपस्वी आहे असें समजून पूर्व वैर लक्षात घेऊन आणि तो प्रहार मनांत आणून तीक्ष्ण शिंगांनीं युक्त, अविचारी व मृगरूप धारण केलेला असा मी अत्यंत क्रुद्ध होऊन त्याचा वध करण्याच्या उद्देशानें ( मृगरूप धारण केलेल्या

इदं वचो बन्धुहितार्थिना मया यथोच्यमानं यदि नाभिपत्स्यसे ।
सबान्धवस्त्यक्षसि जीवितं रणे हतोद्य रामेण शरैरजिह्मगैः २५

इत्यार्षे श्रीमद्वा॰वाल्मीकीय आदिकाव्ये अरण्यकाण्डे नवत्रिंश सर्गः ॥३९॥[१२४६]

चत्वारिंश सर्गः ।

मारीचस्य तु तद्वाक्यं क्षमं युक्तं च रावणः ।
उक्तो न प्रतिजग्राह मर्तुकाम इवौषधम् १
तं पथ्यहितवक्तारं मारीचं राक्षसाधिपः ।
अब्रवीत्परुषं वाक्यमयुक्तं कालचोदितः २
दुष्कुलैतदयुक्तार्थं मारीच मयि कथ्यते ।
वाक्यं निष्फलमत्यर्थं बीजमुप्तमिवोखरे ३
त्वद्वाक्यैर्न तु मां शक्यं भेत्तुं रामस्य संयुगे ।
मूर्खस्य पापशीलस्य मानुषस्य विशेषतः ४

वध केला, यात रामाचा काय बरें अपराध झाला ? हें तूं एकदां खरें खरें साग *असो बांधवाचें हित व्हावें, या उद्देशानें मी करीत असलेल्या या भाषणा*-चा जर तू अंगिकार केला नाहींस, तर सरळ जाणाऱ्या बाणाच्या योगानें रामाच्या हातून संग्रामात आजच वध पावून तू बांधवासह जीविताचा त्याग करशील " (२१-२५)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्य काण्डापैकीं एकोणचाळीसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

मरणाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला ज्याप्रमाणें औषध घेण्यास सांगितलें असताही तो घेत नाहीं, त्याप्रमाणें मारीचाचें तें भाषण योग्य व सयुक्तिक असतांही रावणानें स्वीकारलें नाहीं इतकेंच नव्हे तर, पथ्यकर आणि हितावह असें भाषण करणाऱ्या मारीचाला तो राक्षसाधिपति रावण कालाची प्रेरणा झाल्यामुळें अयोग्य आणि मर्मभेदी शब्दांनीं म्हणाला, " रे मारीचा ! हे कुलहीना ! खडकाळ जमिनींत पेरलेलें बीं ज्याप्रमाणें अगदीं निष्फल होऊन जातें, त्याप्रमाणें ज्यातील अर्थ मुळींच अयोग्य आहे, असा हा निष्फल उपदेश तू मला करीत आहेस परंतु मूर्ख, दु शील आणि विशेषत मनुष्य असा जो

यस्त्यक्त्वा सुहृदो राज्यं मातरं पितरं तथा ।
स्त्रीवाक्यं प्राकृतं श्रुत्वा वनमेकपदे गतः　　५
अवश्यं तु मया तस्य संयुगे खरघातिनः ।
प्राणैः प्रियतरा सीता हर्तव्या तव संनिधौ　　६
एवं मे निश्चिता बुद्धिर्हृदि मारीच विद्यते ।
न व्यावर्तयितुं शक्या सेन्द्रैरपि सुरासुरैः　　७
दोषं गुणं वा संपृष्टस्त्वमेवं वक्तुमर्हसि ।
अपायं वा उपायं वा कार्यस्यास्य विनिश्चये　　८
संपृष्टेन तु वक्तव्यं सचिवेन विपश्चिता ।
उद्यताञ्जलिना राज्ञो य इच्छेद्भूतिमात्मनः　　९
वाक्यमप्रातिकूलं तु मृदुपूर्वं शुभं हितम् ।
उपचारेण वक्तव्यो युक्तं च वसुधाधिपः　　१०
सावमर्दं तु यद्वाक्यमथवा हितमुच्यते ।
नाभिनन्देत तद्राजा मानार्थी मानवर्जितम्　　११

राम त्याच्याशीं भार्याहरणरूप संग्राम करण्याविषयीं निश्चित झालेला मी जो निश्चय केला आहे त्या निश्चयापासून तुझ्या म्हणण्यानें निवृत्त होणें शक्य नाही. स्त्रीचें क्षुल्लक वचन ऐकून जो सुहृद्, राज्य, माता आणि पिता यांचा त्याग करून एकदम वनांत गेला, संग्रामांत खराचा वध करणाऱ्या त्या रामाची प्राणांपेक्षाही प्रिय असलेली भार्या मी तुझ्या समक्ष हरण करणार. हे मारीचा ! याप्रमाणें मनांत जो माझा पक्का निश्चय झालेला आहे, तो इंद्रासह देवदैत्यांनाही फिरविणें शक्य नाहीं (५-७)

" या कार्याचा निर्णय करण्यासंबधानें दोष अथवा गुण किंवा अपाय अथवा उपाय जर मी तुला विचारला असता तर याप्रमाणें सांगणें तुला योग्य होतें ज्या विचारी सचिवाला आपल्या अभ्युदयाची इच्छा असेल, त्यानें प्रश्न झाल्यावर हात जोडून राजापुढें बोलावें शुभ, हितावह, योग्य आणि अनुकूल असेंच भाषण मार्दवपूर्वक आदरानें राजाशीं करावें लागतें राजाचा उपमर्द करणारें आणि मानहीन असें हितकारक भाषण जरी कोणी करू लागला, तरी

पञ्चरूपाणि राजानो धारयन्त्यमितौजसः ।
अग्नेरिन्द्रस्य सोमस्य यमस्य वरुणस्य च १२
औष्ण्यं तथा विक्रमं च सौम्यं दण्डं प्रसन्नताम् ।
धारयन्ति महात्मानो राजानः क्षणदाचर १३
तस्मात्सर्वास्ववस्थासु मान्याः पूज्याश्च नित्यदा ।
त्वं तु धर्ममविज्ञाय केवलं मोहमाश्रितः १४
अभ्यागतं तु दौरात्म्यात्परुषं वदसीदृशम् ।
गुणदोषौ न पृच्छामि क्षयं चात्मनि राक्षस १५
मयोक्तमपि चैतावत्त्वां प्रत्यमितविक्रम ।
अस्मिंस्तु स भवान्कृत्ये साहाय्यं कर्तुमर्हसि १६
शृणु तत्कर्म साहाय्ये यत्कार्यं वचनान्मम ।
सौवर्णस्त्वं मृगो भूत्वा चित्रो रजतबिन्दुभिः १७
आश्रमे तस्य रामस्य सीतायाः प्रमुखे चर ।

---

मानी राजा त्याला मान डोलवणार नाहीं. अचिंत्य सामर्थ्यवान् राजे अग्नि, इंद्र, सोम, यम आणि वरुण या पाच लोकपालांचीं पाच रूपें धारण करीत असतात. म्हणजे हे राक्षसा ! तीक्ष्णपणा, पराक्रम, सौम्यता, दुष्टनिग्रह आणि प्रसन्नता हे पाच लोकपालांचे पाच गुण महात्मे राजे धारण करीत असतात. म्हणून, कोणतीही अवस्था प्राप्त झाली तरी राजे हे नेहमीं मान्य व पूज्यच आहेत; परंतु तूं केवळ मोहग्रस्त झाल्यामुळें राजधर्म न जाणून, मी आलों असता, दुष्टस्वभावामुळें अशा प्रकारचें मर्मभेदक भाषण माझ्याशीं करीत आहेस. (८-१५)

"हे राक्षसा ! मी हें जें करीत आहें तें चांगलें आहे कीं वाईट ? किंवा तें करणें मला योग्य आहे कीं अयोग्य आहे ? हें मी तुला विचारीत नाहीं. हे अमितपराक्रमी मारीचा ! या कृत्यात तूं सहाय्य कर एवढेंच मी तुला सांगितलें आहे, सहाय्य करण्यामध्यें तूं काय काम करावयाचें, हें पाहिजे तर आणखी एकदा मी सांगतों, तें ऐक. रौप्य बिंदूंनीं युक्त असा अद्भुत सुवर्णमय मृग बनून तूं त्या रामाच्या आश्रमांत सीतेसमोर तेथल्या तेथें बागडूं लाग आणि

प्रलोभयित्वा वैदेहीं यथेष्टं गन्तुमर्हसि १८
त्वां हि मायामयं दृष्ट्वा काञ्चनं जातविस्मया ।
आनयैनमिति क्षिप्रं रामं वक्ष्यति मैथिली १९
अपक्रान्ते च काकुत्स्थे दूरं गत्वाऽप्युदाहर ।
हा सीते लक्ष्मणेत्येवं रामवाक्यानुरूपकम् २०
तच्छ्रुत्वा रामपदवीं सीतया च प्रचोदितः ।
अनुगच्छति संभ्रान्तं सौमित्रिरपि सौहृदात् २१
अपक्रान्ते च काकुत्स्थे लक्ष्मणे च यथासुखम् ।
आहरिष्यामि वैदेहीं सहस्राक्षः शचीमिव २२
एवं कृत्वा त्विदं कार्यं यथेष्टं गच्छ राक्षस ।
राज्यस्यार्धं प्रदास्यामि मारीच तव सुव्रत २३
गच्छ सौम्य शिवं मार्गं कार्यस्यास्य विवृद्धये
अहं त्वाऽनुगमिष्यामि सरथो दण्डकावनम् २४
प्राप्य सीतामयुद्धेन वञ्चयित्वा तु राघवम् ।
लङ्कां प्रति गमिष्यामि कृतकार्यः सह त्वया २५

---

सीतेला लुब्ध करून मग वाटेल तिकडे जा. सुवर्णमृगरूप धारण केलेल्या तुला, मायावी राक्षसाला पाहून सीतेला विस्मय वाटेल आणि " मृगाला धेऊन या' असें ती रामाला लगेच म्हणेल. नंतर राम तेथून निघून गेला असता तूंही दूर जाऊन, " हे सीते ! हे लक्ष्मणा !" अशा रामाच्या आवाजाला जुळण्यासारख्या हाका मार. म्हणजे त्या हाका ऐकून सीता रामाच्या मार्गे जाण्याविषयीं लक्ष्मणाला सांगेल आणि भ्रातृप्रेमामुळें लक्ष्मणही घाबरून जाऊन त्याच्या मागोमाग जाईल. ( १५-२१ )

"याप्रमाणें राम आणि लक्ष्मण तेथून निघून गेले म्हणजे शचीला हरण करणाऱ्या इंद्राप्रमाणें मी सीतेला खुशाल हरण करून आणीन. अशा रीतीनें हें कार्य करून, हे राक्षसा ! तूं पाहिजे तिकडे जा. हे सुव्रता मारीचा ! मी तुला अर्धे राज्य देईन. या कार्याच्या सिद्धीकरिता, हे सत्वस्थ मारीचा ! तूं निर्विघ्नपणें आतां मार्गाला लाग. मी रथासह तुझ्या मागोमाग दंडकारण्यांत येतों. रामाला

नो चेत्करोषि मारीच हन्मि त्वामहमद्य वै ।
एतत्कार्यमवश्यं मे बलादपि करिष्यसि २६
राज्ञो विप्रतिकूलस्थो न जातु सुखमेधते २७
आसाद्य तं जीवितसंशयस्ते मृत्युर्ध्रुवो ह्यद्य मया विरुध्यतः ।
एतद्यथावत्परिगण्य बुद्ध्या यदत्र पथ्यं कुरु तत्तथा त्वम् २८
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥४०॥ [१२७४]

एकचत्वारिंशः सर्गः ।

आज्ञप्तो रावणेनेत्थं प्रतिकूलं च राजवत् ।
अब्रवीत्परुषं वाक्यं निःशङ्को राक्षसाधिपम् १
केनायमुपदिष्टस्ते विनाशः पापकर्मणा ।
सपुत्रस्य सराज्यस्य सामात्यस्य निशाचर. २
कस्त्वया सुखिना राजन्नाभिनन्दति पापकृत् ।
केनेदमुपदिष्टं ते मृत्युद्वारमुपायतः ३

फसवून युद्धावाचून सीता प्राप्त झाल्यावर मी तुझ्यासह कृतकृत्य होऊन लंकेला परत जाईन हे मारीचा ! याप्रमाणें जर न वागशील तर मी आजच तुझा वध करून टाकतों. माझ्या बलात्कारानें का होईना, हें माझें कार्य तुला अवश्य करावेंच लागेल. कारण राजाशीं प्रतिकूल वागणाऱ्याला कधींही सुख प्राप्त होत नाहीं. साराश, रामाशीं प्रसंग आल्यानन्तर कदाचित् तुझ्या जीविताविषयीं संशय होईल. परंतु माझ्याशीं विरुद्ध वागल्यानें तर आजच तुझा मृत्यु निश्चयानें ठरला आहे तेव्हा याचा पूर्णपणें लक्षपूर्वक विचार करून या दोहोंपैकीं जें तुझ्या हिताचें वाटेल, तें तूं आपल्या इच्छेप्रमाणें कर. " (२२-२८)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्य-काडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४०॥

याप्रमाणें आपल्या राजेपणावर येऊन प्रतिकूल आज्ञा रावणानें केली असतां तो मारीच निःशंकपणें पुनरपि मनाला अप्रिय लागणारें असें कठोर भाषण त्या राक्षसाधिपतीशीं करूं लागला तो म्हणाला," हे निशाचरा ! कोणत्या पापकर्मी पुरुषानें पुत्र, राज्य आणि अमात्य यासह तुझा नाश होण्याचा हा उपदेश तुला

शत्रवस्तव सुव्यक्तं हीनवीर्या निशाचर।
इच्छन्ति त्वां विनश्यन्तमुपरुद्धं बलीयसा ४
केनेदमुपदिष्टं ते क्षुद्रेणाहितबुद्धिना।
यस्त्वामिच्छति नश्यन्तं स्वकृतेन निशाचर ५
वध्याः खलु न वध्यन्ते सचिवास्तव रावण।
ये त्वामुत्पथमारूढं न निगृह्णन्ति सर्वशः ६
अमात्यैः कामवृत्तो हि राजा कापथमाश्रितः।
निग्राह्यः सर्वथा सद्भिः स निग्राह्यो न गृह्यसे ७
धर्ममर्थं च कामं च यशश्च जयतां वर।
स्वामिप्रसादात्सचिवाः प्राप्नुवन्ति निशाचर ८
विपर्यये तु तत्सर्वं व्यर्थं भवति रावण।
व्यसनं स्वामिवैगुण्यात्प्राप्नुवन्तीतरे जनाः ९

केला आहे ? हे राजा ! कोण असा पापी पुरुष आहे कीं ज्याला तूं सुखी असलेला पाहवत नाहीं ? अरे, हित म्हणून हें मृत्यूचें द्वार तुला कोणी दाखवून दिलें आहे ? हे निशाचरा ! तुझ्यापेक्षा शौर्यानें कमी असलेले असे तुझे कोणी तरी शत्रु, तूं बलिष्ठ शत्रूच्या तावडींत सापडून तुझा नाश होताना पाहण्याची खरोखर इच्छा करीत आहेत, असें स्पष्ट दिसत आहे. हे निशाचरा ! स्वतः योजिलेल्या उपायानें तुझा नाश होत असतांना पाहण्याची इच्छा करणाऱ्या कोणत्या दुष्ट-बुद्धि क्षुद्र पुरुषानें हा तुला उपदेश केला आहे ? हे रावणा ! तूं वाईट मार्गाचा अवलंब केला असतांना सर्व प्रकारांनीं जे तुझा निग्रह करीत नाहींत, त्या सचिवांचा खरोखर वध करणेंच तुला योग्य असून तूं त्यांचा वध करीत नाहीस. राजानें स्वेच्छाचारी होऊन कुमार्गाचा अवलंब केला असतां चांगल्या अमात्यांनीं त्याचा सर्वप्रकारें निग्रहच केला पाहिजे; परंतु तुझा निग्रह करणें (कैदेंत टाकणें) योग्य असतानाही कोणी अमात्य तुझा निग्रह करीत नाहीत. (१-७)

"हे विजयी श्रेष्ठ निशाचरा ! राजाचें आचरण शुद्ध असलें म्हणजे धर्म, अर्थ, काम आणि यश हीं सचिवाना राजकृपेनें प्राप्त होतात. परंतु हे रावणा ! राजाचें आचरण जर उलट असलें तर तें सर्व व्यर्थ होतें आणि इतर प्रजा-

राजमूलो हि धर्मश्च यशश्च जयतां वर ।
तस्मात्सर्वास्ववस्थासु रक्षितव्या नराधिपाः १०
राज्यं पालयितुं शक्यं न तीक्ष्णेन निशाचर ।
न चातिप्रतिकूलेन नाविनीतेन राक्षस ११
ये तीक्ष्णमन्त्राः सचिवा भुज्यन्ते सह तेन वै ।
विषमेषु रथाः शीघ्रं मन्दसारथयो यथा १२
बहवः साधवो लोके युक्तधर्ममनुष्ठिताः ।
परेषामपराधेन विनष्टाः सपरिच्छदाः १३
स्वामिना प्रतिकूलेन प्रजास्तीक्ष्णेन रावण ।
रक्ष्यमाणा न वर्धन्ते मृगा गोमायुना यथा १४
अवश्यं विनशिष्यन्ति सर्वे रावण राक्षसाः ।
येषां त्वं कर्कशो राजा दुर्बुद्धिरजितेन्द्रियः १५
तदिदं काकतालीयं घोरमासादितं मया ।

जनांनाही राजाच्याच दोषामुळें संकट प्राप्त होतें. हे विजयी श्रेष्ठा ! धर्म आणि यश हीं राजावरच अवलंबून असल्यामुळें कोणत्याही अवस्थेत मंत्र्यानीं राजाचें रक्षणच केलें पाहिजे हे निशाचर राक्षसा ! क्रूर, उद्धट आणि प्रजाजनांना फारच प्रतिकूल अशा राजाच्या हातून राज्याचें परिपालन होणें शक्य नाहीं. मंदबुद्धि सारथी ज्या रथावर आहेत असे रथ विषम प्रदेशावरून जाऊं लागले असता ज्याप्रमाणें सारथ्यासह ते सत्वर नाश पावतात, त्याचप्रमाणें कठोर उपाय योजण्याची मसलत देणारे मंत्री त्या राजासह त्या मसलतींचें नाशरूप फल लवकरच भोगतात. शास्त्रानुकूल धर्माचरण करणारे आणि अत्यंत नीतिनिष्ठ असे कित्येक निरुपद्रवी लोक या जगतात दुसऱ्याचा अपराध केल्यामुळें नाश पावलेले आहेत कोल्हा रक्षण करीत असताना ज्याप्रमाणें मृग वृद्धिंगत होत नाहीत, त्याचप्रमाणें प्रतिकूल आणि उग्र असा राजा रक्षण करीत असताना प्रजेची भरभराट होत नाहीं ( ८-१४ )

"हे रावणा ! निर्दय, दुष्टबुद्धि आणि अजितेंद्रिय असा तू ज्याचा राजा आहेस, त्या सर्व राक्षसांचा खचित नाश होईल. तुझ्यामुळें मृत्यु येण्याचें हे घोर

अद्य त्वं शोचनीयोऽसि ससैन्यो विनशिष्यसि १६
मां निहत्य तु रामोऽसावचिरात्त्वां वधिष्यति ।
अनेन कृतकृत्योऽस्मि म्रिये चाप्यरिणा हतः १७
दर्शनादेव रामस्य हतं मामवधारय ।
आत्मानं च हतं विद्धि हृत्वा सीतां सबान्धवम् १८
आनयिष्यसि चेत्सीतामाश्रमात्सहितो मया ।
नैव त्वमपि नाहं वै नैव लङ्का न राक्षसाः १९
निवार्यमाणस्तु मया हितैषिणा न मृष्यसे वाक्यमिदं निशाचर ।
परेतकल्पा हि गतायुषो नरा हितं न गृह्णन्ति सुहृद्भिरीरितम् २०
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकचत्वारिंशः सर्गः ॥४१॥[१२९४]

द्विचत्वारिंशः सर्गः ।

एवमुक्त्वा तु परुषं मारीचो रावणं ततः ।

संकट जरी मला आज एकाएकीं प्राप्त झालें आहे, तरी त्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं, परंतु या कृत्यात सैन्यासह तुझा नाश होणार, म्हणून तुझ्याबद्दल मला वाईट वाटत आहे. हा राम प्रथम माझा वध करून नंतर लवकरच तुझा वध करील. तेव्हां आतां तुझ्या हातून मरण्यापेक्षा रणात शत्रूच्या हातून वध झाला असता मी कृतकृत्य तरी होईन रामाचें मला दर्शन व्हावयाचाच उशीर कीं मी मेलोंच, असें तूं समज आणि सीतेला हरण केलीस म्हणजे तुझाही बांधवांसह वध झालाच, हें ही तू समज कदाचित् यावेळीं माझ्यासह जरी तूं आश्रमातून सीतेला हरण करून आणलीस तरी मीही जिवत राहणार नाहीं, तूंही राहणार नाहींस, लंकाही राहणार नाहीं आणि राक्षसही पण राहणार नाहींत. हे निशाचरा ! तुझें हित इच्छिणारा मी तुला ' नको नको ' म्हणत असताना या माझ्या सांगण्याची तूं पर्वा करीत नाहींस, तेव्हां आयुष्य संपून मृतप्राय झालेले पुरुष सुहृदांनीं सांगितलेला हितकारक उपदेश स्वीकारीत नाहींत, हेंच सत्य आहे " ( १५-२० )

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

गच्छावेत्यब्रवीद्दीनो भयाद्रात्रिंचरप्रभोः १
दृष्टश्चाहं पुनस्तेन शरचापासिधारिणा ।
मद्वधोद्यतशस्त्रेण निहतं जीवितं च मे २
नहि रामं पराक्रम्य जीवन्प्रतिनिवर्तते ।
वर्तते प्रतिरूपोऽसौ यमदण्डहतस्य ते ३
किं तु कर्तुं मया शक्यमेवं त्वयि दुरात्मनि ।
एष गच्छाम्यहं तात स्वस्ति तेऽस्तु निशाचर ४
प्रहृष्टस्त्वभवत्तेन वचनेन स राक्षसः ।
परिष्वज्य सुसंश्लिष्टमिदं वचनमब्रवीत् ५
एतच्छौटीर्ययुक्तं ते मच्छन्दवशवर्तिनः ।
इदानीमसि मारीचः पूर्वमन्यो हि राक्षसः ६
आरुह्यतामयं शीघ्रं खगो रत्नविभूषितः ।
मया सह रथो युक्तः पिशाचवदनैः खरैः ७
प्रलोभयित्वा वैदेहीं यथेष्टं गन्तुमर्हसि ।

---

याप्रमाणें रावणाशीं मर्मभेदक भाषण केल्यानंतर मारीच राक्षस दीन होऊन त्या राक्षसाधिपतीच्या भीतीनें त्याला म्हणाला, "बरें आहे, चल जाऊं! परंतु बाण, धनुष्य आणि खड्ग धारण केलेल्या रामाच्या पुनः मी दृष्टीस पडलों कीं माझ्या वधाकरितां शस्त्र उचललेल्या त्या रामाच्या हातून मी मेलोच असें समज. कारण रामावर चाल करून गेल्यानंतर कोणीही जिवंत परत फिरत नाहीं. तेव्हां तुझ्यासारखाच मीही आतां यमदण्डाचा प्रहार झाल्यासारखाच आहें. माझ्या हातून दुसरें काय होणें शक्य आहे ? म्हणून हा मी निघालोंच, हे निशाचरा ! तुझें कल्याण असो." ( १–४ )

या मारीचाच्या भाषणानें त्या राक्षसाला हर्ष झाला आणि मारीचाला अगदीं कडकडून भेटून तो म्हणाला, " माझ्या इच्छेप्रमाणें वागणाऱ्या तुझें हें भाषण मात्र तुझ्या वीर्याला शोभण्यासारखें आहे. आतां मात्र तूं खरा मारीच आहेस, पूर्वी दुसराच कोणी राक्षस तुझ्या अंगांत आला होता. आता पिशाच्चासारख्या मुखांनीं युक्त असलेले गर्दभ ज्याला जोडलेले आहेत, अशा

तां शून्ये प्रसभं सीतामानयिष्यामि मैथिलीम् ॥ ८
ततस्तथेत्युवाचैनं रावणं ताटकासुतः
ततो रावणमारीचो विमानमिव तं रथम् । ९
आरुह्याययतुः शीघ्रं तस्मादाश्रममण्डलात्
तथैव तत्र पश्यन्तौ पत्तनानि वनानि च । १०
गिरींश्च सरितः सर्वा राष्ट्राणि नगराणि च
समेत्य दण्डकारण्यं राघवस्याश्रमं ततः । ११
ददर्श सहमारीचो रावणो राक्षसाधिपः
अवतीर्य रथात्तस्मात्ततः काञ्चनभूषणात् । १२
हस्ते गृहीत्वा मारीचं रावणो वाक्यमब्रवीत्
एतद्रामाश्रमपदं दृश्यते कदलीवृतम् । १३
क्रियतां तत्सखे शीघ्रं यदर्थं वयमागताः
स रावणवचः श्रुत्वा मारीचो राक्षसस्तदा । १४
मृगो भूत्वाऽऽश्रमद्वारि रामस्य विचचार ह

---

या रत्नभूषित आकाशगामी रथावर माझ्यासह तूं सत्वर चढ. विदेहराजकन्या सीतेला लुब्ध केल्यावर मग तूं पाहिजे तिकडे जा. आश्रम शून्य झाल्यावर मी ती मिथिलाधिपतीची कन्या सीता बलात्कारानें हरण करून आणीन " (५-८)

याप्रमाणें रावणानें सांगितल्यानंतर तो ताटकापुत्र रावणाला "ठीक आहे" असें म्हणाला. नंतर विमानाप्रमाणें आकाशातून संचार करणाऱ्या त्या रथामध्यें रावण व मारीच हे आरूढ होऊन त्या आश्रममंडलातून सत्वर निघून गेले. जातां जातां नगरें, वनें, पर्वत, सर्व नद्या, राष्ट्रें आणि राजधान्या अवलोकन करीत करीत ते चालले. नंतर दण्डकारण्यांत आल्यावर [illegible] त्या राक्षसाधिपति रावणानें रामाचा आश्रम अवलोकन केला. [illegible] सुवर्ण-विभूषित रथांतून खालीं उतरल्यावर मारीचाचा हात धरून त्याला म्हणाला, " केळींनीं व्याप्त झालेला हा रामाचा आश्रम दिसत आहे म्हणून हे मित्रा, ज्याकरितां आपण आलों आहोंत तें कार्य कर. " हें [illegible] भाषण ऐकल्यावर मारीच राक्षस मृगरूपानें रामाच्या [illegible] फिरूं

स तु रूपं समास्थाय महदद्भुतदर्शनम् ।
मणिप्रवरशृङ्गाग्रः सितासितमुखाकृतिः १५
रक्तपद्मोत्पलमुख इन्द्रनीलोत्पलश्रवाः ।
किंचिदत्युन्नतग्रीवः इन्द्रनीलनिभोदरः । १६
मधूकनिभपार्श्वश्च कंजकिंजल्कसंनिभः ।
वैदूर्यसंकाशखुरस्तनुजङ्घः सुसंहतः १७
इन्द्रायुधसवर्णेन पुच्छेनोर्ध्वं विराजितः ।
मनोहरस्निग्धवर्णो रत्नैर्नानाविधैर्वृतः १८
क्षणेन राक्षसो जातो मृगः परमशोभनः ।
वनं प्रज्वलयन् रम्यं रामाश्रमपदं च तत् १९
मनोहरं दर्शनीयं रूपं कृत्वा स राक्षसः ।
प्रलोभनार्थं वैदेह्या नानाधातुविचित्रितम् २०
विचरन् गच्छते शष्पं शाद्वलानि समन्ततः ।
रौप्यैर्बिन्दुशतैश्चित्रं भूत्वा च प्रियनन्दनः २१

*लागला (९-१४)*

पाहणाऱ्याला मोठें आश्चर्य वाटावें असें रूप त्यानें धारण केलेलें होतें. त्याच्या शिंगांचीं टोकें उत्कृष्ट रत्नाचीं होतीं, मुखाची आकृति कोठें पांढरी व कोठें काळी होती मुख आरक्तवर्ण व नीलवर्ण कमलासारखें होतें, कान इंद्रनील अथवा नीलकमल याप्रमाणें होते, मान किंचित् वर केलेली होती, उदराची कांति इंद्रनीलमण्यासारखी होती, बरगड्यांचा वर्ण मोहाच्या फुलासारखा दिसत होता, शरीराचा वर्ण कमलाच्या परागासारखा होता, खूर वैदूर्य मण्यासारखे दिसत होते, पोटऱ्या बारीक होत्या, बांधा मजबूत होता इंद्रधनुष्यासारखा ज्याचा वर्ण आहे, अशा पुच्छानें त्याला शोभा आलेली होती, शरीर मनोहर व तुळतुळीत होतें आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं तें जडवल्यासारखें दिसत होतें एका क्षणात तो राक्षस पराकाष्ठेचा उत्कृष्ट मृग बनून तें रम्य वन आणि तो रमणीय रामाश्रम प्रकाशित करू लागला सीतेला लुब्ध करण्याकरिता नाना-प्रकारच्या धातूंनीं चित्रविचित्र दिसत असलेलें असें मनोहर व दर्शनीय रूप

विटपीनां किसलयान्भक्षयन्विचचार ह ।
कदलीगृहकं गत्वा कर्णिकारानितस्ततः ॥ २२
तमाश्रमं मन्दगतिं सीतासंदर्शनं ततः ।
राजीवचित्रपृष्ठः स विरराज महामृगः ॥ २३
रामाश्रमपदाभ्याशे विचचार यथासुखम् ।
पुनर्गत्वा निवृत्तश्च विचचार मृगोत्तमः ॥ २४
गत्वा मुहूर्तं त्वरया पुनः प्रतिनिवर्तते ।
विक्रीडंश्च पुनर्भूमौ पुनरेव निषीदति ॥ २५
आश्रमद्वारमागम्य मृगयूथानि गच्छति ।
मृगयूथैरनुगतः पुनरेव निवर्तते ॥ २६
सीतादर्शनमाकाङ्क्षन् राक्षसो मृगतां गतः ।
परिभ्रमति चित्राणि मण्डलानि विनिष्पतन् ॥ २७
समुद्वीक्ष्य च सर्वे तं मृगा येऽन्ये वनेचराः ।
उपगम्य समाघ्राय विद्रवन्ति दिशो दश ॥ २८

धारण करून तो राक्षस आश्रमाच्या भोंवतीं कोमल तृण भक्षण करीत करीत संचार करीत होता (१५–२१)

नंतर आश्चर्य वाटेल अशा रीतिनें शेंकडों रौप्यबिंदूंनीं युक्त होऊन प्रिय रावणाला आनंद देणारा तो मारीच वृक्षाचे अंकुर भक्षण करीत करीत हिंडूं लागला नंतर केळीच्या वनात जाऊन आणि कर्णिकार वृक्षातून इकडे तिकडे सीतेच्या दृष्टीस पडावें, या उद्देशानें मंद गतीचें अवलंबन करून कमलासारख्या अद्भुत पृष्ठभागानें युक्त असलेला तो महामृग झळकूं लागला, रामाश्रमाजवळ तो यथेष्ठ संचार करूं लागला आणि एकवार आश्रम सोडून गेल्यावर पुनरपि परत येऊन तो श्रेष्ठ मृग हिंडूं लागला क्षणात सत्वर आश्रम सोडून जाऊन पुनरपि तो परत येऊं लागला आणि पुनरपि क्रीडा करू लागून पुनरपि भूमीवर बसूं लागला. आश्रमाच्या द्वाराशीं येऊन हरिणाच्या कळपाकडे जाऊं लागला आणि पुनरपि त्या मृगांच्या कळपासह परत येऊं लागला. मृगरूप धारण केलेला तो राक्षस सीतेची दृष्टि आपल्याकडे जावी, अशी इच्छा धरून आश्चर्यकारक

राक्षसः सोऽपि तान्वन्यान्मृगान्मृगवधे रतः।
प्रच्छादनार्थं भावस्य न भक्षयति संस्पृशन् २९
तस्मिन्नेव ततः काले वैदेही शुभलोचना।
कुसुमापचये व्यग्रा पादपानत्यवर्तत ३०
कर्णिकारानशोकांश्च चूतांश्च मदिरेक्षणा।
कुसुमान्यपचिन्वन्ती चचार रुचिरानना ३१
अनर्हा वनवासस्य सा तं रत्नमयं मृगम्।
मुक्तामणिविचित्राङ्गं ददर्श परमाङ्गना ३२
तं वै रुचिरदन्तोष्ठं रूप्यधातुतनूरुहम्।
विस्मयोत्फुल्लनयना सस्नेहं समुदैक्षत ३३
स च तां रामदयितां पश्यन्मायामयो मृगः।
विचचार ततस्तत्र दीपयन्निव तद्वनम् ३४
अदृष्टपूर्वं दृष्ट्वा तं नानारत्नमयं मृगम्।

मंडलावर उड्या मारीत मारीत हिंडूं लागला, तेव्हां त्या वनामध्यें संचार करणारे जे दुसरे मृग होते ते सर्व त्याच्याकडे पाहून जवळ येऊं लागले आणि वास घेऊन दशदिशा पळूं लागले. परंतु तो राक्षस जरी मृगवधाविषयीं तत्पर असे तरी आपलें स्वरूप गुप्त राखण्याकरितां स्पर्शास्पर्श झाला असताही त्या वन्यमृगाना भक्षण करीत नसे. असो. शुभ नेत्रानीं युक्त असलेली विदेहकन्या सीता त्याच वेळीं पुष्पें तोडण्यामध्यें गर्क होऊन झाडाखालून चालली होती. मदिरेसारखे आरक्तवर्ण नेत्र व सुंदर मुख यानीं युक्त असलेली ती सीता कर्णिकार, अशोक आणि आम्र या वृक्षाचीं फुलें तोडीत तोडीत चालली. नंतर जातां जाता वनवासाची लहानपणापासून संवय नसलेल्या त्या उत्कृष्ट स्त्रीनें मोत्यें आणि हिरे याच्या योगानें ज्याचें शरीर अद्भुत दिसत आहे असा तो रत्नमय मृग अवलोकन केला व मनोहर दंत आणि ओष्ठ व रुप्याचे केस यानीं युक्त असलेल्या त्या मृगाकडे आश्चर्यानें जिचे नेत्र प्रफुल्लित झालेले आहेत अशी ती सीता पाहूं लागली. तेव्हां त्या रामप्रिय सीतेला अवलोकन केल्यावर तो मायामृग तें वन प्रकाशित करीतच कीं काय, तेथें संचार करूं लागला आणि

३५
विस्मयं परमं सीता जगाम जनकात्मजा
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥४२॥[१३२९]

त्रिचत्वारिंशः सर्गः ।

सा तं संप्रेक्ष्य सुश्रोणी कुसुमानि विचिन्वती । १
हेमराजतवर्णाभ्यां पार्श्वाभ्यामुपशोभितम्
प्रहृष्टा चानवद्याङ्गी मृष्टहाटकवर्णिनी । २
भर्तारमपि चक्रन्द लक्ष्मणं चैव सायुधम्
आहूयाहूय च पुनस्तं मृगं साधु वीक्षते । ३
आगच्छागच्छ शीघ्रं वै आर्यपुत्र सहानुज
तावाहूतौ नरव्याघ्रौ वैदेह्या रामलक्ष्मणौ । ४
वीक्षमाणौ तु तं देशं तदा ददृशतुर्मृगम्
शङ्कमानस्तु तं दृष्ट्वा लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् । ५
तमेवैनमहं मन्ये मारीचं राक्षसं मृगम्
चरन्तो मृगयां हृष्टाः पापेनोपाधिना वने ।

असें झाले असतां पूर्वी कधींही न पाहिलेला असा तो अनेकरत्नमय मृग अवलोकन करून जनककन्या सीतेला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें.

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डापैकी बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

सुवर्ण आणि रौप्यवर्णांनीं युक्त असलेल्या बरगड्यानीं सुशोभित असलेल्या त्या मृगाला पाहून उत्कृष्ट कमर, निर्दोष अवयव व शुद्ध सुवर्णासारखी कांति यांनीं युक्त असलेली ती सीता फुलें तोडतां तोडतां आनंदित झाली व आयुधासह सज्ज होऊन येण्याबद्दल लक्ष्मणाला व भर्त्या रामाला हाका मारूं लागली. आणि " हे आर्यपुत्रा ! कनिष्ठ भ्रात्यासह इकडे लौकर या " अशा हाका मारून पुनः तो त्या मृगाकडे टक लावून पाहूं लागली. तेव्हां सीतेनें हाक मारल्यावर पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मण त्या प्रदेशाकडे पाहूं लागले असता एक मृग त्यांनीं पाहिला आणि त्या मृगाला पाहताक्षणीं लक्ष्मण सशंक होऊन म्हणाला, " हाच तो मृगरूप धारण करणारा मारीच राक्षस असावा असें मला वाटतें. हे

अनेन निहता राम राजानः पापरूपिणा ६
अस्य मायाविदो मायामृगरूपमिदं कृतम् ।
भानुमत्पुरुषव्याघ्र गन्धर्वपुरसंनिभम् ७
मृगो ह्येवंविधो रत्नविचित्रो नास्ति राघव ।
जगत्यां जगतीनाथ मायैषा हि न संशयः ८
एवं ब्रुवाणं काकुत्स्थं प्रतिवार्य शुचिस्मिता ।
उवाच सीता संहृष्टा छद्मना हृतचेतना ९
आर्यपुत्राभिरामोऽसौ मृगो हरति मे मनः ।
आनयैनं महाबाहो क्रीडार्थं नो भविष्यति १०
इहाश्रमपदेऽस्माकं बहवः पुण्यदर्शनाः ।
मृगाश्चरन्ति सहिताश्चमराः सृमरास्तथा ११
ऋक्षाः पृषतसङ्घाश्च वानराः किंनरास्तथा ।
विहरन्ति महाबाहो रूपश्रेष्ठा महाबलाः १२
न चान्यः सदृशो राजन् दृष्टः पूर्वं मृगो मया ।

रामा ! आनंदानें राजे मृगया करीत असताना याच पापी दुष्टानें कपट करून त्याचा वध केलेला आहे हे पुरुषश्रेष्ठा ! गधर्वनगरासारखें वरून रमणीय आणि प्रकाशयुक्त असें जें हें मृगरूप यानें धारण केलें आहे, ही त्या मायावी राक्षसाची माया आहे कारण हे राघवा ! अशा प्रकारच्या रत्नाच्या योगानें चित्रविचित्र असलेला मृग पृथ्वीमध्यें असणें शक्यच नाहीं. म्हणून हे पृथ्वीपते ! ही निःसंशय याची माया आहे " ( १–८ )

याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न लक्ष्मण बोलत असताना मारीच राक्षसाच्या कपटानें भान न राहिल्यासारखी झालेली ती सुहास्यवदना सीता आनंदित होऊन व लक्ष्मणाचा निषेध करून म्हणाली, " हे आर्यपुत्रा ! हा सुंदर मृग माझें मन हरण करीत आहे यास्तव हे महापराक्रमसंपन्ना ! याला आपण घेऊन या, आपल्या करमणुकीला हा उपयोगी पडेल आपल्या आश्रमांत मनोहर आकृतींनीं युक्त असे चमर, सृमर वगैरे अनेक प्रकारचे मृग एकत्र संचार करीत असतात आणि हे महापराक्रमसंपन्ना ! अस्वलें, पृषत मृगाचे कळप, वानर

तेजसा क्षमया दीप्त्या यथाऽयं मृगसत्तमः १३
नानावर्णविचित्राङ्गो रत्नभूतो महाव्रतः ।
द्योतयन्वनमव्यग्रं द्योतते शशिसंनिभः १४
अहो रूपमहो लक्ष्मीः स्वरसंपच्च शोभना ।
मृगोऽद्भुतो विचित्राङ्गो हृदयं हरतीव मे १५
यदि ग्रहणमभ्येति जीवन्नेव मृगस्तव ।
आश्चर्यभूतं भवति विस्मयं जनयिष्यति १६
समाप्तवनवासानां राज्यस्थानां च नः पुनः ।
अन्तःपुरे विभूषार्थो मृग एष भविष्यति १७
भरतस्यार्यपुत्रस्य श्वश्रूणां मम च प्रभो ।
मृगरूपमिदं दिव्यं विस्मयं जनयिष्यति १८
जीवन्न यदि तेऽभ्येति ग्रहणं मृगसत्तमः ।
अजिनं नरशार्दूल रुचिरं तु भविष्यति १९
निहतस्यास्य सत्त्वस्य जाम्बूनदमयत्वचि ।
शष्पबृस्यां विनीतायामिच्छाम्यहमुपासितुम् २०

आणि रूपश्रेष्ठ असे महाबलाढ्य किंवर विहार करीत असतात हे भूपते ! तेज, सौम्यपणा आणि देहकांति यांच्या योगानें या श्रेष्ठ मृगासारखा मृग पूर्वी मी कधीं पाहिलेला नाहीं. नानाप्रकारच्या वर्णांनीं ज्याचें शरीर चित्रविचित्र झालें आहे, असा हा रत्नमय मृग हें वन पूर्णपणें प्रकाशित करीत असून याची प्रभा चंद्रासारखी आल्हादकारक आहे काय हें स्वरूप ! काय ही प्रभा आणि किती तरी हो हा उत्कृष्ट शब्द करीत आहे ! चित्रविचित्र शरीरानें युक्त असलेला हा अद्भुत मृग माझें मन हरण करीत आहे (९-१५)

"हा मृग जर जिवतपणीं आपल्या हातीं लागेल तर तो आश्चर्यरूप होऊन विस्मय उत्पन्न करील वनवास संपूर्ण होऊन आपण पुन्हा राज्यावर जाऊन बसलों असतां अंतःपुरांत शोभेकरितां हा मृग उपयोगी पडेल हे प्रभो ! आर्यपुत्र भरताला, आणि माझ्या सासवांना हें दिव्य मृगरूप विस्मय उत्पन्न करील हे पुरुषश्रेष्ठा ! हा उत्कृष्ट मृग जर जिवंत हातीं लागला नाहीं

कामवृत्तमिदं रौद्रं स्त्रीणामसदृशं मतम् ।
वपुषा त्वस्य सत्त्वस्य विस्मयो जनितो मम ११
तेन काञ्चनरोम्णा तु मणिप्रवरशृङ्गिणा ।
तरुणादित्यवर्णेन नक्षत्रपथवर्चसा १२
बभूव राघवस्यापि मनो विस्मयमागतम् ।
इति सीतावचः श्रुत्वा दृष्ट्वा च मृगमद्भुतम् १३
लोभितस्तेन रूपेण सीतया च प्रचोदितः ।
उवाच राघवो हृष्टो भ्रातरं लक्ष्मणं वचः १४
पश्य लक्ष्मण वैदेह्याः स्पृहामुल्लसितामिमाम् ।
रूपश्रेष्ठतया ह्येष मृगोऽद्य न भविष्यति १५
न वने नन्दनोद्देशे न चैत्ररथसंश्रये ।
कुतः पृथिव्यां सौमित्रे योऽस्य कश्चित्समो मृगः १६
प्रतिलोमानुलोमाश्च रुचिरा रोमराजयः ।
शोभन्ते मृगमाश्रित्य चित्राः कनकबिन्दुभिः १७

तर याचें कातडें मनोहर होईल या मृगाचा वध करून याच्या सुवर्णमय अजिनावर गवती आसन पसरून त्याच्यावर बसण्याची माझी इच्छा आहे. आपल्या कामाकरितां पतीला आज्ञा करणें हें वर्तन स्त्रियांना अयोग्य व भयंकर आहे असें जरी मी समजत आहें, तरी या प्राण्याचें शरीर पाहून मला आश्चर्य वाटत आहे. कारण त्याचे केस सुवर्णाचे असून कांति नक्षत्रांनीं व्याप्त झालेल्या आकाशासारखी दिसत आहे." ( १६-२२ )

याप्रमाणें सीतेचें भाषण ऐकून व तो अद्भुत मृग पाहून रामाचेंही मन विस्मित झालें तेव्हां सीतेनें प्रेरणा केलेला व त्या रूपाला लुब्ध झालेला तो राम आनंदित होऊन भ्राता लक्ष्मणाला म्हणाला, " हे लक्ष्मणा ! वैदेहीला उत्पन्न झालेली ही इच्छा पहा. हा मृग, याचें श्रेष्ठ रूप असल्यामुळें आज जिवंत रहात नाहीं. नंदनवनांत अथवा चैत्ररथ वनांतही या मृगासारखा कोणी मृग नाहीं, मग हे लक्ष्मणा ! पृथ्वीवर तर कोठून असणार? सुवर्णबिंदूंनीं चित्रविचित्र अशा या मृगाच्या अंगावर असलेल्या उलटसुलट रोमपंक्ति मनोहर

पश्यास्य जृम्भमाणस्य दीप्तामग्निशिखोपमाम् ।
जिह्वां मुखान्निःसरन्तीं मेघादिव शतह्रदाम् २८
मसारगल्वर्कमुखः शङ्खमुक्तानिभोदरः ।
कस्य नामानिरूप्योऽसौ न मनो लोभयेन्मृगः २९
कस्य रूपमिदं दृष्ट्वा जाम्बूनदमयप्रभम् ।
नानारत्नमयं दिव्यं न मनो विस्मयं व्रजेत् ३०
मांसहेतोरपि मृगान्विहारार्थं च धन्विनः ।
घ्नन्ति लक्ष्मण राजानो मृगयायां महावने ३१
धनानि व्यवसायेन विचियन्ते महावने ।
धातवो विविधाश्चापि मणिरत्नसुवर्णिनः ३२
तत्सारमखिलं नृणां धनं निचयवर्धनम् ।
मनसा चिन्तितं सर्वं यथा शुक्रस्य लक्ष्मण ३३
अर्थी येनार्थकृत्येन संव्रजत्यविचारयन् ।
तमर्थमर्थशास्त्रज्ञाः प्राहुरर्थ्याः सुलक्ष्मण ३४

दिसत आहेत मेघातून निघणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें हा जांभया देऊं लागला असतां त्याच्या मुखातून बाहेर निघणारी अग्निज्वालेसारिखी देदीप्यमान जिव्हा तूं पहा. इंद्रनीलमण्याच्या पानपात्राच्या आकृतीसारखें ज्याचें मुख आहे व शंख आणि मोत्यें यासारखी ज्याच्या उदराची कांति आहे, असा हा अनिर्वचनीय मृग कोणाचें बरें मन हरण करणार नाहीं ? (२३-२९)

" सुवर्णमय कांतीनें युक्त आणि नानाप्रकारच्या रत्नांनी भरलेलें असें हें दिव्य रूप पाहून कोणाच्या बरें मनाला आश्चर्य वाटणार नाहीं ? हे लक्ष्मणा ! मांसाकरितां आणि करमणुकीकरितां धनुर्धारी राजे महावनामध्यें मृगया करीत असतांना मृगाचा वध करतात आणि महावनांत हिरे, रत्नें, सुवर्ण इत्यादिकांसह नानाप्रकारचे धातु, या वस्तु राजे गोळा करीत असतात म्हणून हे लक्ष्मणा! महारूप बनलेल्या पुरुषाला इच्छामात्रानें सिद्ध झालेल्या सर्व भोग्य वस्तु ज्याप्रमाणें सर्व द्रव्यापेक्षां श्रेष्ठ वाटतात, त्याचप्रमाणें कोशाची अभिवृद्धि करणारें तें वनांतील संपूर्ण धन पुरुषांना अत्यंत प्रशस्त वाटत असतें. हे उत्कृष्ट लक्ष्मणा!

एतस्य मृगरत्नस्य परार्ध्ये काञ्चनत्वचि ।
उपवेक्ष्यति वैदेही मया सह सुमध्यमा ३५
न कादली न प्रियकी न प्रवेणी न चाविकी ।
भवेदेतस्य सदृशी स्पर्शेऽनेनेति मे मतिः ३६
एष चैव मृगः श्रीमान्यश्च दिव्यो नभश्चरः ।
उभावेतौ मृगौ दिव्यौ तारामृगमहीमृगौ ३७
यदि वायं तथा यन्मां भवेद्वदसि लक्ष्मण ।
मायैषा राक्षसस्येति कर्तव्योऽस्य वधो मया ३८
एतेन हि नृशंसेन मारीचेनाकृतात्मना ।
वने विचरता पूर्वं हिंसिता मुनिपुङ्गवाः ३९
उत्थाय बहवो येन मृगयायां जनाधिपाः ।
निहताः परमेष्वासास्तस्माद्वध्यस्त्वयं मृगः ४०
पुरस्तादिह वातापिः परिभूय तपस्विनः ।
उदरस्थो द्विजान्हन्ति स्वगर्भोऽश्वतरीमिव ४१

अर्थ संपादन करणें हें कर्तव्यकर्म आहे असें समजून ज्याच्या प्राप्तीकरितां अर्थेच्छु पुरुष विचार न करितांच चालता होतो, त्याला अर्थ संपादन करण्याविषयीं चतुर असलेले अर्थशास्त्रवेत्ते अर्थ असें म्हणतात. तेव्हां श्रेष्ठ मृगाच्या उत्कृष्ट सुवर्णमय अजिनावर सुंदरी सीता माझ्यासह बसेल. कदली व प्रियकी नांवाचे मृग, बोकड अथवा मेंढ्या यापैकीं कोणाचेंही अजिन मृगाच्या अजिनासारखें मृदु नाहीं, असें मला वाटतें. हा श्रीमान् मृग आणि आकाशांत संचार करणारा ( मृगनक्षत्ररूप ) दिव्य मृग असे तारामृग व भूमृग हे दोनच दिव्य मृग आहेत. ( ३०–३७ )

" आतां हे लक्ष्मणा ! ही राक्षसाची माया आहे असें जें मला तूं म्हणत आहेस त्याप्रमाणें जर हा असेल तर याचा वध मला कर्तव्यच आहे. कारण या-इंद्रियाधीन असलेल्या दुष्ट मारीचानें वनात संचार करतां करतां पूर्वी मुनिश्रेष्ठांचा वध केला आहे आणि मृगयेमध्यें अनेक महाधनुर्धारी राजे यानें प्रादुर्भूत होऊन मारले आहेत. म्हणून, या प्राण्याचा वध केलाच पाहिजे. स्वतःच्या

स कदाचिच्चिराल्लोके आससाद महामुनिम् ।
अगस्त्यं तेजसा युक्तं भक्ष्यस्तस्य बभूव ह ४२
समुत्थाने च तद्रूपं कर्तुकामं समीक्ष्य तम् ।
उत्स्मयित्वा तु भगवान्वातापिमिदमब्रवीत् ४३
त्वयाऽविगण्य वातापे परिभूताश्च तेजसा ।
जीवलोके द्विजश्रेष्ठास्तस्मादसि जरां गतः ४४
तद्रक्षोऽपि न भवेदेव वातापिरिव लक्ष्मण ।
मद्विधं योऽतिमन्येत धर्मनित्यं जितेन्द्रियम् ४५
भवेद्धतोऽयं वातापिरगस्त्येनेव मा गतः ।
इह त्वं भव संनद्धो यन्त्रितो रक्ष मैथिलीम् ४६
अस्यामायत्तमस्माकं यत्कृत्यं रघुनन्दन ।
अहमेनं वधिष्यामि ग्रहीष्याम्यथवा मृगम् ४७

उदरात असलेला गर्भ ज्याप्रमाणें खेचरीचा वध करतो, त्याप्रमाणें उदरांत असलेल्या वातापीनें या ठिकाणीं पूर्वी असंख्य ब्राह्मणांचा फसवून वध केला आहे. असें होतां होतां पुष्कळ दिवस झाल्यावर त्या वातापीची तेजस्वी अगस्त्य महर्षीशीं गाठ पडली आणि तो त्याचें भक्ष्य झाला. तदनंतर (श्राद्ध समाप्त होऊन) ब्राह्मण उठण्याचे वेळीं आपलें राक्षसरूप प्रकट करण्याची तो वातापि इच्छा करीत आहे असें आढळून आल्यावर भगवान् अगस्त्यमुनि किंचित् हंसून त्याला म्हणाले, 'हे वातापे! तूं पापाचा विचार न करतां या जगतामध्यें स्वसामर्थ्यानें श्रेष्ठ ब्राह्मणाचा वध केला आहेस आणि म्हणूनच तू आता जिरून गेला आहेस' (३८-४४)

"तेव्हां जितेंद्रिय राहून नेहमीं धर्मानें वागणाऱ्या माझ्यासारख्याचेंही अतिक्रमण करणाऱ्या या मारीच राक्षसाचा, हे लक्ष्मणा! अगस्त्यमुनींच्या हातून वध पावलेल्या वातापीप्रमाणें माझ्या हातून वध होईल. सारांश, अगस्त्यांच्या हातून ज्याप्रमाणें वातापीचा वध झाला, त्याप्रमाणें माझ्याकडे आलेल्या या मारीचाचा वध होईल. हे लक्ष्मणा! तूं येथें सज्ज रहा आणि प्रयत्नपूर्वक सीतेचें रक्षण कर. हे रघुनंदना! आम्हाला जें करावयाचें आहे, तें सर्व या सीतेवर

यावद्गच्छामि सौमित्रे मृगमानयितुं द्रुतम् ।
पश्य लक्ष्मण वैदेह्या मृगत्वचि गतां स्पृहाम् ४८
त्वचा प्रधानया ह्येष मृगोऽद्य न भविष्यति ।
अप्रमत्तेन ते भाव्यमाश्रमस्थेन सीतया ४९
यावत्पृषतमेकेन सायकेन निहन्म्यहम् ।
हत्वैतच्चर्म आदाय शीघ्रमेष्यामि लक्ष्मण ५०
प्रदक्षिणेनातिबलेन पक्षिणा जटायुषा बुद्धिमता च लक्ष्मण ।
भवाप्रमत्तः प्रतिगृह्य मैथिलीं प्रतिक्षणं सर्वत एव शङ्कितः ५१

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मीकीय आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रिचत्वारिंश सर्ग ४३[१३८०]

चतुश्चत्वारिंश सर्ग ।

तथा तु त समुद्दिश्य भ्रातरं रघुनन्दन ।
बबन्धासिं महातेजा जाम्बूनदमयत्सरुम् । १
ततस्त्रिविनतं चापमादायात्मविभूषणम् ।
आबध्य च कलापौ द्वौ जगामोदग्रविक्रम २

---

अवलंबून आहे तेव्हां मी या मृगाचा वध तरी करीन किंवा याला जिवंत तरी धरून आणीन हे सुमित्रानंदना! मी मृग आणण्याकरितां सत्वर जातों कारण हे लक्ष्मणा! कृष्णाजिनासबधानें सीतेला इच्छा झाली आहे निकडे तू लक्ष दे श्रेष्ठ त्वचेमुळें आज हा मृग जिवंत राहणार नाहीं सीतेसह तू या आश्रमामध्यें रहा हे लक्ष्मणा! मी एका बाणानें या पृषत नावाच्या मृगाचा वध करीन आणि याचें कातडें घेऊन लवकर परत येईन फारच सरळ आणि अतिबलाढ्य अशा या बुद्धिमान् जटायु पक्ष्यासह, हे लक्ष्मणा! सातत्य ताब्यात घेऊन आणि प्रतिक्षणीं सर्व बाजूनीं राक्षसांविषयीं शंकित होऊन तू सावध रहा ' (४८-५१)

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

याप्रमाणें त्या भ्रात्याला सांगितल्यावर महातेजस्वी रघुनंदन रामानें सोन्याची मूठ लावलेलें एक खड्ग घेतलें नंतर तीन ठिकाणीं बाक असलेलें आणि

तं वन्यराजो राजेन्द्रमापतन्तं निरीक्ष्य वै ।
बभूवान्तर्हितस्त्रासात्पुनः संदर्शनेऽभवत् ३
बद्धासिर्धनुरादाय प्रदुद्राव यतो मृगः ।
तं स्म पश्यति रूपेण द्योतयन्तमिवाग्रतः ४
अवेक्ष्यावेक्ष्य धावन्तं धनुष्पाणिर्महावने ।
अतिवृत्तमिवोत्पाताल्लोभयानं कदाचन ५
शङ्कितं तु समुद्भ्रान्तमुत्पतन्तमिवाम्बरम् ।
दृश्यमानमदृश्यं च वनोद्देशेषु केषुचित् ६
छिन्नाभ्रैरिव संवीतं शारदं चन्द्रमण्डलम् ।
मुहूर्तादेव ददृशे मुहुर्दूरात्प्रकाशते ७
दर्शनादर्शनेनैव सोऽपाकर्षत राघवम् ।
स दूरमाश्रमस्यास्य मारीचो मृगतां गतः ८

स्वत.ला भूषण असलेलें असें धनुष्य हातात घेऊन व दोन भाते पाठीशीं बांधून तो उत्कृष्ट पराक्रम करणारा राम निघाला, परंतु तो वनमृगाचा राजा मारीच मागोमाग येत असलेल्या त्या राजाधिराज रामाला अवलोकन करून भीतीनें वारंवार अदृश्य व दृश्य होऊ लागला. जिकडे मृग तिकडे खड्ग लटकावून व धनुष्य हातांत घेऊन राम धावत चालला असता रुपाच्या ओगानें झलकणारा मृग पुढेंच असलेला त्यानें अवलोकन केला. फिरून फिरून मागें पाहून महावनामध्यें धांवत असलेल्या त्या मृगाला धनुर्धारी रामानें अवलोकन केलें. केव्हा तो मृग उडीमुळें टप्प्यातून गेल्यासारखा दिसत असे, केव्हा केव्हा अगदीं जवळ आल्यासारखा दिसून रामाचे ठिकाणीं लोभ उत्पन्न करीत असे. केव्हां बाण लागेल या भीतीनें शंकित झाल्यासारखें दर्शवी, केव्हां बेफाम होऊन आकाशांत उंच उंच उड्या मारी आणि काहीं वनप्रदेशांत केव्हा केव्हां दृश्य व अदृश्य होत असे. विस्खलित ढगांनीं व्याप्त केलेल्या शरदृतूंतील चंद्रमंडलाप्रमाणें तो मृग क्षणात दिसूं लागे आणि क्षणात फारच दूर जाऊन वारंवार झळकूं लागे. (१-७)

मृगरूप धारण केलेला तो मारीच राक्षस या आश्रमापासून दूर गेल्यावर

आसीत्क्रुद्धस्तु काकुत्स्थो विवशस्तेन मोहितः।
अथावतस्थे सुश्रान्तश्छायामाश्रित्य शाद्वले ९
स तमुन्मादयामास मृगरूपो निशाचरः।
मृगैः परिवृतोऽथान्यैरदूरात्प्रत्यदृश्यत १०
गृहीतुकामं दृष्ट्वा तं पुनरेवाभ्यधावत।
तत्क्षणादेव संत्रासात्पुनरन्तर्हितोऽभवत् ११
पुनरेव ततो दूराद्वृक्षखण्डाद्विनिःसृतः।
दृष्ट्वा रामो महातेजास्तं हन्तुं कृतनिश्चयः १२
भूयस्तु शरमुद्धृत्य कुपितस्तत्र राघवः।
सूर्यरश्मिप्रतीकाशं ज्वलन्तमरिमर्दनम् १३
संधाय स दृढं चापि विकृष्य बलवद्बली।
तमेव मृगमुद्दिश्य ज्वलन्तमिव पन्नगम् १४
मुमोच ज्वलितं दीप्तमस्त्रं ब्रह्मविनिर्मितम्।
स भृशं मृगरूपस्य विनिर्भिद्य शरोत्तमः १५

वारंवार दृश्य व अदृश्य होण्याच्या योगानें त्यानें रामाला आपल्या मागोमाग दूर ओढीत नेलें. नन्तर त्या मृगापुढें अगदीं निरुपाय होऊन काहींएक सुचेनासें झालेला तो कुकुत्स्थकुलोत्पन्न राम अतिशय क्रुद्ध झाला आणि फारच थकून गेल्यामुळें छायेचा आश्रय करून कोमल तृणावर बसला नंतर त्या मृगरूप राक्षसानें त्याला पुनरपि भ्रमात पाडलें आणि इतर मृगांनीं परिवेष्टित झालेला तो मृग दूर दिसूं लागला नंतर तो राम आपल्याला धरणार असें पाहून तो पुन्हा पुढें पळाला व भीतीमुळें पुन्हा तत्क्षणीं गुप्त झाला आणि तेथून दूर असलेल्या वृक्षसमुदायांतून पुन बाहेर पडला. तेव्हां त्याला पाहून महातेजस्वी रामानें त्याचा वध करण्याचा निश्चय केला. (८-१२)

नंतर त्या ठिकाणीं क्रुद्ध झालेल्या बलाढ्य रामानें सूर्यकिरणाप्रमाणें उज्ज्वल असा एक शत्रुनाशक बाण भात्यांतून काढून तो नीट धनुष्याला लावून जोरानें धनुष्य खेचलें आणि देदीप्यमान सर्पाप्रमाणें असलेला तो ब्रह्मदत्त बाण उज्ज्वल व देदीप्यमान अशा ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण करून रामानें त्या मृगावर

मारीचस्यैव हृदयं विभेदाशनिसंनिभः।
तालमात्रमथोत्प्लुत्य न्यपतत्स भृशातुरः १६
व्यनदद्भैरवं नादं धरण्यामल्पजीवितः।
म्रियमाणस्तु मारीचो जहौ तां कृत्रिमां तनुम् १७
स्मृत्वा तद्वचनं रक्षो दध्यौ केन तु लक्ष्मणम्।
इह प्रस्थापयेत्सीता तां शून्ये रावणो हरेत् १८
स प्राप्तकालमाज्ञाय चकार च ततः स्वनम्।
सदृशं राघवस्येव हा सीते लक्ष्मणेति च १९
तेन मर्मणि निर्विद्धं शरेणानुपमेन हि।
मृगरूपं तु तत्त्यक्त्वा राक्षसं रूपमास्थितः २०
चक्रे स सुमहाकायो मारीचो जीवितं त्यजन्।
तं दृष्ट्वा पतितं भूमौ राक्षसं भीमदर्शनम् २१
रामो रुधिरसिक्ताङ्गं चेष्टमानं महीतले।
जगाम मनसा सीतां लक्ष्मणस्य वचः स्मरन् २२

सोडला तेव्हां त्या वज्रप्राय उत्कृष्ट बाणानें मृगरूप मारीच राक्षसाला अतिशय विद्ध करून त्याचें हृदय फोडून टाकलें असतां अत्यंत व्याकुल झालेला तो मारीच एक उडी मारून खालीं पडला. नंतर मरण्याच्या बेतात आलेला तो मारीच पृथ्वीवर भयंकर गर्जना करू लागला व मरता मरता त्या मारीचानें त्या कृत्रिम रूपाचा त्याग केला. (१३-१७)

इतक्यांत त्या रावणाच्या भाषणाचें स्मरण झाल्यावर आपण कोणता उपाय योजिला असतां सीता लक्ष्मणाला इकडे पाठवून देईल आणि शून्य आश्रमामध्यें जाऊन रावणाला तिला धरून नेता येईल, याविषयीं त्यानें विचार केला आणि रावणाच्या भाषणाप्रमाणें वागण्याचा समय आला, असें जाणून त्यानें " हे सीते ! हे लक्ष्मणा ! " असा अगदीं रामासारखा सूर काढून आरोळ्या दिल्या व नंतर त्या अनुपम बाणाच्या योगानें ज्याच्या मर्माचा भेद झाला आहे अशा त्या मृगरूपाचा त्याग करून त्यानें राक्षसरूप धारण केलें आणि प्राण सोडतांना त्या मारीचानें आपलें शरीर फार मोठें केलें. तेव्हां

मारीचस्य तु मायैषा पूर्वोक्ता लक्ष्मणेन तु ।
तत्तथा ह्यभवच्चाद्य मारीचोऽयं मया हत २३
हा सीते लक्ष्मणेत्येवमाक्रुश्य तु महास्वनम् ।
ममार राक्षसः सोऽयं श्रुत्वा सीता कथं भवेत् २४
लक्ष्मणश्च महाबाहुः कामवस्थां गमिष्यति ।
इति संचिन्त्य धर्मात्मा रामो हृष्टतनूरुहः २५
तत्र रामं भयं तीव्रमाविवेश विषादजम् ।
राक्षसं मृगरूपं तं हत्वा श्रुत्वा च तत्स्वनम् २६
निहत्य पृषतं चान्यं मांसमादाय राघवः ।
त्वरमाणो जनस्थानं ससाराभिमुखं तदा २७

इत्यार्षे श्रीमद्रा॰वाल्मी॰ आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ४४ [१४०७]

भयंकर मुद्रेनें युक्त, भूमीवर पडलेला आणि रक्ताचा सडा अंगावर होऊन भूतलावर तडफड करीत असलेला तो राक्षस पाहिल्यावर लक्ष्मणाच्या भाषणाचें स्मरण होऊन रामाला सीतेची आठवण झाली (१८-२२)

आणि तो म्हणाला, " लक्ष्मणानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें ही मारीच राक्षसाची माया उघडकीला आली, आज ह्या मारीचाचा माझ्या हातून वध झाला आणि " हे सीते, हे लक्ष्मणा " असा उच्च स्वरानें आक्रोश करून तो हा राक्षस मृत्यु पावला तेव्हां या आरोळ्या ऐकून सीतेची कशी काय अवस्था होईल ? आणि महापराक्रमी लक्ष्मणाची तरी काय अवस्था होऊन जाईल ? " अशा विचार मनात येऊन धर्मात्म्या रामाच्या अंगावर काटा उभा राहिला आणि खेद झाल्यामुळें त्याला फारच भीति वाटू लागली याप्रमाणें त्या मृगरूप राक्षसाचा वध करून व मरतां मरता त्यानें केलेली ती गर्जना ऐकून रामानें दुसरा एक पृषत मृग मारला आणि त्याचें मांस घेऊन तो राघव जनस्थानाकडे तोंड करून सत्वर चालला (२३-२७)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्य कांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४४॥

पञ्चचत्वारिंशः सर्गः ।

आर्तस्वरं तु तं भर्तुर्विज्ञाय सदृशं वने ।
उवाच लक्ष्मणं सीता गच्छ जानीहि राघवम् १
नहि मे जीवितं स्थाने हृदयं वाऽवतिष्ठते ।
क्रोशतः परमार्तस्य श्रुतः शब्दो मया भृशम् २
आक्रन्दमानं तु वने भ्रातरं त्रातुमर्हसि ३
तं क्षिप्रमभिधाव त्वं भ्रातरं शरणैषिणम् ।
रक्षसां वशमापन्नं सिंहानामिव गोवृषम् ४
न जगाम तथोक्तस्तु भ्रातुराज्ञाय शासनम् ।
तमुवाच ततस्तत्र क्षुभिता जनकात्मजा ५
सौमित्रे मित्ररूपेण भ्रातस्त्वमसि शत्रुवत् ।
यस्त्वमस्यामवस्थायां भ्रातरं नाभिपद्यसे ६
इच्छसि त्वं विनश्यन्तं रामं लक्ष्मण मत्कृते ।
लोभात्तु मत्कृते नूनं नानुगच्छसि राघवम् ७
व्यसनं ते प्रियं मन्ये स्नेहो भ्रातरि नास्ति ते ।

---

भर्त्याच्या शब्दासारखा तो दीन शब्द वनांत ऐकून सीता लक्ष्मणाला म्हणाली, " जा आणि रामाचा काय वृत्तांत आहे तो पहा अतिशय व्याकुल होऊन आक्रोश करीत असलेल्या रामाचा शब्द वारंवार माझ्या कानीं येत आहे यामुळें माझ्या जिवांत जीव नाहीं अथवा माझें मनही स्वस्थ नाहीं तेव्हां वनात ओरडत असलेल्या आपल्या भ्रात्याला संकटांतून तारणें तुम्हांला योग्य आहे याकरितां त्या शरणार्थी भ्रात्याकडे तुम्ही सत्वर धाव घ्या सिंहाच्या तावडींत सांपडलेल्या बैलाप्रमाणें तो राक्षसांचे तावडींत सांपडला आहे " (१-४)

याप्रमाणें सीतेनें जरी लक्ष्मणाला सांगितलें तरी भ्रात्याची आज्ञा लक्षात आणून तो तेथून गेला नाहीं तेव्हां जनककन्या क्षुब्ध होऊन त्याला म्हणाली, " हे लक्ष्मणा ! तू मित्ररूपानें आपल्या भ्रात्याचा शत्रु आहेस, कारण असल्या अवस्थेंतही तूं आपल्या भ्रात्याकडे जात नाहींस हे लक्ष्मणा ! तू माझ्याकरिता राम नाश पावण्याची इच्छा करीत आहेस आणि मजविषयीं लोभ धरूनच तूं

तेन तिष्ठसि विस्रब्धं तमपश्यन्महाद्युतिम् ८
किं हि संशयमापन्ने तस्मिन्निह मया भवेत् ।
कर्तव्यमिह तिष्ठन्त्या यत्प्रधानस्त्वमागतः ९
एवं ब्रुवाणां वैदेहीं बाष्पशोकसमन्विताम् ।
अब्रवील्लक्ष्मणस्त्रस्तां सीतां मृगवधूमिव १०
पन्नगासुरगन्धर्वदेवदानवराक्षसैः ।
अशक्यस्तव वैदेहि भर्ता जेतुं न संशयः ११
देवि देवमनुष्येषु गन्धर्वेषु पतत्रिषु ।
राक्षसेषु पिशाचेषु किन्नरेषु मृगेषु च १२
दानवेषु च घोरेषु न स विद्येत शोभने ।
यो रामं प्रतियुध्येत समरे वासवोपमम् १३
अवध्यः समरे रामो नैवं त्वं वक्तुमर्हसि ।
न त्वामस्मिन्वने हातुमुत्सहे राघवं विना १४
अनिवार्यं बलं तस्य बलैर्बलवतामपि ।
त्रिभिर्लोकैः समुदितैः सेश्वरैः सामरैरपि १५

खरोखर रामाकडे जात नाहींस. रामाचें संकटच तुला प्रिय आहे असें मला वाटतें. भ्रात्याचे ठिकाणीं तुझें प्रेम नाहीं आणि म्हणूनच तो महातेजस्वी भ्राता डोळ्याआड झाला असताही तूं निःशंकपणें येथें राहिला आहेस. राम तुला मुख्य असून तूं जर येथें आला आहेस तर तो राम संकटांत सापडला असता मला तरी येथें जिवंत राहून काय करावयाचें आहे ! " (५–९)

याप्रमाणें अश्रु व शोक यानीं युक्त होऊन व हरिणीप्रमाणें त्रस्त होऊन भाषण करीत असलेल्या त्या सीतेला लक्ष्मण म्हणाला, " हे वैदेहि ! पन्नग, असुर, गंधर्व, देव, दानव आणि राक्षस याच्या हातून तुझ्या भर्त्याचा पराजय होणें निःसंशय अशक्य आहे. हे देवि ! देव, मनुष्य, गंधर्व, पक्षी, राक्षस, पिशाच, किन्नर, मृग आणि घोर दानव यांपैकीं इंद्रतुल्य रामाशीं समरांगणांत युद्ध करण्यास समर्थ असा, हे कल्याणि ! कोणीही नाहीं. समरांगणात राम अवध्य आहे. तेव्हा तुला या वनात एकटी टाकून जाण्याची माझी इच्छा नाहीं.

हृदयं निर्वृतं तेऽस्तु संतापस्त्यज्यतां तव।
आगमिष्यति ते भर्ता शीघ्रं हत्वा मृगोत्तमम् १६
न स तस्य स्वरो व्यक्तं न कश्चिदपि दैवतः।
गन्धर्वनगरप्रख्या माया तस्य च रक्षसः १७
न्यासभूताऽसि वैदेहि न्यस्ता मयि महात्मना।
रामेण त्वं वरारोहे न त्वां त्यक्तुमिहोत्सहे १८
कृतवैराश्च कल्याणि वयमेतैर्निशाचरैः।
खरस्य निधने देवि जनस्थानवधं प्रति १९
राक्षसा विविधा वाचो व्याहरन्ति महावने।
हिंसाविहारा वैदेहि न चिन्तयितुमर्हसि २०
लक्ष्मणेनैवमुक्ता तु क्रुद्धा संरक्तलोचना।
अब्रवीत्परुषं वाक्यं लक्ष्मणं सत्यवादिनम् २१
अनार्य करुणारम्भ नृशंस कुलपांसन।

बलाढ्य लोकांच्याही सामर्थ्यानें त्याच्या बलाचा प्रतिकार होणें शक्य नाहीं व देव आणि ईश्वर यासह त्रैलोक्यातील लोक एकत्र झाले असतानाही त्याच्या सामर्थ्याचें त्याच्यानें निवारण होणें शक्य नाहीं. तुझें चित्त स्वस्थ असूं दे; तूं संताप सोडून दे; तो श्रेष्ठ मृग मारून लौकरच तुझा भर्ता परत येईल.(१०–१६)

"त्या रामाचा हा स्वर निःसंशय नव्हे व हा काहीं देवताचाही ध्वनि नव्हे. गंधर्वनगरासारखी ही त्या राक्षसाची मिथ्या माया आहे. हे वैदेहि! तूं ठेवीप्रमाणें आहेस आणि हे सुंदरि! महात्म्या रामानें तुला माझे स्वाधीन केली आहे म्हणून तुझा त्याग करण्याची माझी इच्छा नाहीं हे कल्याणि! हे देवि! खराचा वध होऊन जनस्थानाचा वध झाला, यामुळें राक्षस आमच्याशीं वैर धरून आहेत आणि हे विदेहराजकन्ये! हिंसेकरितां विहार करणारे राक्षस महावनांत नानाप्रकारचे शब्द उच्चारीत असतात. तेव्हां तूं त्याचा विचार करूं नको." (१७–२०)

याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतांही सीता क्रुद्ध झाली आणि डोळे लाल करून सत्यवादी लक्ष्मणाशीं मर्मभेदक भाषण करूं लागली. "सज्जनांना

अहं तव प्रियं मन्ये रामस्य व्यसनं महत् २२
रामस्य व्यसनं दृष्ट्वा तेनैतानि प्रभाषसे।
नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत् २३
त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु।
सुदुष्टस्त्वं वने राममेकमेकोऽनुगच्छसि २४
मम हेतोः प्रतिच्छन्नः प्रयुक्तो भरतेन वा।
तन्न सिद्ध्यति सौमित्रे तवापि भरतस्य वा २५
कथमिन्दीवरश्यामं रामं पद्मनिभेक्षणम्।
उपसंश्रित्य भर्तारं कामयेयं पृथग्जनम् २६
समक्षं तव सौमित्रे प्राणांस्त्यक्ष्याम्यसंशयम्।
रामं विना क्षणमपि नैव जीवामि भूतले २७
इत्युक्तः परुषं वाक्यं सीतया रोमहर्षणम्।
अब्रवील्लक्ष्मणः सीतां प्राञ्जलिः स जितेन्द्रियः २८
उत्तरं नोत्सहे वक्तुं दैवतं भवती मम।

अयोग्य अशा दयेचें ढोंग करून माझें रक्षण करणाऱ्या दुष्टा ! हे कुलदूषका ! मला वाटतें रामावर मोठें सकट येणें तुला प्रिय आहे आणि म्हणूनच रामावर सकट आलेलें पाहून तू अशीं भाषणें करीत आहेस, परतु हे लक्ष्मणा ! नेहमीं आपलें स्वरूप गुप्त ठेवून वागणाऱ्या तुझ्यासारख्या दुष्ट शत्रूचे ठिकाणीं अशी पापबुद्धि असणें हें कांहीं आश्चर्य नव्हे ! तू अत्यत दुष्ट आहेस आणि माझ्याकरिता अथवा भरतानें सागितलें असल्यामुळें, आपलें स्वरूप गुप्त ठेवून वनात असलेल्या एकट्या रामाच्या मागोमाग तू एकटा जात आहेस, परतु हे लक्ष्मणा ! तुझा अथवा त्या भरताचा तो मनोरथ सिद्धीस जाणार नाहीं अरे! नीलकमला प्रमाणें श्यामवर्ण आणि कमलपत्रासारख्या नेत्रानीं युक्त अशा भर्त्या रामाचा सहवास करून मी आता परपुरुषाची कशी बरें इच्छा करीन ? हे लक्ष्मणा ! मी तुझ्या समक्ष नि सशय प्राणत्याग करीन, रामावाचून एक क्षणभरही मी भूतलावर जिवत राहणार नाहीं " (२१-२७)

याप्रमाणें अगावर काटा आणणारें मर्मभेदक भाषण सीतेनें लक्ष्मणाशी

वाक्यमप्रतिरूपं तु न चित्रं स्त्रीषु मैथिलि  २९
स्वभावस्त्वेष नारीणामेषु लोकेषु दृश्यते।
विमुक्तधर्माश्चपलास्तीक्ष्णा भेदकराः स्त्रियः  ३०
न सहे हीदृशं वाक्यं वैदेहि जनकात्मजे।
श्रोत्रयोरुभयोर्मध्ये तप्तनाराचसंनिभम्  ३१
उपशृण्वन्तु मे सर्वे साक्षिणो हि वनेचराः।
न्यायवादी यथा वाक्यमुक्तोऽहं परुषं त्वया  ३२
धिक्त्वामद्य विनश्यन्तीं यन्मामेवं विशङ्कसे।
स्त्रीत्वाद्दुष्टस्वभावेन गुरुवाक्ये व्यवस्थितम्  ३३
गच्छामि यत्र काकुत्स्थः स्वस्ति तेऽस्तु वरानने।
रक्षन्तु त्वां विशालाक्षि समग्रा वनदेवताः  ३४
निमित्तानि हि घोराणि यानि प्रादुर्भवन्ति मे।
अपि त्वां सह रामेण पश्येयं पुनरागतः  ३५

केलें असता तो जितेंद्रिय लक्ष्मण हात जोडून सीतेला म्हणाला, "उत्तर देण्याची माझी इच्छा नाहीं, तूं माझें दैवत आहेस आणि हे मैथिलि! स्त्रियाचे ठिकाणीं अयोग्य भाषण ईहीं काहीं मोठें आश्चर्य नव्हे. या लोकांत स्त्रियांचा हा स्वभावच दिसत आहे. स्त्रिया म्हणजे क्रूर, चंचल, धर्माची पर्वा न बाळगणाऱ्या आणि एकमेकांत फूट पाडणाऱ्या अशा असावयाच्याच हे जनककन्ये वैदेहि! दोन्ही कानांत तप्त नाराच बाणासारखें सलत असलेले तुझें हें अशा प्रकारचें भाषण मला सहन होत नाहीं. ज्याअर्थी मी न्यायानें भाषण करीत असता हीं तूं माझ्याशीं मर्मभेदी भाषण करीत आहेस,त्या साक्षी असलेले सर्व वनचर प्राणी मी काय म्हणत आहें, इकडे लक्ष देवोत वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या माझ्या-विषयीं तूं जातीची स्त्री असल्यामुळें दुष्टस्वभावानें अशी शंका घेत आहेस. म्हणून विनाशकाल जवळ आलेल्या तुला धिक्कार असो. हे सुमुखि! जिकडे राम असेल तिकडे मी जातों; तुझें कल्याण असो आणि हे विशालनयने! संपूर्ण वनदेवता तुझें रक्षण करोत. मला भयसूचक घोर चिन्हें दिसत आहेत. यावरून रामासह परत आल्यावर तूं माझ्या दृष्टीस पडशील किंवा नाहीं, हीं शंकाच आहे." (२८-३५)

लक्ष्मणेनैवमुक्ता तु रुदती जनकात्मजा ।
प्रत्युवाच ततो वाक्यं तीव्रबाष्पपरिप्लुता ३६
गोदावरीं प्रवेक्ष्यामि हीना रामेण लक्ष्मण ।
आबंधिष्येऽथवा त्यक्ष्ये विषमे देहमात्मनः ३७
पिबामि वा विषं तीक्ष्णं प्रवेक्ष्यामि हुताशनम् ।
न त्वहं राघवादन्यं कदापि पुरुषं स्पृशे ३८
इति लक्ष्मणमाश्रुत्य सीता शोकसमन्विता ।
पाणिभ्यां रुदती दुःखादुदरं प्रजघान ह ३९
तामार्तरूपां विमना रुदन्तीं सौमित्रिरालोक्य विशालनेत्राम् ।
आश्वासयामास न चैव भर्तुस्तं भ्रातरं किंचिदुवाच सीता ४०
ततस्तु सीतामभिवाद्य लक्ष्मणः कृताञ्जलिः किंचिदभिप्रणम्य ।

---

अवेक्षमाणो बहुशः स मैथिलीं जगाम रामस्य समीपमात्मवान् ४१

इत्यार्षे श्रीमद्रा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चचत्वारिंश: सर्गः ॥४५॥[१४४८]

याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां तीव्र अश्रूंनीं भरून गेलेली ती जनककन्या रडत रडत म्हणाली, " हे लक्ष्मणा ! रामाचा वियोग झाला असता मी गोदावरींत उडी घालीन, गळ्याला फांस लावून घेईन, कड्याविड्यावर उभी राहून तेथून आपला देह लोटून देईन, तीक्ष्ण विष प्राशन करीन अथवा अग्नींत प्रवेश करीन, परंतु रामावाचून इतर पुरुषाला मी कधींही स्पर्श करणार नाहीं." याप्रमाणें लक्ष्मणाला निश्चयपूर्वक सांगून शोकाकुल झालेली सीता रडत रडत आपल्या हातानीं दु:खानें उदर बडवून घेऊं लागली असतां आर्त होऊन रडत असलेल्या त्या विशालनयना सीतेला पाहून लक्ष्मणानें तिचें सांत्वन केलें तथापि भर्त्याच्या त्या भ्रात्याशीं ती सीता कांहींच बोलेना. तेव्हां लक्ष्मणानें सीतेला मनानें अभिवदन करून व किंचित् नम्र होऊन पहात पहात तो लक्ष्मण रामाचे समीप निघून गेला (३६-४१)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकाण्डापैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४५॥

षट्चत्वारिंशः सर्गः ।

तया परुषमुक्तस्तु कुपितो राघवानुजः । १
स विकाङ्क्षन्भृशं रामं प्रतस्थे न चिरादिव
तदासाद्य दशग्रीवः क्षिप्रमन्तरमास्थितः । २
अभिचक्राम वैदेहीं परिव्राजकरूपधृक्
श्लक्ष्णकाषायसंवीतः शिखी छत्री उपानही । ३
वामे चांसेऽवसज्ज्याथ शुभे यष्टिकमण्डलू
परिव्राजकरूपेण वैदेहीमन्ववर्तत । ४
तामाससादातिबलो भ्रातृभ्यां रहितां वने
रहितां सूर्यचन्द्राभ्यां संध्यामिव महत्तमः । ५
तामपश्यत्ततो बालां राजपुत्रीं यशस्विनीम्
रोहिणीं शशिना हीनां ग्रहवद्भृशदारुणः । ६
तमुग्रं पापकर्माणं जनस्थानगता द्रुमाः
संदृश्य न प्रकम्पन्ते न प्रवाति च मारुतः । ७
शीघ्रस्रोताश्च तं दृष्ट्वा वीक्षन्तं रक्तलोचनम्

नंतर तिच्या कठोर भाषणानें रुष्ट झालेला रामाचा कनिष्ठ बंधु लक्ष्मण रामही आपल्याशीं विरुद्ध आहे की काय, अशी शंका आल्यामुळें रामचंद्राकडे जाण्याच्या इच्छेनें सत्वर निघाला. ही संधि साधून संन्याशाचा वेष घेतलेला दशग्रीव रावणही अति सत्वर त्या वैदेहीच्या जवळ आला. त्यानें मनोहर भगवीं वस्त्रें परिधान केलेलीं असून शेंडी, छत्री व जोडे यासह असलेल्या त्याच्या डाव्या खांद्यावर उत्तम प्रकारची काठी आणि कमंडलु हीं लटकलेलीं होतीं. तो अतिबलवान् रावण वनांत दोघा बंधूंनीं रहित असलेल्या त्या वैदेहीकडे संन्याशाच्या वेषानें आला आणि त्यानें सूर्यचंद्रानीं रहित असलेल्या संध्येप्रमाणें शोभणाऱ्या त्या तरुण यशस्विनी राजपुत्रीला पाहिलें तेव्हां ती चंद्रानें रहित रोहिणीप्रमाणें केतुरूप रावणाच्या दृष्टीस पडली. त्या पापकर्म करणाऱ्या उग्र रावणाला अवलोकन करितांच जनस्थानांतील वृक्ष हलेनाशीं झालीं, वारा वाहीनासा झाला, जलद वाहणारे पाण्याचे ओघ आरक्तवर्ण नेत्र असलेल्या त्या रावणाला पाहून हळू

स्तिमितं गन्तुमारेमे भयाद्गोदावरी नदी ।
रामस्य त्वन्तरं प्रेप्सुर्दशग्रीवस्तदन्तरे ८
उपतस्थे च वैदेहीं भिक्षुरूपेण रावणः ।
अभव्यो भव्यरूपेण भर्तारमनुशोचतीम् ९
अभ्यवर्तत वैदेहीं चित्रामिव शनैश्चरः ।
सहसा भव्यरूपेण तृणै कूप इवावृतः १०
अतिष्ठत्प्रेक्ष्य वैदेहीं रामपत्नीं यशस्विनीम् ।
तिष्ठन्संप्रेक्ष्य च तदा पत्नीं रामस्य रावणः ११
शुभां रुचिरदन्तोष्ठीं पूर्णचन्द्रनिभाननाम् ।
आसीनां पर्णशालायां बाष्पशोकाभिपीडिताम् १२
स तां पद्मपलाशाक्षीं पीतकौशेयवासिनीम् ।
अभ्यगच्छत वैदेहीं हृष्टचेता निशाचरः १३
दृष्ट्वा कामशराविद्धो ब्रह्मघोषमुदीरयन् ।
*अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं रहिते राक्षसाधिपः* १४
तामुत्तमां त्रिलोकानां पद्महीनामिव श्रियम् ।
विभ्राजमानां वपुषा रावणः प्रशशंस ह १५

हळू वाहूं लागले व त्याप्रमाणें गोदावरी नदीही मंदमंदच वाहूं लागली (१–८)

आश्रमात रामचंद्र नाहीं असें पाहून तो भव्य असलेला दशग्रीव रावण भिक्षुरूपानें भर्त्याबद्दल शोक करीत असलेल्या त्या वैदेहीकडे भव्य रूप धारण करून आला, तेव्हा चित्रानक्षत्राकडे येणाऱ्या शनैश्चराप्रमाणें आणि तृणांनीं आच्छादित असलेल्या कूपाकडे जाणाऱ्या भव्य पुरुषाप्रमाणें तो रावण वैदेहीजवळ आल्यावर उभ्या उभ्याच रामचंद्राची पत्नी यशस्विनी वैदेही सीतेला उत्कृष्ट दंत व ओष्ठ असलेली, पौर्णिमेच्या चंद्रासारखें मुख असलेली, शोकाश्रूंनीं नेत्र भरून गेलेली, पर्णशालेमध्यें बसलेली, पद्मपत्राप्रमाणें विस्तृत नेत्र असलेली आणि पीतांबर धारण केलेली अशी ती कल्याणी वैदेही सीता त्याच्या दृष्टीस पडली व तिला पाहून त्याला मोठा आनंद झाला. (८–१३)

याप्रमाणें जानकीला पाहून कामबाणांनीं पीडित झालेल्या त्या राक्षसाधिपति

रौप्यकाञ्चनवर्णाभे पीतकौशेयवासिनि ।
कमलानां शुभां मालां पद्मिनीव च बिभ्रती १६
ह्रीः श्रीः कीर्तिः शुभा लक्ष्मीरप्सरा वा शुभानने ।
भूतिर्वा त्वं वरारोहे रतिर्वा स्वैरचारिणी १७
समाः शिखरिणः स्निग्धाः पाण्डुरा दशनास्तव ।
विशाले विमले नेत्रे रक्तान्ते कृष्णतारके १८
विशालं जघनं पीनमूरू करिकरोपमौ ।
एतावुपचितौ वृत्तौ संहतौ संप्रगल्भितौ १९
पीनोन्नतमुखौ कान्तौ स्निग्धतालफलोपमौ ।
मणिप्रवेकाभरणौ रुचिरौ तौ पयोधरौ २०
चारुस्मिते चारुदति चारुनेत्रे विलासिनि ।
मनो हरसि मे रामे नदीकूलमिवाम्भसा २१
करान्तमितमध्यासि सुकेशी संहतस्तनि ।

रावणानें वेदाचा उच्चार केला आणि कोणी नाहीं असें पाहून तो तिच्याशीं बालण्याच्या इच्छेनें त्रैलोक्यामध्यें उत्कृष्ट, कमलरहित लक्ष्मीप्रमाणें शोभणाऱ्या व शरीरानें प्रकाशित होणाऱ्या सीतेला म्हणाला, "हे उत्कृष्ट सुवर्णाप्रमाणें असलेल्या, पीतवस्त्र परिधान करणाऱ्या व लक्ष्मीप्रमाणें कमलाची माला गळ्यात धारण करणाऱ्या सुंदरी जानकि! तू श्री, ऱ्हा, कीर्ति, लक्ष्मी, अप्सरा, उत्तम प्रकारचें मुख असलेली भूति अथवा स्वैर वर्तन करणारी रतीच आहेत कीं काय? तुझे दत एकसारखे, स्निग्ध आणि पांढुरवर्णे असे असून तुझे विशाल आणि स्वच्छ असे नेत्र काळ्या बाहुल्यानीं युक्त आहत व त्याचे प्रांत आरक्तवर्ण आहेत (१४-१८)

"तुझा कटिपश्चाद्भाग विशाल असून तुझ्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणें सरळ आहेत हे तुझे स्तन उच्च असून वर्तुलाकृति, सारखे, आलिंगन देण्यास योग्य, अगें उच्च असलेले, सुंदर तालवृक्षाच्या फळाप्रमाणें मऊ व श्रेष्ठ श्रेष्ठ मणि ज्यावर लोंबत आहेत, असे आहेत हे उत्कृष्ट हास्य करणाऱ्या व रमणीय दंत आणि सुंदर नयन यानीं युक्त असलेल्या विलासिनि जानकि! ज्याप्रमाणें नदी आपल्या उदकानें आपल्या तीराला वाहून नेत, त्याप्रमाणें तू माझें अंत:करण नेत

नैव देवी न गन्धर्वी न यक्षी न च किंनरी २२
नैवंरूपा मया नारी दृष्टपूर्वा महीतले।
रूपमग्र्यं च लोकेषु सौकुमार्यं वयश्च ते २३
इह वासश्च कान्तारे चित्तमुन्माथयन्ति मे।
सा प्रतिक्राम भद्रं ते न त्वं वस्तुमिहार्हसि २४
राक्षसानामयं वासो घोराणां कामरूपिणाम्।
प्रासादाग्राणि रम्याणि नगरोपवनानि च २५
संपन्नानि सुगन्धीनि युक्तान्याचरितुं त्वया।
वरं माल्यं वरं गन्धं वरं वस्त्रं च शोभने २६
भर्तारं च वरं मन्ये त्वद्युक्तमसितेक्षणे।
का त्वं भवसि रुद्राणां मरुतां वा शुचिस्मिते २७
वसूनां वा वरारोहे देवता प्रतिभासि मे।
नेह गच्छन्ति गन्धर्वा न देवा न च किंनराः २८

---

नेत आहेस. हे उत्कृष्ट आणि आकुंचित स्तन यांनीं युक्त असलेल्या जानकि! तुझी कटि अंगुष्ठ व तर्जनी यामध्यें सामावणारी असून तूं देवांगना, गंधर्व-स्त्री, यक्षीण अथवा किन्नरी नसावीस (असें वाटतें.) या भूतलावर तुझ्यासारखी रूपवती स्त्री मी पूर्वी कधीं पाहिली नसून या लोकांमध्यें तुझें हें रूप, हा सुकुमारपणा आणि हें वय हीं अत्यंत उत्कृष्ट आहेत. अशा प्रकारचें तुझें रूप असून तूं अरण्यांत वास्तव्य करीत आहेस, हें पाहून माझें मन अगदीं गोंधळून जात आहे. म्हणून हे जानकि! तुझें कल्याण असो; तूं येथें न राहता माझ्याबरोबर चल. (१९-२४)

"इच्छेस येईल तें रूप धारण करणाऱ्या घोर राक्षसाचें हें अरण्य वसतिस्थान आहे. सुंदर सुंदर नगराच्या, पुष्पांनीं भरलेल्या व सुगंधयुक्त अशा उपवनांत राजवाड्याच्या गच्च्यावर तुझ्यासह क्रीडा करण्यास तूं योग्य आहेस. तुझी सुंदर माला, उत्कृष्ट गंध, रमणीय वस्त्र व हे कृष्णनयने सुंदरि! तुझे ठिकाणीं रममाण होणारा पति हीं सर्व श्रेष्ठ आहेत. हे सुहास्यवदने, तूं रुद्र, देव, व वसु यापैकीं कोण आहेस? मला वाटतें तूं देवता आहेस. येथें देव, गंधर्व

राक्षसानामयं वासः कथं तु त्वामिहागता।
इह शाखामृगाः सिंहा द्वीपिव्याघ्रमृगा वृकाः २९
ऋक्षास्तरक्षवः कङ्का कथं तेभ्यो न बिभ्यसे।
मदान्वितानां घोराणां कुञ्जराणां तरस्विनाम् ३०
कथमेका महारण्ये न बिभेषि वरानने।
काऽसि कस्य कुतश्च त्वं किंनिमित्तं च दण्डकान् ३१
एका चरसि कल्याणि घोरान् राक्षससेवितान्।
इति प्रशस्ता वैदेही रावणेन महात्मना ३२
द्विजातिवेषेण हि तं दृष्ट्वा रावणमागतम्।
सर्वैरतिथिसत्कारैः पूजयामास मैथिली ३३
उपानीयासनं पूर्वं पाद्येनाभिनिमन्त्र्य च।
अब्रवीत्सिद्धमित्येव तदा तं सौम्यदर्शनम् ३४
द्विजातिवेषेण समीक्ष्य मैथिली समागतं पात्रकुसुम्भधारिणम्।
अशक्यमुद्द्वेष्टुमुपायदर्शनान्न्यमन्त्रयद्ब्राह्मणवत्तथागतम् ३५

अथवा किंवर ह कधींही यत नाहीत हें राक्षसांचें वसतिस्थान असून तू येथें का आली आहेस? या ठिकाणीं वानर, सिंह चित्ते, वाघ, लांडगे अस्वलें, तरस आणि कंक म्हणून प्रख्यात असलेले पक्षी वास करतात याकरिता त्यांपासून तुला कशी भीति वाटत नाहीं? तू कोण आहेस कोणाची आहेस आणि या दण्डकारण्यांत काय व कशाकरिता आली आहेस? हे कल्याणि! घोर राक्षसांनीं निवास केलेल्या या दण्डकारण्यांत तू एकटी का संचार करीत आहेस?" (२५-३२)

याप्रमाणें महात्म्या रावणानें जानकीशीं आदरपूर्वक भाषण केलें असता यतिवेषानें हा रावणच आपणाकडे आला आहे' असें जाणूनही त्या मैथिलीनें ज्याप्रमाणें अतिथींचा सत्कार करावयाचा, त्याचप्रमाणें त्याचा सत्कार केला आणि प्रथमतः त्याला बसावयास आसन देऊन पाद्य समर्पण केलें आणि सिद्ध असलेलें व परिपक्व झालेलें असें अन्न तयार आहे, असें सांगितलें. नंतर कमण्डलु व भगवीं वस्त्रें परिधान करून यतिवेषानें आलेल्या रावणाला सीतेनें

इयं वृसी ब्राह्मण काममास्यतामिदं च पाद्यं प्रतिगृह्यतामिति।
इदं च सिद्धं वनजातमुत्तमं त्वदर्थमव्यग्रमिहोपभुज्यताम् ३६
निमन्त्र्यमाणः प्रतिपूर्णभाषिणीं नरेन्द्रपत्नीं प्रसमीक्ष्य मैथिलीम्।
प्रसह्य तस्या हरणे दृढं मनः समर्पयामास वधाय रावणः ३७
ततः सुवेषं मृगयागतं पतिं प्रतीक्षमाणा सहलक्ष्मणं तदा ।
निरीक्षमाणा हरितं ददर्श तन्महद्वनं नैव तु रामलक्ष्मणौ ३८
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः॥४६॥[१४८६]

सप्तचत्वारिंशः सर्गः ।

रावणेन तु वैदेही तदा पृष्टा जिहीर्षुणा।
परिव्राजकरूपेण शशंसात्मानमात्मना १
ब्राह्मणश्चातिथिश्चैष अनुक्तो हि शपेत माम् ।
इति ध्यात्वा मुहूर्तं तु सीता वचनमब्रवीत् २

पाहिलें आणि याची उपेक्षा करणें योग्य नव्हे असें मनांत आणून आपण ब्राह्मण आहोंत असें इतरांना वाटण्याकरितां रावणानें योजिलेले उपाय दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें ब्राह्मण समजूनच त्याला ती म्हणाली, "हे द्विज ! या आसनावर आपण खुशाल बसून या पाद्याचा स्वीकार करावा आणि आपणाकरितां तयार केलेले हे उत्कृष्ट वन्य पदार्थ आपण येथें स्वस्थपणें सेवन करावे." याप्रमाणें त्याच्याशीं सीतेचें बोलणें चाललें असतांना त्या राजपत्नीचें भाषण संपूर्ण झालें असें पाहून स्वतःच्या नाशाकरितां, बलात्कारानें तिला हरण करून नेण्याविषयीं रावणानें आपल्या मनाचा पक्का निश्चय केला. नंतर उत्कृष्ट वेष धारण करून लक्ष्मणासह मृगयेला गेलेल्या पतीची मार्गप्रतीक्षा करीत बसलेली ती सीता निरखून पाहूं लागली असतां राम-लक्ष्मण तर नाहींतच; परंतु प्रचंड हिरवें गार वन मात्र तिच्या दृष्टीस पडलें. (३२-३८)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं शेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

यतिवेष धारण केलेल्या व आपला नाश होण्याची इच्छा करणाऱ्या रावणानें सीतेला प्रश्न केला असतां तिनें स्वतःविषयींचें वृत्त त्याला सांगितलें

दुहिता जनकस्याहं मैथिलस्य महात्मनः ।
सीता नाम्नास्मि भद्रं ते रामस्य महिषी प्रिया ३
उषित्वा द्वादश समा इक्ष्वाकूणां निवेशने ।
भुञ्जाना मानुषान्भोगान्सर्वकामसमृद्धिनी ४
तत्र त्रयोदशे वर्षे राजामन्त्रयत प्रभु ।
अभिषेचयितुं रामं समेतो राजमन्त्रिभिः ५
तस्मिन्संभ्रियमाणे तु राघवस्याभिषेचने ।
कैकेयी नाम भर्तारं ममार्या याचते वरम् ६
परिगृह्य तु कैकेयी श्वशुरं सुकृतेन मे ।
मम प्रव्राजनं भर्तुर्भरतस्याभिषेचनम् ।
द्वावयाचत भर्तारं सत्यसंधं नृपोत्तमम् ७
नाद्य भोक्ष्ये न च स्वप्स्ये न पास्ये न कदाचन ।
एष मे जीवितस्यान्तो रामो यद्यभिषिच्यते ८
इति ब्रुवाणां कैकेयीं श्वशुरो मे स पार्थिवः ।

हा ब्राह्मण असून आतिथि आहे, तेव्हा याच्या प्रश्नाला जर उत्तर दिलें नाहीं तर हा मला शाप देईल, असा क्षणभर विचार केल्यानंतर ती सीता म्हणाली, "मी महात्म्या मिथिलाधिपति जनक राजाची कन्या असून रामाची सीता नामक प्रियपत्नी आहें विवाहानंतर माझीं बारा वर्षे मनुष्याला योग्य अशा सर्व प्रकारच्या भोग्य वस्तूंचा उपभोग घेण्यांत आणि हवी ती इच्छा परिपूर्ण करून घेण्यात गेलीं असता तराव्या वर्षी राजमन्त्र्यासह असलेल्या प्रभु दशरथ राजानें रामाला अभिषेक करण्याचें ठरविलें परंतु रघुवंशज रामाच्या त्या अभिषेकाची तयारी चालली असता मला पूज्य असलेल्या कैकेयीनें आपल्या भर्त्यापाशीं वरप्रदान मागितलें माझ्या मासऱ्याला प्रथमत तिनें धर्माची शपथ घातली आणि नंतर माझ्या भर्त्याला वनवास व भरताला अभिषेक असे दोन वर तिनें त्या आपल्या सत्यवचनी नृपश्रेष्ठ भर्त्यापाशीं मागितले (१-७)

" ती म्हणाली— 'मी आज कांहीं एक खाणार नाहीं, कांहीं एक पिणार नाहीं आणि कधीं झोंपही घेणार नाहीं, रामाला जर अभिषेक होणार असेल तर

अयाचतार्थैरन्वर्थैर्न च याञ्चा चकार सा ९
मम भर्ता महातेजा वयसा पञ्चविंशकः।
अष्टादश हि वर्षाणि मम जन्मनि गण्यते १०
रामेति प्रथितो लोके सत्यवाञ्शीलवाञ्शुचिः।
विशालाक्षो महाबाहुः सर्वभूतहिते रतः ११
कामार्तश्च महाराजः पिता दशरथः स्वयम्।
कैकेय्याः प्रियकामार्थं तं रामं नाभ्यषेचयत् १२
अभिषेकाय तु पितुः समीपं राममागतम्।
कैकेयी मम भर्तारमित्युवाच द्रुतं वचः १३
तव पित्रा समाज्ञप्तं ममेदं श्रृणु राघव।
भरताय प्रदातव्यमिदं राज्यमकण्टकम् १४
त्वया तु खलु वस्तव्यं नव वर्षाणि पञ्च च।
वने प्रव्रज काकुत्स्थ पितरं मोचयानृतात् १५
तथेत्युवाच तां रामः कैकेयीमकुतोभयः।

ही माझ्या जीविताची परिसमाप्तीच झाली असें आपण समजा.' याप्रमाणें कैकेयी बोलूं लागली असता माझ्या सासऱ्यानें म्हणजे त्या दशरथ राजानें उपभोग घेण्यास योग्य अशा पुष्कळ वस्तु तिला देऊं केल्या असताही तिनें त्याच्या विनंतीला मान दिला नाहीं. त्यावेळीं माझा महातेजस्वी पति वयानें पंचवीस वर्षांचा असून माझें वय अठरा वर्षांचें होतें. विशालनयन, महापराक्रमी, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर, सत्यवचनी, सुशील आणि पवित्र असा माझा भर्ता राम म्हणून लोकांत प्रसिद्ध आहे तथापि कामाच्या तावडींत सापडलेल्या स्वतः पित्या दशरथ महाराजानेंच कैकेयीची प्रिय इच्छा परिपूर्ण करण्याकरितां त्या रामाला अभिषेक केला नाहीं (८-१२)

" अभिषेकाकरितां माझा भर्ता राम पित्याचे जवळ आला असतां कैकेयी सत्वर त्याला म्हणाली, ' हे राघवा! हें तुझ्या पित्यानें मला दिलेलें वचन तू श्रवण कर. हें निष्कंटक राज्य भरताला द्यावयाचें असून तुला चवदा वर्षे वनांत जावयाचें आहे याकरितां, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा! तूं आतां वनांत

चकार तद्वचः श्रुत्वा भर्ता मम दृढव्रतः १६
दद्यान्न प्रतिगृह्णीयाः सत्यं ब्रूयान्न चानृतम् ।
एतद्ब्राह्मण रामस्य व्रतं धृतमनुत्तमम् १७
तस्य भ्राता तु वैमात्रो लक्ष्मणो नाम वीर्यवान् ।
रामस्य पुरुषव्याघ्रः सहायः समरेऽरिहा १८
स भ्राता लक्ष्मणो नाम ब्रह्मचारी दृढव्रतः ।
अन्वगच्छद्धनुष्पाणिः प्रव्रजन्तं मया सह १९
जटी तापसरूपेण मया सह सहानुजः ।
प्रविष्टो दण्डकारण्यं धर्मनित्यो दृढव्रतः २०
ते वयं प्रच्युता राज्यात्कैकेय्यास्तु कृते त्रयः ।
विचरामः द्विजश्रेष्ठ वनं गम्भीरमोजसा २१
समाश्वस मुहूर्तं तु शक्यं वस्तुमिह त्वया २२

चालता हो आणि अनृतापासून आपल्या पित्याला मुक्त कर.' यावर स्वीकारलेलें व्रत नेटानें चालविणाऱ्या व कसल्याही प्रकारची भीति नसलेल्या त्या रामानें 'ठीक आहे" असें तिला उत्तर दिलें आणि तिचें बोलणें ऐकून घेतल्यानंतर माझ्या भर्त्यानें त्याचप्रमाणें केलें हे ब्राह्मणा! दान द्यावें, परंतु प्रतिग्रह कधींही करू नये, आणि त्याचप्रमाणें भाषण सत्यच करावें, परंतु अनृत कधींही बोलूं नये, हें रामाचें अत्युत्तम स्वीकृत व्रत आहे (१३-१७)

"असो त्या रामाचा लक्ष्मण म्हणून एक बलाढ्य सापत्न भ्राता आहे आणि तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण समरांगणात शत्रूंचा नाश करणारा असून रामाला साहाय्य करणारा आहे. यामुळें मला बरोबर घेऊन आणि हातांत धनुष्य घेऊन राम वनात जाऊं लागला असता तो दृढनिश्चयी भ्राता लक्ष्मण ब्रह्मचर्य स्वीकारून त्याच्या मागोमाग वनांत आला आणि याप्रमाणें जटा धारण केलेला व नेहमीं धर्माचीच अपेक्षा करणारा दृढनिश्चयी राम कनिष्ठ भ्रात्याला बरोबर घेऊन माझ्यासह दंडकारण्यात प्रविष्ट झाला तात्पर्य, हे द्विजश्रेष्ठा! कैकेयीकरितां राज्याला मुकलेले ते आम्ही तिघे गहन वनात स्वसामर्थ्यानें संचार करीत आहोंत. येथें आपणाला राहणें जर शक्य असेल तर क्षणभर विश्रांति

आगमिष्यति मे भर्ता वन्यमादाय पुष्कलम् ।
रुरून्गोधान्वराहांश्च हत्वादायामिषं बहु २३
स त्वं नाम च गोत्रं च कुलमाचक्ष्व तत्त्वतः ।
एकश्च दण्डकारण्ये किमर्थं चरसि द्विज २४
एवं ब्रुवत्यां सीतायां रामपत्न्यां महाबलः ।
प्रत्युवाचोत्तरं तीव्रं रावणो राक्षसाधिपः २५
येन वित्रासिता लोकाः सदेवासुरमानुषाः ।
अहं स रावणो नाम सीते रक्षोगणेश्वरः २६
त्वां तु काञ्चनवर्णाभां दृष्ट्वा कौशेयवासिनीम् ।
रतिं स्वकेषु दारेषु नाधिगच्छाम्यनिन्दिते २७
बह्वीनामुत्तमस्त्रीणामाहृतानामितस्ततः ।
सर्वासामेव भद्रं ते ममाग्रमहिषी भव २८
लङ्का नाम समुद्रस्य मध्ये मम महापुरी ।
सागरेण परिक्षिप्ता निविष्टा गिरिमूर्धनि २९

---

घ्या, रुरु, गोधा व वराह याचा वध करून, बरेंचसें मास बरोबर घेऊन आणि इतरही पुष्कळ वन्य पदार्थ घेऊन माझा भर्ता इतक्यातच येईल. आता आपण आपलें नाव, गोत्र आणि कुल खरें खरें मला सांगा. आणि हे द्विज ! दंडकारण्यांत आपण एकटे कशाकरिता संचार करीत आहात, तेंही कथन करा. " (१८–२४)

याप्रमाणें रामपत्नी सीता विचारूं लागली असता तो राक्षसाधिपति महाबलाढ्य रावण तिच्या प्रश्नाला कठोर उत्तर देऊं लागला. "हे सीते ! ज्यानें देव, दैत्य आणि मनुष्य यासह सर्व त्रैलोक्य त्रस्त करून सोडलें आहे, तो मी रावण नांवाचा राक्षसगणांचा राजा आहें. सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेल्या तुला पैठणी नेसलेली अवलोकन केल्यापासून माझ्या स्त्रियाचे ठिकाणीं हे सुंदरि ! माझें मन मुळींच रमेनासें झालें आहे. याकरिता इकडूनतिकडून ज्या मी अनेक उत्कृष्ट स्त्रिया हरण करून आणल्या आहेत, त्या सर्वांमध्यें तूंच माझी पट्टराणी हो; म्हणजे तुझें कल्याण होईल. समुद्रामध्यें लंका म्हणून माझी एक

तत्र सीते मया सार्धं वनेषु विचरिष्यसि ।
न चास्य वनवासस्य स्पृहयिष्यसि भामिनि ३०
पञ्च दास्यः सहस्राणि सर्वाभरणभूषिताः ।
सीते परिचरिष्यन्ति भार्या भवसि मे यदि ३१
रावणेनैवमुक्ता तु कुपिता जनकात्मजा ।
प्रत्युवाचानवद्याङ्गी तमनादृत्य राक्षसम् ३२
महागिरिमिवाकम्प्यं महेन्द्रसदृशं पतिम् ।
महोदधिमिवाक्षोभ्यमहं राममनुव्रता ३३
सर्वलक्षणसंपन्नं न्यग्रोधपरिमण्डलम् ।
सत्यसंधं महाभागमहं राममनुव्रता ३४
महाबाहुं महोरस्कं सिंहविक्रान्तगामिनम् ।
नृसिंहं सिंहसंकाशमहं राममनुव्रता ३५
पूर्णचन्द्राननं रामं राजवत्सं जितेन्द्रियम् ।
पृथुकीर्तिं महाबाहुमहं राममनुव्रता ।

मोठी नगरी आहे तिच्या सभोंवतीं समुद्राचा वेढा असून पर्वताच्या माथ्यावर ती वसलेली आहे त्या ठिकाणीं तूं माझ्यासह वनात संचार करूं लागलीस म्हणजे हे सुंदरि सीते ! या वनात राहण्याची तुला इच्छाही होणार नाहीं हे सीते ! तूं जर माझी भार्या होशील तर सर्व प्रकारचे अलंकार धारण केलेल्या अशा पाच हजार दासी तुझी सेवा करीत राहतील " (२५-३१)

याप्रमाणें रावण बोलला असता ती जनककन्या सुंदरी सीता क्रुद्ध होऊन व त्या राक्षसाचा धिक्कार करून त्याला म्हणाली, " महापर्वताप्रमाणें जो कधीं कंपित होणें शक्य नाहीं आणि महासागराप्रमाणें जो क्षुब्ध होणें शक्य नाहीं, असा जो माझा पति महेंद्रतुल्य राम त्यालाच अनुसरून मी वागणारी आहे. सर्वलक्षणसंपन्न आणि वटवृक्षाप्रमाणें सर्वांना आश्रयभूत अशा त्या महाभाग्यवान् सत्यवचनी रामाला अनुसरून वागणें हेंच माझें व्रत आहे महापराक्रमी, विशाल वक्षःस्थलानें युक्त, सिंहगतीनें चालणाऱ्या आणि पराक्रमात सिंहाप्रमाणेंच असणाऱ्या पुरुषश्रेष्ठ रामालाच अनुसरून मी वागणारी आहे पूर्णचंद्राप्रमाणें

त्वं पुनर्जम्बुकः सिंहीं मामिहेच्छसि दुर्लभाम् ३६
नाहं शक्या त्वया स्प्रष्टुमादित्यस्य प्रभा यथा ३७
पादपान्काञ्चनान्नूनं बहून्पश्यसि मन्दभाक् ।
राघवस्य प्रियां भार्यां यस्त्वमिच्छसि राक्षस ३८
क्षुधितस्य च सिंहस्य मृगशत्रोस्तरस्विनः ।
आशीविषस्य वदनाद् दंष्ट्रामादातुमिच्छसि ।
मन्दरं पर्वतश्रेष्ठं पाणिना हर्तुमिच्छसि ३९
कालकूटं विषं पीत्वा स्वस्तिमान्गन्तुमिच्छसि ।
अक्षि सूच्या प्रमृजसि जिह्वया लेढि च क्षुरम् ४०
राघवस्य प्रियां भार्यामधिगन्तुं त्वमिच्छसि ।
अवसृज्य शिलां कण्ठे समुद्रं तर्तुमिच्छसि ४१
सूर्याचन्द्रमसौ चोभौ पाणिभ्यां हर्तुमिच्छसि ।

ज्याचें मुख आहे अशा महापराक्रमी, महाकीर्तिमान् व जितेंद्रिय राजपुत्र रामाला अनुसरून वागणें हेंच माझें व्रत आहे. सिंहिणीची इच्छा धरणाऱ्या कोल्ह्याप्रमाणें तूं विनाकारण माझी इच्छा करीत आहेस; परंतु मी तुला मिळणें शक्य नाहीं; इतकेंच नव्हे तर, ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रभेला सूर्यापासून पृथक् करून कोणाला स्पर्श करतां येत नाहीं, त्याचप्रमाणें रामाला दूर करून मला तुझा स्पर्श होणें शक्य नाहीं. (३२–३८)

"हे भाग्यहीना! मृत्यु जवळ आल्यामुळें स्वप्नात पुष्कळच सुवर्णवृक्ष खरोखर तूं पहात असशील. हे राक्षसा! रामाच्या प्रिय भार्येची तूं इच्छा करीत आहेस; परंतु असें मनात आणणें म्हणजे मृगांचा शत्रु आणि महाबलाढ्य अशा क्षुधित सिंहाच्या अथवा सर्पाच्या तोंडातून दाढ काढून घेण्याची इच्छा करण्यासारखें अथवा मंदर नांवाचा श्रेष्ठ पर्वत हातानें उचलून नेण्याचीच इच्छा करण्यासारखें आहे. इतकेंच नव्हे, तर कालकूट विष भक्षण करून सुखरूप जाण्याची तूं इच्छा करीत आहेस आणि धार साफ लागण्याकरितां नेत्राग्रावर तूं वस्तरा घाशीत जिभेनें तो चाटीत आहेस. रामाची प्रिय भार्या प्राप्त होण्याची तूं इच्छा करीत आहेस; म्हणजे गळ्यामध्यें दगड बांधून समुद्र तरून जाण्याचेंच तूं मनांत

यो रामस्य प्रियां भार्यां प्रधर्षयितुमिच्छसि ४२
अग्निं प्रज्वलितं दृष्ट्वा वस्त्रेणाहर्तुमिच्छसि ।
कल्याणवृत्तां यो भार्यां रामस्याहर्तुमिच्छसि ४३
अयोमुखानां शूलानां मध्ये चरितुमिच्छसि ।
रामस्य सदृशीं भार्यां योऽधिगन्तुं त्वमिच्छसि ४४
यदन्तरं सिंहशृगालयोर्वने यदन्तरं स्यन्दनिकासमुद्रयोः ।
सुराग्र्यसौवीरकयोर्यदन्तरं तदन्तरं दाशरथेस्तवैव च ४५
यदन्तरं काञ्चनसीसलोहयोर्यदन्तरं चन्दनवारिपङ्कयोः ।
यदन्तरं हस्तिबिडालयोर्वने तदन्तरं दाशरथेस्तवैव च ४६
यदन्तरं वायसवैनतेययोर्यदन्तरं मद्गुमयूरयोरपि ।
यदन्तरं हंसकगृध्रयोर्वने तदन्तरं दाशरथेस्तवैव च ४७
तस्मिन्सहस्राक्षसमप्रभावे रामे स्थिते कार्मुकबाणपाणौ ।
हृतापि तेऽहं न जरां गमिष्ये आज्यं यथा मक्षिकयावगीर्णम् ४८

आणीत आहेस. अरे ! रामाच्या प्रिय भार्येवर हात टाकण्याचें तू मनात आणीत आहेस, परंतु असें मनात आणणें म्हणजे सूर्य व चंद्र या उभयतांना हातानींच खोडून आणण्याचा तूं विचार करीत आहेस. सदाचरणानें वागणाऱ्या रामाच्या भार्येला हरण करण्याची इच्छा करणारा तूं प्रज्वलित अग्नि पाहूनही तो वस्त्रात बांधून आणण्याचेंच मनात आणीत आहेस. फार कशाला ? हे रावणा ! रामाची अनुरूप भार्या प्राप्त करून घेण्याचा इच्छा करणारा तू खरोखर लोहाग्रयुक्त शूलामध्येंच संचार करण्याचा इच्छा करीत आहेस. (३९–४४)

" सिंह आणि कोल्हा याच्यात जें अंतर वनात दिसून येतें अथवा ओढा आणि समुद्र याच्यांत जें अंतर दृष्टोत्पत्तीस येतें किंवा अमृत आणि कांजी यांच्यात जें अंतर अनुभवाला येतें, तें अंतर दशरथपुत्र राम आणि तूं याच्यांत असल्याचें दिसत आहे. सुवर्ण आणि शिसें या धातूंमध्यें, चंदनोदक आणि चिखल यांमध्यें आणि हत्ती व मांजर यांमध्ये जितकें अंतर आहे, तितकें अंतर दशरथ-पुत्र आणि तूं यामध्यें आहे. कावळा आणि गरुड किंवा पाणकोंबडा आणि मोर अथवा हंस आणि गिधाड याच्यात जें अंतर वनात दृष्टोत्पत्तीस येतें, तेंच अंतर

इतीव तद्वाक्यमदुष्टभावा सुदुष्टमुक्त्वा रजनीचरं तम् ।
गात्रप्रकम्पाद्व्यथिता बभूव वातोद्धता सा कदलीव तन्वी ४९
तां वेपमानामुपलक्ष्य सीतां स रावणो मृत्युसमप्रभावः ।
कुलं बलं नाम च कर्म चात्मनः समाचचक्षे भयकारणार्थम् ५०

इत्यार्षे श्रीमद्रा॰वाल्मी॰ आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ४७ [१५३६]

अष्टचत्वारिंशः सर्गः ।

एवं ब्रुवत्यां सीतायां संरब्धः परुषं वचः ।
ललाटे भ्रुकुटिं कृत्वा रावणः प्रत्युवाच ह १
भ्राता वैश्रवणस्याहं सापत्नो वरवर्णिनि ।
रावणो नाम भद्रं ते दशग्रीवः प्रतापवान् २
यस्य देवाः सगन्धर्वाः पिशाचपतगोरगाः ।
विद्रवन्ति सदा भीता मृत्योरिव सदा प्रजाः ३
येन वैश्रवणो भ्राता वैमात्रः कारणान्तरे ।

---

दशरथपुत्र राम आणि तूं याच्यात आहे. तेव्हां हातांत धनुष्यबाण घेऊन तो इंद्रतुल्य पराक्रमी राम भूतलावर असतांना जरी तूं मला घेऊन गेलास तरी माशीनें गिळलेल्या तुपाप्रमाणें मी तुला पचणार नाहीं." (४५-४८)

याप्रमाणें स्वभावानें सरळ असलेल्या सीतेनें त्या अत्यंत दुष्ट राक्षसाला सांगितल्यावर शरिराला कंप सुटून वाऱ्यानें लटलट हालूं लागलेल्या बारीक केळीप्रमाणें तिची अवस्था झाली नंतर कापत असलेल्या त्या सीतेला पाहून तिला भिवविण्याच्या हेतूनें तो मृत्यूप्रमाणें पराक्रमी असलेला रावण आपलें कुल, बल, नाव आणि पराक्रम तिला सांगूं लागला. (४९-५०)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४७॥

याप्रमाणें सीता निंदा करूं लागली असतां रावण क्रुद्ध झाला आणि कपाळाला आठ्या घालून तिला कठोर शब्दांनीं म्हणाला, "तुझें देव कल्याण करो, हे सुंदरि ! प्रतापी आणि दशकंठ असा मी रावण म्हणून कुबेराचा सापत्न भ्राता आहें. गंधर्वांसह देव, पिशाच, पक्षी आणि उरग हे सर्वदा मृत्यूला भीत अस-

भ्रन्द्वमासादितः क्रोधाद्रणे विक्रम्य निर्जित- ४
मद्भयार्तः परित्यज्य स्वमधिष्ठानमृद्धिमत् ।
कैलासं पर्वतश्रेष्ठमध्यास्ते नरवाहनः ५
यस्य तत्पुष्पकं नाम विमानं कामगं शुभम् ।
वीर्यादावर्जितं भद्रे येन यामि विहायसम् ६
मम संजातरोषस्य मुखं दृष्ट्वैव मैथिलि ।
विद्रवन्ति परित्रस्ता सुराः शक्रपुरोगमाः ७
यत्र तिष्ठाम्यहं तत्र मारुतो वाति शङ्कित. ।
तीव्रांशुः शिशिरांशुश्च भयात्संपद्यते दिवि ८
निष्कम्पपत्रास्तरवो नद्यश्च स्तिमितोदकाः ।
भवन्ति यत्र तत्राहं तिष्ठामि च चरामि च ९
मम पारे समुद्रस्य लङ्का नाम पुरी शुभा ।
संपूर्णा राक्षसैर्घोरैर्यथेन्द्रस्यामरावती १०

---

लेल्या प्राप्त्यप्रमाणें मला नेहमीं भिऊन पळत सुटतात एकदां कांहीं कारण उपस्थित झाल्यामुळें मी माझ्या सापत्न भ्रात्या कुबेराशीं रणांत क्रोधामुळें युद्ध केलें आणि पराक्रम करून त्याचा पराजय केला तेव्हां माझ्या भयानें व्याकुळ झाल्यामुळें आपल्या समृद्ध स्थानाचा त्याग करून तो नरवाहन कुबेर तूर्त कैलास नामक श्रेष्ठ पर्वतावर निवास करीत आहे आणि हे कल्याणि ! हवें तिकडे गमन करणारें जें त्याचें पुष्पक नामक शुभ विमान तें मी पराक्रमानें हिसकून घेतलें असून त्याच्याच योगानें मी आकाशातून गमन करीत असतों हे मिथिल-राजकन्ये ! मी क्रुद्ध झालों असता माझी मुद्रा पाहूनच इंद्र इत्यादि देव भयभीत होऊन पळत सुटतात (१-७)

" जेथें मी राहतों, तेथें वाराही भीतभीतच वहात असून सूर्यही माझ्या भीतीनें शीतल किरणांनीं युक्त होत असतो इतकेंच नव्हे, तर ज्या ठिकाणीं मी राहतों व हिंडतों, त्या ठिकाणीं वृक्षाचीं पानेंही हलेनाशीं होऊन नद्यांचें उदकही हलेनासें होतें. इंद्राच्या अमरावतीप्रमाणें समुद्राच्या पलीकडे माझी लंका नांवाची एक शुभ नगरी आहे आणि घोर राक्षसांनीं ती भरलेली आहे. पांढरा कोट

प्राकारेण परिक्षिप्ता पाण्डुरेण विराजिता ।
हेमकक्ष्या पुरी रम्या वैदूर्यमयतोरणा ॥ ११
हस्त्यश्वरथसंबाधा तूर्यनादविनादिता ।
सर्वकामफलैर्वृक्षैः संकुलोद्यानभूषिता ॥ १२
तत्र त्वं वस हे सीते राजपुत्रि मया सह ।
न स्मरिष्यसि नारीणां मानुषीणां मनस्विनि ॥ १३
भुञ्जाना मानुषान्भोगान्दिव्यांश्च वरवर्णिनि ।
न स्मरिष्यसि रामस्य मानुषस्य गतायुषः ॥ १४
स्थापयित्वा प्रियं पुत्रं राज्ये दशरथो नृपः ।
मन्दवीर्यस्ततो ज्येष्ठः सुतः प्रस्थापितो वनम् ॥ १५
तेन किं भ्रष्टराज्येन रामेण गतचेतसा ।
करिष्यसि विशालाक्षि तापसेन तपस्विना ॥ १६
रक्ष राक्षसभर्तारं कामय स्वयमागतम् ।
न मन्मथशराविष्टं प्रत्याख्यातुं त्वमर्हसि ॥ १७

तिच्या भोंवतीं असून वैदूर्य रत्नें जडलेल्या वेशी तिला आहेत आणि त्या रम्य नगरीच्या सीमा सुवर्णाच्या असून ती झळकत आहे. गज, अश्व आणि रथ यांनीं ती गजबजलेली असून वाद्यांच्या नादानें ती निनादित झालेली आहे आणि कल्पवृक्षानीं ती व्याप्त झालेली असून नागान्या योगानें भूषित झालेली आहे. तेथें हे राजकन्ये सीते ! त्या ठिकाणीं तूं माझ्याबरोबर रहा; म्हणजे हे विचारी स्त्रिये ! तुला मानवी स्त्रियांचें स्मरणदेखील होणार नाहीं व त्याचप्रमाणें हे सुंदरि ! मनुष्य आणि देव या उभयतानाही योग्य असलेल्या भोग्य वस्तूंचा तूं उपभोग घेऊं लागलीस म्हणजे मरणाच्या दारीं बसलेल्या मानव रामाचेंही तुला स्मरण होणार नाहीं. (८–१४)

" दशरथ राजानें आपल्या प्रिय पुत्राची राज्यावर स्थापना केली असून ज्येष्ठ पुत्राचें सामर्थ्य कमी असल्यामुळें त्यानें त्याला वनात पाठविलें आहे. याकरिता राज्यापासून भ्रष्ट व मनात अस्वस्थ अशा त्या बिचाऱ्या शौर्यहीन रामाशीं हे विशालनयने ! तुला आता काय बरें कर्तव्य आहे ? म्हणून तूं संभाळ

प्रत्याख्याय हि मां भीरु पश्चात्तापं गमिष्यसि ।
चरणेनाभिहत्येव पुरूरवसमुर्वशी १८
अङ्गुल्या न समो रामो मम युद्धे स मानुषः ।
तव भाग्येन संप्राप्तं भजस्व वरवर्णिनि १९
एवमुक्ता तु वैदेही क्रुद्धा संरक्तलोचना ।
अब्रवीत्परुषं वाक्यं रहिते राक्षसाधिपम् २०
कथं वैश्रवणं देवं सर्वदेवनमस्कृतम् ।
भ्रातरं व्यपदिश्य त्वमशुभं कर्तुमिच्छसि २१
अवश्यं विनशिष्यन्ति सर्वे रावण राक्षसाः ।
येषां त्वं कर्कशो राजा दुर्बुद्धिरजितेन्द्रियः २२
अपहृत्य शचीं भार्यां शक्यमिन्द्रस्य जीवितुम् ।
न हि रामस्य भार्यां मामानीय स्वस्तिमान्भवेत् २३
जीवेच्चिरं वज्रधरस्य पश्चाच्छचीं प्रधृष्याप्रतिरूपरूपाम् ।

आणि स्वतः चालून आलेल्या राक्षसाधिपतीची इच्छा कर. मदनबाणानीं विद्ध झालेल्या मला नाकारणें तुला योग्य नाहीं. कारण हे भीरु ! पुरुरव्याला लाथ मारून उर्वशीला जसा पश्चात्ताप झाला, तसा मला नाकारल्यामुळें तुला पश्चात्ताप होईल. बलासंबंधानें पाहूं गेलें असतां तो मानव राम युद्धांत माझ्या एका बोटाचीही बरोबरी करूं शकणार नाहीं. याकरितां हे सुंदरि ! तुझ्या सुदैवानें जवळ आलेल्या माझा तूं अंगीकार कर " (१५-१९)

याप्रमाणें रावण बोलला असतां सीता क्रुद्ध होऊन तिचे डोळे लाल झाले आणि रामरहित आश्रमांत असलेली ती सीता त्या राक्षसराजाशीं कठोर भाषण करूं लागली " सर्व देवांना पूज्य जो देव कुबेर तो भ्राता आहे, असें सांगून तूं पाप करण्याचें कसें मनांत आणीत आहेस ? हे रावणा ! कठोर, दुष्ट आणि विषयलंपट असा तूं ज्यांचा राजा आहेस, त्या सर्व राक्षसांचा अवश्य नाश होईल अरे ! कदाचित् इंद्राची भार्या शची हिचें हरण करून नेल्यावर हरण करणारा जिवंत राहणें शक्य आहे, परंतु रामभार्येला हरण करून नेणारा जिवंत राहण्याचा संभव नाही. मारारा, हे राक्षसा ! वज्रपाणी इंद्राची जी अनुपम

न मादृशीं राक्षस धर्षयित्वा पीतामृतस्यापि तवास्ति मोक्षः २४

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे अष्टचत्वारिंशः सर्गः ४८[१५६०]

एकोनपञ्चाशः सर्गः ।

सीताया वचनं श्रुत्वा दशग्रीवः प्रतापवान् ।
हस्ते हस्तं समाहत्य चकार सुमहद्वपुः १
स मैथिलीं पुनर्वाक्यं बभाषे वाक्यकोविदः ।
नोन्मत्तया श्रुतौ मन्ये मम वीर्यपराक्रमौ २
उद्वहेयं भुजाभ्यां तु मेदिनीमम्बरे स्थितः ।
आपिबेयं समुद्रं च मृत्युं हन्यां रणे स्थितः ३
अर्कं तुद्यां शरैस्तीक्ष्णैर्विभिन्द्यां हि महीतलम् ।
कामरूपेण उन्मत्ते पश्य मां कामरूपिणम् ४
एवमुक्तवतस्तस्य रावणस्य शिखिप्रभे ।
क्रुद्धस्य हरिपर्यन्ते रक्ते नेत्रे बभूवतुः ५

---

सौंदर्यसंपन्न भार्या शची तिचा अपहार केल्यानंतरही कदाचित् पुष्कळ दिवसपर्यंत नेणारा जिवंत राहणें शक्य आहे; परंतु बलात्कारानें मजसारख्या रामभार्येला हरण करून नेल्यावर तूं जरी अमृतपान केलेंस तरी मृत्यूपासून तुझी सुटका होणार नाहीं. " (२०-२४)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४८॥

याप्रमाणें सीतेचें भाषण ऐकल्यानंतर प्रतापी रावणानें हातावर हात चोळून फारच मोठें शरीर धारण केलें आणि तो संभाषणचतुर राघव पुन. सीतेला म्हणाला– ' मला वाटतें तूं बुद्धीवर नसल्यामुळें माझें वीर्य व पराक्रम कधीं ऐकलें नाहींस अंतरिक्षात राहून मी दोन हातांनीं पृथ्वी उचलून घेऊन जाईन, समुद्रही गट्ट करून टाकीन आणि रणात उभा राहिलों असता मृत्यूचाही वध करीन. इतकेंच नव्हे, तर तीक्ष्ण बाणांनीं सूर्यालाही दु.ख देईन व भूतल भेदून टाकीन. विषयवासनेमुळें आणि स्वरूपगर्वामुळें तूं बेफाम झाली आहेस. म्हणून हे सीते ! मनाप्रमाणें रूप धारण करणाऱ्या मजकडे तूं पहा " याप्रमाणें तो

सद्यः सौम्यं परित्यज्य तीक्ष्णरूपं स रावणः ।
स्वं रूपं कालरूपाभं भेजे वैश्रवणानुजः  ६
संरक्तनयनः श्रीमांस्तप्तकाञ्चनभूषणः ।
क्रोधेन महताऽऽविष्टो नीलजीमूतसंनिभः  ७
दशास्यो विंशतिभुजो बभूव क्षणदाचरः ।
स परिव्राजकच्छद्म महाकायो विहाय तत्  ८
प्रतिपेदे स्वकं रूपं रावणो राक्षसाधिपः ।
रक्ताम्बरधरस्तस्थौ स्त्रीरत्नं प्रेक्ष्य मैथिलीम्  ९
स तामसितकेशान्तां भास्करस्य प्रभामिव ।
वसनाभरणोपेतां मैथिलीं रावणोऽब्रवीत्  १०
त्रिषु लोकेषु विख्यातं यदि भर्तारमिच्छसि ।
मामाश्रय वरारोहे तवाहं सदृशः पतिः  ११
मां भजस्व चिराय त्वमहं श्लाघ्यः पतिस्तव ।
नैव चाहं क्वचिद्भद्रे करिष्ये तव विप्रियम्  १२

रावण क्रुद्ध होऊन बोलूं लागला असतां त्याचे नेत्र अग्नीप्रमाणें आरक्त वर्ण होऊन नेत्रप्रांतही हिरवे होऊन गेले. (१-५)

तात्पर्य, त्या रावण नावाच्या कुबेराच्या कनिष्ठ भ्रात्यानें एकदम सौम्य रूपाचा त्याग करून मृत्यूच्या स्वरूपाप्रमाणें भयकर असलेलें आपलें स्वतःचें रूप धारण केलें; म्हणजे प्रचंड क्रोधानें व्याप्त होऊन आरक्त वर्ण नेत्रांनीं युक्त झालेला तो वैभवशाली राक्षस रावण उत्कृष्ट सुवर्णभूषणें, नीलमेघतुल्य कांति, दहा मुखें आणि वीस हात यांनीं युक्त झाला. सारांश, शरीरानें धिप्पाड असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणानें ढोंगी यतिवेषाचा त्याग करून स्वतःचें रूप धारण केलें आणि आरक्त वस्त्र परिधान केलेला तो रावण स्त्रियांत सर्वोत्कृष्ट असलेल्या सीतेकडे पहात उभा राहिला. अमावस्य काळे कुळकुळीत केंस, वस्त्रें व भूषणें यांनीं युक्त असलेल्या व सूर्याच्या प्रभेप्रमाणें दिसणाऱ्या सीतेस तो रावण म्हणाला. (६-१०)

" तुला जर सर्व त्रैलोक्यविख्यात पाहिजे असेल तर, हे सुंदरि ! तूं माझा स्वीकार कर; मी तुला योग्य पति आहें यास्तव तूं चिरकाल मज

त्यज्यतां मानुषो भावो मयि भावः प्रणीयताम्।
राज्याच्च्युतमसिद्धार्थं रामं परिमितायुषम् १३
कैर्गुणैरनुरक्तासि मूढे पण्डितमानिनि।
यः स्त्रियो वचनाद्राज्यं विहाय ससुहृज्जनम् १४
अस्मिन्व्यालानुचरिते वने वसति दुर्मतिः।
इत्युक्त्वा मैथिलीं वाक्यं प्रियार्हां प्रियवादिनीम् १५
अभिगम्य सुदुष्टात्मा राक्षसः काममोहितः।
जग्राह रावणः सीतां बुधः खे रोहिणीमिव १६
वामेन सीतां पद्माक्षीं मूर्धजेषु करेण सः।
ऊर्वोस्तु दक्षिणेनैव परिजग्राह पाणिना १७
तं दृष्ट्वा गिरिशृङ्गाभं तीक्ष्णदंष्ट्रं महाभुजम्।
प्राद्रवन्मृत्युसंकाशं भयार्ता वनदेवताः १८
स च मायामयो दिव्यः खरयुक्तः खरस्वनः।

स्वीकार कर; मीच तुला उत्कृष्ट पति आहें. शिवाय हे *कल्याणि!* मी कधींही तुझ्या इच्छेविरुद्ध वागणार नाहीं म्हणून तूं आता आपली मनुष्यविषयक प्रीति सोडून देऊन माझे ठिकाणीं प्रेम कर. हे मूढे! तूं आपल्याला शहाणी समजत आहेस, परंतु राज्यापासून भ्रष्ट, अल्पायु आणि मनोरथ भग्न झालेल्या रामाच्या ठिकाणीं कोणत्या गुणामुळें तूं अनुरक्त आहेस? तो दुर्बुद्धि राम स्त्रीच्या सांगण्यावरून सुहृज्जनासह राज्याचा त्याग करून श्वापदांनीं वस्ती केलेल्या या वनात रहात आहे." (११–१५)

याप्रमाणें दयेला पात्र असलेल्या आणि रावणावाचून सर्वांशीं प्रिय भाषण करीत असलेल्या सीतेच्या समीप तो गेला आणि आकाशात ज्याप्रमाणें बुधानें विषयवासनेमुळें आपल्या रोहिणी मातेला धरावी, त्याप्रमाणें त्या अत्यंत दुष्ट व मदांध झालेल्या रावण राक्षसानें सीतेला धरली. कमलनयन सीतेचे केश त्यानें डाव्या हातानें धरले व उजवा हात मांड्यांखालीं घालून त्यानें तिला उचलली. तेव्हां प्रचंड बाहु आणि तीक्ष्ण दंष्ट्रा यांनीं युक्त, स्वरूपानें मृत्युसमान आणि पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या रावणाला पाहूनच वनदेवता

प्रत्यदृश्यत हेमाङ्गो रावणस्य महारथः । १९
ततस्तां परुषैर्वाक्यैरभितर्ज्य महास्वनः ।
अङ्केनादाय वैदेहीं रथमारोहयत्तदा २०
सा गृहीतातिचुक्रोश रावणेन यशस्विनी ।
रामेति सीता दुःखार्ता रामं दूरं गतं वने २१
तामकामां स कामार्तः पन्नगेन्द्रवधूमिव ।
विचेष्टमानामादाय उत्पपाताथ रावणः २२
ततः सा राक्षसेन्द्रेण ह्रियमाणा विहायसा ।
भृशं चुक्रोश मत्तेव भ्रान्तचित्ता यथातुरा २३
हा लक्ष्मण महाबाहो गुरुचित्तप्रसादक ।
ह्रियमाणां न जानीषे रक्षसा कामरूपिणा २४
जीवितं सुखमर्थं च धर्महेतोः परित्यजन् ।
ह्रियमाणामधर्मेण मां राघव न पश्यसि २५

भयभीत होऊन धावूं लागल्या व इतक्यात कर्कश स्वर व सुवर्णांचें सामान यांनीं युक्त असलेला आणि गर्दभ जोडलेला तो रावणाचा मायामय दिव्य महारथही दिसूं लागला नंतर मोठी गर्जना करणाऱ्या त्या रावणानें कठोर शब्दांनीं सीतेला धमकाविलें आणि हातानीं उचलून धरून तिला रथावर ठेविलें. (१९-२०)

रावणानें सीतेला उचलताक्षणीं ती यशस्वी सीता दुःखाकुल झाली आणि दूर गेलेल्या रामाच्या नावानें ' राम राम ' असा आक्रोश करूं लागली. तथापि तो विषयाधीन झालेला रावण अनुरागरहित आणि नागराजाच्या स्त्रीप्रमाणें सुटून जाण्याकरितां तडफड करीत असलेल्या सीतेला घेऊन सत्वर चालता झाला. याप्रमाणें तो राक्षसाधिपति रावण आकाशमार्गानें तिला घेऊन चालला असतां शोकाकुल व बेशुद्ध झालेली स्त्री ज्याप्रमाणें मनांत गोंधळून जाऊन शोक करूं लागते, त्याप्रमाणें ती शोक करूं लागली. ती म्हणाली, " हे लक्ष्मणा ! तूं महापराक्रमी असून वडिलांच्या मनाला आनंद देणारा आहेस; परंतु कर्म असतांनाही इच्छेप्रमाणें रूप धारण करणारा हा राक्षस मला घेऊन जात आहे.

ननु नामाविनीतानां विनेतासि परंतप ।
कथमेवंविधं पापं न त्वं शाधि हि रावणम् २६
न तु सद्योऽविनीतस्य दृश्यते कर्मणः फलम् ।
कालोऽप्यङ्गीभवत्यत्र सस्यानामिव पक्तये २७
त्वं कर्म कृतवानेतत्कालोपहतचेतनः ।
जीवितान्तकरं घोरं रामाद्व्यसनमाप्नुहि २८
हन्तेदानीं सकामा तु कैकेयी बान्धवैः सह ।
ह्रियेयं धर्मकामस्य धर्मपत्नी यशस्विनः २९
आमन्त्रये जनस्थानं कर्णिकारांश्च पुष्पितान् ।
क्षिप्रं रामाय शंसध्वं सीतां हरति रावणः ३०
हंससारससंघुष्टां वन्दे गोदावरीं नदीम् ।
क्षिप्रं रामाय शंसध्वं सीतां हरति रावणः ३१
दैवतानि च यान्यस्मिन्वने विविधपादपे ।

हें तुझ्या गावींही नाहीं. हे राघवा ! धर्माकरितां जीविताचर, सुखावर आणि संपत्तीवर तूं लाथ मारणारा असतानाही मला हा रावण अधर्मानें घेऊन जात आहे, इकडे तूं ढुंकूनही पहात नाहींस. हे शत्रुतापना ! बेफामपणानें वागणाऱ्या लोकांना तूं तर ताळ्यावर आणणारा आहेस, परंतु अशा प्रकारच्या या पापी रावणाला तूं कां शासन करीत नाहींस ? (२१-२६)

" बेफामपणानें केलेल्या कृत्याचें फल तत्काल दृष्टोत्पत्तीस येत नाहीं; कारण धान्यें परिपक्व होण्यास ज्याप्रमाणें ठराविक वेळ लागतो, त्याप्रमाणें कर्मांचें फल प्राप्त होण्यास कालाची अपेक्षा आहे. हे रावणा ! कालानें तुझी बुद्धि नाहींशी केल्यामुळें तूं हें कर्म केलें आहेस. म्हणून जीविताचा नाश करणारें असें घोर संकट रामापासून तुला प्राप्त होईल. आता मात्र आपल्या बांधवासह कैकयीचे मनोरथ परिपूर्ण झाले खरे. धर्माचीच अपेक्षा धरणाऱ्या यशस्वी रामाच्या धर्मपत्नीला रावण घेऊन जात आहे ! मी आता जनस्थान आणि प्रफुल्लित झालेल्या कर्णिकार वृक्षाचा निरोप घेतें. हे वृक्षहो ! रावण सीतेला हरण करून नेत आहे असें तुम्ही सत्वर रामाला सांगा हंस आणि सारसपक्षी

नमस्करोम्यहं तेभ्यो भर्तुः शंसत मां हृताम् ३१
यानि कानिचिदप्यत्र सत्त्वानि विविधानि च ।
सर्वाणि शरणं यामि मृगपक्षिगणानि वै ३३
ह्रियमाणां प्रियां भर्तुः प्राणेभ्योऽपि गरीयसीम् ।
विवशा ते हृता सीता रावणेनेति शंसत ३४
विदित्वा तु महाबाहुरमुत्रापि महाबलः ।
आनेष्यति पराक्रम्य वैवस्वतहृतामपि ३५
सा तदा करुणावाचो विलपन्ती सुदुःखिता ।
वनस्पतिगतं गृध्रं ददर्शायतलोचना ३६
सा तमुद्वीक्ष्य सुश्रोणी रावणस्य वशंगता ।
समाक्रन्दद्भयपरा दुःखोपहितया गिरा ३७

योनीं नादित असलेल्या गोदावरी नदीला मी वंदन करितें. हे पक्षिगणहो ! रावण सीतेला घेऊन जात आहे, हें तुम्ही सत्वर रामाला कळवा. अनेक प्रकारच्या वृक्षांनीं युक्त असलेल्या या वनांत ज्या कांहीं देवता असतील त्यांना मी नमस्कार करीत आहें. करितां, अहो देवतांनों ! मला नेल्याचें तुम्ही माझ्या भर्त्याला विदित करा. (२७-३२)

" या अरण्यांत जे कांहीं नानाप्रकारचे प्राणी आणि मृगाचे व पक्ष्यांचे समुदाय असतील त्या सर्वांना मी शरण आलें आहे. म्हणून हें अरण्यवासी प्राणिगणहो ! ' निरुपाय झालेली तुझी सीता रावणानें हरण करून नेली आहे ' असें प्राणापेक्षाही अधिक आणि प्रिय अशा मला रावण हरण करून नेत असल्याचें वर्तमान रामाला कळवा. म्हणजे यमानें जरी मला परलोकीं नेलें असलें तरीसुद्धां समजताक्षणींच तो महापराक्रमी व महाबलाढ्य राम त्याला जिंकून मला परत आणील." (३३-३५)

याप्रमाणें ती दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली व अत्यंत दुःखाकुल झालेली सीता करुण स्वरानें विलाप करूं लागली असता वृक्षावर बसलेला जटायु तिनें पाहिला. तेव्हा त्याला पाहतांच रावणाच्या तावडींत सापडलेली व म्हणूनच भयभीत झालेली ती सुंदरी सीता दुःखजन्य अश्रूंमुळें अस्पष्ट

जटायो पश्य मामार्य ह्रियमाणामनाथवत्।
अनेन राक्षसेन्द्रेण करुणं पापकर्मणा ३८
नैष वारयितुं शक्यस्त्वया क्रूरो निशाचरः।
सत्ववाञ्जितकाशी च सायुधश्चैव दुर्मतिः ३९
रामाय तु यथातत्त्वं जटायो हरणं मम।
लक्ष्मणाय च तत्सर्वमाख्यातव्यमशेषतः ४०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनपञ्चाशः सर्गः।४९।[१६००]

पञ्चाशः सर्गः।

तं शब्दमवसुप्तस्तु जटायुरथ शुश्रुवे।
निरैक्षद्रावणं क्षिप्रं वैदेहीं च ददर्श सः १
ततः पर्वतशृङ्गाभस्तीक्ष्णतुण्डः खगोत्तमः।
वनस्पतिगतः श्रीमान्व्याजहार शुभां गिरम् २
दशग्रीव स्थितो धर्मे पुराणे सत्यसंश्रयः।
भ्रातस्त्वं निन्दितं कर्म कर्तुं नार्हसि सांप्रतम् ३

---

निघणाऱ्या शब्दांनीं त्याला ओरडून म्हणाली, " हे सज्जना जटायो ! पहा, हा राक्षसाधिपति व पापकर्मा रावण शोचनीय रीतीनें अनाथासारखी मला ओढून नेत आहे व या क्रूर राक्षसाचें निवारणही तुझ्यानें होणें शक्य नाहीं. कारण हा दुर्बुद्धि राक्षस बलाढ्य व सशस्त्र असून विजयी पुरुषाप्रमाणें दिसत आहे. म्हणून हे जटायो ! माझ्या नेण्यासंबंधानें सर्व कांहीं इत्थंभूत वर्तमान तूं पूर्णपणें रामाला व लक्ष्मणाला साग." (३६-४०)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला. ॥ ४९ ॥

निद्रित जटायूच्या कानावर तें शब्द येताच जटायु पाहूं लागला तों लगेच रावण आणि सीता हीं त्याला दिसलीं. नंतर पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड व तीक्ष्ण चंचूनें युक्त असा तो वृक्षावर असलेला वैभवशाली श्रेष्ठ पक्षी शुभ शब्दांनीं रावणाला म्हणाला, " हे दशानना ! मी सनातन धर्माचें अवलंबन करीत असून आपली प्रतिज्ञा शेवटास नेणारा आहें. यास्तव, रावणा ! सांप्रत

जटायुर्नाम नाम्नाहं गृध्रराजो महाबलः।
राजा सर्वस्य लोकस्य महेन्द्रवरुणोपमः ४
लोकानां च हिते युक्तो रामो दशरथात्मजः।
तस्यैषा लोकनाथस्य धर्मपत्नी यशस्विनी ५
सीता नाम वरारोहा यां त्वं हर्तुमिहेच्छसि।
कथं राजा स्थितो धर्मे परदारान्परामृशेत् ६
रक्षणीया विशेषेण राजदारा महाबल।
निवर्तय गतिं नीचां परदाराभिमर्शनात् ७
न तत्समाचरेद्धीरो यत्परोऽस्य विगर्हयेत्।
यथाऽऽत्मनस्तथाऽन्येषां दारा रक्ष्या विमर्शनात् ८
अर्थं वा यदि वा कामं शिष्टाः शास्त्रेष्वनागतम्।
व्यवस्यन्त्यनु राजानं धर्मं पौलस्त्यनन्दन ९
राजा धर्मश्च कामश्च द्रव्याणां चोत्तमो निधिः।
धर्मः शुभं वा पापं वा राजमूलं प्रवर्तते १०
पापस्वभावश्चपलः कथं त्वं रक्षसा वर।

हें निंद्य कर्म करणें तुला योग्य नाहीं मी जटायु म्हणून महाबलाढ्य गृध्रराज आहें आणि इंद्रवरुणाप्रमाणें असलेला मी सर्व पृथ्वीचा राजा आहें दशरथपुत्र राम लोकाच्या हिताविषयीं तत्पर आहे आणि त्या लोकनाथाची ही यशस्वी धर्मपत्नी आहे, या सुंदर स्त्रीचें नांव सीता आहे व तूं तिला हरण करून नेण्याचें इच्छीत आहेस, परन्तु धर्माला अनुसरून वागणारा राजा परस्त्रीला कसा बरें स्पर्श करील ? हे महाबलाढ्य रावणा ! राजस्त्रीचें तर विशेषेंकरून रक्षण केलें पाहिजे. म्हणून तूं आपली नीच मनोवृत्ति परस्त्रीस्पर्शापासून निवृत्त कर (१-७)

" दुसरा ज्याला नाव ठेवील असें कर्म विचारी पुरुषानें कधींही करूं नये. अरे, आपल्या स्त्रीप्रमाणेंच परस्त्रीचेंही परपुरुषाच्या स्पर्शापासून रक्षण केलें पाहिजे हे पौलस्त्यनंदना ! शास्त्रामध्यें ज्याचा नीट बोध होत नाहीं, असा धर्म, अर्थ अथवा काम राजाचें आचरण पाहून शिष्ट लोक निश्चित करीत असतात. धर्म, काम आणि उत्तम वस्तूचें उत्कृष्ट भांडार हें सर्व राजाच आहे; कारण

ऐश्वर्यमभिसंप्राप्तो विमानमिव दुष्कृती ११
कामस्वभावो यः सोऽसौ न शक्यस्तं प्रमार्जितुम्।
नहि दुष्टात्मनामार्यमावसत्यालये चिरम् १२
विषये वा पुरे वा ते यदा रामो महाबलः।
नापराध्यति धर्मात्मा कथं तस्यापराध्यसि १३
यदि शूर्पणखाहेतोर्जनस्थानगतः खरः।
अतिवृत्तो हतः पूर्वं रामेणाक्लिष्टकर्मणा १४
अत्र ब्रूहि यथातत्त्वं को रामस्य व्यतिक्रमः।
यस्य त्वं लोकनाथस्य हृत्वा भार्यां गमिष्यसि १५
क्षिप्रं विसृज वैदेहीं मा त्वा घोरेण चक्षुषा।
दहेद्दहनभूतेन वृत्रमिन्द्राशनिर्यथा १६
सर्पमाशीविषं बद्ध्वा वस्त्रान्ते नावबुध्यसे।
ग्रीवायां प्रतिमुक्तं च कालपाशं न पश्यसि १७

---

पुण्य अथवा पातक हें सर्व राजमूलकच असतें. म्हणून, हे राक्षसश्रेष्ठा! तूं स्वभावानें दुष्ट व चंचल असतांना पातकी पुरुषाला ज्याप्रमाणें विमान प्राप्त व्हावें त्याप्रमाणें तुला ऐश्वर्य कसें प्राप्त झालें आहे ? जो पुरुष स्वभावतःच पापी असतो, तो आपला स्वभाव नाहींसा करण्यास समर्थ होत नाहीं. कारण दुष्ट पुरुषांच्या घरीं कितीही दिवस लोटले तरी पुण्य कर्म होण्याचा संभव नसतो. अरे, तुझ्या प्रदेशांत अगर नगरांत महाबलाढ्य व धर्मात्मा राम जर तुझा काहीं अपराध करीत नाहीं, तर तूं कशाकरितां त्याचा अपराध करीत आहेस ? आतां शूर्पणखेकरितां जनस्थानांत गेलेला खर पूर्वींच अयोग्य रीतीनें वागल्यामुळें जर सत्कर्मनिष्ठ रामानें त्याचा वध केला आहे, तर ज्या पृथ्वीपति रामाची भार्या हरण करून तूं जात आहेस, त्या रामाचा यांत काय बरें अपराध आहे ? हें तूं खरें सांग. (८–१५)

"सारांश, इंद्राच्या वज्रानें ज्याप्रमाणें वृत्रासुराला दग्ध करून टाकलें त्याप्रमाणें अग्निरूप बनलेल्या घोर दृष्टीच्या योगानें रामानें तुला दहन न करावें, एतदर्थ तूं सीतेला सत्वर सोडून दे. अरे! सीता हा एक विषयुक्त दढानीं युक्त

स भारः सौम्य भर्तव्यो यो नरं नावसादयेत् ।
तदन्नमपि भोक्तव्यं जीर्यते यदनामयम् १८
यत्कृत्वा न भवेद्धर्मो न कीर्तिर्न यशो ध्रुवम् ।
शरीरस्य भवेत्खेदः कस्तत्कर्म समाचरेत् १९
षष्टिवर्षसहस्राणि जातस्य मम रावण ।
पितृपैतामहं राज्यं यथावदनुतिष्ठतः २०
वृद्धोऽहं त्वं युवा धन्वी सरथः कवची शरी ।
न चाप्यादाय कुशली वैदेहीं मे गमिष्यसि २१
न शक्तस्त्वं बलाद्धर्तुं वैदेहीं मम पश्यतः ।
हेतुभिर्न्यायसंयुक्तैर्ध्रुवां वेदश्रुतीमिव २२
युद्धयस्व यदि शूरोऽसि मुहूर्तं तिष्ठ रावण ।
शयिष्यसे हतो भूमौ यथा पूर्वं खरस्तथा २३

असलेला सर्पच पदरांत बांधून तू चालला आहेस, हें तू जाणीत नाहींस आणि गळ्यात पडलेला कालपाश तूं अवलोकन करीत नाहींस हें सौम्य रावणा! ज्याच्या खालीं चिरडून जाण्याची पाळी येणार नाहीं, तो भार पुरुषानें उचलावा आणि अन्न तरी रोगोत्पत्ति न होता जें जिरेल तेंच खावें अरे! जें केलें असता धर्म, कीर्ति आणि अक्षय यश यांतील कांहींच प्राप्त न होता शरिराला क्लेश मात्र होण्याचा संभव असतो, तें कर्म कोण बरें करील ? हे रावणा! वाडवडिलापासून चालत आलेलें पक्षिराज्य योग्य रीतीनें चालविता चालविता माझ्या जन्माला साठ हजार वर्षे होऊन गेलीं. तेव्हा मी वृद्ध असून तू तरुण आहेस आणि धनुष्य, बाण, रथ व कवच यांनीं तू युक्त आहेस, तथापि माझ्या समक्ष सीतेला घेऊन तू सुखरूप जाणार नाहींस तात्पर्य, मीमांसकापुढें सनातन वेदश्रुतीला हेत्वाभासांच्या योगानें भलतीकडे नेण्यास ज्याप्रमाणें शाक्य समर्थ होत नाहीं, त्याचप्रमाणें माझ्या समक्ष सीतेला बलात्कारानें हरण करून नेण्यास तूं समर्थ नाहींस ( १८-२२ )

"म्हणून, हे रावणा! शूर असशील तर एक क्षणभर वाट पहा आणि रामाशीं युद्ध कर. पूर्वी ज्याप्रमाणें खर भूमीवर मरून पडला, त्याप्रमाणें तूं

असकृत्संयुगे येन निहता दैत्यदानवाः।
न चिराच्चीरवासास्त्वां रामो युधि वधिष्यति २४
किं नु शक्यं मया कर्तुं गतौ दूरं नृपात्मजौ।
क्षिप्रं त्वं नश्यसे नीच तयोर्भीतो न संशयः २५
नहि मे जीवमानस्य नयिष्यसि शुभामिमाम्।
सीतां कमलपत्राक्षीं रामस्य महिषीं प्रियाम् २६
अवश्यं तु मया कार्यं प्रियं तस्य महात्मनः।
जीवितेनापि रामस्य तथा दशरथस्य च २७
तिष्ठ तिष्ठ दशग्रीव मुहूर्तं पश्य रावण।
वृन्तादिव फलं त्वां तु पातयेयं रथोत्तमात् २८
युद्धातिथ्यं प्रदास्यामि यथाप्राणं निशाचर २९

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चाश. सर्गः ।५०। [१६२९]

एकपञ्चाशः सर्गः।

इत्युक्तः क्रोधताम्राक्षस्तप्तकाञ्चनकुण्डलः।

भूमीवर मरून पडशील अरे! संग्रामांत ज्यानें अनेक वेळा दैत्यदानवांचा वध केला आहे, तो वल्कलें परिधान करणारा राम लवकरच युद्धांत तुझा वध करील. राजपुत्र राम-लक्ष्मण तर दूर गेले आहेत तेव्हा या प्रसंगीं मजकडून काय बरें होणार आहे? परंतु हे नीचा! त्यांना भिऊन तू लवकरच पळून जाशील यांत संशय नाहीं. कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशी ही रामाची प्रिय भार्या कल्याणी सीता मी जिवंत असताना तुला नेता येणार नाहीं. जीव जरी खर्ची पडला तरी त्या महात्म्या रामाला आणि त्याचप्रमाणें दशरथाला प्रिय होणारी गोष्ट मला अवश्यच केली पाहिजे. याकरितां हे दशकंठा रावणा! थाव, थाव; एक क्षणभर धीर धर, म्हणजे देठापासून ज्याप्रमाणें फळ गळून पडतें त्याप्रमाणें मी तुला उत्कृष्ट रथापासून खालीं पाडतों आणि, हे राक्षसा! मी युद्धरूप पाहुणचारानें तुझें यथाशक्ति स्वागत करतों" (२३-२९)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पन्नासावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५० ॥

राक्षसेन्द्रोऽभिदुद्राव पतगेन्द्रममर्षणः १
स संप्रहारस्तुमुलस्तयोस्तस्मिन्महामृधे ।
बभूव वातोद्धुतयोर्मेघयोर्गगने यथा २
तद्बभूवाद्भुतं युद्धं गृध्रराक्षसयोस्तदा ।
सपक्षयोर्माल्यवतोर्महापर्वतयोरिव ३
ततो नालीकनाराचैस्तीक्ष्णाग्रैश्च विकर्णिभिः ।
अभ्यवर्षन्महाघोरैर्गृध्रराजं महाबलम् ४
स तानि शरजालानि गृध्रः पत्ररथेश्वरः ।
जटायुः प्रतिजग्राह रावणास्त्राणि संयुगे ५
तस्य तीक्ष्णनखाभ्यां तु चरणाभ्यां महाबलः ।
चकार बहुधा गात्रे व्रणान्पतगसत्तमः ६
अथ क्रोधाद्दशग्रीवो जग्राह दश मार्गणान् ।
मृत्युदण्डनिभान्घोराञ्छत्रोर्निधनकाङ्क्षया ७
स तैर्बाणैर्महावीर्यः पूर्णमुक्तैरजिह्मगैः ।

याप्रमाणें जटायु रावणाला बोलला असता त्या राक्षसाधिपाला तें सहन झालें नाही. तेव्हा उत्कृष्ट सुवर्णाची कुंडलें धारण केलेला तो रावण क्रोधानें डोळे लाल करून त्या पक्षिराजावर सत्वर चालून गेला व नंतर वायूनें प्रेरित झालेल्या मेघाचें ज्याप्रमाणें आकाशात परस्पराशीं युद्ध होतें, त्याप्रमाणें त्या महासंग्रामात त्या उभयतांचें तुमुल युद्ध सुरू झालें. पक्षांनीं युक्त असलेल्या दोन माल्यवान् महापर्वतांमध्यें ज्याप्रमाणें परस्पर युद्ध व्हावें, त्याप्रमाणें गृध्र आणि राक्षस यामध्यें तें अद्भुत युद्ध सुरू झालें युद्ध सुरू झाल्यावर नालीक, नाराच आणि तीक्ष्णाग्रानीं युक्त असलेले महाभयंकर विकर्णी नांवाचे बाण याचा रावणानें महाबलाढ्य गृध्रराजावर वर्षाव केला व पक्षिराज गृध्र जटायूनेंही युद्धांत रावणानें सोडलेल्या त्या बाणसमुदायाचा स्वीकार केला इतकेंच नव्हें, तर त्या महाबलाढ्य श्रेष्ठ पक्ष्यानें रावणाच्या शरीरावर तीक्ष्ण नखानीं युक्त असलेल्या आपल्या पायांच्या योगानें अनेक जखमा केल्या (१-६)

नेव्हा मृत्यूच्या दंडाप्रमाणें भयंकर असे दहा बाण शत्रूचा वध करण्याच्या

विभेद निशितैस्तीक्ष्णैर्गृध्रं घोरैः शिलीमुखैः ८
स राक्षसरथे पश्यञ्जानकीं बाष्पलोचनाम्।
अचिन्तयित्वा बाणांस्तान्राक्षसं समभिद्रवत् ९
ततोऽस्य सशरं चापं मुक्तामणिविभूषितम्।
चरणाभ्यां महातेजा बभञ्ज पतगोत्तमः १०
ततोऽन्यद्धनुरादाय रावणः क्रोधमूर्छितः।
ववर्ष शरवर्षाणि शतशोऽथ सहस्रशः ११
शरैरावारितस्तस्य संयुगे पतगेश्वरः।
कुलायमभिसंप्राप्तः पक्षिवच्च बभौ तदा १२
स तानि शरजालानि पक्षाभ्यां तु विधूय ह।
चरणाभ्यां महातेजा बभञ्जास्य महद्धनुः १३
तच्चाग्निसदृशं दीप्तं रावणस्य शरावरम्।
पक्षाभ्यां च महातेजा व्यधुनोत्पतगेश्वरः १४
काञ्चनोरश्छदान्दिव्यान्पिशाचवदनान्खरान्।

---

इच्छेनें रागारागानें रावणानें हातांत घेतले आणि कानापर्यंत दोरी ताणून सोडलेले, सरळ जाणारे, घासलेले, तीक्ष्ण आणि भयंकर अशा शिलीमुख नावाच्या बाणाच्या योगानें त्या महावीर्यमान् रावणानें जटायूचें शरीर भेदून टाकलें. तथापि राक्षसाच्या रथावर अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या सीतेकडे त्याचें लक्ष गेल्यामुळें त्या बाणाची पर्वा न करितां तो त्या राक्षसाच्या अंगावर धांवून गेला आणि त्या महातेजस्वी श्रेष्ठ पक्ष्यानें आपल्या पायांच्या योगानें त्याचें मोत्यें आणि रत्नें यांनीं सजविलेलें धनुष्य बाणासह मोडून टाकलें. तेव्हां रावण क्रोधानें व्याप्त झाला आणि त्यानें दुसरें धनुष्य घेऊन शेकडों हजारों बाणाचे वर्षाव जटायूवर केले व त्यामुळें बाणानीं युद्धांत व्याप्त झालेला तो पक्षिराज घरट्यांत येऊन बसलेल्या पक्ष्याप्रमाणें दिसूं लागला. (८–१२)

त्या महातेजस्वी जटायूनें आपले पंख हालवून ते बाणसमुदाय टाकून दिले, पायांच्या योगानें त्याचें प्रचंड धनुष्य तोडलें आणि त्या महातेजस्वी पक्षिराजानें आपल्या पक्षांच्या योगानें रावणाचें तें अग्नीप्रमाणें उज्वल असलेलें

तांश्चास्य जवसंपन्नाञ्जघान समरे बली १५
अथ त्रिवेणुसंपन्नं कामगं पावकार्चिषम् ।
मणिसोपानचित्राङ्गं बभञ्ज च महारथम् १६
पूर्णचन्द्रप्रतीकाशं छत्रं च व्यजनैः सह ।
पातयामास वेगेन ग्राहिभी राक्षसैः सह १७
सारथेश्चास्य वेगेन तुण्डेन च महच्छिरः ।
पुनर्व्यपहनच्छ्रीमान्पक्षिराजो महाबलः १८
स भग्नधन्वा विरथो हताश्वो हतसारथिः ।
अङ्केनादाय वैदेहीं पपात भुवि रावणः १९
दृष्ट्वा निपतितं भूमौ रावणं भग्नवाहनम् ।
साधु साध्विति भूतानि गृध्रराजमपूजयन् २०
परिश्रान्तं तु तं दृष्ट्वा जरया पक्षियूथपम् ।
उत्पपात पुनर्हृष्टो मैथिलीं गृह्य रावणः २१

---

कवचही उडवून दिलें. इतकेंच नव्हे, तर पिशाच्चासारख्या मुखानीं आणि सुवर्णाच्या उरस्त्राणानीं युक्त असलेले त्या रावणाचे वेगवान् व दिव्य गर्दभही संग्रामांत त्या बलाढ्य जटायूनें मारून टाकले आणि नंतर दांड्या, रत्नजडीत पायऱ्या व चमत्कारिक सामान यानीं युक्त असून अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेला त्याचा महारथ त्यानें तोडून टाकला. पूर्ण चंद्राप्रमाणें असलेलें छत्रही, चामरासह आणि तें संभाळणाऱ्या राक्षसासह, त्यानें वेगावेगानें खालीं पाडलें आणि त्या महाबलाढ्य श्रीमान् पक्षिराजानें त्याच्या सारथ्याचें प्रचंड मस्तकही चोंचीच्या योगानें वेगावेगानें तोडून टाकलें (१३-१८)

तेव्हां ज्याचें धनुष्य मोडलेलें आहे, ज्याचा रथ नाहींसा झाला आणि ज्याच्या अश्वांचा व सारथ्याचा वध झाला आहे, असा तो रावण सीतेला घेऊन पृथ्वीवर पडला. त्यानें डाव्या हातात सीतेचे केस धरून आणि उजवा हात कमरेखालीं घालून तिला उचलली होती. वाहनाचा वध होऊन रावण भूमीवर पडल्याचें अवलोकन करिताक्षणींच, " शाबास शाबास " म्हणून सर्व प्राणी गृध्रराज जटायूची प्रशंसा करूं लागले इतक्यांत पक्ष्याच्या कळपाचें

तं प्रहृष्टं निधायाङ्के रावणं जनकात्मजाम् ।
गच्छन्तं खड्गशेषं च प्रनष्टहतसाधनम् २२
गृध्रराजः समुत्पत्य रावणं समभिद्रवत् ।
समावार्य महातेजा जटायुरिदमब्रवीत् २३
वज्रसंस्पर्शबाणस्य भार्यां रामस्य रावण ।
अल्पबुद्धे हरस्येनां वधाय खलु रक्षसाम् २४
समित्रबन्धुः सामात्यः सबलः सपरिच्छदः ।
विषपानं पिबस्येतत्पिपासित इवोदकम् २५
अनुबन्धमजानन्तः कर्मणामविचक्षणाः ।
शीघ्रमेव विनश्यन्ति यथा त्वं विनशिष्यसि २६
बद्धस्त्वं कालपाशेन क्व गतस्तस्य मोक्ष्यसे ।
वधाय बडिशं गृह्य सामिषं जलजो यथा २७
नहि जातु दुराधर्षौ काकुत्स्थौ तव रावण ।

रक्षण करणारा जटायु म्हातारपणामुळें थकून गेला आहे असें पाहून रावण पुनरपि आनंदित झाला आणि सीतेला घेऊन आकाशमार्गानें प्रयाण करूं लागला. इतर सर्व साधनें नाहींशीं होऊन फक्त खड्गच ज्याचे जवळ शिलक राहिलें आहे असा तो आनंदित झालेला रावण जनककन्या सीतेला अंकावर बसवून जाऊं लागला असता तो महातेजस्वी गृध्रराज जटायु उड्डाण करून त्याच्या अंगावर धावला आणि त्याला अडवून धरून म्हणाला. (१९-२३)

"हे मूढा रावणा ! प्रहारासंबंधानें वज्राची बरोबरी करणारे ज्याचे बाण आहेत, अशा रामाची ही भार्या तूं खरोखर राक्षसाच्या वधाकरिता हरण करून नेत आहेस सारांश, तृषाक्रांत झालेला पुरुष ज्याप्रमाणें उदक प्राशन करूं लागतो, त्याप्रमाणें मृत्यूनें ग्रस्त झालेला तूं मित्र, बांधव, अमात्य, सैन्य आणि सेवक यांसह हें विष प्राशन करीत आहेस. जे मूढ पुरुष आपल्या कृत्याच्या परिणामाकडे लक्ष देत नाहींत, ते तुझ्याप्रमाणें सत्वरच नाश पावतात. अरे, आपल्या वधाकरितां आमिष लावलेला गळ मुखांत घेऊन ज्याप्रमाणें मत्स्य सुटून जाण्यास समर्थ होत नाहीं, त्याचप्रमाणें कालपाशानें बद्ध झालेला

घर्षणं चाश्रमस्यास्य क्षमिष्येते तु राघवौ २८
यथा त्वया कृतं कर्म भीरुणा लोकगर्हितम् ।
तस्कराचरितो मार्गो नैष वीरनिषेवितः २९
युद्धयस्व यदि शूरोऽसि मुहूर्तं तिष्ठ रावण ।
शयिष्यसि हतो भूमौ यथा भ्राता खरस्तथा ३०
परेतकाले पुरुषो यत्कर्म प्रतिपद्यते ।
विनाशायात्मनोऽधर्म्यं प्रतिपन्नोऽसि कर्म तत् ३१
पापानुबन्धो वै यस्य कर्मणः को नु तत्पुमान् ।
कुर्वीत लोकाधिपतिः स्वयंभूर्भगवानपि ३२
एवमुक्त्वा शुभं वाक्यं जटायुस्तस्य रक्षसः ।
निपपात भृशं पृष्ठे दशग्रीवस्य वीर्यवान् ३३
तं गृहीत्वा नखैस्तीक्ष्णैर्विददार समन्ततः ।
अधिरूढो गजारोहो यथा स्याद् दुष्टवारणम् ३४

तूं कोठेंही गेलास तरी त्या रामाच्या तावडींतून कसा बरें सुटशील ? हे रावणा! तूं जो या आश्रमाचा अपमान केला आहेस, तो ककुत्स्थकुलोत्पन्न रघुवंशज राम-लक्ष्मणांना कधींही सहन होणार नाहीं. लोकांत निंद्य ठरणारें जें हें कृत्य तूं रामाला भिऊन केलें आहेस, तो चोरांनीं स्वीकारलेला मार्ग आहे, वीरांनीं अवलंबन केलेला हा मार्ग नव्हे याकरितां हे रावणा ! जर तूं शूर असशील तर एक क्षणभर उभा राहून युद्ध कर; म्हणजे आपल्या खर नामक भ्रात्याप्रमाणें वध पावून भूमीवर शयन करशील मृत्यूचा समय प्राप्त झाला असतां पुरुष ज्या कर्माचें अवलंबन करीत असतो, तें पातकावह कर्म आपल्या नाशाकरितां तूं केलें आहेस. ज्याचा परिणाम चांगला नाहीं, तें कर्म प्रत्यक्ष लोकाधिपति भगवान् ब्रह्मदेवही जरी झाला तरी कोणता बरें कल्याणेच्छु पुरुष करण्यास प्रवृत्त होईल ?" (२४-३२)

याप्रमाणें शुभ भाषण करून तो वीर्यवान् त्या दशकंठ राक्षसाच्या मागें एकसारखा धावूं लागला आणि दुष्ट गजावर आरूढ झालेला महात ज्याप्रमाणें अंकुशाच्या योगानें गजाला जखमा करतो, त्याचप्रमाणें तीक्ष्ण नखांनीं त्या

विददार नखैरस्य तुण्डं पृष्ठे समर्पयन् ।
केशांश्चोत्पाटयामास नखपक्षमुखायुधः ३५
स तदा गृध्रराजेन क्लिश्यमानो मुहुर्मुहुः ।
अमर्षस्फुरितोष्ठः सन्प्राकम्पत च राक्षसः ३६
संपरिष्वज्य वैदेहीं वामेनाङ्केन रावणः ।
तलेनाभिजघानार्तो जटायुं क्रोधमूर्च्छितः ३७
जटायुस्तमतिक्रम्य तुण्डेनास्य खगाधिपः ।
वामबाहून्दश तदा व्यपाहरदरिन्दमः ३८
संछिन्नबाहोः सद्यो वै बाहवः सहसाऽभवन् ।
विषज्वालावलीमुक्ता वल्मीकादिव पन्नगाः ३९
ततः क्रोधाद्दशग्रीवः सीतामुत्सृज्य वीर्यवान् ।
मुष्टिभ्यां चरणाभ्यां च गृध्रराजमपोथयत् ४०
ततो मुहूर्तं संग्रामो बभूवातुलवीर्ययोः ।
राक्षसानां च मुख्यस्य पक्षिणां प्रवरस्य च ४१

---

रावणाच्या शरिरावर सर्व ठिकाणीं जखमा करूं लागला. नखें, पंख आणि मुख हींच ज्याचीं आयुधें आहेत, अशा त्या जटायूनें रावणाच्या पाठींत चोंच भोंसकून नखानीं त्याला जखमी केलें आणि त्याचे केस उपटून टाकले. याप्रमाणें गृध्रराज जटायू वारंवार क्लेश देऊं लागला असता क्रोधामुळें ओंठ फुरफुरूं लागलेला तो राक्षस रावण थरथर कांपूं लागला व क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या दुःखित रावणानें डाव्या मांडीवर सीतेला घेऊन जटायूला एक चपराक मारली. तथापि ती सहन करून शत्रूंचें दमन करणाऱ्या पक्षिराज जटायूनें आपल्या चोंचीच्या योगानें त्याचे दहाही डावे हात तोडून टाकले. याप्रमाणें जरी त्याचे हात तुटले गेले तरी विषयुक्त ज्वालासमुदाय ज्यांच्या मुखातून निघत आहे असे सर्प ज्याप्रमाणें वारुळातून बाहेर निघतात, त्याचप्रमाणें त्या रावणाच्या बाहुरंध्रातून एकाएकीं नवे बाहु निघाले. (३३-३९)

तेव्हां वीर्यवान् दशकंठ रावण सीतेला सोडून देऊन रागारागानें त्या गृध्रराज जटायूला लाथा-बुक्क्या मारूं लागला असता ज्याच्या सामर्थ्याला

तस्य व्यायच्छमानस्य रामस्यार्थे स रावणः ।
पक्षौ पादौ च पार्श्वौ च खड्गमुद्धृत्य सोऽच्छिनत् ४१
स च्छिन्नपक्षः सहसा रक्षसा रौद्रकर्मणा ।
निपपात महागृध्रो धरण्यामल्पजीवितः　　　　४२
तं दृष्ट्वा पतितं भूमौ क्षतजार्द्रं जटायुषम् ।
अभ्यधावत वैदेही स्वबन्धुमिव दुःखिता　　　　४४
तं नीलजीमूतनिकाशकल्पं सपाण्डुरोरस्कमुदारवीर्यम् ।
ददर्श लङ्काधिपतिः पृथिव्यां जटायुषं शान्तमिवाग्निदावम् ४५
ततस्तु तं पत्ररथं महीतले निपातितं रावणवेगमर्दितम् ।
पुनश्च संगृह्य शशिप्रभानना रुरोद सीता जनकात्मजा तदा ४६
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकपञ्चाशः सर्गः ॥५१॥[१६७५]

द्विपञ्चाशः सर्गः ।

सा तु ताराधिपमुखी रावणेन निरीक्ष्य तम् ।
गृध्रराजं विनिहतं विललाप सुदुःखिता　　　　१

तुलना नाहीं असा राक्षसश्रेष्ठ रावण आणि पक्षिश्रेष्ठ जटायू यामध्यें एक मुहूर्तभर युद्ध झालें व त्या युद्धांत रामाकरितां धडपडत असलेल्या जटायूचे पंख, दोन्ही बाजू व पाय त्या रावणानें तरवार उपसून तोडून टाकले याप्रमाणें क्रूरकर्मी राक्षसानें पंख तोडून टाकल्यामुळें तो धिप्पाड गृध्रपक्षी जटायू कंठीं प्राण येऊन एकाएकी भूमीवर पडला. तेव्हां तो जटायू पृथ्वीवर पडला आहे व त्याचें शरीर रक्तानें भरलें आहे असें पाहतांच ती दुःखित झालेली सीता त्याच्याकडे धावली व नील मेघाप्रमाणें आकृति, श्वेत वक्षःस्थल आणि प्रचंड सामर्थ्य यानीं युक्त असलेला तो जटायू लंकाधिपति रावणाला शांत झालेल्या अग्नीप्रमाणें पृथ्वीवर दिसूं लागला आणि इकडे चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती जनककन्या सीता रावणाच्या सामर्थ्यानें जर्जर होऊन भूतलावर पडलेल्या त्या पक्ष्याला पुनः कवटाळून रडूं लागली. (४०-४६)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥ ५१ ॥

निमित्तं लक्षणं स्वप्नं शकुनिस्वरदर्शनम् ।
अवश्यं सुखदुःखेषु नराणां परिदृश्यते २
न नूनं राम जानासि महद्व्यसनमात्मनः ।
धावन्ति नूनं काकुत्स्थ मदर्थं मृगपक्षिणः ३
अयं हि कृपया राम मां त्रातुमिह संगतः ।
शेते विनिहतो भूमौ ममाभाग्याद्विहंगमः ४
त्राहि मामद्य काकुत्स्थ लक्ष्मणेति वराङ्गना ।
सुसंत्रस्ता समाक्रन्दच्छृण्वतां तु यथाऽन्तिके ५
तां क्लिष्टमाल्याभरणां विलपन्तीमनाथवत् ।
अभ्यधावत वैदेहीं रावणो राक्षसाधिपः ६
तां लतामिव वेष्टन्तीमालिङ्गन्तीं महाद्रुमान् ।
मुञ्च मुञ्चेति बहुशः प्राप तां राक्षसाधिपः ७

चद्रतुल्य सुंदर मुखानें युक्त असलेली ती सीता रावणानें मारलेल्या गृध्रराज जटायूला पाहून अत्यंत दु खित झाली आणि विलाप करूं लागली ती म्हणाली, " सुखाचे अथवा दु खाचे प्रसंग यावयाचे असल्यास स्वप्न अथवा पक्ष्याचा स्वर असें काहींतरी सूचक चिन्ह मनुष्याच्या दृष्टोत्पत्तीस अवश्य येत असतें परन्तु हे रामा ! माझ्याकरिता ( म्हणजे रावणानें माझा अपहार केला आहे हें सुचविण्याकरिता ) पशुपक्षी जरी धावाधाव करीत आहेत, तरी खरोखर स्वत वर आलेलें मोठें संकट तू जाणत नाहींस हे रामा ! हा पक्षी जटायू माझें रक्षण करण्याकरिता कृपा करून येथें आला, परन्तु माझ्या दुर्दैवानें हा भूमीवर मरून पडला आहे म्हणून हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! हे लक्ष्मणा ! आज तुम्ही माझें रक्षण करा " याप्रमाणें ती उत्कृष्ट स्त्री सीता अतिशय त्रस्त होऊन व राम लक्ष्मण समीप ऐकत बसले आहेत असेंच जणूं समजून हळूहळू विलाप करूं लागली ( १–५ )

जिनें धारण केलेलीं पुष्पें व भूषणें अस्ताव्यस्त झालीं आहेत, अशी ती सीता अनाथाप्रमाणें विलाप करू लागली असता राक्षसाधिपति रावण तिच्या अंगावर धावून गेला आणि लतेप्रमाणें मोठमोठ्या वृक्षाना आलिंगन

क्रोशन्तीं राम रामेति रामेण रहितां वने।
जीवितान्ताय केशेषु जग्राहान्तकसंनिभः ८
प्रधर्षितायां वैदेह्यां बभूव सचराचरम्।
जगत्सर्वममर्यादं तमसान्धेन संवृतम् ९
न वाति मारुतस्तत्र निष्प्रभोऽभूद्दिवाकरः।
दृष्ट्वा सीतां परामृष्टां देवो दिव्येन चक्षुषा १०
कृतं कार्यमिति श्रीमान्व्याजहार पितामहः।
प्रहृष्टा व्यथिताश्चासन्सर्वे ते परमर्षयः ११
दृष्ट्वा सीतां परामृष्टां दण्डकारण्यवासिनः।
रावणस्य विनाशं च प्राप्तं बुद्ध्वा यदृच्छया १२
स तु तां राम रामेति रुदतीं लक्ष्मणेति च।
जगामादाय चाकाशं रावणो राक्षसेश्वरः १३
तप्ताभरणवर्णाङ्गी पीतकौशेयवासिनी।

---

देऊन ती सीता विळखा घालूं लागली असता " सोड सोड " असें वारवार म्हणत तो राक्षसाधिपति रावण तिच्याजवळ आला आणि रामाचा वियोग झाल्यामुळें "राम राम" म्हणून वनात आक्रोश करीत असलेल्या सीतेचे केस दिसण्यात मृत्युसमान असलेल्या राक्षसानें आपल्या जीविताच्या नाशाकरितां धरिले याप्रमाणें रावणानें सीतेला बलात्कारानें धरलें असता चराचर प्राण्यासह सर्व जगत् अमर्याद होऊन निबिड अंधकारानें भरून गेलें तेथें वारा वाहेनासा झाला आणि सूर्यही निस्तेज झाला इकडे वैभवशाली भगवान् ब्रह्मदेव सीतेला रावणानें धरल्याचें दिव्य दृष्टीनें पाहिल्यावर "आपलें कार्य झालें" असें म्हणाले आणि तेथें असलेले सर्व महर्षि आनंदित व दुःखित झाले, कारण सीतेचें संकट पाहून ते दुःख करूं लागले आणि परिवारासह रावणाचा नाश होण्याचा प्रसंग आला आहे असें आढळून आल्यामुळें त्यांना हर्ष होऊं लागला. (६-१२)

" रामा ! रामा ! लक्ष्मणा ! " असें म्हणून सीता रडत असतांना तिला घेऊन राक्षसाधिपति रावण आकाशमार्गानें चालता झाला. शरीराची कांति

रराज राजपुत्री तु विद्युत्सौदामनी यथा १४
उद्धूतेन च वस्त्रेण तस्याः पीतेन रावणः ।
अधिकं परिबभ्राज गिरिर्दीप्त इवाग्निना १५
तस्याः परमकल्याण्यास्ताम्राणि सुरभीणि च ।
पद्मपत्राणि वैदेह्या अभ्यकीर्यन्त रावणम् १६
तस्याः कौशेयमुद्धूतमाकाशे कनकप्रभम् ।
बभौ चादित्यरागेण ताम्रमभ्रमिवातपे १७
तस्यास्तद्विमलं वक्त्रमाकाशे रावणाङ्कगम् ।
न रराज विना रामं विनालमिव पङ्कजम् १८
बभूव जलदं नीलं भित्त्वा चन्द्र इवोदितः ।
सुललाटं सुकेशान्तं पद्मागर्भाभमव्रणम् १९
शुक्लैः सुविमलैर्दन्तैः प्रभावद्भिरलंकृतम् ।
तस्याः सुनयनं वक्त्रमाकाशे रावणाङ्कगम् २०
रुदितं व्यपमृष्टास्रं चन्द्रवत्प्रियदर्शनम् ।

---

उज्ज्वल सुवर्णभूषणाप्रमाणें असल्यामुळें आणि स्वतः पिंवळी पैठणी नेसलेली असल्यामुळें ती राजकन्या मेघातील विद्युल्लतेप्रमाणें दिसूं लागली आणि तिचें पीत वस्त्र वाऱ्यानें उडूं लागलें असता रावणही अग्नीच्या योगानें प्रदीप्त झालेल्या पर्वताप्रमाणें अधिकच शोभूं लागला. त्या परम कल्याणी सीतेचें शरिरावरील आरक्तवर्ण व सुगंधी अशीं कमलाचीं पानें रावणाच्या अंगावर पडलीं. सोन्याप्रमाणें झळकत असलेलें तिचें वस्त्र आकाशात उडूं लागलें असता तें संध्यासमयीं सूर्याच्या प्रभेनें युक्त झालेल्या ताम्रवर्ण अभ्राप्रमाणें दिसूं लागलें. रावणाच्या अंकावर असलेलें तिचें निर्मल मुख रामाच्या वियोगानें देठ नसलेल्या कमलाप्रमाणें आकाशामध्यें फारसें शोभलें नाहीं. (१३–१८)

उत्कृष्ट कपाळ, मनोहर केस व कमलाच्या गाभ्यासारखी कांति यांनीं युक्त असून व्रणरहित असलेलें तिचें मुख नील मेघाला फोडून त्यात उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें दिसूं लागलें. शुभ्रवर्ण, अत्यन्त निर्मल व सतेज अशा दाताच्या योगानें भूषित आणि उत्कृष्ट नेत्रानीं युक्त असलेलें तिचें मुखकमल

सुनासं चारुताम्रोष्ठमाकाशे हाटकप्रभम् २१
राक्षसेन्द्रसमाधूतं तस्यास्तद्वदनं शुभम्।
शुशुभे न विना रामं दिवा चन्द्र इवोदितः २२
सा हेमवर्णा नीलाङ्गं मैथिली राक्षसाधिपम्।
शुशुभे काञ्चनी काञ्ची नीलं गजमिवाश्रिता २३
सा पद्मपीता हेमाभा रावणं जनकात्मजा।
विद्युद्घनमिवाविश्य शुशुभे तप्तभूषणा २४
तस्या भूषणघोषेण वैदेह्या राक्षसेश्वरः।
अभूत्सचपलो नीलः सघोष इव तोयदः २५
उत्तमाङ्गच्युता तस्याः पुष्पवृष्टिः समन्ततः।
सीताया ह्रियमाणायाः पपात धरणीतले २६
सा तु रावणवेगेन पुष्पवृष्टिः समन्ततः।

रावणाच्या अंकावर असल्यामुळें आकाशात शोभेनासें झालें. तिचें मुख जरी चंद्राप्रमाणें दृष्टीला आल्हादकारक होतें आणि सुवर्णासारखी कांति, सुंदर नासिका आणि मनोहर ताम्रवर्ण ओष्ठ यांनीं जरी तें युक्त होतें, तरी रडकें व अश्रू पुसलेलें असल्यामुळें शोभत नव्हतें सारांश, दिवसा उदय पावलेला चंद्र ज्याप्रमाणें शोभत नाहीं, त्याप्रमाणें राक्षसाधिपति रावणामुळें दु खी झालेलें तिचें शुभ मुख रामाचा वियोग झाला असल्यामुळें शोभेनासें झालें सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेली ती सीता नीलवर्ण राक्षसाधिपतीच्या आश्रयाला असल्यामुळें नील गजाच्या आश्रयाला असलेल्या सुवर्णाच्या साखळदंडाप्रमाणें दिसूं लागली कमलाच्या केसराप्रमाणें जिच्या देहाचा वर्ण आहे, सुवर्णाप्रमाणें जिची कांति आहे आणि उज्ज्वल सुवर्णभूषणें जिनें धारण केलेलीं आहेत, अशी ती जनककन्या सीता रावणाच्या आश्रयाला असल्यामुळें मेघात शिरलेल्या विद्युल्लतेप्रमाणें दिसूं लागली (१९-२४)

सीतेनें धारण केलेल्या भूषणाच्या ध्वनीनें राक्षसाधिपति रावण विद्युल्लतेनें युक्त असून गर्जना करणाऱ्या चपल नीलमेघाप्रमाणें दिसूं लागला. सीतेला रावण घेऊन जाऊं लागला असतां तिच्या डोक्यात असलेल्या

समाधूता दशग्रीवं पुनरेवाभ्यवर्तत २७
अभ्यवर्तत पुष्पाणां धारा वैश्रवणानुजम्।
नक्षत्रमाला विमला मेरुं नगमिवोत्तमम् २८
चरणान्नूपुरं भ्रष्टं वैदेह्या रत्नभूषितम्।
विद्युन्मण्डलसंकाशं पपात धरणीतले २९
तरुप्रवालरक्ता सा नीलाङ्गं राक्षसेश्वरम्।
प्रशोभयत वैदेही गजं कक्ष्येव काञ्चनी ३०
तां महोल्कामिवाकाशे दीप्यमानां स्वतेजसा।
जहाराकाशमाविश्य सीतां वैश्रवणानुजः ३१
तस्यास्तान्यग्निवर्णानि भूषणानि महीतले।
सघोषाण्यवशीर्यन्त क्षीणास्तारा इवाम्बरात् ३२
तस्याः स्तनान्तराद्भ्रष्टो हारस्ताराधिपद्युतिः।

पुष्पांचा वर्षाव भूतलावर चोहोंकडे झाला, आणि रावणाच्या वेगामुळें उत्पन्न झालेल्या वायुनें ती पुष्पवृष्टि जरी जिकडे तिकडे उडवून दिली जात होती तरी ती एकसारखी होत असल्यामुळें पुनरपि रावणाच्या समोंवतींच येत होती. सारांश, निर्मल नक्षत्रमाला ज्याप्रमाणें श्रेष्ठ मेरुपर्वतासभोंवतीं फिरत असते, त्याप्रमाणें ती पुष्पवृष्टि रावणासभोंवतीं फिरत होती. जातां जातां विद्युन्मण्डलाप्रमाणें तेजस्वी असलेलें रत्नजडीत नूपुर सीतेच्या पायापासून सुटून भूतलावर पडलें. रावण घेऊन जाऊं लागल्यामुळें अतिशयच क्रुद्ध आणि म्हणूनच वृक्षावरील नूतन पल्लवाप्रमाणें आरक्तवर्ण झालेली ती सीता, सुवर्णाची झूल ज्याप्रमाणें हत्तीला शोभा देऊं लागते त्याचप्रमाणें त्या नीलवर्ण शरिरानें युक्त असलेल्या राक्षसाधिपति रावणाला शोभा देऊं लागली.(२५–३०)

मोठ्या ज्वालेप्रमाणें आकाशामध्यें आपल्या तेजानें दैदीप्यमान होत असलेल्या त्या सीतेला तो कुबेराचा कनिष्ठ भ्राता रावण आकाशाच्या मार्गानें घेऊन जाऊं लागला असतां तिच्या शरिरावर असलेलीं अग्नी-सारखीं उज्ज्वल व नादयुक्त भूषणें पुण्य क्षीण झाल्यामुळें आकाशांतून गळून पडणाऱ्या तारारूप पुण्यवान् लोकांप्रमाणें गळून पडलीं आणि त्या सीतेच्या

वैदेह्या निपतन्भाति गङ्गेव गगनच्युता　　३३
उत्पातवाताभिहता नानाद्विजगणायुताः ।
मा भैरिति विधूताग्रा व्याजह्रुरिव पादपाः　　३४
नलिन्यो ध्वस्तकमलास्त्रस्तमीनजलेचराः ।
सखीमिव गतोत्साहां शोचन्तीव स्म मैथिलीम्　　३५
समन्तादभिसंपत्य सिंहव्याघ्रमृगद्विजाः ।
अन्वधावंस्तदा रोषात्सीताच्छायानुगामिनः　　३६
जलप्रपातास्रमुखाः शृङ्गैरुच्छ्रितबाहुभिः ।
सीतायां ह्रियमाणायां विक्रोशन्तीव पर्वताः　　३७
ह्रियमाणां तु वैदेहीं दृष्ट्वा दीनो दिवाकरः ।
प्रविध्वस्तप्रभः श्रीमानासीत्पाण्डुरमण्डलः　　३८
नास्ति धर्मः कुतः सत्यं नार्जवं नानृशंसता ।
यत्र रामस्य वैदेहीं सीतां हरति रावणः　　३९

वक्षःस्थलापासून सुटलेला चंद्रसमान तेजस्वी हार खालीं पडूं लागला असतां आकाशातून च्युत झालेली गंगाच की काय असा भासूं लागला. नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त असलेल्या वृक्षाचीं अग्रें वादळी वायूचे तडाके बसल्यामुळें हलूं लागलीं असतां ते वृक्ष सीतेला " भिऊं नको " म्हणूनच सांगत आहेत कीं काय, असें भासूं लागलें. रावणाच्या त्रासामुळें आतील कमलांचा नाश होऊन मत्स्यप्रभृति जलचर प्राणी भयभीत होऊन गेले असतां सरोवरें, निरुत्साह झालेल्या आपल्या प्रिय सखी सीतेकरितां, शोकच करीत आहेत कीं काय अशीं दिसूं लागलीं. (३१-३५)

रावणविषयक क्रोधामुळें सिंह, व्याघ्र, मृग आणि पक्षी चोहोंकडून जमा होऊन सीतेच्या छायेच्या मागोमाग धावूं लागले. जलप्रवाहरूप अश्रूंच्या ज्यांच्या मुखावरून धारा चालल्या आहेत असे शिखरें असलेले पर्वत सीतेला रावण घेऊन जाऊं लागला असतां आपले बाहु वर करून आक्रोश करीत आहेत असे दिसूं लागले. सीतेला रावण नेत आहे असें पाहतांक्षणीं सूर्य दीन झाल्यामुळें निस्तेज दिसूं लागला आणि कांतिमान् असूनही तेजोहीन अशा पांडरवर्ण

इति भूतानि सर्वाणि गणशः पर्यदेवयन् ।
विप्रस्तका दीनमुखा रुरुदुर्मृगपोतकाः ४०
उद्वीक्ष्योद्वीक्ष्य नयनैर्भयादिव विलक्षणैः ।
सुप्रवेपितगात्राश्च बभूवुर्वनदेवताः ४१
विक्रोशन्तीं दृढं सीतां दृष्ट्वा दुःखं तथागताम् ।
तां तु लक्ष्मण रामेति क्रोशन्तीं मधुरस्वराम् ।
अवेक्षमाणां बहुशो वैदेहीं धरणीतलम् ४२
स तामाकुलकेशान्तां विप्रमृष्टविशेषकाम् ।
जहारात्मविनाशाय दशग्रीवो मनस्विनीम् ४३
ततस्तु सा चारुदती शुचिस्मिता विनाकृता बन्धुजनेन मैथिली ।
अपश्यती राघवलक्ष्मणावुभौ विवर्णवक्त्रा भयभारपीडिता ४४
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥५२॥ [१७१९]

मंडलानें तो युक्त झाला. " अहो ! ज्याअर्थी रावण विदेहराजकन्या सीतेला *हरण करून नेत आहे, त्याअर्थी धर्म, सरळपणा आणि दया हीं राहिलींच* नाहींत; मग सत्याची गोष्ट पाहिजेच कशाला !" म्हणून सर्व प्राणी एकत्र जमून शोक करूं लागले आणि त्रस्त होऊन गेलेलीं मृगबालकेंही दीन वदन करून रुदन करूं लागलीं. (३६-४०)

मधुर स्वरानें युक्त असलेली सीता तशाप्रकारें दुःखांत पडली असून " हे लक्ष्मणा ! हे रामा ! " असा अतिशय शोक करीत आणि वारंवार भूतलाकडे पहात आहे असें दृष्टोत्पत्तीस आल्याकारणानें भयामुळें विलक्षण नेत्रानीं वारंवार वर पाहून वनदेवताना कम्प सुटला. जिचें केशाग्र अस्ताव्यस्त झालें असून तिलक पुसून गेलेला आहे अशी ती बिचारी सीता आपल्या नाशा-करिता रावणानें हरण करून नेली, तेव्हां मनोहर दात व पवित्र हास्य यांनीं युक्त असलेली ती मिथिलराजकन्या सीता स्वजनाचा वियोग झाल्यामुळें भयाच्या भाराखालीं खचून गेल्यासारखी झाली आणि उभयताही राम-लक्ष्मण कोठेंही तिला दिसेनासे झाल्यामुळें तिचें मुखही निस्तेज झालें. (४१-४४) "

यांप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील
अरण्यकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५२॥

त्रिपञ्चाशः सर्गः ।

खमुत्पतन्तं तं दृष्ट्वा मैथिली जनकात्मजा ।
दुःखिता परमोद्विग्ना भये महति वर्तिनी १
रोषरोदनताम्राक्षी भीमाक्षं राक्षसाधिपम् ।
रुदती करुणं सीता ह्रियमाणा तमब्रवीत् २
न व्यपत्रपसे नीच कर्मणानेन रावण ।
ज्ञात्वा विरहितां यो मां चोरयित्वा पलायसे ३
त्वयैव नूनं दुष्टात्मन्भीरुणा हर्तुमिच्छता ।
ममापवाहितो भर्ता मृगरूपेण मायया ४
यो हि मामुद्यतस्त्रातुं सोऽप्ययं विनिपातितः ।
गृध्रराजः पुराणोऽसौ श्वशुरस्य सखा मम ५
परमं खलु ते वीर्यं दृश्यते राक्षसाधम ।
विश्राव्य नामधेयं हि युद्धेनास्मि जिता त्वया ६
ईदृशं गर्हितं कर्म कथं कृत्वा न लज्जसे ।

त्या रावणाला आकाशमार्गानें चाललेला पाहून मोठ्या संकटात सापडलेली जनककन्या सीता अत्यन्त उद्विग्न व दुःखित झाली आणि तिला घेऊन जाऊ लागला असता क्रोधामुळें आणि रोदनामुळें जिचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशी ती सीता भयंकर नेत्रानीं युक्त असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणाला दीन वाणीनें म्हणाली, "हे नीचा रावणा ! मी एकटी आहें असें समजून आल्यामुळें तूं माझा अपहार करून जात आहेस या कर्माची, हे नीचा रावणा ! तुला लाज कशी वाटत नाहीं ? अरे दुष्टा ! राम-लक्ष्मणाची भीति वाटत असल्यामुळें तूंच माझा अपहार करण्याची इच्छा धरून कपटानें मृगरूप धारण केलेंस आणि माझ्या भर्त्याला येथून दूर नेलेंस, इतकेंच नव्हे तर, माझ्या सासऱ्याचा मित्र वृद्ध गृध्रराज माझें रक्षण करण्याकरता उद्युक्त झाला असताना त्याचाही तूं वध केलास (१-५)

"हे राक्षसाधमा ! आपलें नांव जाहीर करून युद्धात तूं मला जिंकलेंस हें खरोखर तुझें मोठेंच सामर्थ्य माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहे ! हे नीचा !

स्त्रियाश्चाहरणं नीच रहिते च परस्य च ७
कथयिष्यन्ति लोकेषु पुरुषाः कर्म कुत्सितम् ।
सुनृशंसमधर्मिष्ठं तव शौटीर्यमानिनः ८
धिक्ते शौर्यं च सत्त्वं च यत्त्वया कथितं तदा ।
कुलाक्रोशकरं लोके धिक्ते चारित्रमीदृशम् ९
किं शक्यं कर्तुमेवं हि यज्जवेनैव धावसि ।
मुहूर्तमपि तिष्ठ त्वं न जीवन्प्रतियास्यसि १०
नहि चक्षुःपथं प्राप्य तयोः पार्थिवपुत्रयोः ।
ससैन्योऽपि समर्थस्त्वं मुहूर्तमपि जीवितुम् ११
न त्वं तयोः शरस्पर्शं सोढुं शक्तः कथंचन ।
वने प्रज्वलितस्येव स्पर्शमग्नेर्विहङ्गमः १२
साधु कृत्वाऽऽत्मनः पथ्यं साधु मां मुञ्च रावण १३

स्त्रीचा आणि अपहार, त्यातूनही एकान्त स्थलामध्यें परस्त्रीचा अपहार अशा प्रकारचें हें निंद्य कर्म करायला तुला लाज कशी वाटत नाहीं ? अरे, स्वतःला शूर समजत असलेल्या तुझें हें निंद्य कर्म अत्यन्त निर्दयपणाचें व अतिशय पापयुक्त आहे म्हणून लोक जगतामध्यें सांगतील त्या वेळीं ( माझा अपहार करण्याचें पूर्वीं ) तूं ज्या आपल्या शौर्याची व सामर्थ्याची माझ्यापाशीं प्रशंसा केलीस या तुझ्या शौर्याला आणि सामर्थ्याला धिक्कार असो ! आणि कुलाला कलंक लावणाऱ्या या अशाप्रकारच्या तुझ्या वर्तनालाही धिक्कार असो अरे, ज्याअर्थी तूं वेगावेगानेंच धावत चालला आहेस, त्याअर्थी अशा स्थितींत तुझा काय प्रतिकार करणें शक्य आहे ? परन्तु तूं जर शूर असशील तर एक क्षणभर तरी धीर धर म्हणजे तूं जिवन्त परत जाणार नाहींस ! (६-१०)

"अरे, त्या राजकुमाराच्या दृष्टीचे टप्प्यात आल्यावर तूं सैन्यासह जरी असलास तरी एकक्षणभरही जिवत राहण्यास समर्थ होणार नाहींस ! फार कशाला ? वनामध्यें प्रज्वलित झालेल्या अग्नीचा स्पर्श ज्याप्रमाणें पक्षी सहन करण्यास समर्थ नसतो, त्याचप्रमाणें त्याच्या बाणाचा स्पर्श सहन करण्यास तूं कोणत्याही प्रकारें समर्थ नाहींस. आपल्या कल्याणाकडे लक्ष देऊन तूं

मत्प्रधर्षणसंक्रुद्धो भ्रात्रा सह पतिर्मम ।
विधास्यति विनाशाय त्वं मां यदि न मुञ्चसि १४
येन त्वं व्यवसायेन बलान्मां हर्तुमिच्छसि ।
व्यवसायस्तु ते नीच भविष्यति निरर्थकः १५
नह्यहं तमपश्यन्ती भर्तारं विबुधोपमम् ।
उत्सहे शत्रुवशगा प्राणान्धारयितुं चिरम् १६
न नूनं चात्मनः श्रेयः पथ्यं वा समवेक्षसे ।
मृत्युकाले यथा मर्त्यो विपरीतानि सेवते १७
मुमूर्षूणां तु सर्वेषां यत्पथ्यं तन्न रोचते ।
पश्यामीह हि कण्ठे त्वां कालपाशावपाशितम् १८
यथा चास्मिन्भयस्थाने न बिभेषि निशाचर ।
व्यक्तं हिरण्मयांस्त्वं हि संपश्यसि महीरुहान् १९
नदीं वैतरणीं घोरां रुधिरौघविवाहिनीम् ।

बऱ्या विचारानें मला सोडून दे कारण तूं जर मला न सोडशील तर बलात्कारानें माझा अपहार झाल्यामुळे भ्रात्यासह क्रुद्ध झालेला माझा पति तुझ्या नाशाची तजवीज करील. हे नीचा! ज्या उद्देशानें तूं माझा बलात्कारानें अपहार करण्याची इच्छा करीत आहेस, तो तुझा उद्देश व्यर्थ होईल; कारण तो देवतुल्य भर्ता माझ्या दृष्टीआड असताना शत्रूचे आधीन झालेल्या मला दीर्घ कालपर्यंत प्राणधारण करून राहण्याची इच्छा नाहीं. (११-१६)

"स्वतःला कोणती गोष्ट तात्काळ अथवा परिणामीं सुखावह होणारी आहे याचा विचार तूं मुळीच करीत नाहींस. मृत्यु समीप आला असतां ज्याप्रमाणें मर्त्य जन विपरीत कृत्याचें अवलंबन करूं लागतो त्याप्रमाणें तूं करीत आहेस. मरण जवळ आलेल्या सर्वांनाच जें हितकर असेल तें रुचत नाहीं. तेव्हा ज्याअर्थी तूं असें हें निंद्य कर्म करीत आहेस त्याअर्थी कालपाशाचा वेढा तुझ्या गळ्याभोंवतीं पडू बसला आहे असें मला वाटतें. हे राक्षसा! भय वाटण्यासारखें हें कृत्य असतांनाही ज्याअर्थी तूं भीत नाहींस, त्याअर्थी मृत्युसूचक सुवर्णमय वृक्ष तूं स्वप्नामध्यें अवलोकन करीत असल्याचें

खङ्गपत्रवनं चैव भीमं पश्यसि रावण २०
तप्तकाञ्चनपुष्पां च वैदूर्यप्रवरच्छदाम्
द्रक्ष्यसे शाल्मलीं तीक्ष्णामायसैः कण्टकैश्चिताम् २१
नहि त्वमीदृशं कृत्वा तस्यालीकं महात्मनः ।
धारितुं शक्ष्यसि चिरं विषं पीत्वेव निर्घृण २२
बद्धस्त्वं कालपाशेन दुर्निवारेण रावण ।
क्व गतो लप्स्यसे शर्म मम भर्तुर्महात्मनः २३
निमेषान्तरमात्रेण विना भ्रातरमाहवे ।
राक्षसा निहता येन सहस्राणि चतुर्दश २४
कथं स राघवो वीरः सर्वास्त्रकुशलो बली ।
न त्वां हन्याच्छरैस्तीक्ष्णैरिष्टभार्यापहारिणम् २५
एतच्चान्यच्च परुषं वैदेही रावणाङ्कगा ।
भयशोकसमाविष्टा करुणं विललाप ह २६

स्पष्ट होत आहे. हे रावणा ! रक्ताचे लोट वाहून नेणारी अशी घोर वैतरणी नदी *आणि खड्गरूप पानानीं युक्त असलेलें भयकर वन तू पहात करीत आहेस* (१७-२०)

"*लोखंडी काट्यानीं भरलेला, उज्ज्वल सुवर्णपुष्पानीं आणि उत्कृष्ट वैदूर्य-*रत्नरूप पानानीं युक्त असलेला शाल्मलि नावाचा तीक्ष्ण वृक्ष तूं अवलोकन करूं *लागशील हे निर्दया ! विष प्राशन केल्यावर ज्याप्रमाणें फार वेळ जीव धरून* राहतां येणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें त्या महात्म्या रामाचा अशा प्रकारचा *अपराध करून तुला फार वेळ जिवत राहतां येणार नाहीं हे रावणा !* तू खरोखर निवारण होण्यास अशक्य अशा कालपाशानें बद्ध झाला आहेस *माझ्या भर्त्याचा अपराध केल्यावर तू कोठें जरी गेलास तरी तुला सुख* कसें प्राप्त होणार बरें ? अरे, फक्त एका निमिषातच भ्रात्याच्या मदतीवाचून *युद्धामध्यें ज्यानें चौदा हजार राक्षसाचा वध केला, तो सर्व अस्त्रांमध्यें निपुण* व बलाढ्य असलेला रघुवंश-वीर राम प्रिय भार्येचा अपहार करणाऱ्या तुझा तीक्ष्ण बाणानीं कसा बरें वध करणार नाहीं ?" (२१-२५)

तदा भृशार्तां बहु चैव भाषिणीं विलापपूर्वं करुणं च भामिनीम् ।
जहार पापस्तरुणीं विचेष्टतीं नृपात्मजामागतगात्रवेपथुः॥२७
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥५३॥ [१०४६]

चतुःपञ्चाशः सर्गः ।

ह्रियमाणा तु वैदेही कंचिन्नाथमपश्यती ।
ददर्श गिरिशृङ्गस्थान्पञ्च वानरपुङ्गवान् १
तेषां मध्ये विशालाक्षी कौशेयं कनकप्रभम् ।
उत्तरीयं वरारोहा शुभान्याभरणानि च २
मुमोच यदि रामाय शंसेयुरिति भामिनी ।
वस्त्रमुत्सृज्य तन्मध्ये निक्षिप्तं सहभूषणम् ।
संभ्रमात्तु दशग्रीवस्तत्कर्म च न बुद्धवान् ३
पिङ्गाक्षास्तां विशालाक्षीं नेत्रैरनिमिषैरिव ।

असो. रावणाच्या तावडीत सापडलेली सीता भय आणि शोक यांनी व्याकुल होऊन करुण स्वरानें या व अशाच प्रकारच्या कठोर शब्दांनीं विलाप करूं लागली. तथापि अत्यन्त दुःखित झालेली ती राजकन्या तरुणी सीता याप्रमाणें करुण स्वरानें विलापपूर्वक एकसारखी बोलत असतानाही आणि सुटून जाण्याकरितां तडफड करीत असतानाही शरिराचा थरकाप झालेला तो रावण तिला घेऊन गेला. (२६-२७)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥५३॥

सीतेला रावण घेऊन चालला असता कोणीही त्राता जेव्हां तिच्या दृष्टीस पडेना, तेव्हां एका पर्वतशिखरावर बसलेले पाच श्रेष्ठ वानर तिनें अवलोकन केले व जाता जाता वानरामध्यें त्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या सुंदरी सीतेनें सुवर्णाप्रमाणें झळकत असलेला शेला आणि शुभ भूषणें, हे वानर तरी रामाला ही बातमी कळवितील, म्हणून टाकून दिलीं. परन्तु शरिरावरून वस्त्र काढून सीतेनें भूषणासह त्या वानरामध्यें टाकून दिलें, हें कृत्य लगबगीमुळें रावणाला समजलें नाहीं. ज्यांच्या नेत्रांचा वर्ण

विक्रोशन्तीं तदा सीतां ददृशुर्वानरोत्तमाः ४
स च पम्पामतिक्रम्य लङ्कामभिमुखः पुरीम् ।
जगाम मैथिलीं गृह्य रुदतीं राक्षसेश्वरः ५
तां जहार सुसंहृष्टो रावणो मृत्युमात्मनः ।
उत्सङ्गेनैव भुजगीं तीक्ष्णदंष्ट्रां महाविषाम् । ६
वनानि सरितः शैलान्सरांसि च विहायसा ।
स क्षिप्रं समतीयाय शरश्चापादिव च्युतः ७
तिमिनक्रनिकेतं तु वरुणालयमक्षयम् ।
सरितां शरणं गत्वा समतीयाय सागरम् ८
संभ्रमात्परिवृत्तोर्मी रुद्धमीनमहोरगः ।
वैदेह्यां ह्रियमाणायां बभूव वरुणालयः ९
अन्तरिक्षगता वाचः ससृजुश्चारणास्तथा ।
एतदन्तो दशग्रीव इति सिद्धास्तदाब्रुवन् १०

पिंगट आहे असे ते श्रेष्ठ वानर त्या आक्रोश करीत असलेल्या विशालनयना सीतेकडे डोळ्याचें पातेंही न लववितां टक लाऊन पाहूं लागले व तो राक्षसाधिपति रावण रोदन करीत असलेल्या सीतेला घेऊन पंपासरोवर ओलांडल्यावर लंकानगरीकडे तोंड करून चालला. (१–५)

तीक्ष्ण दाढा आणि जलाल विष यांनीं युक्त असलेल्या नागिणीला घेऊन जाणाऱ्या पुरुषाप्रमाणें रावण आपल्या मृत्युरूप सीतेला अतिशय आनंदित होऊन घेऊन गेला. धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें तो रावण सत्वरच वनें, नद्या, पर्वत आणि सरोवरें आकाशमार्गानें ओलांडून चालता झाला. तिमिनामक मत्स्य आणि नक्र यांचें वसतिस्थान, वरुणाचें अक्षय्य निवासस्थान आणि नद्यांचें आश्रयस्थान असा सागर ओलांडून तो रावण चालता झाला. परन्तु सीतेला घेऊन तो जाऊं लागला असतां समुद्र गोंधळून गेल्यामुळें त्यात पूर्वीप्रमाणें लाटा येईनाशा झाल्या आणि आंत असलेले मत्स्य व महासर्पही चकित झाले. अंतरिक्षामध्यें असलेले चारण आपापसांत बोलूं लागले. "या कृत्यामुळें रावणाचा अन्त होणार" असें सिद्धही म्हणूं लागले. " (६–१०)

स तु सीतां विचेष्टन्तीमङ्केनादाय रावणः ।
प्रविवेश पुरीं लङ्कां रूपिणीं मृत्युमात्मनः ११
सोऽभिगम्य पुरीं लङ्कां सुविभक्तमहापथाम् ।
संरूढकक्ष्यां बहुलां स्वमन्तःपुरमाविशत् १२
तत्र तामसितापाङ्गीं शोकमोहसमन्विताम् ।
निदधे रावणः सीतां मयो मायामिवासुरीम् १३
अब्रवीच्च दशग्रीवः पिशाचीर्घोरदर्शनाः ।
यथा नैनां पुमान्स्त्री वा सीतां पश्यत्यसंमतः । १४
मुक्तामणिसुवर्णानि वस्त्राण्याभरणानि च ।
यद्यदिच्छेत्तदेवास्या देयं मच्छन्दतो यथा १५
या च वक्ष्यति वैदेहीं वचनं किंचिदप्रियम् ।
अज्ञानाद्यदि वा ज्ञानान्न तस्या जीवितं प्रियम् १६
तथोक्त्वा राक्षसीस्तास्तु राक्षसेन्द्रः प्रतापवान् ।
निष्क्रम्यान्तःपुरात्तस्मात्किं कृत्यमिति चिन्तयन् १७

असो. सुटून जाण्याकरिता तडफड करीत असलेल्या त्या सीतेला म्हणजे आपल्या मूर्तिमन्त मृत्यूला कडेवर घेऊन रावणानें लंकानगरीमध्यें प्रवेश केला आणि मोठमोठे रुंद मार्ग व पुष्कळ लोकांची जेथें गर्दी झाली आहे अशा वेशी यांनीं युक्त असलेल्या लंकानामक विशाल नगरीमध्यें गेल्यावर रावणानें आपल्या अंतःपुरात प्रवेश केला. नंतर कृष्णवर्ण नेत्रप्रांतानीं युक्त असून शोक व मोह यांनीं युक्त झालेली ती सीता रावणानें राक्षसी माया ठेवणाऱ्या मयासुराप्रमाणें तेथें ठेविली आणि दिसण्यातही भयंकर अशा ज्या राक्षसी तेथें होत्या त्याना तो म्हणाला, " माझ्या आज्ञेवाचून ती सीता कोणत्याहि पुरुषाच्या अथवा स्त्रीच्याही दृष्टीस पडणार नाहीं, अशा रीतीनें तुम्ही हिचें रक्षण करा. मोत्यें, रत्नें आणि सुवर्ण यांचीं भूषणें व वस्त्रें यापैकीं ज्याची ज्याची सीतेला इच्छा होईल तें तें तुम्ही त्याच वेळेला तिला देत जा, अशी माझी तुम्हांला आज्ञा आहे. समजून उमजून अथवा चुकून जी कोणी सीतेशीं अप्रिय भाषण करील तिला आपलें जीवित प्रिय नाहीं असें समजावें."(११-१६)

याप्रमाणें तो राक्षसाधिपति प्रतापी रावण त्या राक्षसींना सांगून त्या

ददर्शाष्टौ महावीर्यान्राक्षसान्पिशिताशनान् १८
स तान्दृष्ट्वा महावीर्यो वरदानेन मोहितः ।
उवाच तानिदं वाक्यं प्रशस्य बलवीर्यतः १९
नानाप्रहरणाः क्षिप्रमितो गच्छत सत्वराः ।
जनस्थानं हतस्थानं भूतं पूर्वं खरालयम् २०
तत्रास्यतां जनस्थाने शून्ये निहतराक्षसे ।
पौरुषं बलमाश्रित्य त्रासमुत्सृज्य दूरतः २१
बहुसैन्यं महावीर्यं जनस्थाने निवेशितम् ।
सदूषणखरं युद्धे निहतं रामसायकैः २२
ततः क्रोधो ममापूर्वो धैर्यस्योपरि वर्धते ।
वैरं च सुमहज्जातं रामं प्रति सुदारुणम् २३
निर्यातयितुमिच्छामि तच्च वैरं महारिपोः ।
नहि लप्स्याम्यहं निद्रामहत्वा संयुगे रिपुम् २४

अंतःपुरातून बाहेर पडला आणि " आता काय करावें " म्हणून विचार करूं लागला तोंच मोठे बलाढ्य व मांसभक्षक असे आठ राक्षस त्यानें पाहिले आणि ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें मोहित झालेला तो महावीर्यवान् रावण त्यांना पाहून झाल्यावर बल व वीर्य यासंबंधानें त्यांची प्रशंसा करून त्यांना असें म्हणाला– " नाना प्रकारचीं आयुधें घेऊन तुम्ही जनस्थानाकडे सत्वर येथून जा. कारण तें जनस्थान पूर्वी खराचें निवासस्थान असूनही साप्रत रामानें निर्जन करून टाकलें आहे. तुम्ही शरीरबलाचा अवलम्ब करून भीति दूर सोडून या आणि राक्षसाचा वध झाल्यामुळें शून्य झाल्यामुळें जनस्थानात जाऊन रहा (१८–२१)

" अहो, जनस्थानामध्यें महापराक्रमी असें पुष्कळच सैन्य ठेविलेलें होतें; तथापि दूषण आणि खर यासह तें सैन्य रामबाणाच्या योगानें युद्धात नाश पावलें. त्या दिवसापासून धैर्यापेक्षाही माझ्या ठिकाणीं एकसारखा अपूर्व क्रोध वृद्धिंगत होत आहे आणि रामासंबंधानें फारच भयंकर असें अति प्रचंड वैर माझ्या मनामध्यें उत्पन्न झालें आहे त्या प्रबल शत्रूसंबंधानें मनामध्यें

तं त्विदानीमहं हत्वा खरदूषणघातिनम् ।
रामं शर्मोपलप्स्यामि धनं लब्ध्वेव निर्धनः २५
जनस्थाने वसद्भिस्तु भवद्भी राममाश्रिता ।
प्रवृत्तिरुपनेतव्या किं करोतीति तत्त्वतः । २६
अप्रमादाच्च गन्तव्यं सर्वैरेव निशाचरैः ।
कर्तव्यश्च सदा यत्नो राघवस्य वधं प्रति २७
युष्माकं तु बलं ज्ञातं बहुशो रणमूर्धनि ।
अतश्चास्मिञ्जनस्थाने मया यूयं निवेशिताः २८
ततः प्रियं वाक्यमुपेत्य राक्षसा महार्थमष्टावभिवाद्य रावणम् ।
विहाय लङ्कां सहिताःप्रतस्थिरे यतो जनस्थानमलक्ष्यदर्शनाः २९
ततस्तु सीतामुपलभ्य रावणः सुसंप्रहृष्टः परिगृह्य मैथिलीम् ।
प्रसज्ज्य रामेण च वैरमुत्तमं बभूव मोहान्मुदितः स रावण ३०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुःपञ्चाशः सर्गः । [ १७७६ ]

असलेल्या त्या वैराचा शेवट करण्याची माझी इच्छा आहे आणि यामुळें युद्धामध्यें शत्रूचा वध केल्यावाचून मला निद्रा येणें शक्य नाहीं. म्हणून धनप्राप्ति झाली असता निर्धनाला ज्याप्रमाणें सुख होतें, त्याप्रमाणें खर आणि दूषण ह्यांचा घात करणाऱ्या रामाचा आतां वध केल्यावर मला सुख होईल तेव्हां राम काय करीत आहे अशा प्रकारचें त्याच्यासंबंधानें असलेलें खरेंखुरें वर्तमान जनस्थानामध्यें राहून तुम्ही माझ्याकडे पाठवीत जा. सर्वही राक्षसांनीं गाफील न होतां तिकडे जावें आणि रघुवंशज रामाच्या वधाविषयीं नेहमीं यत्न करावा. अरे, संग्रामामध्यें पुष्कळ वेळा तुमचें बल माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें आहे आणि म्हणूनच या जनस्थानांत मी तुमची योजना केली आहे "

नंतर याप्रमाणें गंभीर अर्थानें युक्त असलेल्या त्या प्रिय भाषणाला आठही राक्षसांनीं मान दिला आणि रावणाला अभिवंदन करून व लंका सोडून कोणाच्या दृष्टीस न पडतां एकत्र जमून ते जनस्थानाकडे चालते झाले. असो, सीता हातीं आल्यावर तिला घरांत नेऊन ठेवल्यामुळें रावणाला अतिशय हर्ष झाला आणि यामुळें रामाशीं जरी त्या रावणानें अनिर्वचनीय वैर संपादन

पञ्चपञ्चाशः सर्गः ।

संदिश्य राक्षसान्घोरान्रावणोऽष्टौ महाबलान् ।
आत्मानं बुद्धिवैक्लव्यात्कृतकृत्यममन्यत १
स चिन्तयानो वैदेहीं कामबाणैः प्रपीडितः ।
प्रविवेश गृहं रम्यं सीतां द्रष्टुमभित्वरन् २
स प्रविश्य तु तद्वेश्म रावणो राक्षसाधिपः ।
अपश्यद्राक्षसीमध्ये सीतां दुःखपरायणाम् ३
अश्रुपूर्णमुखीं दीनां शोकभारावपीडिताम् ।
वायुवेगैरिवाक्रान्तां मज्जन्तीं नावमर्णवे ४
मृगयूथपरिभ्रष्टां मृगीं श्वभिरिवावृताम् ।
अधोगतमुखीं सीतां तामभ्येत्य निशाचरः ५
तां तु शोकवशाद्दीनामवशां राक्षसाधिपः ।
स बलाद्दर्शयामास गृहं देवगृहोपमम् ६

केलें होतें तरी मोहामुळें तो त्यात आनंदच मानूं लागला.

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतलि
अरण्यकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला. ॥५४॥

याप्रमाणें त्या आठ महाबलाढ्य घोर राक्षसांना आज्ञा केल्यावर रावण बुद्धिभ्रंशामुळें स्वतःला कृतकृत्य मानूं लागला आणि कामबाणांनीं व्याकुल झाल्यामुळें सीतेचें चिंतन करीत करीत तो तिला पाहण्याकरिता त्वरेनें त्या रम्य गृहात गेला आणि त्या गृहांत गेल्यावर त्या राक्षसाधिपति रावणानें त्या राक्षसींमध्यें असलेली सीता पाहिली. त्या वेळीं ती केवळ दुःखाचाच आश्रय करून राहिलेली होती, अश्रूंनीं तिचें मुख भरून गेलेलें होतें, ती अगदीं दीन झालेली होती, शोकाच्या भरानें अगदीं खचून गेल्यामुळें वायुवेगानें ग्रस्त आणि म्हणूनच समुद्रात बुडत असलेल्या नावेप्रमाणें तिची अवस्था झालेली होती. हरणाच्या कळपांतून चुकल्यामुळें कुत्र्यांनीं घेरलेल्या हरिणीप्रमाणें ती दिसत होती आणि मान खालीं घालून ती बसली होती. तो राक्षस तिचे जवळ गेला व त्यानें पराधीन व शोकाकुल झाल्यामुळें दीन झालेल्या त्या सीतेला बलात्कारानें आपलें देवगृहाप्रमाणें असलेलें गृह दाखविलें. (१–६)

हर्म्यप्रासादसंबाधं स्त्रीसहस्रनिषेवितम् ।
नानापक्षिगणैर्जुष्टं नानारत्नसमन्वितम् ७
दान्तकैस्तापनीयैश्च स्फाटिकै राजतैस्तथा ।
वज्रवैदूर्यचित्रैश्च स्तम्भैर्दृष्टिमनोरमैः ८
दिव्यदुन्दुभिनिर्घोषं तप्तकाञ्चनभूषणम् ।
सोपानं काञ्चनं चित्रमारुरोह तया सह ९
दान्तका राजताश्चैव गवाक्षाः प्रियदर्शनाः ।
हेमजालावृताश्चासंस्तत्र प्रासादपङ्क्तयः १०
सुधामणिविचित्राणि भूमिभागानि सर्वशः ।
दशग्रीवः स्वभवने प्रादर्शयत मैथिलीम् ११
दीर्घिकाः पुष्करिण्यश्च नानापुष्पसमावृताः ।
रावणो दर्शयामास सीतां शोकपरायणाम् १२
दर्शयित्वा तु वैदेहीं कृत्स्नं तद्भवनोत्तमम् ।

त्या गृहाच्या सभोंवतीं श्रीमन्त लोकांच्या वाड्याची व राजवाड्याची गर्दी झालेली होती, हजारों स्त्रियांनीं त्याचा आश्रय केलेला होता, नानाप्रकारचे पक्षिसमुदाय तेथें रहात होते, तऱ्हतऱ्हेचीं रत्नें त्यामध्यें होतीं हिरे व वैदूर्यमणी जडलेले असल्यामुळें चित्रविचित्र आणि म्हणूनच दृष्टीलाही रम्य अशा हस्तिदन्त, सुवर्ण, स्फटिक व रौप्य यांच्या बनवलेल्या खांबांनीं तें युक्त होतें. दिव्य दुंदुभींचा घोष तेथें चालला होता आणि सुवर्णाच्या अलंकारानीं तें सजविलेलें होतें अशा प्रकारचें आपलें घर सीतेला दाखविल्यानन्तर तिच्यासह तो त्यांतील एक अद्भुत सोनेरी जिना चढून वर गेला. त्या घराला असलेल्या हस्तिदंती व रुप्याच्या खिडक्या दिसण्यात मनोहर होत्या आणि त्याच्याभोंवतीं असलेल्या राजवाड्याच्या ओळी सुवर्णमय जाळ्यांनीं आच्छादित झालेल्या होत्या. (७–१०)

चुनेगच्ची आणि रत्नें यांच्यामुळें विचित्र दिसत असलेले आपल्या घरातील सर्वही भूप्रदेश रावणानें सीतेला दाखविले व त्याचप्रमाणें शोकच करीत असलेल्या त्या सीतेला नानाप्रकारच्या पुष्पानीं युक्त पुष्करणी व वापीही त्यानें दाखविल्या,

उवाच वाक्यं पापात्मा सीतां लोभितुमिच्छया १३
दश राक्षसकोट्यश्च द्वाविंशतिरथापराः।
वर्जयित्वा जनान्वृद्धान्बालांश्च रजनीचरान् १४
तेषां प्रभुरहं सीते सर्वेषां भीमकर्मणाम्।
सहस्रमेकमेकस्य मम कार्यपुरःसरम् १५
यदिदं राज्यतन्त्रं मे त्वयि सर्वं प्रतिष्ठितम्।
जीवितं च विशालाक्षि त्वं मे प्राणैर्गरीयसी १६
बह्वीनामुत्तमस्त्रीणां मम योऽसौ परिग्रहः।
तासां त्वमीश्वरी सीते मम भार्या भव प्रिये १७
साधु किं तेऽन्यथाबुद्ध्या रोचयस्व वचो मम।
भजस्व माऽभितप्तस्य प्रसादं कर्तुमर्हसि १८
परिक्षिप्ता समुद्रेण लङ्केयं शतयोजना।
नेयं धर्षयितुं शक्या सेन्द्रैरपि सुरासुरैः १९

याप्रमाणें आपलें तें उत्कृष्ट सर्व गृह सीतेला दाखविल्यावर तो पापबुद्धि रावण सीतेला लुब्ध करून टाकण्याच्या इच्छेनें म्हणाला, " वृद्ध व अल्पवयी राक्षसजन सोडून दिले तरी दुसरे बत्तीस कोटी राक्षस आहेत आणि हे सीते! अति क्रूर कर्मे करणाऱ्या त्या सर्वही राक्षसांचा मी अधिपति आहें, इतकेंच नव्हे तर माझ्या कार्याविषयीं पुढाकार घेणारे हजार हजार राक्षस त्या बत्तीस हजारांपैकीं प्रत्येक राक्षसाच्या हाताखालीं आहेत हे विशालनयने! राज्यसबंधीं जें जें म्हणून कांहीं आहे तें सर्व तुझ्या स्वाधीन असून माझें जीवितही तुझ्याच हातीं आहे, कारण तू मला माझ्या प्राणांपेक्षाही श्रेष्ठ आहेस (११-१६)

" हे सीते! हे प्रिये! तू माझी भार्या हो आणि माझ्या भार्या म्हणून ज्या कांहीं इतर पुष्कळ उत्कृष्ट स्त्रिया आहेत, त्यांची मालकीण हो, याशिवाय भलतीच गोष्ट मनांत आणून तुला कांहींएक उपयोग होणार नाहीं, म्हणून हितकारक अशा माझ्या भाषणाला तू मान दे, माझा अंगिकार कर आणि मदनानें संतप्त झालेल्या मजवर तूं कृपा कर. शंभर योजनें लांब असलेली ही लंका समुद्रानें वेढलेली असल्यामुळें इंद्रासह सर्व देवदैत्य जरी आले तरी त्यांनाही हिच्यावर हल्ला करतां

न देवेषु न यक्षेषु न गन्धर्वेषु नर्षिषु ।
अहं पश्यामि लोकेषु यो मे वीर्यसमो भवेत् ॥ २०
राज्यभ्रष्टेन दीनेन तापसेन पदातिना ।
किं करिष्यसि रामेण मानुषेणाल्पतेजसा ॥ २१
भजस्व सीते मामेव भर्ताऽहं सदृशस्तव ।
यौवनं त्वध्रुवं भीरु रमस्वेह मया सह ॥ २२
दर्शने मा कृथा बुद्धिं राघवस्य वरानने ।
काऽस्य शक्तिरिहागन्तुमपि सीते मनोरथैः ॥ २३
न शक्यो वायुराकाशे पाशैर्बद्धुं महाजवः ।
दीप्यमानस्य वाप्यग्नेर्ग्रहीतुं विमलाः शिखाः ॥ २४
त्रयाणामपि लोकानां न तं पश्यामि शोभने ।
विक्रमेण नयेद्यस्त्वां मद्बाहुपरिपालिताम् ॥ २५
लंकायाः सुमहद्राज्यमिदं त्वमनुपालय ।

---

येथें शक्य नाही. मग राम येथें येण्याची गोष्ट पाहिजेच कशाला ? देव, यक्ष, गंधर्व, ऋषि आणि मानव यांत वीर्यानें माझी बरोबरी करणारा मला कोणीही दिसत नाहीं. तेव्हा राज्यापासून भ्रष्ट, दीन, शोचनीय, अशक्त आणि पादचारी अशा मानव रामाशीं तुला काय करावयाचें आहे ? (१६-२१)

"हे सीते ! तूं माझाच अंगिकार कर. मी तुला योग्य पति आहें. हे भित्र्ये ! यौवन अस्थिर आहे. याकरितां तू आतां व्यर्थ कालक्षेप न करितां या ठिकाणीं माझ्यासह रममाण हो हे सुमुखि ! रघुवंशज रामाच्या दर्शनाची इच्छा करूं नकोस. कारण हे सीते ! मनोरथांच्या योगानें, तरी येथें येण्याचें त्याचें काय सामर्थ्य लागून गेलें आहे ? महावेगवान् वायूला आकाशात पाशांनीं बद्ध करणें अथवा देदीप्यमान अग्नीच्या निर्मल ज्वाला धरून ठेवणें ज्याप्रमाणें अशक्य आहे, त्याचप्रमाणें रामाचें आगमन येथें होणें अशक्य आहे., हे कल्याणि ! माझ्या बाहूंच्या योगानें तूं सुरक्षित असतांना पराक्रम करून तुला घेऊन जाणारा त्रैलोक्यातही मला कोणी दिसत नाहीं. लंकेच्या या अति विस्तृत राज्याचें तूंच परिपालन कर तूं जर माझा अंगिकार करशील तर

त्वत्प्रेष्या मद्विधाश्चैव देवाश्चापि चराचरम्।
अभिषेकजलक्लिन्ना तुष्टा च रमयस्व च २६
दुष्कृतं यत्पुरा कर्म वनवासेन तद्गतम्।
यच्च ते सुकृतं कर्म तस्येह फलमाप्नुहि २७
इह सर्वाणि माल्यानि दिव्यगन्धानि मैथिलि।
भूषणानि च मुख्यानि तानि सेव मया सह २८
पुष्पकं नाम सुश्रोणि भ्रातुर्वैश्रवणस्य मे।
विमानं सूर्यसंकाशं तरसा निर्जितं रणे २९
विशालं रमणीयं च तद्विमानं मनोजवम्।
तत्र सीते मया सार्धं विहरस्व यथासुखम् ३०
वदनं पद्मसंकाशं विमलं चारुदर्शनम्।
शोकार्तं तु वरारोहे न भ्राजति वरानने ३१
एवं वदति तस्मिन्सा वस्त्रान्तेन वराङ्गना।

---

माझ्यासारखे तुझे दास होतील व देवही तुझ्या आज्ञेत राहतील; इतकेंच नव्हे तर सर्व चराचर जगत् तुझें दास्यत्व पत्करून राहील. श्रमनिवृत्ति व्हावी म्हणून स्नानाकरिता आणलेल्या उदकानें तूं आता अगदीं सुकून गेली आहेस तीं आर्द्र हो आणि संतुष्ट राहून माझ्याशीं रममाण हो. (२२-२६)

" पूर्वी जे काहीं पातक तुझ्या हातून झालें होतें त्याचें अनिष्ट फल वनवासाच्या योगानें संपून गेलें आहे. तुझ्या हातून जें कांहीं पुण्य कर्म घडलें असेल त्याच्या फलाचा आता उपभोग घे. हे मिथिलराजकन्ये ! दिव्य अशा सुगंधानीं युक्त असलेलीं सर्व प्रकारचीं पुष्पें आणि मुख्य मुख्य भूषणें येथें आहेत, त्याचा तूं माझ्यासह उपभोग घे. हे सुंदरि ! मी आपल्या वैश्रवणनावाच्या भावाचें सूर्यासमान तेजस्वी असलेलें विमान संग्रामात स्वसामर्थ्यानें जिंकून आणलें आहे आणि तें विमान विस्तृत व रमणीय असून त्याची गति मनाप्रमाणें शीघ्र आहे. याकरिता हे सीते ! त्या विमानामध्यें माझ्यासह यथेष्ट क्रीडा कर. हे सुंदरि ! हे सुमुखि ! कमलतुल्य व निर्मल असल्यामुळें दिसण्यातही मनोहर असलेलें तुझें मुख शोकाकुल झाल्यानें शोभत नाहीं. " (२७-३१)

पिधायेन्दुनिभं सीता मन्दमश्रूण्यवर्तयत् ३२
ध्यायन्तीं तामिवास्वस्थां सीतां चिन्ताहतप्रभाम् ।
उवाच वचनं वीरो रावणो रजनीचरः ३३
अलं व्रीडेन वैदेहि धर्मलोपकृतेन ते ।
आर्षोऽयं दिवि निष्पन्दो यस्त्वामभिभविष्यति ३४
एतौ पादौ मया स्निग्धौ शिरोभिः परिपीडितौ ।
प्रसादं कुरु मे क्षिप्रं वश्यो दासोऽहमस्मि ते ३५
इमाः शून्यमया वाचः शुष्यमाणेन भाषिताः ।
न चापि रावणः कांचिन्मूर्ध्ना स्त्रीं प्रणमेत ह ३६
एवमुक्त्वा दशग्रीवो मैथिलीं जनकात्मजाम् ।
कृतान्तवशमापन्नो ममेयमिति मन्यते ३७

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥५५॥[१८१३]

याप्रमाणें तो रावण भाषण करूं लागला असतां सीता आपल्या चन्द्रतुल्य आल्हादकारक असलेल्या मुखावर पदर घेऊन हळूहळू अश्रु ढाळूं लागली तेव्हां शोकानें अस्वस्थ व काळजीनें निस्तेज झालेली ती सीता चिंताक्रांत होऊन बसली असतांना तो वीर रावण राक्षस तिला म्हणाला— "हे सीते ! स्वपतीचा त्याग करून दुसऱ्याच्या स्वीकारानें होणाऱ्या धर्मलोपामुळें उत्पन्न झालेली लज्जा आतां पुरे. हे देवि ! तुझा माझा जो हा सम्बन्ध झाला आहे व जो होणार आहे, तो वेदमूलकच आहे कारण बलात्कारानें स्त्री हरण करून आणणें, हा राक्षसविवाह विवाहविधींमध्येंच आहे तुझ्या तुळतुळीत पायावर मी आपलीं मस्तकें ठेविलीं आहेत, तू मजवर सत्वर कृपा कर मी तुझ्या आज्ञेप्रमाणें वागणारा तुझा दास आहें, करितां कामपीडित होऊन मी जे हे शब्द बोललों आहे, ते व्यर्थ न होतील असें कर, रावण मस्तकानें कोणत्याही स्त्रीला प्रणाम करणार नाहीं " (३२-३६)

याप्रमाणें रावण जनककन्या सीतेला म्हणाला आणि मृत्यूचे तडाक्यांत सापडला असल्यामुळें 'ही सीता माझी आहे' असें समजूं लागला (३७)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५५॥

षट्पञ्चाशः सर्गः ।

सा तथोक्ता तु वैदेही निर्भया शोककर्शिता ।
तृणमन्तरतः कृत्वा रावणं प्रत्यभाषत १
राजा दशरथो नाम धर्मसेतुरिवाचलः ।
सत्यसन्धः परिज्ञातो यस्य पुत्रः स राघवः २
रामो नाम स धर्मात्मा त्रिषु लोकेषु विश्रुतः ।
दीर्घबाहुर्विशालाक्षो दैवतं स पतिर्मम ३
इक्ष्वाकूणां कुले जातः सिंहस्कन्धो महाद्युतिः ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा यस्ते प्राणान्वधिष्यति ४
प्रत्यक्षं यद्यहं तस्य त्वया वै धर्षिता बलात् ।
शयिता त्वं हतः संख्ये जनस्थाने यथा खरः ५
य एते राक्षसाः प्रोक्ता घोररूपा महाबलाः ।
राघवे निर्विषाः सर्वे सुपर्णे पन्नगा यथा ६
तस्य ज्याविप्रमुक्तास्ते शराः काञ्चनभूषणाः ।
शरीरं विधमिष्यन्ति गङ्गाकूलमिवोर्मयः ७

---

याप्रमाणें शोकाकुल झालेल्या सीतेशीं रावण बोलला असता ती सीता तृण आड धरून निर्भयपणें रावणाला म्हणाली–"धर्माचा अचल सेतुच कीं काय असा दशरथ नांवाचा एक राजा होऊन गेला तो राम त्याचा पुत्र असून सत्यवचनी म्हणून तो प्रसिद्ध आहे तो धर्मात्मा- राम आजानुबाहु व विशालनयन असून त्रैलोक्यात प्रसिद्ध आहे आणि तोच माझा पति व दैवत आहे इक्ष्वाकुकुलांत तो जन्मला आहे, त्याचे खांदे सिंहासारखे विशाल आहेत, तो महातेजस्वी आहे, भ्रात्या लक्ष्मणासह तोच तुझे प्राण नाहींसे करील त्याच्या समक्ष जर तू बलात्कारानें माझ्यावर हल्ला केला असतास तर जनस्थानांत वध पावलेल्या खराप्रमाणें तूं युद्धांत मृत होऊन पडला असतास (१–५)

"तूं जे हे राक्षस भयंकर व महाबलाढ्य म्हणून मला सांगितलेस, ते सर्व गरुडाची गांठ पडली असतां निर्विष होणाऱ्या सर्पाप्रमाणें रामाची गांठ पडली असतां निरुपद्रवी होतील, आणि त्याच्या धनुष्याच्या दोरीपासून

असुरैर्वा सुरैर्वा त्वं यद्यवध्योऽसि रावण ।
उत्पाद्य सुमहद्वैरं जीवंस्तस्य न मोक्ष्यसे ८
स ते जीवितशेषस्य राघवोऽन्तकरो बली ।
पशोर्यूपगतस्येव जीवितं तव दुर्लभम् ९
यदि पश्येत्स रामस्त्वां रोषदीप्तेन चक्षुषा ।
रक्षस्त्वमद्य निर्दग्धो यथा रुद्रेण मन्मथः १०
यश्चन्द्रं नभसो भूमौ पातयेन्नाशयेत वा ।
सागरं शोषयेद्वापि स सीतां मोचयेदिह ११
गतासुस्त्वं गतश्रीको गतसत्त्वो गतेन्द्रियः ।
लंका वैधव्यसंयुक्ता त्वत्कृतेन भविष्यति १२
न ते पापमिदं कर्म सुखोदर्कं भविष्यति ।
याहं नीता विनाभावं पतिपार्श्वात्त्वया बलात् १३
स हि दैवरसंयुक्तो मम भर्ता महाद्युतिः ।

सुटलेले सुवर्णभूषित बाण ज्याप्रमाणें गंगेच्या लाटा तीर उडवून देतात, त्याप्रमाणें तुझें शरीर उडवून देतील. हे रावणा ! दैत्यांच्या हातून अथवा देवाच्या हातून जरी तुझा वध होणें शक्य नसलें तरी रामाशीं तूं अतिमोठें वैर उत्पन्न केलें असल्यामुळें त्याच्या हातून तूं जिवंत सुटणार नाहींस. तो बलाढ्य राम तुझ्या शिल्लक राहिलेल्या जीविताचा अन्त करणारा आहे साराश, यज्ञस्तम्भाला बांधलेल्या पशूच्या जीविताप्रमाणें तुझें जीवित आहे हे राक्षसा ! क्रोधाग्नीनें प्रदीप्त झालेली त्या रामाची दृष्टि जर तुझ्यावर गेली तर रुद्राकडून जळून खाक झालेल्या मदनाप्रमाणें तूं पूर्णपणें दग्ध होऊन पडशील. (८-१०)

"अरे, प्रसंग पडला असता जो चंद्राला आकाशातून भूमीवर पाडील किंवा त्याचा नाशही करील अथवा समुद्र आटवून टाकील, तो येथें असलेल्या सीतेचीही सुटका करीलच करील. तुझें वैभव, बल, इंद्रियें आणि प्राण हें सर्व नष्ट होऊन तूं केलेल्या अपराधामुळें लंका विधवा होईल. ज्याअर्थी बलात्कारानें तूं पतीपासून माझा वियोग केला आहेस त्याअर्थी तुझ्या या पापकर्माचा परिणाम चांगला होणार नाहीं तो माझा महातेजस्वी भर्ता केवल वीर्याचें अवलम्बन करून

निर्भयो वीर्यमाश्रित्य शून्ये वसति दण्डके १४
स ते वीर्यं बलं दर्पमुत्सेकं च यथाविधम् ।
व्यपनेष्यति गात्रेभ्यः शरवर्षेण संयुगे १५
यदा विनाशो भूतानां दृश्यते कालचोदितः ।
तदा कार्ये प्रमाद्यन्ति नराः कालवशं गताः १६
मां प्रधृष्य स ते कालः प्राप्तोऽयं राक्षसाधम ।
आत्मनो राक्षसानां च वधायान्तःपुरस्य च १७
न शक्या यज्ञमध्यस्था वेदिः स्रुग्भाण्डमण्डिता ।
द्विजातिमन्त्रसंपूता चण्डालेनावमर्दितुम् १८
तथाऽहं धर्मनित्यस्य धर्मपत्नी दृढव्रता ।
त्वया स्प्रष्टुं न शक्याऽहं राक्षसाधम पापिना १९
क्रीडन्ती राजहंसेन पद्मषण्डेषु नित्यशः ।
हंसी सा तृणमध्यस्थं कथं द्रक्ष्येत मद्गुकम् २०
इदं शरीरं निःसंज्ञं बन्ध वा घातयस्व वा ।

निर्जन दण्डकारण्यात माझ्या दीराग्रह निर्भयपणें रहात आहे. तो युद्धात बाण-वृष्टीच्या योगानें तुझ्या शरीरापासून तुझा पराक्रम, शरीर बल, मद आणि माझ्याशीं झालेल्या अमर्यादपणा हीं सर्व काढून टाकील (११–१५)

" जेव्हा कालाच्या प्रेरणेनें प्राण्याचा नाश होण्याचा समय दिसत असतो, तेव्हा मृत्यूच्या स्वाधीन झालेल्या लोकाची बुद्धि कर्तव्यासम्बन्धानें विपरीत होत असते हे राक्षसाधमा ! माझ्याशीं अतिप्रसंग करून ज्याअर्थी तूं येथें राहिला आहेस त्याअर्थी तू स्वतः, सर्व राक्षस आणि तुझें अन्त:पुर या सर्वांचा नाश होण्याचा काल आला आहे; कारण ज्याप्रमाणें स्रुचिप्रभृति पात्रानीं भूषित आणि ब्राम्हणांनीं म्हटलेल्या मंत्रानीं पवित्र झालेल्या यज्ञातील वेदीला चंडालाचा स्पर्श होणें शक्य नसतें, त्याचप्रमाणें हे राक्षसाधमा ! नित्य धर्मानेंच वागत असलेल्या रामाची जी मी पातिव्रत्यरूप दृढ व्रत धारण करणारी धर्मपत्नी तिला तुझा पाप्याचा स्पर्श होणें शक्य नाहीं कारण कमलाच्या समुदायांत नेहमीं राजहंसाबरोबर क्रीडा करणारी जी हंसी ती तृणामध्यें बसलेल्या पाणकोंबड्याकडे कशी पाहील ?

नेदं शरीरं रक्ष्यं मे जीवितं वापि राक्षस २१
न तु शक्यमपक्रोशं पृथिव्यां दातुमात्मनः ।
एवमुक्त्वा तु वैदेही क्रोधात्सुपरुषं वचः २२
रावणं जानकी तत्र पुनर्नोवाच किंचन ।
सीताया वचनं श्रुत्वा परुषं रोमहर्षणम् २३
प्रत्युवाच ततः सीतां भयसंदर्शनं वचः ।
शृणु मैथिलि मद्वाक्यं मासान्द्वादश भामिनि २४
कालेनानेन नाभ्येषि यदि मां चारुहासिनि ।
ततस्त्वां प्रातराशार्थं सूदाश्छेत्स्यन्ति लेशशः २५
इत्युक्त्वा परुषं वाक्यं रावणः शत्रुरावणः ।
राक्षसीश्च ततः क्रुद्ध इदं वचनमब्रवीत् २६
शीघ्रमेव हि राक्षस्यो विरूपा घोरदर्शनाः ।
दर्पमस्यापनेष्यन्तु मांसशोणितभोजनाः २७
वचनादेव तास्तस्य सुघोरा घोरदर्शनाः ।

हे राक्षसा ! तूं या जड शरिराला बांध अथवा मारून टाक. या शरिराचें रक्षण मला कर्तव्य नाहीं पण पृथ्वीवर आपली निंदा होऊं देणें मला योग्य नाहीं. " (१६-२२)

याप्रमाणें जनककन्या सीता क्रोधामुळें रावणाशीं फारच कठोर भाषण करून स्वस्थ बसली व तिनें पुनरपि त्याच्याशीं काहीं एक भाषण केलें नाहीं. शरिरावर रोमांच उठविणारें असें तें कठोर भाषण ऐकल्यावर रावण भयदर्शक वाणीनें तिला म्हणाला- " हे सीते ! माझें म्हणणें ऐक. मी बारा महिनेपर्यंत वाट पाहीन आणि हे सुहास्यवदने ! इतक्या वेळात जर तूं माझा अंगिकार न करशील तर न्याहारीकरितां माझे आचारी तुझे तिळाएवढाले तुकडे करून टाकतील " याप्रमाणें शत्रूंना रडविणारा तो क्रुद्ध रावण सीतेशीं कठोर भाषण करून राक्षसींना म्हणाला— " हे राक्षसस्त्रियांनो ! मांस व रक्त सेवन करणाऱ्या आणि दिसण्यांतही भयंकर असून 'अकाळ-विक्राळ असलेल्या तुम्ही हिच्या गर्वाचा सत्वरच परिहार करा. " (२२-२७)

कृतप्राञ्जलयो भूत्वा मैथिलीं पर्यवारयन् २८
स ताः प्रोवाच राजाऽसौ रावणो घोरदर्शनाः ।
प्रचल्य चरणोत्कर्षैर्दारयन्निव मेदिनीम् २९
अशोकवनिकामध्ये मैथिली नीयतामिति ।
तत्रेयं रक्ष्यतां गूढं युष्माभिः परिवारिता ३०
तत्रैनां तर्जनैर्घोरैः पुनः सान्त्वैश्च मैथिलीम् ।
आनयध्वं वशं सर्वा वन्यां गजवधूमिव ३१
इति प्रतिसमादिष्टा राक्षस्यो रावणेन ताः ।
अशोकवनिकां जग्मुर्मैथिलीं परिगृह्य तु ३२
सर्वकामफलैर्वृक्षैर्नानापुष्पफलैर्वृताम् ।
सर्वकालमदैश्चापि द्विजैः समुपसेविताम् ३३
सा तु शोकपरीताङ्गी मैथिली जनकात्मजा ।
राक्षसीवशमापन्ना व्याघ्रीणां हरिणी यथा ३४

याप्रमाणें त्यानें सांगितलें असता त्याच्या सामर्थ्याप्रमाणेंच दिसण्यातही भयंकर असलेल्या त्या अति क्रूर राक्षसस्त्रिया रावणाला हात जोडून व सीतेला गराडा देऊन उभ्या राहिल्या. तेव्हां तो रावण दोन तीन पावलें चालला आणि जोरजोरानें पावलें उचलल्यामुळें पृथ्वी विदारणच करून टाकीत आहे कीं काय अशा रीतीनें भासू लागलेला तो रावण उग्र स्वरूप धारण करणाऱ्या त्या राक्षसस्त्रियांना म्हणाला— " सीतेला अशोक वनात न्या आणि तेथें तुम्ही एकसारखा हिच्याभोंवतीं गराडा देऊन हिचें अगदीं गुप्तपणें रक्षण केलें पाहिजे. अरण्यातील हत्तिणीला ज्याप्रमाणें वश करून घेतात त्याप्रमाणें त्या ठिकाणीं भयंकर धमक्या देऊन आणि चुचकारून चुचकारून तुम्ही हिला वश करून घ्या " (२८–३१)

याप्रमाणें रावणानें त्या राक्षसींना आज्ञा केल्यावर त्या राक्षसी सीतेला घेऊन अशोकवनात गेल्या. नानाप्रकारचीं पुष्पें व फलें धारण करणाऱ्या कल्पवृक्षांनीं तें वन गजबजलेलें असून सर्वदा मत्त असलेल्या पक्ष्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता. रामवियोगानें व्याकुल झालेली ती जनककन्या सीता राक्षसींच्या तावडींत

शोकेन महता ग्रस्ता मैथिली जनकात्मजा ।
न शर्म लभते भीरुः पाशबद्धा मृगी यथा ३५
न विन्दते तत्र तु शर्म मैथिली विरूपनेत्राभिरतीव तर्जिता।
पतिं स्मरन्ती दयितं च देवरं विचेतनाभूद्भयशोकपीडिता ३६
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥५६॥[१८४९]

सप्तपञ्चाशः सर्गः । ×

प्रवेशितायां सीतायां लङ्कां प्रति पितामहः ।
तदा प्रोवाच देवेन्द्रं परितुष्टं शतक्रतुम् १
त्रैलोक्यस्य हितार्थाय रक्षसामहिताय च ।
लङ्कां प्रवेशिता सीता रावणेन दुरात्मना २
पतिव्रता महाभागा नित्यं चैव सुखैधिता ।
अपश्यन्ती च भर्तारं पश्यन्ती राक्षसीजनम् ३

सापडली असतां वाघिणींच्या तावडींत सापडलेल्या हरिणीप्रमाणें तिची स्थिति झाली प्रचंड शोकानें ती अगदी ग्रस्त झाली आणि जाळ्यात अडकलेल्या हरिणीप्रमाणें त्या भीतियुक्त झालेल्या सीतेला कशापासूनही सुख होईनासें झालें भयंकर नेत्रांनीं युक्त असलेल्या राक्षसस्त्रिया तिला अतिशय धमक्या देऊं लागल्या असतां सीतेला त्या ठिकाणीं मुळींच सुख मिळालें नाहीं, इतकेंच नव्हे तर प्रिय पति आणि दीर यांचें स्मरण होत असल्यामुळें भय व शोक यांनीं ग्रस्त झालेल्या त्या सीतेला भानही नाहींसें झालें (३२-३६)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं छप्पन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५६॥

रावण सीतेला लंकेंत घेऊन गेला असता संतुष्ट झालेल्या देवराज इंद्राला ब्रह्मदेव म्हणाला– "त्रैलोक्याच्या कल्याणाकरितां आणि राक्षसांच्या अकल्याणाकरितां दुष्ट रावणानें सीतेला लंकेंत नेलें आहे, ती महाभाग्यवती पतिव्रता नेहमीं सुखांत वाढलेली आहे, तथापि आतां पति तिला दिसत नसून

× या सर्गावर रामायणतिलक नांवाची टीका नसल्यानें हा प्रक्षिप्त आहे, असें कांहीं विद्वानांचें मत आहे

राक्षसीभिः परिवृता भर्तृदर्शनलालसा ।
निविष्टा हि पुरी लङ्का तीरे नदनदीपतेः ४
कथं ज्ञास्यति तां रामस्तत्रस्थां तामनिन्दिताम्
दुःखं संचिन्तयन्ती सा बहुशः परिदुर्लभा ५
प्राणयात्रामकुर्वाणा प्राणांस्त्यक्ष्यत्यसंशयम् ।
स भूयः संशयो जातः सीतायाः प्राणसंक्षये ६
स त्वं शीघ्रमितो गत्वा सीतां पश्य शुभाननाम् ।
प्रविश्य नगरीं लंकां प्रयच्छ हविरुत्तमम् ७
एवमुक्तोऽथ देवेन्द्रः पुरीं रावणपालिताम् ।
आगच्छन्निद्रया सार्धं भगवान्पाकशासनः ८
निद्रां चोवाच गच्छ त्वं राक्षसान्संप्रमोहय ।
सा तथोक्ता मघवता देवी परमहर्षिता ९
देवकार्यार्थसिद्ध्यर्थं प्रामोहयत राक्षसान् ।
एतस्मिन्नन्तरे देवः सहस्राक्षः शचीपतिः १०

राक्षसस्त्रियाच तीं पहात आहे. कारण पतीच्या दर्शनाविषयीं उत्सुक असलेल्या त्या सीतेला राक्षसस्त्रियांनीं घेरून टाकलें आहे लंका तर समुद्राच्या तीरीं वसलेली आहे तेव्हां तेथें असलेल्या त्या निर्दोष सीतेची बातमी रामाला कशी पोंचेल ? एकसारखें दुःखच मनात आणीत असलेली ती सीता जगण्यास अवश्य असलेलें अन्नपानही सेवन न करता निःसंशय प्राणत्याग करील आणि म्हणूनच रामाला दुर्लभ होईल यासाठीं ज्याअर्थी सीतेचे प्राण जातात कीं काय असा संशय पुन उत्पन्न झाला आहे, त्याअर्थी तूं येथून सत्वर जाऊन शुभ मुखानें युक्त अशा सीतेला भेट आणि लंकानगरींत प्रवेश करून तिला उत्कृष्ट हवि अर्पण कर " (१–७)

याप्रमाणें ब्रह्मदेवानें देवराज इंद्राला सांगितलें असता भगवान् इंद्र निद्रादेवीला बरोबर घेऊन त्या रावण-रक्षित लंकानगरींत आला आणि तेथें आल्यानन्तर निद्रेला म्हणाला, " तूं जा आणि राक्षसाना मोहित कर." याप्रमाणें इंद्रानें सांगितलें असता निद्रादेवीला अत्यन्त हर्ष झाला आणि देवांचें कार्य शेवटास जावें म्हणून तिनें सर्व राक्षस मोहित केले तेव्हा सहस्र नेत्र असलेला

आससाद वनस्थां तां वचनं चेदमब्रवीत् ।
देवराजोऽस्मि भद्रं ते इह चास्मि शुचिस्मिते ११
अहं त्वां कार्यसिद्ध्यर्थं राघवस्य महात्मनः ।
साहाय्यं कल्पयिष्यामि मा शुचो जनकात्मजे १२
मत्प्रसादात्समुद्रं स तरिष्यति बलैः सह ।
मयैवेह च राक्षस्यो मायया मोहिताः शुभे १३
तस्मादन्नमिदं सीते हविष्यान्नमहं स्वकम् ।
स त्वां संगृह्य वैदेहि आगतः सह निद्रया १४
एतदत्स्यसि मद्धस्तान्न त्वां बाधिष्यते शुभे ।
क्षुधा तृषा च रम्भोरु वर्षाणामयुतैरपि १५
एवमुक्ता तु देवेन्द्रमुवाच परिशङ्किता ।
कथं जानामि देवेन्द्रं त्वामिहस्थं शचीपतिम् १६
देवालिङ्गानि दृष्टानि रामलक्ष्मणसंनिधौ ।

शचीपति देव इंद्र अशोकवनात असलेल्या सीतेजवळ जाऊन तिला म्हणाला, " हे सुहास्यवदने ! तुझें कल्याण असो, मी देवराज इंद्र आहें आणि या ठिकाणीं आलों आहें देवाचें कार्य सिद्धीस नेण्याकरतां महात्म्या रघुवंशज रामाला सहाय्य करण्याची मी तजवीज करीन, याकरितां हे जनककन्ये ! तूं शोक करूं नकोस. माझ्या प्रसादामुळें तो राम सैन्यासह समुद्र तरून येईल हे कल्याणि ! या ठिकाणीं असलेल्या राक्षसस्त्रियांना मीच मोह पाडलेला आहे हे विदेहराजकन्ये सीते ! मी तुझ्याकरितां हें हविष्यान्न घेऊन स्वतः निद्रेसह येथें आलों आहे हे कल्याणि ! हे सुंदरि ! माझ्या हातून जर तूं भक्षण करशील तर लाखों वर्षें लोटलीं असतांही तुला क्षुधेपासून अथवा तृषेपासून पीडा होणार नाहीं. " (८-१५)

याप्रमाणें इंद्रानें तिला सांगितलें असतांही संशययुक्त असलेली ती सीता देवराज इंद्राला म्हणाली, " तू शचीपति देवराज इन्द्रच आला आहेस, हें मी कशावरून समजावें ? हे देवाधिपते ! तूं जर स्वतः देवराज असशील तर रामलक्ष्मणाजवळ असतांना जीं देवाचीं चिन्हें मीं पाहिलीं आहेत, तीं तूं स्वतःचे

तानि दर्शय देवेन्द्र यदि त्वं देवराट् स्वयम् ॥ १७
सीताया वचनं श्रुत्वा तथा चक्रे शचीपतिः ।
पृथिवीं नास्पृशत्पद्भ्यामनिमेषेक्षणानि च ॥ १८
अरजोऽम्बरधारी च न म्लानकुसुमस्तथा ।
तं ज्ञात्वा लक्षणैः सीता वासवं परिहर्षिता ॥ १९
उवाच वाक्यं रुदती भगवद्राघवं प्रति ।
सह भ्रात्रा महाबाहुर्दिष्ट्या मे श्रुतिमागतः ॥ २०
यथा मे श्वशुरो राजा यथा च मिथिलाधिपः ।
तथा त्वामद्य पश्यामि सनाथो मे पतिस्त्वया ॥ २१
तवाऽऽज्ञया च देवेन्द्र पयोभूतमिदं हविः ।
अशिष्यामि त्वया दत्तं रघूणां कुलवर्धनम् ॥ २२
इन्द्रहस्ताद्गृहीत्वा तत्पायसं सा शुचिस्मिता ।
न्यवेदयत भर्त्रे सा लक्ष्मणाय च मैथिली ॥ २३
यदि जीवति मे भर्ता सह भ्रात्रा महाबलः ।

ठिकाणीं असलेली दाखव." हें सीतेचें भाषण ऐकतांच इंद्रानें तसें केलें, अर्थात् त्याच्या पायांचा पृथ्वीला स्पर्श होईनासा झाला, नेत्रांच्या पापण्या लवेनाशा झाल्या, त्याचें वस्त्र निर्मल झालें व पुष्पेंही टवटवीत झालीं. लक्षणांवरून तो इंद्र आहे अशी जेव्हा सीतेची खात्री झाली, तेव्हा तिला अतिशय आनन्द झाला आणि भगवान् रघुवंशज रामासम्बन्धानें ती रडत रडत त्याला म्हणाली, "सुदैवानें भ्रात्यासह पतीची वार्ता माझ्या कानावर आली आहे. माझा पति आज आपल्यामुळें सनाथ झाला आहे. यांसतव माझे श्वशुर दशरथमहाराज अथवा मिथिलाधिपति जनकराज यांचेंच आगमन आज येथें झालें, असें मी समजतें आहे. हे देवराज ! रघुवंशजाचें कुल वृद्धिंगत करणारें असें हें आपण दिलेलें दुग्धरूप हविष्यान्न आपल्या आज्ञेनें मी भक्षण करीन." (१६-२२)

असें म्हणून त्या सुहास्यवदन सीतेनें इंद्राच्या हातातून तें पायस घेतलें, प्रथमतः तें तिनें मनानें आपल्या भर्त्याला व लक्ष्मणाला अर्पण केलें आणि नन्तर 'भ्रात्यासह माझा महाबलाढ्य भर्ता जर जिवंत असेल तर हें पायस

इदमस्तु तयोर्भक्त्या तदाश्नात्पायसं स्वयम् २४
इतीव तत्प्राश्य हविर्वरानना जहौ क्षुधादुःखसमुद्भवं च तम् ।
इन्द्रात्प्रवृत्तिमुपलभ्य जानकी काकुत्स्थयोः प्रीतमना बभूव २५
स चापि शक्रस्त्रिदिवालयं तदा प्रीतो ययौ राघवकार्यसिद्धये ।
आमंत्र्य सीतां स ततो महात्मा जगाम निद्रासहितः स्वमालयं २६
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तपञ्चाश सर्गः ॥५७॥[१८८५]

अष्टपञ्चाशः सर्गः ।

राक्षसं मृगरूपेण चरन्तं कामरूपिणम् ।
निहत्य रामो मारीचं तूर्णं पथि न्यवर्तत १
तस्य संत्वरमाणस्य द्रष्टुकामस्य मैथिलीम् ।
क्रूरस्वनोऽथ गोमायुर्विननादास्य पृष्ठतः २
स तस्य स्वरमाज्ञाय दारुणं रोमहर्षणम् ।
शङ्कयामास गोमायोः स्वरेण परिशङ्कितः ३

---

त्यांना अर्पण होवो ' असें म्हणून त्याच्या भक्तीनें तिनें तें पायस स्वत ग्रहण केलें. त्या सुंदरी सीतेनें याप्रमाणें तें हविष्यान्न भक्षण केल्यावर क्षुधा च तृषा यांसंबंधानें दुःखाचाही त्याग केला आणि ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांची वार्ता इंद्राकडून समजल्यामुळें त्या जनककन्येच्या मनाला आनन्द झाला नन्तर संतुष्ट झालेला इंद्रही रघुवंशज रामाच्या हातून होणारें कार्य सिद्धीस नेण्याकरितां स्वर्गाकडे निघाला आणि सीतेचा निरोप घेऊन तो महात्मा निद्रेसह स्वस्थानीं गेला (२३–२६)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नांवाच्या आदिकाव्यांतील
अरण्यकाण्डापैकी सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५७॥

इकडे इच्छेप्रमाणें रूप धारण करण्यास समर्थ असा जो मारीच राक्षस मृगरूपानें संचार करूं लागला होता, त्याचा मार्गांत सत्वर वध करून राम परतला. सीतेच्या भेटीची इच्छा धरून तो राम त्वरेनें परत येऊं लागला असता क्रूर शब्द करणारें एक खोकड त्याच्या मागें ओरडलें, तेव्हां त्याचा तो अंगावर रोमांच उठविणारा भयंकर ध्वनि ऐकून सीतेच्या रक्षणाविषयीं आधींच साशंक

अशुभं बत मन्येऽहं गोमायुर्वाश्यते यथा ।
स्वस्ति स्यादपि वैदेह्या राक्षसैर्भक्षणं विना ४
मारीचेन तु विज्ञाय स्वरमालक्ष्य मामकम् ।
विक्रुष्टं मृगरूपेण लक्ष्मणः शृणुयाद्यदि ५
स सौमित्रिः स्वरं श्रुत्वा तां च हित्वाऽथ मैथिलीम् ।
तयैव प्रहितः क्षिप्रं मत्सकाशमिहैष्यति ६
राक्षसैः सहितैर्नूनं सीताया ईप्सितो वधः ७
काञ्चनश्च मृगो भूत्वा व्यपनीयाऽऽश्रमात्तु माम् ।
दूरं नीत्वाऽथ मारीचो राक्षसोऽभूच्छराहतः ८
हा लक्ष्मण हतोऽस्मीति यद्वाक्यं व्याजहार ह ।
अपि स्वस्ति भवेद् द्वाभ्यां रहिताभ्यां मया वने ९
जनस्थाननिमित्तं हि कृतवैरोऽस्मि राक्षसैः ।
निमित्तानि च घोराणि दृश्यन्तेऽद्य बहूनि च १०

---

झालेल्या रामाला खोकडाच्या शब्दामुळें शंका आली आणि तो म्हणाला, "ज्याअर्थी म्हातारें कोल्हें ओरडत आहे, त्याअर्थी हें काहीं तरी अशुभ चिन्ह आहे असें मला वाटतें. सीतेचें कुशल असेल ना ? राक्षसांनीं तिला खाऊन तर टाकली नसेल ना ? (१-५)

"माझा आवाज लक्षपूर्वक समजून घेऊन मृगरूप धारण केलेल्या मारीचानें 'हे सीते, हे लक्ष्मणा' असा जो आक्रोश केला, तो जर लक्ष्मणाच्या कानावर गेला असेल तर सुमित्रापुत्र लक्ष्मण तो ध्वनि कानावर येताच त्या मिथिल-राजकन्येला एकटी सोडून देईल आणि तिनेंच पाठविल्यामुळें सत्वर माझे जवळ येईल खरोखर राक्षसांनीं एकत्र जमून सीतेचा वध करण्याचें मनात आणलें आहे. कारण प्रथम मारीच राक्षसानें सुवर्ण मृग बनून मला आश्रमातून बाहेर काढलें; तेथून दूर नेल्यावर मी जेव्हा बाणानें त्याला वेध केला तेव्हा तो मारीच राक्षस बनला आणि मरणसमयीं "हे लक्ष्मणा, माझा वेध झाला रे झाला !" असेंही तो म्हणाला. यावरून आम्ही दोघे वनामध्यें नसताना तेथें सर्व कुशल असेल ना ? कारण जनस्थानाकरिता राक्षसांनीं माझ्याशीं वैर

इत्येवं चिन्तयन्रामः श्रुत्वा गोमायुनिःस्वनम् ।
निवर्तमानस्त्वरितो जगामाश्रममात्मवान् ११
आत्मनश्चापनयनं मृगरूपेण रक्षसा ।
आजगाम जनस्थानं राघवः परिशङ्कितः १२
तं दीनमानसं दीनमासेदुर्मृगपक्षिणः ।
सव्यं कृत्वा महात्मानं घोरांश्च ससृजुः स्वरान् १३
तानि दृष्ट्वा निमित्तानि महाघोराणि राघवः ।
ततो लक्ष्मणमायान्तं ददर्श विगतप्रभम् १४
ततो विदूरे रामेण समीयाय स लक्ष्मणः ।
विषण्णः सन्विषण्णेन दुःखितो दुःखभागिना १५
स जगर्हेऽथ तं भ्राता दृष्ट्वा लक्ष्मणमागतम् ।
विहाय सीतां विजने वने राक्षससेविते १६
गृहीत्वा च करं सव्यं लक्ष्मणं रघुनन्दनः ।
उवाच मधुरोदर्कमिदं परुषमार्तवत् १७

घडलें आहे आणि आज भयंकर चिन्हें पुष्कळच दिसत आहेत." (६-१०)

याप्रमाणें खोकडाचा शब्द ऐकताच चिंता करूं लागलेला व परतलेला तो जितेंद्रिय राम त्वरेनें आश्रमाकडे आला. मृगरूप धारण केलेल्या राक्षसानें आपल्याला आश्रमापासून दूर नेलें, याविषयीं चिंतन करीत असलेला तो रघुवंशज राम साशंक होऊन जनस्थानांत आला, तेव्हां मनांत खिन्न व शरीरानेंही म्लान होऊन गेलेल्या त्या रामाजवळ पशुपक्षी आले आणि त्या महात्म्याला डावी घालून भयंकर शब्द करूं लागले, याप्रमाणें महाभयंकर चिन्हें पाहिल्यावर निस्तेज होऊन येत असलेला लक्ष्मण रामाचे दृष्टीस पडला. नंतर खिन्न व दुःखित झालेला तो लक्ष्मण त्याच्याचप्रमाणें खिन्न व दुःखित झालेल्या रामाला अगदीं जवळ येऊन भेटला असतां, राक्षसांचें वास्तव्य असलेल्या निर्जन वनांत सीतेला सोडून आलेल्या लक्ष्मणाला पाहतांच राम त्याची निंदा करूं लागला. (११-१६)

रघुनंदन रामानें लक्ष्मणाचा डावा हात धरला आणि परिणामीं सुखकर

अहो लक्ष्मण गर्ह्यं ते कृतं यत्त्वं विहाय ताम् ।
सीतामिहागतः सौम्य कच्चित्स्वस्ति भवेदिति १८
न मेऽस्ति संशयो वीर सर्वथा जनकात्मजा ।
विनष्टा भक्षिता वापि राक्षसैर्वनचारिभिः १९
अशुभान्येव भूयिष्ठं यथा प्रादुर्भवन्ति मे ।
अपि लक्ष्मण सीतायाः सामग्र्यं प्राप्नुयामहे २०
जीवन्त्याः पुरुषव्याघ्र सुताया जनकस्य वै ।
यथा वै मृगसङ्घाश्च गोमायुश्चैव भैरवम् २१
वाशन्ते शकुनाश्चापि प्रदीप्तामभितो दिशम् ।
अपि स्वस्ति भवेत्तस्या राजपुत्र्या महाबल २२
इदं हि रक्षो मृगसंनिकाशं प्रलोभ्य मां दूरमनुप्रयातम् ।
हतं कथंचिन्महता श्रमेण स राक्षसोऽभून्म्रियमाण एव २३
मनश्च मे दीनमिहाप्रहृष्टं चक्षुश्च सव्यं कुरुते विकारम् ।

होणाऱ्या कठोर शब्दानीं एखाद्या भयभीत झालेल्या पुरुषाप्रमाणें तो त्याला म्हणाला, " हे लक्ष्मणा ! सीतेला सोडून तू येथें आलास, हें तू फारच निंद्य कृत्य केलेंस, कारण हे सौम्य लक्ष्मणा ! आपणापैकीं कोणीही तेथें नसताना सीतेचें कुशल असेल काय ? हे वीरा ! जनककन्या सीतेचा सर्वस्वीं नाश तरी झाला असला पाहिजे अथवा वनात संचार करणाऱ्या राक्षसानीं तिला खाल्ली तरी असली पाहिजे हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा ! ज्याअर्थी पुष्कळ अशुभ चिन्हें मला होत आहेत, त्याअर्थी जनककन्या सीता जिवंत असून तिचें कुशलवृत्त आपणाला समजेल काय ? (१७-२१)

" मृगाचे कळप, खोकड व पक्षी प्रदीप्त झालेल्या दिशेकडे तोंड करून भयंकर शब्द करीत आहेत; तेव्हा हे महाबलाढ्य लक्ष्मणा ! त्या राजकन्येचें कुशल असेल ना ? मृगाप्रमाणें भासणारा हा राक्षस मला लुब्ध करून दूर निघून गेला आणि मोठ्या श्रमानें कसा तरी मी जेव्हा त्याचा वध केला, तेव्हा मरता-मरताच मात्र त्यानें राक्षसरूप धारण केलें. या ठिकाणीं माझें मन खिन्न व हर्षरहित झालेलें आहे आणि माझा डावा डोळा लवत आहे यावरून हे लक्ष्मणा ! सीता

असंशयं लक्ष्मण नास्ति सीता हृता मृता वा पथि वर्तते वा २४
इत्यार्षे श्रीमद्रा० वा० आदिकाव्येऽरण्यकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥५८॥[१८२९]

नवपञ्चाशः सर्गः ।

स दृष्ट्वा लक्ष्मणं दीनं शून्यं दशरथात्मजः ।
पर्यपृच्छत धर्मात्मा वैदेहीमागतं विना १
प्रस्थितं दण्डकारण्यं या मामनुजगाम ह ।
क्व सा लक्ष्मण वैदेही यां हित्वा त्वमिहागतः २
राज्यभ्रष्टस्य दीनस्य दण्डकान्परिधावतः ।
क्व सा दुःखसहाया मे वैदेही तनुमध्यमा ३
यां विना नोत्सहे वीर मुहूर्तमपि जीवितुम् ।
क्व सा प्राणसहाया मे सीता सुरसुतोपमा ४
पतित्वममराणां हि पृथिव्याश्चापि लक्ष्मण ।
विना तां तपनीयाभां नेच्छेयं जनकात्मजाम् ५

निःसंशय आश्रमांतून नाहींशी झालेली आहे मग तिला कोणी हरण करून नेलेली असो, ती कोठें मरून पडलेली असो किंवा कोठेंतरी मार्गांत असो" (२१-२४)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकाण्डापैकीं अठ्ठावनावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

सीतेला सोडून आलेल्या त्या दीन व खिन्न लक्ष्मणाला पाहिल्यावर तो दशरथपुत्र धर्मात्मा राम त्याला म्हणाला, "हे लक्ष्मणा ! मी दण्डकारण्यात जाण्याकरितां निघालो असतां जी माझ्या मागोमाग आली व जिचा त्याग करून तूं येथें आला आहेस, ती सीता कोठें आहे ? अरे, राज्याला मुकल्यामुळें दीन होऊन दण्डकारण्यांत भटकत फिरणाऱ्या मला दुःखामध्येंही साहाय्य करणारी ती सुंदरी विदेहराजकन्या कोठें आहे ? हे वीरा ! जिच्यावांचून एक क्षणभरही जिवंत राहण्याची माझी इच्छा नाहीं, ती देवकन्येप्रमाणें सुंदर व माझ्या प्राणाची मैत्रीण असलेली सीता कोठें आहे ? हे लक्ष्मणा ! पृथ्वीचें व देवाचें आधिपत्य जरी मला प्राप्त झालें तरी सुवर्णासारख्या उज्ज्वल कांतीनें युक्त असलेल्या त्या जानकीचा वियोग होत असेल तर मला त्याची इच्छा

कच्चिज्जीवति वैदेही प्राणैः प्रियतरा मम।
कच्चित्प्रव्राजनं वीर न मे मिथ्या भविष्यति ६
सीतानिमित्तं सौमित्रे मृते मयि गते त्वयि।
कच्चित्सकामा कैकेयी सुखिता सा भविष्यति ७
सपुत्रराज्यां सिद्धार्थां मृतपुत्रा तपस्विनी।
उपस्थास्यति कौसल्या कच्चित्सौम्येन कैकयीम् ८
यदि जीवति वैदेही गमिष्याम्याश्रमं पुनः।
संवृत्ता यदि वृत्ता सा प्राणांस्त्यक्ष्यामि लक्ष्मण ९
यदि मामाश्रमगतं वैदेही नाभिभाषते।
पुरः प्रहसिता सीता विनशिष्यामि लक्ष्मण १०
ब्रूहि लक्ष्मण वैदेही यदि जीवति वा न वा।
त्वयि प्रमत्ते रक्षोभिर्भक्षिता वा तपस्विनी ११
सुकुमारी च बाला च नित्यं चादुःखभागिनी।

नाहीं. (१–५)

"हे वीरा! मला प्राणांहूनही प्रिय असलेली विदेहराजकन्या सीता जिवंत असेल काय? अरे, चौदा वर्षेपर्यंत वनांत राहण्याची जी मी प्रतिज्ञा केली आहे ती (सीतेचें जीवित नाहींसें झाल्यास माझेंही जीवित कायम राहणें संभवनीय नसल्यामुळें) असत्य तर होणार नाहीं ना? हे सुमित्रापुत्रा लक्ष्मणा! सीतेकरितां मला मरण येऊन तूं एकटा अयोध्येंत परत गेल्यावर तरी त्या कैकेयीचे मनोरथ परिपूर्ण होऊन ती सुखी होईल काय? अरे, पुत्र मेल्यामुळें दीन झालेली कौसल्या, मनोरथ परिपूर्ण होऊन पुत्र व राज्य यांसह असलेल्या कैकेयीची सामोपचारानें सेवा करील का? हे लक्ष्मणा! विदेहराजकन्या जर जिवंत असेल तर मी आश्रमांत पुनः जाईन; परंतु ती जर मृत झाली असेल तर मी प्राणत्याग करीन. हे लक्ष्मणा! मी आश्रमांत जातांच सामोरी येऊन सीतेनें जर माझ्याशीं भाषण केलें नाहीं तर मी नाश पावणार. (६–१०)

"हे लक्ष्मणा! सीता जिवंत आहे किंवा नाहीं? अरे, निष्काळजीपणानें तूं येथें निघून आल्यामुळें त्या बिचारीला राक्षसांनीं भक्षण करून टाकलें कीं

मद्वियोगेन वैदेही व्यक्तं शोचति दुर्मना॰ १२
सर्वथा रक्षसा तेन जिह्मेन सुदुरात्मना ।
वदता लक्ष्मणेत्युच्चैस्तवापि जनितं भयम् १३
श्रुतश्च मन्ये वैदेह्या स स्वर सदृशो मम ।
त्रस्तया प्रेषितस्त्वं च द्रष्टुं मां शीघ्रमागत १४
सर्वथा तु कृतं कष्ट सीतामुत्सृजता वने ।
प्रतिकर्तुं नृशंसानां रक्षसां दत्तमन्तरम् १५
दु खिता खरघातेन राक्षसा पिशिताशना ।
तैं सीता निहता घोरैर्भविष्यति न सशय १६
अहोऽस्मि व्यसने मग्नः सर्वथा रिपुनाशन ।
किं त्विदानीं करिष्यामि शङ्के प्राप्तव्यमीदृशम् १७
इति सीतां वरारोहां चिन्तयन्नेव राघवः ।
आजगाम जनस्थानं त्वरया सहलक्ष्मण १८

काय ? ती विदेहराजकन्या सुकुमार व अद्यापि लहान असून नेहमीं सुखातच वाढलेली आहे माझ्या वियोगामुळें नि सशय ती खिन्न होऊन कोठें तरी शोक करीत असेल 'हे लक्ष्मणा !' अशी अतिशय उच्च स्वरानें आरोळी मारणाऱ्या *त्या अत्यत दुष्ट व कुटिल राक्षसानें तुझ्या ठिकाणींही नि सशय भय उत्पन्न* केलें माझ्यासारखा जो स्वर त्यानें काढला तो सीतेनें ऐकला आणि तिनें भयभीत होऊन तुला पाठविल्यामुळें तू मला पाहण्याकरितां सत्वर येथें आला आहेस, असें मला वाटतें अरे, सीतेला वनांत टाकून येथें आलास ही गोष्ट तू अगदीं वाईट केलीस, कारण दुष्ट राक्षसाना आपला सूड उगविण्याची ही तू चांगली सधीच आणून दिलीस खराचा वध झाल्यामुळें त्या मासभक्षक राक्षसांना दु ख झालें होतें तेव्हां त्या घोर राक्षसांनीं सीतेचा वध केला असेल यांत सशय नाहीं हे शत्रुनाशका लक्ष्मणा ! मी सर्वस्वीं सकटांत बुडून गेलों आहें, यामुळें आतां काय करावें ? अरे, अशा प्रकारें प्राप्त होणारें दु ख आपणांला अनुभवावें लागणारच, अशी मला शका येते " (११-१७)

याप्रमाणें सुदरी सीतेचें मनात चिंतन करीत असलेला तो रघुवशज राम

विगर्हमाणोऽनुजमार्तरूपं क्षुधाश्रमेणैव पिपासया च ।
विनिःश्वसञ्छुष्कमुखो विषण्णः प्रतिश्रयं प्राप्य समीक्ष्य शून्यं १९
स्वमाश्रमं स प्रविगाह्य वीरो विहारदेशाननुसृत्य कांश्चित् ।
पतत्तदित्येव निवासभूमौ प्रहृष्टरोमा व्यथितो बभूव २०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे नवपञ्चाशः सर्गः ॥५९॥[१११९]

षष्टितमः सर्गः ।

अथाश्रमादुपावृत्तमन्तरा रघुनन्दनः ।
परिपप्रच्छ सौमित्रिं रामो दुःखार्दितं वचः १
तमुवाच किमर्थं त्वमागतोऽपास्य मैथिलीम् ।
यदा सा तव विश्वासाद्वने विरहिता मया २
दृष्ट्वैवाभ्यागतं त्वां मे मैथिलीं त्यज्य लक्ष्मण ।
शङ्कमानं महत्पापं यत्सत्यं व्यथितं मनः ३

लक्ष्मणासह सत्वर जनस्थानात आला. आश्रमाचे संनिध असलेला प्रदेश सीतेनें विरहित आहे असें पाहून रामाचें मुख निस्तेज झालें, तो खिन्न झाला, दुःखाचे सुस्कारे टाकूं लागला आणि क्षुधा, तृषा व श्रम यांमुळें व्याकुल झालेल्या आपल्या कनिष्ठ भ्रात्याची निंदा करूं लागला. नंतर आपल्या आश्रमांत तो वीर राम आल्यावर तेथील कांहीं क्रीडास्थानांकडे गेला आणि ( तेथेंही सीता न आढळून आल्यावर ) निवासस्थानामध्यें ( अमुक अमुक क्रीडा ज्या ठिकाणीं आपण केली ) तेंच हें ठिकाण असें स्मरण होताच त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले आणि तो फारच दुःखाकुल झाला. (१८-२०)

याप्रमाणें वाल्मीकिप्रणीत श्रीरामायण नावाच्या आदिकाव्यांतील
अरण्यकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला. ॥५९॥

सीतेच्या सांगण्यावरून आश्रमांतून निघून मार्गांत आपल्याजवळ आलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला रघुनंदन राम दुःखानें म्हणाला, " मी तुझ्या विश्वासानें सीतेला आश्रमात सोडून आलों होतों, तर तिला सोडून तूं कां येथें आलास ? मारीच राक्षस जेव्हां माझ्यासारखी आरोळी देऊं लागला तेव्हां ,फारच वाईट गोष्ट घडल्याची जी शंका येऊन माझें मन व्याकुल झालें होतें ती, हे लक्ष्मणा !

देवदानवयक्षाणां लोका ये राक्षसामपि ।
बहुधा निपतिष्यन्ति बाणौघैः शकलीकृताः ६७
निर्मर्यादानिमाँल्लोकान्करिष्याम्यद्य सायकैः ।
हृतां मृतां वा सौमित्रे न दास्यन्ति ममश्वराः ६८
तथारूपां हि वैदेहीं न दास्यन्ति यदि प्रियाम् ।
नाशयामि जगत्सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ६९
यावद्दर्शनमस्या वै तापयामि च सायकैः ।
इत्युक्त्वा क्रोधताम्राक्षः स्फुरमाणोष्ठसंपुटः ७०
वल्कलाजिनमाबध्य जटाभारमबन्धयत् ।
तस्य क्रुद्धस्य रामस्य तथाभूतस्य धीमतः ७१
त्रिपुरं जघ्नुषः पूर्वं रुद्रस्येव बभौ तनुः ।
लक्ष्मणादथ चादाय रामो निष्पीड्य कार्मुकम् ७२
शरमादाय सदीप्तं घोरमाशीविषोपमम् ।
सन्दधे धनुषि श्रीमान्रामः परपुरंजय ७३

बाणसमुदायानीं अनेक प्रकारें तुकडे तुकडे होऊन पृथ्वीवर पडतील हे लक्ष्मणा! सीतेला नेणारे बलाढ्य प्राणी जर मला सीता हरण केलेली अथवा मेलेली न देतील तर बाणाच्या योगानें मी आजच सर्व त्रैलोक्य क्षुब्ध करून टाकीन तशा प्रकारच्या माझ्या प्रिय सीतेला जर कोणी आणून न देतील तर नुसत्या जगताचाच नव्हे, परंतु, चराचर प्राण्यासहवर्तमान सर्व त्रैलोक्याचाही मी नाश करीन, आणि तिचें दर्शन होईपर्यंत मी बाणांच्या योगानें सर्वांना असेंच संतप्त ठेवीन' (६६-७०)

त्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितल्यावर क्रोधानें नेत्र आरक्तवर्ण होऊन दोन्ही ओठ स्फुरण पावूं लागलेल्या त्या रामानें परिधान केलेलीं वल्कलें व आजिनें सांवरून बांधून जटाभारही सावरून बांधिला व तो बुद्धिमान् राम तशाप्रकारें क्रुद्ध झाला असतां, पूर्वी त्रिपुरासुराचा वध करण्याची इच्छा धरणाऱ्या रुद्राच्या शरीराप्रमाणें त्याचें शरीर दिसूं लागलें तदनंतर रामानें लक्ष्मणापासून धनुष्य घेऊन तें हातामध्यें घट्ट धरिलें सर्पाप्रमाणें भयंकर असलेला एक उज्ज्वल बाण

युगान्ताग्निरिव क्रुद्ध इदं वचनमब्रवीत् ।
यथा जरा यथा मृत्युर्यथा कालो यथा विधिः ७४
नित्यं न प्रतिहन्यन्ते सर्वभूतेषु लक्ष्मण ।
तथाऽहं क्रोधसंयुक्तो न निवार्योऽस्म्यसंशयम् ७५
पुरेव मे चारुदतीमनिन्दितां दिशन्ति सीतां यदि नाद्य मैथिलीम् ।
सदेवगन्धर्वमनुष्यपन्नगं जगत्सशैलं परिवर्तयाम्यहम् ७६
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥६५॥[२१३२]

षट्षष्टितमः सर्गः ।

तप्यमानं तदा रामं सीताहरणकर्शितम् ।
लोकानामभवे युक्तं सांवर्तकमिवानलम् १
वीक्षमाणं धनुः सज्यं निःश्वसन्तं पुनःपुनः ।
दग्धुकामं जगत्सर्वं युगान्ते च यथा हरम् २

त्यानें हातामध्यें घेतला आणि नंतर शत्रुसमुदाय जिंकणाऱ्या त्या वैभवशाली रामानें तो बाण त्या धनुष्याला लाविला. इतकेंच नव्हे, परंतु, प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें क्रुद्ध झालेला तो राम लक्ष्मणाला म्हणाला " हे लक्ष्मणा ! जरा, मृत्यु, काल आणि दैव हीं प्राप्त झालीं असता ज्याप्रमाणें कोणत्याही प्राण्याचें ठिकाणीं त्याचें निवारण होत असल्याचें दिसत नाहीं. त्याचप्रमाणें मी क्रोध-संयुक्त झालों असता माझें कोणाच्याही हातून नि:संशय निवारण होणार नाहीं (७१-७५)

पूर्वीप्रमाणें मनोहर दंतानीं युक्त व निर्दोष असलेली मिथिलराजकन्या सीता जर तिचे अपहार करणारे मला न देतील तर देव, गंधर्व, मनुष्य, नाग व पर्वत ह्यासहवर्तमान मी सर्व जगत् उलथून टाकीन ( ७६ )

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडांतील पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥६५॥

सीतेचा अपहार झाल्यामुळें म्लान वदन होऊन शोक करीत असलेला तो राम प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें लोकांच्या नाशाला उद्युक्त झाला आहे, प्रत्यंचा चढविलेल्या धनुष्याकडे पाहत आहे, वारंवार सुस्कारे टाकीत आहे, प्रलयसमयीं

अदृष्टपूर्वं संक्रुद्धं दृष्ट्वा रामं स लक्ष्मणः ।
अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं मुखेन परिशुष्यता ३
पुरा भूत्वा मृदुर्दान्तः सर्वभूतहिते रतः ।
न क्रोधवशमापन्नः प्रकृतिं हातुमर्हसि ४
चन्द्रे लक्ष्मीः प्रभा सूर्ये गतिर्वायौ भुवि क्षमा ।
एतच्च नियतं नित्यं त्वयि चानुत्तमं यशः ५
एकस्य नापराधेन लोकान्हन्तुं त्वमर्हसि ६
ननु जानामि कस्यायं भग्नः सांग्रामिको रथः ।
केन वा कस्य वा हेतोः सायुधः सपरिच्छदः ७
खुरनेमिक्षतश्चायं सिक्तो रुधिरबिन्दुभिः ।
देशो निर्वृत्तसंग्रामः सुघोरः पार्थिवात्मज ८

जगत् दग्ध करून टाकण्यास उद्युक्त होणाऱ्या रुद्राप्रमाणें सर्व जगतच दग्ध करून टाकण्याची इच्छा करीत आहे, आणि पूर्वी कधींही पाहण्यात न आलेला अशा रीतीनें क्रुद्ध झालेला आहे असें पाहिल्या बरोबर लक्ष्मणाचें मुख निस्तेज झालें आणि हात जोडून तो त्याला म्हणाला ( १-३ )

"आपण पूर्वी इंद्रियनिग्रही आणि प्राणिमात्राच्या हिताविषयीं तत्पर होता, तेव्हां सांप्रत क्रोधाच्या अधीन होऊन आपल्या स्वभावाचा त्याग करणें तुम्हांला योग्य नाहीं. चंद्राचे ठिकाणीं कांति, सूर्याचे ठिकाणीं प्रभा, वायूचे ठिकाणीं गति व पृथ्वीचे ठिकाणीं क्षमा हीं जशीं नित्यसिद्ध आहेत तशीच आपले ठिकाणीं अनुपम कीर्ति नित्यसिद्ध आहे. त्यास्तव एकाच्या अपराधाकरितां सर्व लोकांचा वध करणें आपणाला योग्य नाहीं. हा अपराध एकाचाच आहे हें मी जाणतो आहें. कारण, हा कोणाचा तरी एकाचाच संग्रामसंबंधीं रथ, सामान व आयुधें त्यासहवर्तमान मोडून पडलेला आहे हें उघडच दिसत आहे, परंतु, हा रथ कोणीं मोडला आहे व काय कारणाकरितां मोडला आहे त्याचा मात्र अदमास मला होत नाहीं. हे राजपुत्रा ! अश्वांच्या खुरांनीं व चाकाच्या धावांनीं खळग्या पडलेल्या ह्या अतिभयंकर प्रदेशावर रक्तबिंदूंचा सडा झालेला आहे, त्यावरून येथें संग्राम झालेला असावा असें दिसतें. हे वक्त्यामध्ये श्रेष्ठ रामा ! हा संग्राम एकेकट्याचाच

एकस्य तु विमर्दोऽयं न ह्यथावेदनं चर।
न हि वृत्तं हि पश्यामि बलस्य महतः पदम् ९
नैकस्य तु कृते लोकान्विनाशयितुमर्हसि।
युक्तदण्डा हि मृदवः प्रशान्ता वसुधाधिपाः १०
सदा त्वं सर्वभूतानां शरण्यः परमा गतिः।
को नु दारप्रणाशं ते साधु मन्येत राघव ११
सरितः सागराः शैला देवगन्धर्वदानवाः।
नालं ते विप्रियं कर्तुं दीक्षितस्येव साधवः १२
येन राजन्हृता सीता तमन्वेषितुमर्हसि।
मद्द्वितीयो धनुष्पाणिः सहायैः परमर्षिभिः १३
समुद्रं वा विचेष्यामः पर्वतांश्च वनानि च।
गुहाश्च विविधा घोरा पद्मिन्यो विविधास्तथा १४
देवगन्धर्वलोकांश्च विचेष्यामः समाहिताः।
यावन्नाधिगमिष्यामस्तव भार्यापहारिणम् १५

झालेला आहे, अनेकाचा झालेला नाहीं. कारण, मोठ्या सैन्याचीं पाउलें उमट-लेलीं येथें दिसत नाहींत. ( ४-९ )

म्हणून एकाकरितां त्रैलोक्याचा नाश करणें तुला योग्य नाहीं. पृथ्वीच्या अधिपतींनीं शांत व मृदु राहून अपराधाप्रमाणेंच दंडाचें अवलंबन केलें पाहिजे. सर्व प्राण्याचें रक्षण करणारा तूंच असून सर्वांचा मुख्य आश्रयही तूंच आहेस. तेव्हां हे रघुवंशजा रामा, तुझ्या पत्नीचा नाश होणें कोणालाही बरें वाटणार नाहीं. यज्ञदीक्षा घेतलेल्या यजमानाचे इच्छेविरुद्ध ज्याप्रमाणें ज्ञानी ऋत्विज वागत नाहींत, त्याचप्रमाणें नद्या, समुद्र, पर्वत, देव, गंधर्व आणि दैत्य ह्यापैकीं कोणीही तुझ्या मर्जीविरुद्ध वागण्यास समर्थ नाहींत. हे राजा ! हातामध्यें धनुष्य घेऊन व साहाय्य करणाऱ्या श्रेष्ठ ऋषींसहवर्तमान मला बरोबर घेऊन तूं ज्यानें सीतेचा अपहार केला आहे त्याला हुडकून काढ. समुद्र, पर्वत, वनें, नानाप्रकारच्या घोर गुहा आणि नानाप्रकारचीं सरोवरें आपण धुंडून काढूं इतकेंच नव्हे; परंतु, तुझ्या भार्येचा अपहार करणाऱ्याचा पत्ता लागपर्यंत आपण लक्षपूर्वक देवलोक आणि गंधर्वलोकही शोधून काढूं. ( १०-१५ )

न चेत्साम्ना प्रदास्यन्ति पत्नीं ते त्रिदशेश्वराः ।
कोसलेन्द्र ततः पश्चात्प्राप्तकालं करिष्यसि १६
शीलेन साम्ना विनयेन सीतां नयेन न प्राप्स्यसि चेन्नरेन्द्र ।
ततः समुत्सादय हेमपुङ्खैर्महेन्द्रवज्रप्रतिमैः शरौघैः १७

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥६६॥[२१४९]

सप्तषष्टितमः सर्गः ।

तं तथा शोकसंतप्तं विलपन्तमनाथवत् ।
मोहेन महता युक्तं परिद्यूनमचेतसम् १
ततः सौमित्रिराश्वास्य मुहूर्तादिव लक्ष्मणः ।
रामं संबोधयामास चरणौ चाभिपीडयन् २
महता तपसा चापि महता चापि कर्मणा ।
राज्ञा दशरथेनासील्लब्धोऽमृतमिवामरैः ३
तव चैव गुणैर्बद्धस्त्वद्वियोगान्महीपतिः ।
राजा देवत्वमापन्नो भरतस्य यथाश्रुतम् ४

---

ह्याप्रमाणें सामोपचारानें स्वर्गाधिपति देव जर तुला तुझी पत्नी परत न देतील तर, हे कोसलराज ! नंतर समयाला योग्य असें काय हवें तें तूं कर हे राजा ! गरीबी, सामोपचार, विनय आणि नीति ह्याच्या योगानें जर तुला सीता प्राप्त न होईल तर इंद्रवज्रतुल्य आणि सुवर्णाच्या पिसांनीं युक्त अशा बाणसमुदायाच्या योगानें तूं त्रैलोक्याचा नाश करून टाक. (१६-१७)

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥६६॥

त्याप्रमाणें शोकसंतप्त, खिन्न, अत्यंत मोहित व भानरहित झालेला तो राम अनाथाप्रमाणें विलाप करूं लागला असतां, एक क्षणभरही वाट न पाहतां सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रामाचे पाय धरिले आणि धीर देऊन तो त्याला, म्हणाला, "देवांना ज्याप्रमाणें अमृत प्राप्त झालें त्याप्रमाणें मोठी तपश्चर्या आणि मोठें कर्मानुष्ठान केल्यामुळें दशरथराजाला तूं प्राप्त झालेला असून, त्या पृथ्वीपति राजाला तूं आपल्या गुणांनींच आपल्या स्वाधीन करून घेतलें असल्याकारणानें तुझ्याच वियोगामुळें तो स्वर्गवासी झाल्याची हकीकतही तूं भरतापासून इत्थंभूत ऐकली

यदि दुःखमिदं प्राप्तं काकुत्स्थ न सहिष्यसे ।
प्राकृतश्चाल्पसत्त्वश्च इतरः कः सहिष्यति ५
आश्वसिहि नरश्रेष्ठ प्राणिनः कस्य नापदः ।
संस्पृशन्त्यग्निवद्राजन्क्षणेन व्यपयान्ति च ६
लोकस्वभाव एवैष ययातिर्नहुषात्मजः ।
गतः शक्रेण सालोक्यमनयस्तं समस्पृशत् ७
महर्षियों वसिष्ठस्तु यः पितुर्नः पुरोहितः ।
अह्ना पुत्रशतं जज्ञे तथैवास्य पुनर्हतम् ८
या चेयं जगतो माता सर्वलोकनमस्कृता ।
अस्याश्च चलनं भूमेर्दृश्यते कोसलेश्वर ९
यौ धर्मौ जगतो नेत्रौ यत्र सर्वं प्रतिष्ठितम् ।
आदित्यचन्द्रौ ग्रहणमभ्युपेतौ महाबलौ १०
सुमहान्त्यपि भूतानि देवाश्च पुरुषर्षभ ।
न दैवस्य प्रमुञ्चन्ति सर्वभूतानि देहिनः ११

आहेस. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! हें प्राप्त झालेलें दुःख जर तूं सहन न करशील तर कमी धैर्याचा असा दुसरा कोण बरें साधारण पुरुष ( प्रसंग पडला असता ) दुःख सहन करील ? ( १-५ )

म्हणून, हे पुरुषश्रेष्ठा, तूं धीर धर हे राजा, प्रत्येक प्राण्यावर संकटें येऊन तीं त्याला अग्नीप्रमाणें चटका लावीतच असतात; परंतु, ( धैर्याचें अवलंबन केलें असता ) तीं एका क्षणामध्यें नाहींशीही होतात. अरे, ( प्रपंचात दुःख होणें ) हा जगताचा स्वभावच आहे नहुषपुत्र ययाति इंद्रलोकीं गेला असता त्यालाही ( कांहीं दिवस स्वर्गच्युतिरूप ) दुःख भोगावें लागलें. आपल्या पित्याचे पुरोहित महर्षि त्यांना शंभर पुत्र झाले व एका दिवसातच विश्वामित्रानें ते सर्व मारून टाकिले. हे कोसलाधिपते ! सर्व लोकांना पूज्य अशा ह्या जगज्जननी पृथ्वीचेही चलन दृष्टोत्पत्तीस येतें. धर्मप्रवर्तक, जगन्नियंते आणि सर्वांना आधारभूत असे जे महाबलाढ्य सूर्य चंद्र यानाही ग्रहण लागत असतें. ( ६-१० )

हे पुरुषश्रेष्ठा ! प्राणी कितीही मोठे असले तरी ते अथवा देवही दैवाच्या

शक्रादिष्वपि देवेषु वर्तमानौ नयानयौ ।
श्रूयेते नरशार्दूल न त्वं व्यथितुमर्हसि ११
मृतायामपि वैदेह्यां नष्टायामपि राघव ।
शोचितुं नार्हसे वीर यथाऽन्यः प्राकृतस्तथा १२
त्वद्विधा न हि शोचन्ति सततं सर्वदर्शनाः ।
सुमहत्स्वपि कृच्छ्रेषु रामानिर्विण्णदर्शनाः १४
तत्त्वतो हि नरश्रेष्ठ बुद्ध्या समनुचिन्तय ।
बुद्ध्या युक्ता महाप्राज्ञा विजानन्ति शुभाशुभे १५
अदृष्टगुणदोषाणामधृतानां तु कर्मणाम् ।
नान्तरेण क्रियां तेषां फलमिष्टं च वर्तते १६
मामेवं हि पुरा वीर त्वमेव बहुशोऽन्वशाः ।
अनुशिष्याद्धि को नु त्वामपि साक्षाद्बृहस्पतिः १७

कचाट्यांतून सुटत नाहींत, मग देह धारण करणारे ( सामान्य ) सर्व प्राणी त्याच्या कचाट्यांतून सुटत नाहींत हें या सागावयास पाहिजे ? हे पुरुषश्रेष्ठा ! इंद्रादि देवांचे ठिकाणींही सुखदुःख असल्याचें ऐकण्यांत येतें, म्हणून, शोक करणें तुला योग्य नाहीं फार तर काय, परंतु, हे वीरा, सीता नाहींशी झाली असतां किंवा ती मेली असताही एखाद्या साधारण पुरुषाप्रमाणें तिच्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं हे रामा, नेहमीं सर्व गोष्टींकडे लक्ष पुरविणारे आणि खिन्न मुद्रेनें कधींही युक्त न होणारे तुझ्यासारखे ( श्रेष्ठ लोक ) मोठीं मोठीं संकटें आलीं असताही दुःख करीत बसत नाहींत हे पुरुषश्रेष्ठा ! तू बुद्धिपूर्वक एकदा तत्त्वदृष्टीनें युक्तायुक्तेचा विचार कर कारण, बुद्धीनें युक्त असलेले महाज्ञानी लोक शुभाशुभ जाणीत असतात ( ११-१५ )

ज्यांतील गुणदोष प्रत्यक्ष दिसत नाहींत अशीं जीं नश्वर कर्में त्यांची निष्पत्ति पुरुषव्यापारावांचून होत नाहीं, परंतु, सत् व्या सत्कर्तीनें झालेलीं जीं तीं कर्में त्यांच्यापासून परिणामीं सुख अथवा दुःख प्राप्त होतच असतें हे वीरा, ह्याप्रमाणें पूर्वीं तूंच मला अनेक वेळा उपदेश केला आहेस. याचा साक्षात् बृहस्पतिही तुला उपदेश करण्यास समर्थ नाहीं, मग दुसऱ्याची तर गोष्ट पाहिजे कशाला ?

बुद्धिश्च ते महाप्राज्ञ देवैरपि दुरन्वया ।
शोकेनाभिप्रसुप्तं ते ज्ञानं संबोधयाम्यहम् १८
दिव्यं च मानुषं चवमात्मनश्च पराक्रमम् ।
इक्ष्वाकुवृषभावेक्ष्य यतस्व द्विषतां वधे १९
किं ते सर्वविनाशेन कृतेन पुरुषर्षभ ।
तमेव तु रिपुं पापं विज्ञायोद्धर्तुमर्हसि २०

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः॥६७॥[२१६९]

अष्टषष्टितमः सर्गः ।

पूर्वजे ऽप्युक्तवाक्यस्तु लक्ष्मणेन सुभाषितम् ।
सारग्राही महासारं प्रतिजग्राह राघवः १
स निगृह्य महाबाहुः प्रवृद्धं रोषमात्मनः ।
अवष्टभ्य धनुश्चित्रे रामो लक्ष्मणमब्रवीत् २
किं करिष्यावहे वत्स क वा गच्छाव लक्ष्मण ।
केनोपायेन पश्यावः सीतामिह विचिन्तय ३

हे महाज्ञानवान् रामा ! तुझ्या ज्ञानाचें आकलन देवानाही करितां येणें शक्य नाहीं; तथापि शोकानें तें तुझें ज्ञान आज आच्छादित झाल्यासारिखें दिसत असल्यामुळें मी तें ( तुझ्याच उपदेशानें पुनरपि ) आवरणरहित करितों. हे इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठा रामा ! देवांना व मनुष्यांना उचित अशा आपल्या पराक्रमाचा विचार करून तूं शत्रूंच्या वधाविषयीं प्रयत्न कर. हे पुरुषश्रेष्ठा, सर्वांचा नाश करून तुला काय उपयोग होणार आहे. ? ज्यानें तुझ्या भार्येला नेलें असेल त्याच दुष्ट शत्रूला ओळखून काढून तूं त्याचीं पाळेंमुळें खणून काढ. " ( १९-२० )

ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनावाच्या आदिकाव्यांतील आरण्यकांडांतील सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

ह्याप्रमाणें लक्ष्मणानें ज्येष्ठ भ्राता रामाला चांगल्या शब्दांनीं उपदेश केला असतां सार ग्रहण करणाऱ्या रघुवंशज रामानें त्यांतील मुख्य सार ग्रहण केलें नंतर पराक्रमी पोंचलेला आपला क्रोध आवरून धरून व अद्भुत धनुष्य हातांत घेऊन तो महापराक्रमी राम लक्ष्मणाला म्हणाला, " वत्सा लक्ष्मणा ! आपण आतां काय करावें ? आपणाला कोणत्या उपायानें येथें सीता प्राप्त होईल ह्याचा तूं विचार कर."

तं तथा परितापार्तं लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् ।
इदमेव जनस्थानं त्वमन्वेषितुमर्हसि ४
राक्षसैर्बहुभिः कीर्णं नानाद्रुमलतायुतम् ।
सन्तीह गिरिदुर्गाणि निर्दराः कन्दराणि च ५
गुहाश्च विविधा घोरा नानामृगगणाकुलाः ।
आवासाः किंनराणां च गन्धर्वभवनानि च ६
तानि युक्तो मया सार्धं समन्वेषितुमर्हसि ।
त्वद्विधाबुद्धिसंपन्ना महात्मानो नरर्षभाः ७
आपत्सु न प्रकम्पन्ते वायुवेगैरिवाचलाः ।
इत्युक्तस्तद्वनं सर्वं विचचार सलक्ष्मणः ८
क्रुद्धो रामः शरं घोरं संधाय धनुषि क्षुरम् ।
ततः पर्वतकूटाभं महाभागं द्विजोत्तमम् ९
ददर्श पतितं भूमौ क्षतजार्द्रं जटायुषम् ।
तं दृष्ट्वा गिरिशृङ्गाभं रामो लक्ष्मणमब्रवीत् १०

ह्याप्रमाणें तो राम दु:खाकुल झाला असतां लक्ष्मण त्याला म्हणाला "हे जनस्थानच तूं शोधून काढ. नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेलें हें जनस्थान असंख्य राक्षसांनीं व्याप्त झालेलें आहे ( १-५ )

ह्या ठिकाणीं जाण्यास अशक्य असे पर्वतप्रदेश, धबधबे, दऱ्या आणि अनेक प्रकारच्या भयंकर गुहा नानाप्रकारच्या मृगगणांनीं व्याप्त असून किंनरांचीं निवासस्थानें व गंधर्वांचीं घरेंही येथें आहेत; तीं तूं मला बरोबर घेऊन शोधून काढ. तुझ्यासारिखे बुद्धिमान् व महात्मे पुरुषश्रेष्ठ वायुवेगाला दाद न देणाऱ्या पर्वताप्रमाणें संकटसमयीं घाबरे होत नाहींत." ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितल्यावर तो क्रुद्ध राम वस्तऱ्यासारखा तीक्ष्ण व घोर बाण धनुष्याला लावून लक्ष्मणासह-वर्तमान त्या सर्व वनामध्यें संचार करूं लागला. तेव्हां पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड असलेला महाभाग्यवान् पक्षिश्रेष्ठ जटायु रक्तानें भरून गेलेला व भूमीवर पडलेला त्यानें अवलोकन केला आणि पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड असलेल्या त्या पक्ष्याला पाहिल्यावर राम लक्ष्मणाला म्हणाला; ( ६-१० )

अनेन सीता वैदेही भक्षिता नात्र संशयः ।
गृध्ररूपमिदं व्यक्तं रक्षो भ्रमति काननम् ११
भक्षयित्वा विशालाक्षीमास्ते सीतां यथासुखम् ।
एनं वधिष्ये दीप्ताग्रैः शरैर्घोरैरजिह्मगैः १२
इत्युक्त्वाऽभ्यपतद्द्रष्टुं संधाय धनुषि क्षुरम् ।
क्रुद्धो रामः समुद्रान्तां चालयन्निव मेदिनीम् १३
तं दीनदीनया वाचा सफेनं रुधिरं वमन् ।
अभ्यभाषत पक्षी स रामं दशरथात्मजम् १४
यामोषधीमिवायुष्मन्नन्वेषसि महावने ।
सा देवी मम च प्राणा रावणेनोभयं हृतम् १५
त्वया विरहिता देवी लक्ष्मणेन च राघव ।
ह्रियमाणा मया दृष्टा रावणेन बलीयसा १६
सीतामभ्यवपन्नोऽहं रावणश्च रणे प्रभो ।
विध्वंसितरथच्छत्रः पातितो धरणीतले १७

---

"ह्यानेंच विदेहराजकन्या सीता भक्षण करून टाकिली ह्यांत संशय नाहीं. निःसंशय हा गृध्ररूप राक्षस अरण्यामध्यें संचार करीत आहे. म्हणून विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या सीतेला यथेष्ट भक्षण करून ज्याअर्थीं हा स्वस्थ बसलेला आहे त्याअर्थीं उज्ज्वल अग्रांनीं युक्त व सरळ जाणाऱ्या घोर बाणानें मी याचा वध करितों." असें म्हणून रामानें धनुष्याला क्षुरसंज्ञक बाण लाविला आणि समुद्रवलयांकित पृथ्वी कंपित करीतच कीं काय तो क्रुद्ध राम त्या पक्ष्याला पाहण्याकरितां त्याच्या अंगावर धावून गेला तेव्हा फेंसासहवर्तमान रक्त ओकीत असलेला तो पक्षी अत्यंत दीन वाणीनें त्या दशरथपुत्र रामाला म्हणाला- "हे चिरंजीवी रामा! संजीवनी ओषधीप्रमाणें तूं जिचा महावनामध्यें शोध करीत आहेस ती सीता आणि माझे प्राण हीं दोन्हीं रावणानें हरण करून नेलीं (११-१५)

हे रघुराजा रामा, तूं आणि लक्ष्मण त्यांच्याबरोबर नसून सीता देवीला महाबलाढ्य रावण घेऊन चालला आहे असें जेव्हा मीं पाहिलें तेव्हा, हे प्रभो! सीतेचें रक्षण करण्याच्या उद्देशानें मी त्याच्या पुढें गेलों आणि संग्रामामध्यें रावणाच्या रथाचा व छत्राचा विध्वंस करून मीं त्याला भूतलावर पाडिलें.

एतदस्य धनुर्भग्नमेते चास्य शरास्तथा ।
अयमस्य रणे राम भग्नः साङ्ग्रामिको रथः ॥ १८
अयं तु सारथिस्तस्य मत्पक्षनिहतो भुवि ।
परिश्रान्तस्य मे पक्षौ छित्त्वा खड्गेन रावणः ॥ १९
सीतामादाय वैदेहीमुत्पपात विहायसम् ।
रक्षसा निहतं पूर्वं मां न हन्तुं त्वमर्हसि ॥ २०
रामस्तस्य तु विज्ञाय सीतासक्तां प्रियां कथाम् ।
गृध्रराजं परिष्वज्य परित्यज्य महद्धनुः ॥ २१
निपपातावशो भूमौ रुरोद सह लक्ष्मणः ।
द्विगुणीकृततापार्तो रामो धीरतरोऽपि सन् ॥ २२
एकमेकायने कृच्छ्रे निःश्वसन्तं मुहुर्मुहुः ।
समीक्ष्य दुःखितो रामः सौमित्रिमिदमब्रवीत् ॥ २३

हे रामा ! हें त्याचें धनुष्य मोडून पडलें असून हे त्याचे बाण पडले आहेत आणि त्याचप्रमाणें रणामध्यें त्याचा हा संग्रामसंबंधीं रथ मोडून पडला आहे. इतकेंच नव्हे; परंतु, माझ्याच पंखांच्या योगानें हा त्याचा सारथिही भूमीवर मरून पडला आहे. तथापि, युद्ध करून मी शांत झालों असतां रावणानें खड्ग घेऊन माझे पंख तोडिले, आणि विदेहराजकन्या सीतेला घेऊन तो आकाशमार्गानें चालता झाला. यास्तव, राक्षसानें पूर्वीच मारून टाकिलेल्या माझा वध करणें तुला योग्य नाहीं. " ( १९-२० )

ह्याप्रमाणें त्यानें सांगितलेली ती सीतेसंबंधानें प्रिय कथा श्रवण केल्याबरोबर आपल्या हातांतील मोठें धनुष्य टाकून देऊन राम त्या गृध्रराज जटायूला कवटाळून भेटला, आणि स्वतः इतका पैर्यवान् असून सुद्धां जटायूचाही वध झाल्यानें त्याच्या दुःखोत्पत्तीस आल्या कारणानें द्विगुणित दुःखानें व्याकुळ झाल्यामुळें कांहीं एक सुचेनासें होऊन तो लक्ष्मणासहवर्तमान भूमीवर पडून रोदन करूं लागला, तदनंतर शोक करितां करितां लक्ष्मणाला ऊर्ध्व होऊन तो पक्षी एकसारिखा दीर्घ श्वास टाकीत आहे असें अवलोकन केल्यावर तो दुःखित राम म्हणाला,

राज्यं भ्रष्टं वने वासः सीता नष्टा मृतो द्विजः।
ईदृशीयं ममालक्ष्मीर्दहेदपि हि पावकम् २४
संपूर्णमपि चेदद्य प्रतरेयं महोदधिम्।
सोऽपि नूनं ममालक्ष्म्या विशुष्येत्सरितां पतिः २५
नास्त्यभाग्यतरो लोके मत्तोऽस्मिन्सचराचरे।
येनेयं महती प्राप्ता मया व्यसनवागुरा २६
अयं पितुर्वयस्यो मे गृध्रराजो महाबलः।
शेते विनिहतो भूमौ मम भाग्यविपर्ययात् २७
इत्येवमुक्त्वा बहुशो राघवः सहलक्ष्मणः।
जटायुषं च पस्पर्श पितृस्नेहं निदर्शयन् २८
निकृत्तपक्षं रुधिरावसिक्तं तं गृध्रराजं परिगृह्य राघवः।
क्व मैथिली प्राणसमा गतेति विमुच्य वाचं निपपात भूमौ २९
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे अष्टषष्टितमः सर्गः॥६८ [२११८]

---

" राज्य नाहींसें झालें, वनामध्यें वास्तव्य करण्याचा प्रसंग आला, सीता नाहींशी झाली आणि ( कैवारी ) पक्षीही मरून गेला; अशा प्रकारची ही माझी आपत्ति अग्नीलाही जाळून टाकील. हा दुःखसंताप शमन होण्याकरिता संपूर्ण महासागरामध्यें जर मी आज उडी घातली तर तो सागरही माझ्या आगीनें खरोखर शुष्क होऊन जाईल. ( २१-२५ )

ज्या मला हें प्रचंड दुःखजाल प्राप्त झालें आहे त्या माझ्यापेक्षां ह्या चराचर जगतामध्यें अधिक भाग्यहीन प्राणी कोणीही नाहीं. अरे, माझ्या पित्याचा मित्र हा महाबलाढ्य गृध्रराजही माझें नशीब फिरल्यामुळें भूमीवर मरून पडला आहे." ह्याप्रमाणें रामानें लक्ष्मणासहवर्तमान नानाप्रकारानीं विलाप केला आणि पितृप्रेम दर्शविण्याच्या उद्देशानें जटायूला त्यानें वारंवार आलिंगन दिलें. असो. ह्याप्रमाणें पंख तुटून शरीर रक्तानें मरलेल्या त्या गृध्रराजाला आलिंगन दिल्यावर ' प्राणांप्रमाणें असलेली माझी ( प्रिया ) मिथिलराजकन्या सीता कोठें गेली " असा हंबरडा फोडून रघुवंशज राम भूमीवर पडला. ( २६-२९ )

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणरूपाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं अडसष्टावा सर्ग समाप्त झाला॥६८॥

एकोनसप्ततितमः सर्गः।

रामः प्रेक्ष्य तु तं गृध्रं भुवि रौद्रेण पातितम्।
सौमित्रिं मित्रसम्पन्नमिदं वचनमब्रवीत् १
ममायं नूनमर्थेषु यतमानो विहङ्गमः।
राक्षसेन हतः सङ्ख्ये प्राणांस्त्यजति मत्कृते २
अतिखिन्नः शरीरेऽस्मिन्प्राणो लक्ष्मण विद्यते।
तथा स्वरविहीनोऽयं विक्लवं समुदीक्षते ३
जटायो यदि शक्नोषि वाक्यं व्याहरितुं पुनः।
सीतामाख्याहि भद्रं ते वधमाख्याहि चात्मनः ४
किंनिमित्तो जहारार्यां रावणस्तस्य किं मया।
अपराधं तु यं दृष्ट्वा रावणेन हृता प्रिया ५
कथं तच्चन्द्रसंकाशं मुखमासीन्मनोहरम्।
सीतया कानि चोक्तानि तस्मिन्काले द्विजोत्तम ६
कथंवीर्यः कथंरूपः किंकर्मा स च राक्षसः।

---

घोर राक्षसानें भूमीवर मारून पाडिलेल्या त्या गृध्राला पाहिल्यावर राम सर्वांशी मित्रत्वानें वागणाऱ्या लक्ष्मणाला म्हणाला " खरोखर माझ्याकरिताच हा पक्षी धडपड करूं लागला असतांना राक्षसानें युद्धामध्यें त्याचा वध केला आहे व हा आता माझ्याकरिता प्राण सोडीत आहे हे लक्ष्मणा! ह्याच्या शरिरामध्यें ह्याचे प्राण अगदीं गुदमरून गेल्याचें दिसत आहे व ह्याच्या तोंडातून उच्चारही निघत नसून हा डोळे फिरवीत आहे हे जटायो! तुझ्यानें जर बोलवत असेल तर पुनरपि एकदा सीतेची हकीगत सांग आणि तुझें देव बरें करो, स्वतःच्या वधाचाही वृत्तांत तूं मला कथन कर, साध्वी सीता रावणानें कशाकरिता बरें हरण करून नेली? माझी प्रिया सीता रावणानें हरण करून नेण्यासारिखा मी त्याचा काय बरें अपराध केला आहे? ( १–५ )

त्यावेळीं सीतेचें तें चंद्रतुल्य मनोहर मुख कसें झालें होतें आणि, हे पक्षिश्रेष्ठ! त्या वेळीं सीतेनें काय शब्द उच्चारिले (हें तू मला कथन कर). त्याचप्रमाणें, हा जटायो! त्या राक्षसाचें वीर्य कसें आहे, त्याचें स्वरूप कसें आहे, त्याचें कर्म कसें

क चास्य भवनं तात ब्रूहि मे परिपृच्छतः ७
तमुद्वीक्ष्य स धर्मात्मा विलपन्तमनाथवत्।
वाचा विक्लवया राममिदं वचनमब्रवीत् ८
सा हृता राक्षसेन्द्रेण रावणेन दुरात्मना।
मायामास्थाय विपुलां वातदुर्दिनसंकुलाम् ९
परिक्लान्तस्य मे तात पक्षौ छित्त्वा निशाचरः।
सीतामादाय वैदेहीं प्रयातो दक्षिणामुखः १०
उपरुध्यन्ति मे प्राणा दृष्टिर्भ्रमति राघव।
पश्यामि वृक्षान्सौवर्णानुशीरकृतमूर्धजान् ११
येन याति मुहूर्तेन सीतामादाय रावणः।
विप्रणष्टं धनं क्षिप्रं तत्स्वामी प्रतिपद्यते १२
विन्दो नाम मुहूर्तोऽसौ न च काकुत्स्थ सोऽबुधत्।
झषवद्बडिशं गृह्य क्षिप्रमेव विनश्यति १३

आहे आणि त्याचें वसतिस्थान कोठें आहे हें मी तुला विचारीत आहें तें तूं मला कथन कर." ह्याप्रमाणें तो राम अनाथासारिखें भाषण करूं लागला असता त्याच्याकडे पाहून तो धर्मात्मा जटायु अडखळत अडखळत ह्मणाला, "वायु व मेघपटल ह्यांनीं युक्त असलेल्या प्रचंड मायेचें अवलंबन करून त्या दुरात्म्या राक्षसाधिपति रावणानें सीता हरण करून नेली, मी त्याच्याशीं युद्ध करून थकलों असता, बा रामा! माझेही पंख त्यानें तोडून टाकिले आणि विदेहराजकन्या सीतेला घेऊन तो राक्षस दक्षिणेकडे तोंड करून चालता झाला. ( ६-१० )

हे रघुवंशजा रामा! आता माझे प्राण व्याकुल होत असून माझी नजर ठरेनाशी झाली आहे आणि ( मरणकाल समीप आल्यामुळें ) नलद ( वाळा ) रूप केंसांनीं युक्त असे सुवर्णवृक्ष माझ्या दृष्टीस पडूं लागले आहेत. असो. ज्या मुहूर्तावर रावण सीतेला घेऊन गेला त्या मुहूर्तावर जें द्रव्य नाहींसें झालेलें असेल तें मालकाला सत्वर परत मिळत असतें. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा! त्या वेळीं हा विंदनामक मुहूर्त होता ही गोष्ट त्या रावणाच्या लक्षात आली नाहीं. म्हणून, ( ज्याअर्थी तो ह्या मुहूर्तावर सीतेला घेऊन गेला आहे त्याअर्थी ) आमिषाचा

न च त्वया व्यथा कार्या जनकस्य सुतां प्रति ।
वैदेह्यां रंस्यसे क्षिप्रं हत्वा तं रणमूर्धनि १४
असंमूढस्य गृध्रस्य रामं प्रत्यनुभाषतः ।
आस्यात्सुस्राव रुधिरं म्रियमाणस्य सामिषम् १५
पुत्रो विश्रवसः साक्षाद्भ्राता वैश्रवणस्य च ।
इत्युक्त्वा दुर्लभान्प्राणान्मुमोच पतगेश्वरः १६
ब्रूहि ब्रूहीति रामस्य ब्रुवाणस्य कृताञ्जलेः ।
त्यक्त्वा शरीरं गृध्रस्य प्राणा जग्मुर्विहायसम् १७
स निक्षिप्य शिरो भूमौ प्रसार्य चरणौ तथा ।
विक्षिप्य च शरीरं स्वं पपात धरणीतले १८
तं गृध्रं प्रेक्ष्य ताम्राक्षं गतासुमचलोपमम् ।
रामः सुबहुभिर्दुःखैर्दीनः सौमित्रिमब्रवीत् १९
बहूनि रक्षसां वासे वर्षाणि वसता सुखम् ।

स्वीकार करणाऱ्या मत्स्याप्रमाणें त्याचा सत्वरच नाश होईल. जनककन्येसंबंधानें तूं मुळींच काळजी वहूं नकोस; संग्रामामध्यें त्या राक्षसाचा वध करून तूं लवकरच विदेहराजकन्येशीं रममाण होशील." ( ११-१४ )

त्याप्रमाणें तो शुद्धीवर असलेला गृध्रपक्षी रामाला सांगूं लागला असतां मरणोन्मुख झाल्यामुळें त्याच्या तोंडातून मांसासहवर्तमान रक्त वाहूं लागलें, आणि ( रावण कोण हें सांगण्याचा उद्देश मनांत धरून ) " विश्रवस् मुनींचा प्रत्यक्ष पुत्र व कुबेराचा भ्राता " इतकेंच बोलून त्या पक्षिराजानें दुर्लभ प्राण सोडिले. सारांश, " सांग, सांग " असें राम हात जोडून त्याला म्हणत असतांनाही शरिराचा त्याग करून त्या गृध्रपक्ष्याचे प्राण आकाशामध्यें निघून गेले तात्पर्य, मस्तक भूमावर टाकून देऊन आणि त्याचप्रमाणें पाय लांब करून व आपलें शरीर अस्ताव्यस्त टाकून देऊन तो भूतलावर मरून पडला, तेव्हां ताम्रवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला पर्वतप्राय गृध्रपक्षी गतप्राण झाल्याचें अवलोकन करून फारच दुःख झाल्यामुळें दीन झालेला राम लक्ष्मणाला म्हणाला. " राक्षसाचें निवासस्थान असलेल्या या दंडकारण्यामध्यें पुष्कळ वर्षेंपर्यंत सुखानें वास्तव्य करणाऱ्या या

अनेन दण्डकारण्ये विशीर्णमिह पक्षिणा २०
अनेकवार्षिको यस्तु चिरकालसमुत्थितः ।
सोऽयमद्य हतः शेते कालो हि दुरतिक्रमः २१
पश्य लक्ष्मण गृध्रोऽयमुपकारी हतश्च मे ।
सीतामभ्यवपन्नो हि रावणेन बलीयसा २२
गृध्रराज्यं परित्यज्य पितृपैतामहं महत् ।
मम हेतोरयं प्राणान्मुमोच पतगेश्वरः २३
सर्वत्र खलु दृश्यन्ते साधवो धर्मचारिणः ।
शूराः शरण्याः सौमित्रे तिर्यग्योनिगतेष्वपि २४
सीताहरणजं दुःखं न मे सौम्य तथागतम् ।
यथा विनाशो गृध्रस्य मत्कृते च परन्तप २५
राजा दशरथः श्रीमान्यथा मम महायशाः ।
पूजनीयश्च मान्यश्च तथाऽयं पतगेश्वरः २६

पक्ष्याला शेवटीं येथेंच मरण आलें. ( १५–२० )

पुष्कळ वर्षांचा म्हणजे चिरजीवी असलेला हा पक्षी ज्याअर्थी आज मरून पडला आहे त्याअर्थी काळाचें अतिक्रमण दुर्घट आहे ( हीच गोष्ट खरी ). हे लक्ष्मणा ! पहा माझ्यावर उपकार करणारा हा गृध्रपक्षी सीतेची मुक्तता करण्याकरितां प्रवृत्त झाला असतां बलाढ्य रावणाच्या हातून त्याचा वध झाला. आपले वाडवडिलांपासून चालत आलेल्या गृध्रराज्याचा त्याग करून ह्या पक्षिराजानें माझ्याकरितां प्राण सोडिला. हे लक्ष्मणा ! शूर व शरण जाण्यास योग्य असे धर्मानें वागणारे साधुजन खरोखर सर्वत्र म्हणजे तिर्यग्योनि प्राप्त झालेल्या प्राण्यांतही दृष्टोत्पत्तीस येतात. हे विनयसंपन्न शत्रुतापना लक्ष्मणा ! माझ्याकरितां गृध्रपक्ष्याचा नाश झाला, ह्याबद्दल जसा माझ्या मनाला चटका लागून राहिला आहे तसा सीतेचा अपहार झाल्यामुळें होणाऱ्या दुःखाचा चटका लागून राहिलेला नाहीं. वैभवशाली महाकीर्तिमान् दशरथ राजा जसा मला पूज्य व मान्य होता तसाच हा पक्षिराज मला पूज्य व मान्य आहे. ( २१–२६ )

सौमित्रे हर काष्ठानि निर्मथिष्यामि पावकम् ।
गृध्रराजं दिधक्षामि मत्कृते निधनं गतम् ॥ २७
नाथं पतगलोकस्य चितामारोपयाम्यहम् ।
इमं धक्ष्यामि सौमित्रे हतं रौद्रेण रक्षसा ॥ २८
या गतिर्यज्ञशीलानामाहिताग्नेश्च या गतिः ।
अपरावर्तिनां या च या च भूमिप्रदायिनाम् ॥ २९
मया त्वं समनुज्ञातो गच्छ लोकाननुत्तमान् ।
गृध्रराज महासत्त्व संस्कृतश्च मया व्रज ॥ ३०
एवमुक्त्वा चितां दीप्तामारोप्य पतगेश्वरम् ।
ददाह रामो धर्मात्मा स्वबन्धुमिव दुःखितः ॥ ३१
रामोऽथ सह सौमित्रिर्वनं गत्वा स वीर्यवान् ।
स्थूलान्हत्वा महारोहीननु तस्तार तं द्विजम् ॥ ३२
रोहिमांसानि चोद्धृत्य पेशीकृत्वा महायशाः ।
शकुनाय ददौ रामो रम्ये हरितशाद्वले ॥ ३३

---

म्हणून हे लक्ष्मणा ! काष्ठें घेऊन ये म्हणजे मी मथन करून अग्नि काढीन आणि माझ्याकरितां प्राणाला मुकलेल्या ह्या पक्षिराजाचें दहन करीन हे लक्ष्मणा ! क्रूर राक्षसानें वध केलेल्या ह्या पक्षिगणाच्या राजाला मी चितेवर ठेवून दहन करीन हे महाशय गृध्रराजा ! माझ्या हातून तुझा और्ध्वदेहिक संस्कार होत असल्यामुळें यज्ञशील, अग्निहोत्री, युद्धापासून परावृत्त न होणारे आणि भूमिदान करणारे ह्यांची गति तुला क्रमाक्रमानें प्राप्त झाल्यावर माझ्या अनुज्ञेनें तुला सर्वोत्कृष्ट असे क्रममुक्तिदायक लोक प्राप्त होतील (२७-३०)

असें बोलून रामानें त्या पक्षिराजाला प्रदीप्त चितेवर ठेविलें आणि दुःखाकुल होऊन त्या धर्मात्म्यानें स्वतःचा बांधवच की काय असें समजून त्याचें दहन केलें नंतर लक्ष्मणाला बरोबर घेऊन वनामध्यें गेल्या त्या वीर्यवान् रामानें मोठे मोठे स्थूल मृग मारून आणिले आणि तदनंतर त्या पक्ष्याला उद्देशून पिंडदान करण्याकरितां त्यानें भूमीवर तृण पसरिलें मृगमांस बाहेर काढून व त्याचे पिंड करून महाकीर्तिमान् रामानें रम्य अशा त्या हिरव्या तृणावर पक्ष्याला अर्पण केले आणि

यत्तत्प्रेतस्य मर्त्यस्य कथयन्ति द्विजातयः।
तत्स्वर्गगमनं क्षिप्रं तस्य रामो जजाप ह ३४
ततो गोदावरीं गत्वा नदीं नरवरात्मजौ।
उदकं चक्रतुस्तस्मै गृध्रराजाय तावुभौ ३५
शास्त्रदृष्टेन विधिना जलं गृध्राय राघवौ।
स्नात्वा तौ गृध्रराजाय उदकं चक्रतुस्तदा ३६
स गृध्रराजः कृतवानयशस्करं सुदुष्करं कर्म रणे निपातितः।
महर्षिकल्पेन च संस्कृतस्तदा जगाम पुण्यां गतिमात्मनः शुभाम् ३७
कृतोदकौ तावपि पक्षिसत्तमे स्थिरां च बुद्धिं प्रणिधाय जग्मतुः।
प्रवेश्य सीताधिगमे ततो मनो वनं सुरेन्द्राविव विष्णुवासवौ ३८
इत्यार्षे श्रीमद्रा.वाल्मी.आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकोनसप्ततितमः सर्गः॥६९ [२२३६]

---

झालेल्या मनुष्याला स्वर्गप्राप्ति व्हावी त्या उद्देशानें जे मंत्र ब्राह्मण म्हणत असतात त्या स्वर्गप्रापक मंत्रांचा रामानें सत्वर जप केला. इतकें झाल्यावर ते उभयतां राजपुत्र गोदावरी नदीचे तीरीं गेले आणि त्यांनीं त्या गृध्रराजाचें तर्पण केलें. ( ३१-३५ )

सारांश, शास्त्रोक्तविधीचें अवलंबन करून जलाचा आश्रय केल्यावर ते उभयतां रघुवंशजांनीं त्या गृध्राच्या उद्देशानें स्नान केलें आणि नंतर त्यांनीं त्या गृध्रराजाला जलांजलि दिली. असो. कीर्ति वृद्धिंगत करणारें असें अत्यंत दुष्कर कर्म करून संग्रामांत वध पावलेल्या त्या गृध्रराजाचा महर्षितुल्य रामानें और्ध्वदेहिक संस्कार केल्यामुळें त्याला केवल पुण्यानेंच प्राप्त होणारी व सुखस्वरूपच असलेली अशी आत्मगति प्राप्त झाली व इकडे उत्तरक्रियेसंबंधीं उदककर्म आटोपल्यावर त्या श्रेष्ठ पक्ष्याविषयीं आपली पूज्यबुद्धि अचल कायम ठेवून आणि पुनरपि सीतेच्या प्राप्तीकडे आपलें मन लावून देवाधिपति विष्णु व इंद्रच कीं काय असे ते रामलक्ष्मण वनामध्यें प्रविष्ट झाले. ( ३६-३८ )

याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडांतील एकूणसत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ६९ ॥

सप्ततितमः सर्गः ।

कृत्वैवमुदकं तस्मै प्रस्थितौ राघवौ तदा ।
अवेक्षन्तौ वने सीतां जग्मतुः पश्चिमां दिशम् १
तां दिशं दक्षिणां गत्वा शरचापासिधारिणौ ।
अविप्रहतमैक्ष्वाकौ पन्थानं प्रतिपेदतुः २
गुल्मैर्वृक्षैश्च बहुभिर्लताभिश्च प्रवेष्टितम् ।
आवृतं सर्वतो दुर्गं गहनं घोरदर्शनम् ३
व्यतिक्रम्य तु वेगेन गृहीत्वा दक्षिणां दिशम् ।
सुभीमं तन्महारण्यं व्यतियातौ महाबलौ ४
ततः परं जनस्थानात्त्रिक्रोशं गम्य राघवौ ।
क्रौञ्चारण्यं विविशतुर्गहनं तौ महौजसौ ५
नानामेघघनप्रख्यं प्रहृष्टमिव सर्वतः ।
नानावर्णैः शुभैः पुष्पैर्मृगपक्षिगणैर्युतम् ६
दिदृक्षमाणौ वैदेहीं तद्वनं तौ विचिक्यतुः ।

याप्रमाणें त्या जटायूला जलांजलि दिल्यावर तेथून वनामध्यें निघालेले ते रघुवंशज रामलक्ष्मण सीतेला शोधण्याकरितां पश्चिमदिशेकडे चालते झाले, आणि नंतर जरा दक्षिण दिशेकडे वळल्यावर धनुर्बाण व खड्ग धारण केलेले ते इक्ष्वाकुवंशज रामलक्ष्मण संचाररहित अशा मार्गाला लागले झुडुपें वृक्ष आणि नानाप्रकारच्या लता यांनीं परिवेष्टित असलेला तो वनरूप मार्ग सर्व बाजूंनीं आच्छादित, जाण्यास कठीण व दिसण्यांतही भयंकर होता. तथापि, दक्षिणदिशेचें अवलंबन करून वेगावेगानें ते त्या मार्गांतून पार पडले आणि नंतर ते महाबलाढ्य रामलक्ष्मण अतिशयच भयंकर अशा त्या महारण्यामध्यें प्रविष्ट झाले तदनंतर जनस्थानापासून तीन कोस गेल्यावर ते महासामर्थ्यवान् रघुवंशज रामलक्ष्मण क्रौंचारण्य नावाच्या गहन वनामध्यें प्रविष्ट झाले. ( १-५ )

अनेक मेघाच्या समुदायाप्रमाणें श्यामवर्ण असलेलें तें वन अनेक वर्णांच्या शुभ पुष्पांनीं व पशुपक्ष्यांच्या समुदायांनीं युक्त असल्यामुळें सर्व बाजूंनीं आनंदित झाल्यासारखें दिसत होतें. असो. सीतेचा अपहार झाल्यामुळें दुःखित झालेले ते

तत्र तत्रावतिष्ठन्तौ सीताहरणदुःखितौ ७
ततः पूर्वेण तौ गत्वा त्रिक्रोशं भ्रातरौ तदा।
क्रौञ्चारण्यमतिक्रम्य मतङ्गाश्रममन्तरे ८
दृष्ट्वा तु तद्वनं घोरं बहुभीममृगद्विजम्।
नानावृक्षसमाकीर्णं सर्वं गहनपादपम् ९
ददृशाते गिरौ तत्र दरीं दशरथात्मजौ।
पातालसमगम्भीरां तमसा नित्यसंवृताम् १०
आसाद्य च नरव्याघ्रौ दर्यास्तस्या विदूरतः।
ददर्शतुर्महारूपां राक्षसीं विकृताननाम् ११
भयदामल्पसत्त्वानां बीभत्सां रौद्रदर्शनाम्।
लम्बोदरीं तीक्ष्णदंष्ट्रां करालीं परुषत्वचम् १२
भक्षयन्तीं मृगान्भीमान्विकटां मुक्तमूर्धजाम्।
अवैक्षतां तु तौ तत्र भ्रातरौ रामलक्ष्मणौ १३

रामलक्ष्मण सीतेला शोधण्याचा उद्देश मनामध्यें धरून जागोजाग थांबले आणि त्यानीं तें वन धुंडून काढिलें तदनंतर त्या क्रौंचारण्यनावाच्या वनातून निघाल्यावर पूर्वदिशेकडे ते तीन कोस गेले असता मार्गामध्यें मतंगमुनींचा आश्रम त्यानीं पाहिले आणि भयंकर अशा असंख्य पशुपक्ष्यांनीं युक्त, नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त व गहन वृक्षांनीं गजबजलेलें असें तें घोर मतंगाश्रमवन अवलोकन केल्यावर त्या दशरथपुत्रांनीं पातालाप्रमाणें खोल व अंधकारानें नेहमीं व्याप्त असलेली एक दरी त्या पर्वतावर पाहिली। (९–१०)

व त्या दरीच्या शेजारींच ते पुरुषश्रेष्ठ बसले असता अक्राळविक्राळ मुखानें युक्त असलेली एक फारच मोठी राक्षसी त्यांच्या दृष्टीस पडली ती निंद्य कर्म करणारी राक्षसी दिसण्यातही भयंकर असून अशक्तप्राण्यांना भयप्रद होती. तिचें उदर लांब होतें, दाढा तीक्ष्ण होत्या, शरीर उन्नत होतें, त्वचा कठिण होती, आकार फारच स्थूल होता, केंस मोकळे सोडिलेले होते आणि भयंकर मृगनाही ती भक्षण करीत होती. अशा प्रकारची ती राक्षसी त्या भ्रात्या राम लक्ष्मणांनीं अवलोकन केल्यावर ती त्या वीरांचे समीप आली आणि भ्रात्यांचे अग्रभागीं

सा समासाद्य तौ वीरौ व्रजन्तं भ्रातुरग्रतः ।
एहि रंस्यावहेत्युक्त्वा समालम्भत लक्ष्मणम् । १४
उवाच चैनं वचनं सौमित्रिमुपगुह्य च ।
अहं त्वयोमुखी नाम लाभस्ते त्वमसि प्रियः १५
नाथ पर्वतदुर्गेषु नदीनां पुलिनेषु च ।
आयुश्चिरमिदं वीर त्वं मया सह रंस्यसे १६
एवमुक्तस्तु कुपितः खड्गमुद्धृत्य लक्ष्मणः ।
कर्णनासस्तनं तस्या निचकर्तारिसूदनः १७
कर्णनासे निकृत्ते तु विस्वरं विननाद सा ।
यथागतं प्रदुद्राव राक्षसी घोरदर्शना १८
तस्यां गतायां गहनं व्रजन्तौ वनमोजसा ।
आसेदतुरमित्रघ्नौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ १९
लक्ष्मणस्तु महातेजाः सत्त्ववाञ्छीलवाञ्छुचिः ।
अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं भ्रातरं दीप्ततेजसम् २०

---

संचार करीत असलेल्या लक्ष्मणाला " ये, आपण रममाण होऊं " असें ह्मणून तिनें त्याला आलिंगन दिलें. इतकेंच नव्हे; परंतु, लक्ष्मणाला मिठी मारिल्यावर ती त्याला ह्मणाली " माझें नाव अयोमुखी असून मी तुला लाभरूपच आहें आणि तूं माझा प्रिय भर्ता आहेस. ( ११-१५ )

ह्यास्तव, हे नाथा, हे वीरा, पर्वतसंबंधीं दुर्गम प्रदेश व नद्यांचीं वाळवंटें ह्या ठिकाणीं माझ्यासहवर्तमान तूं चिरकाल रममाण हो. " ह्याप्रमाणें तिनें सांगितलें असता लक्ष्मण क्रुद्ध झाला आणि त्या शत्रुनाशकानें तरवार उपसून तिचे कान, नाक व स्तन कापून काढिले तेव्हां कान व नाक तुटल्यावर तिनें भयंकर गर्जना केली आणि दिसण्यातही भयंकर असलेली ती राक्षसी आल्या मार्गानें पळून गेली ती गेल्यावर शत्रूंचा वध करणारे ते भ्राते रामलक्ष्मण जोरानें चालता चालता एका गहन वनामध्यें आले. तेव्हां सत्यनिष्ठ, सुशील, शुचि व महातेजस्वी लक्ष्मण हात जोडून उज्ज्वल कांतीनें युक्त असलेल्या भ्रात्याला म्हणाला. ( १६-२० )

स्पन्दने मे दृढं बाहुरुद्विग्नमिव मे मनः।
प्रायशश्चाप्यनिष्टानि निमित्तान्युपलक्षये २१
तस्मात्सज्जीभवार्य त्वं कुरुष्व वचनं मम।
ममैव हि निमित्तानि सद्यः शंसन्ति संभ्रमम् २२
एष वञ्चुलको नाम पक्षी परमदारुणः।
आवयोर्विजयं युद्धे शंसन्निव विनर्दति २३
तयोरन्वेषतोरेव सर्वं तद्वनमोजसा।
संजज्ञे विपुलः शब्दः प्रभञ्जन्निव तद्वनम् २४
संवेष्टितमिवात्यर्थं गहनं मातरिश्वना।
वनस्य तस्य शब्दोऽभूद्वनमापूरयन्निव २५
तं शब्दं काङ्क्षमाणस्तु रामः खड्गी सहानुजः।
ददर्श सुमहाकायं राक्षसं विपुलोरसम् २६
आसेदतुश्च तद्रक्षस्तावुभौ प्रमुखे स्थितम्।

" माझा ( वाम ) बाहु अतिशयच स्फुरण पावत असून माझें मनही उद्विग्न झाल्यासारिखें झालें आहे व ह्याप्रमाणें प्राय. भयसूचक चिन्हेंच माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहत. म्हणून, हे आर्य तूं सज्ज हो; माझें ऐक. कारण, हीं चिन्हें मला आताच भय प्राप्त होईल असें सुचवीत आहेत, आणि हा महाभयंकर वंचुलक नावाचा पक्षी युद्धामध्यें आपला विजय होईल असें सुचवीत सुचवीत गर्जना करीत आहे. " असो. ह्याप्रमाणें स्वसामर्थ्यानें तें सर्व वन शोधीत असतांना तें वन मोडूनच टाकीत आहे कीं काय असा एक मोठा ध्वनि उत्पन्न झाला. सारांश, वायूनें तें वन अतिशय व्याप्त झाल्यासारिखें झाल्यामुळें सर्व वन दणाणून टाकणारा असा शब्द त्या वनामध्येंच उत्पन्न झाला. ( २१-२५ )

तेव्हा तो शब्द होण्याचें कारण काय म्हणून राम हातामध्यें तरवार घेऊन आपल्या कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान विचार करूं लागला असता विशाल वक्षस्थलानें युक्त असा एक अतिप्रचंड राक्षस त्यानीं अवलोकन केला व संमुखच उभा राहिलेल्या त्या राक्षसाकडे ते उभयता गेले. त्याचें शरीर फारच वाढलेलें होतें. मुख उदरामध्येंच असल्यामुळें मस्तक व कंठ ह्यानीं रहित असलेला तो राक्षस

विवृद्धमशिरोग्रीवं कबन्धमुदरे मुखम् २७
रोमभिर्निशितैस्तीक्ष्णैर्महागिरिमिवोच्छ्रितम् ।
नीलमेघनिभं रौद्रं मेघस्तनितनिःस्वनम् २८
अग्निज्वालानिकाशेन ललाटस्थेन दीप्यता ।
महापक्ष्मेण पिङ्गेन विपुलेनायतेन च २९
एकेनोरसि घोरेण नयनेन सुदर्शिना ।
महादंष्ट्रोपपन्नं तं लेलिहानं महामुखम् ३०
भक्षयन्तं महाघोरानृक्षसिंहमृगद्विजान् ।
घोरौ भुजौ विकुर्वाणमुभौ योजनमायतौ ३१
कराभ्यां विविधान्गृह्य ऋक्षान्पक्षिगणान्मृगान् ।
आकर्षन्तं विकर्षन्तमनेकान्मृगयूथपान् ३२
स्थितमावृत्य पन्थानं तयोर्भ्रात्रोः प्रपन्नयोः ।

---

कबंध हा नावाला अगदीं योग्य झालेला होता; निशित म्हणजे तीक्ष्ण रोमांनीं युक्त असलेला तो राक्षस उन्नत अशा महापर्वताप्रमाणें दिसत होता, त्या भयंकर राक्षसाची कांति नीलवर्ण मेघाप्रमाणें असून त्याचा ध्वनीही मेघगर्जनेप्रमाणेंच होता. त्याच्या कपाळावर अग्नीच्या ज्वालेप्रमाणें एक देदीप्यमान डोळा होता, त्याच्या पापण्या फारच मोठ्या होत्या, त्याचा वर्ण पिंगट होता, तो विशाल व दीर्घ होता, त्याची दृष्टि उत्तम होती आणि तो एक भयंकर डोळा उरःप्रदेशाचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत होता. अशा प्रकारचा डोळा व मोठमोठ्या दाढा ह्यांनीं युक्त असलेलें आपलें प्रचंड मुख तो राक्षस चाटीत होता. ( २६-३० )

*महाभयंकर अस्वलें, सिंह, मृग व पक्षी भक्षण करीत होता,* एकेक योजन ( म्हणजे चार चार कोस ) लांब असलेले आपले दोन्ही भयंकर हात तो इकडे तिकडे हालवीत होता, नानाप्रकारचे पक्षिगण, अस्वलें व मृग हातांनीं धरून तो आपल्याकडे ओढीत होता, आपल्या कळपाचें रक्षण करणारे असे अनेक मृग आपल्यापासून परीकडेही ओढून टाकीत होता आणि मार्गानें जात असलेल्या त्या उभयतां भ्रात्यांचा मार्ग व्याप्त करून तो उभा राहिला होता. तेव्हां त्याच्या मिठीमध्यें न सापडतां ते रामलक्ष्मण दूर जाऊन उभे राहिले

अथ तं समतिक्रम्य क्रोशमात्रं ददर्शतुः ३३
महान्तं दारुणं भीमं कबन्धं भुजसंवृतम् ।
कबन्धमिव संस्थानादतिघोरप्रदर्शनम् ३४
स महाबाहुरत्यर्थं प्रसार्य विपुलौ भुजौ ।
जग्राह सहितावेव राघवौ पीडयन्बलात् ३५
खड्गिनौ दृढधन्वानौ तिग्मतेजौ महाभुजौ ।
भ्रातरौ विवशं प्राप्तौ कृष्यमाणौ महाबलौ ३६
तत्र धैर्याच्च शूरस्तु राघवो नैव विव्यथे ।
बाल्यादनाश्रयाच्चैव लक्ष्मणस्त्वभिविव्यथे ३७
उवाच च विषण्णः सन्राघवं राघवानुजः ।
पश्य मां विवशं वीर राक्षसस्य वशंगतम् ३८
मयैकेन तु निर्युक्तः परिमुञ्चस्व राघव ।
मां हि भूतबलिं दत्त्वा पलायस्व यथासुखम् ३९

असता शरीराने तो राक्षस एक कोसपर्यंत असल्यावर त्यानीं अवलोकन केलें. धिप्पाड, क्रूर, भयंकर बाहूंच्या योगानें प्राण्याना घेरणारा आणि दिसण्यातही अतिशयच भयंकर असलेला तो कबंध राक्षस ( मस्तक उदरात असल्यामुळें ) आकृतीनेंही कबंधच होता, दीर्घ हातानीं युक्त असलेल्या त्या कबंध राक्षसानें रघुवंशज रामलक्ष्मणाना आवळून टाकण्याच्या उद्देशानें आपले दीर्घ हात लांब करून एकदम धरिलें ( ३१–३५ )

व ते रामलक्ष्मण जरी महाधनुर्धारी, प्रचंड तेजस्वी, महापराक्रमी, महाबलाढ्य व हातात तरवारी घेतलेले असे होते तथापि तो राक्षस त्याना ओढूं लागला असता ते निरुपाय होऊन त्याच्या मिठींत सापडलेच. त्या उभयतापैकीं रघुवंशज शूर राम धैर्यामुळें भयभीत झाला नाहीं, परन्तु, लक्ष्मण बालबुद्धीमुळें आणि धैर्याचा आधार नसल्यामुळें भयभीत झाला. इतकेंच नव्हे, परंतु, रामाच्या मागून जन्मास आलेला तो लक्ष्मण खिन्न होऊन रामास म्हणाला " हे वीरा! निरुपाय होऊन राक्षसाच्या ताब्यांत सापडलेल्या मला अवलोकन कर. मज एकट्याची राक्षसाच्या बलिद्रव्यानीं योजना करून तूं आपली सुटका करून घे सारांश, हे रामा! राक्षसाला माझा बलि देऊन तूं आपला खुशाल पळून जा, म्हणजे तुला

अधिगन्तासि वैदेहीमचिरेणेति मे मतिः।
प्रतिलभ्य च काकुत्स्थ पितृपैतामहीं महीम् ४०
तत्र मां राम राज्यस्थः स्मर्तुमर्हसि सर्वदा।
लक्ष्मणेनैवमुक्तस्तु रामः सौमित्रिमब्रवीत् ४१
मा स्म त्रासं वृथा वीर न हि त्वादृग्विषीदति।
एतस्मिन्नन्तरे क्रूरो भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४२
तावुवाच महाबाहुः घननिर्घोषः कबन्धो दानवोत्तमः।
कौ युवां वृषभस्कन्धौ महाखड्गधनुर्धरौ ४३
घोरं देशमिमं प्राप्तौ दैवेन मम चाक्षुषौ।
वदतं कार्यमिह वां किमर्थं चागतौ युवाम् ४४
इमं देशमनुप्राप्तौ क्षुधार्तस्येह तिष्ठतः।
सबाणचापखड्गौ च तीक्ष्णशृङ्गाविवर्षभौ ४५
मां तूर्णमनुसंप्राप्तौ दुर्लभं जीवितं हि वाम्।

---

विदेहराजकन्या लवकरच प्राप्त होईल असें मला वाटतें. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा! वाडवडिलापासून चालत आलेली पृथ्वी प्राप्त होऊन तूं राज्यावर बसलास म्हणजे नेहमीं माझी आठवण करीत जा." (३६-४०)

लक्ष्मणानें ह्याप्रमाणें सांगितलें असता राम त्याला म्हणाला, "हे वीरा, तूं भिऊं नको, तुझ्यासारिखा पुरुष धैर्य सोडीत नाहीं," हें उभयतांचें बोलणें चाललें आहे तोंच तो क्रूर व दीर्घ बाहूनीं युक्त असलेला राक्षसश्रेष्ठ कबंध त्या भ्रात्या रामलक्ष्मणाना म्हणाला "बैलासारिखे ज्याचे खांदे आहेत व मोठमोठे खड्ग व धनुष्य ज्यानीं धारण केलीं आहेत असे तुह्मी कोण, सुदैवानें ह्या घोर प्रदेशामध्यें येऊन मला दृग्गोचर झाला आहात? तुमचें येथें काय काम आहे व तुह्मी येथें कशाकरिता आला आहात हें मला सांगा (४०-४४)

अरे, बाण, धनुष्य व खड्ग धारण केल्यामुळें तीक्ष्ण शृंगानीं युक्त असलेल्या बैलाप्रमाणें दिसत असलेले तुह्मी, क्षुधेनें व्याकुळ होऊन येथें असलेल्या माझ्या ह्या प्रदेशावर, प्राप्त झाला असून, लगच माझ्या समीपही आला आहात ह्यामुळें तुमचें जीवित दुर्लभ आहे" हें त्या दुरात्म्या कबंध राक्षसाचें भाषण श्रवण

तस्य तद्वचनं श्रुत्वा कबन्धस्य दुरात्मनः 46
उवाच लक्ष्मणं रामो मुखेन परिशुष्यता ।
कृच्छ्रात्कृच्छ्रतरं प्राप्य दारुणं सत्यविक्रम 47
व्यसनं जीवितान्ताय प्राप्तमप्राप्य तां प्रियाम् ।
कालस्य सुमहद्वीर्यं सर्वभूतेषु लक्ष्मण 48
त्वां च मां च नरव्याघ्र व्यसनैः पश्य मोहितौ ।
नातिभारोऽस्ति दैवस्य सर्वभूतेषु लक्ष्मण 49
शूराश्च बलवन्तश्च कृतास्त्राश्च रणाजिरे ।
कालाभिपन्नाः सीदन्ति यथा वालुकसेतवः 50
इति ब्रुवाणो दृढसत्यविक्रमो महायशा दाशरथिः प्रतापवान् ।
अवेक्ष्य सौमित्रिमुदग्रविक्रमः स्थिरां तदा स्वां मतिमात्मनाकरोत् 51
इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकांडे सप्ततितमः सर्गः ॥७०॥ [२२८७]

करून, रामाच्या तोंडचें पाणी पळून तो लक्ष्मणाला म्हणाला " हे अमोघ पराक्रमी लक्ष्मणा ! अत्यंत दुःसह असें राज्यभ्रंशरूप भयंकर दुःख प्राप्त झालें असूनही ( न डगमगता आजपर्यंत कायम राहिलेल्या ) आपणांला आज ती प्रिया प्राप्त न होताच जीविताचा अंत होईल अशा प्रकारचें हें संकट प्राप्त झालें आहे. म्हणून, हे लक्ष्मणा ! सर्व प्राण्यांचे ठिकाणीं कालाचें अति मोठें सामर्थ्य दृष्टोत्पत्तीस येतच असतें. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा ! पहा तूं व मी असे दोघेही संकटांनीं गांगरून गेलों आहोंत ह्यावरून कोणीही प्राणी असला तरी त्याच ठिकाणीं पराक्रम गाजविण्यास दैवाला मुळींच जड जात नाहीं. कारण, शूर, बलाढ्य व अस्त्रनिपुण असेही लोक वेळ आली म्हणजे वाळूच्या बंधाऱ्याप्रमाणें समरांगणामध्यें नाश पावतात. ४५-५० )

ह्याप्रमाणें बोलणाऱ्या त्या महाकीर्तिमान्, प्रतापी आणि प्रचंड व अमोघ पराक्रम करणाऱ्या दशरथपुत्र रामानें सुमित्रानंदन लक्ष्मणाकडे पाहिलें आणि स्वतः त्या महापराक्रमी रामानें आपलें मन मुळींच खिन्न होऊं न देता अचल केलें. ( ५१ )

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण नांवाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडांपैकीं सत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥७०॥

एकसप्ततितमः सर्गः।

तौ तु तत्र स्थितौ दृष्ट्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ।
बाहुपाशपरिक्षिप्तौ कबन्धो वाक्यमब्रवीत् १
तिष्ठतः किं नु मां दृष्ट्वा क्षुधार्तं क्षत्रियर्षभौ।
आहारार्थं तु संदिष्टौ दैवेन गतचेतनौ २
तच्छ्रुत्वा लक्ष्मणो वाक्यं प्राप्तकालं हितं तदा।
उवाचार्तिसमापन्नो विक्रमे कृतनिश्चयः ३
*त्वां च मां च पुरा तूर्णमादत्ते राक्षसाधमः।*
तस्मादसिभ्यामस्याशु बाहू छिन्दावहे गुरू ४
भीषणोऽयं महाकायो राक्षसो भुजविक्रमः।
लोकं ह्यतिजितं कृत्वा ह्यावां हन्तुमिहेच्छति ५
निश्चेष्टानां वधो राजन्कुत्सितो जगतीपतेः।
क्रतुमध्योपनीतानां पशूनामिव राघव ६
एतत्संजल्पितं श्रुत्वा तयोः क्रुद्धस्तु राक्षसः।

---

बाहुपाशानें घेरले गेलेले ते रामलक्ष्मण तसेंच तेथें उभे आहेत असें अवलोकन करून कबंध राक्षस त्यांना ह्मणाला, "हे क्षत्रियश्रेष्ठहो, क्षुधेनें व्याकुल झालेल्या मला अवलोकन करूनही तुम्ही स्वस्थ कसले उभे रहता अहा? अरे, अक्कल गुंग झालेल्या तुमची नेमणूक दैवानें माझ्या आहाराकडे केलेली आहे." प्रथमतः भयभीत झालेल्या लक्ष्मणानें तें राक्षसाचें भाषण श्रवण करिताक्षणीं पराक्रमाविषयीं निश्चय केला आणि समयाला योग्य व हितावह असें भाषण तो रामाशीं करूं लागला, (तो ह्मणाला) "हा राक्षसाधम आधीं तुला व मला सत्वर आवळून टाकील. म्हणून तरवारींनीं आपण ह्याचे मोठमोठे हात तोडून टाकूं. (१-४)

शरिरानें धिप्पाड, हातांनीं पराक्रम करणारा आणि भयंकर असा हा राक्षस सर्व पृथ्वीचा पराजय करून ह्या ठिकाणीं आपलाही वध करण्याची इच्छा करीत आहे; परंतु, हे रघुकुलोत्पन्ना राजा! यज्ञामध्यें आणिलेल्या निश्चेष्ट पशूप्रमाणें क्षत्रियाचा वध हालचाल न करितां होणें निंद्य आहे. हें त्याचें संभाषण श्रवण करून तो राक्षस क्रुद्ध झाला आणि आपला भयंकर जबडा पसरून त्यांना भक्षण

विदार्यास्यं ततो रौद्रं तौ भक्षयितुमारभत् ७
ततस्तौ देशकालज्ञौ खड्गाभ्यामेव राघवौ ।
अच्छिन्दन्तां सुसंहृष्टौ बाहू तस्यांसदेशयोः ८
दक्षिणो दक्षिणं बाहुमसक्तमसिना ततः ।
चिच्छेद रामो वेगेन सव्यं वीरस्तु लक्ष्मणः ९
स पपात महाबाहुश्छिन्नबाहुर्महास्वनः ।
खं च गां च दिशश्चैव नादयञ्जलदो यथा १०
स निकृत्तौ भुजौ दृष्ट्वा शोणितौघपरिप्लुतः ।
दीनः पप्रच्छ तौ वीरौ कौ युवामिति दानवः ११
इति तस्य ब्रुवाणस्य लक्ष्मणः शुभलक्षणः ।
शशंस तस्य काकुत्स्थं कबन्धस्य महाबलः १२
अयमिक्ष्वाकुदायादो रामो नाम जनैः श्रुतः ।
तस्यैवावरजं विद्धि भ्रातरं मां च लक्ष्मणम् १३

---

करण्यास प्रवृत्त झाला, तेव्हां देश व काल जाणणारे ते उभयतां रघुवंशज रामलक्ष्मण अतिशय आनंदित झाले, आणि तरवारींनींच त्यांनीं त्याचे दोन्ही हात खांद्यापाशीं तोडून टाकिले. समर्थ रामानें त्याचा लुला पडलेला उजवा हात तरवारीच्या योगानें झटपट तोडून टाकिला आणि वीर लक्ष्मणानें डावा हात उतरून टाकिला. ( ५-९ )

तेव्हा मोठी गर्जना करणारा व पूर्वी दीर्घ हातांनीं युक्त असलेला तो कबंध हात तुटल्यामुळें मेघाप्रमाणें आकाश, पृथ्वी व दिशा नादित करीत करीत खालीं पडला, आणि रक्तप्रवाहानें भरून गेलेला तो दीन कबंध राक्षस आपले हात तुटलेले पाहतांक्षणींच " तुम्ही कोण " म्हणून त्या वीरांना विचारूं लागला. याप्रमाणें तो विचारीत असतांना शुभ लक्षणानीं युक्त असलेल्या महाबलाढ्य लक्ष्मणानें त्या कबंधाला ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची हकीकत प्रथम निवेदन केली. ( तो म्हणाला ) " हा इक्ष्वाकूचा वारस आहे व राम म्हणून लोकांना विदित आहे. त्याचाच कनिष्ठ भ्राता लक्ष्मण मी आहें असें तूं समज. सापत्न मातेनें राज्य हाणून पाडून

मात्रा प्रतिहते राज्ये रामः प्रव्राजितो वनम्।
मया सह चरत्येष भार्यया च महद्वनम् १४
अस्य देवप्रभावस्य वसतो विजने वने।
राक्षसापहृता भार्या यामिच्छन्ताविहागतौ १५
त्वं तु को वा किमर्थं वा कबन्धसदृशो वने।
आस्येनोरसि दीप्तेन भग्नजङ्घो विचेष्टसे १६
एवमुक्तः कबन्धस्तु लक्ष्मणेनोत्तरं वचः।
उवाच वचनं प्रीतस्तदिन्द्रवचनं स्मरन् १७
स्वागतं वां नरव्याघ्रौ दिष्ट्या पश्यामि वामहम्।
दिष्ट्या चेमौ निकृत्तौ मे युवाभ्यां बाहुबन्धनौ १८
विरूपं यच्च मे रूप प्राप्तं ह्यविनयाद्यथा।
तन्मे शृणु नरव्याघ्र तत्त्वतः शंसतस्तव १९

इत्यार्षे श्रीमद्रा०वाल्मी०आदिकाव्येऽरण्यकाण्डे एकसप्ततितमः सर्ग.७१॥[२३०६]

रामाला वनामध्यें पाठविलें आणि तेव्हापासून हा आपल्या भार्येसहवर्तमान व माझ्यासहवर्तमान महावनामध्यें संचार करीत आहे हा देवतुल्य पराक्रमी राम निर्जन वनामध्यें वास्तव्य करीत असताना राक्षसानें त्याची भार्या हरण करून नेली आहे व तिचा शोध लावण्याकरितां आम्ही येथें आलों आहोंत (११-१५)
आतां कबंधासारिखा असलेला तू कोण आणि वक्षस्थलाचे ठिकाणीं दृश्य असलेल्या मुखानें युक्त व पोटऱ्यांमध्यें मोडलेला असा तू आज कशाकरितां वनामध्यें तडफड करीत उभा राहिला आहेस ( हें सांग ). ह्याप्रमाणें लक्ष्मणानें विचारिलें असतां कबंध संतुष्ट झाला आणि त्या इंद्राच्या वचनाचें स्मरण होऊन त्याला उत्तर देऊं लागला कीं, "हे पुरुषश्रेष्ठहो, तुमचें स्वागत असो. आज सुदैवानें तुमचें मला दर्शन झालें आणि तुम्ही हे माझे बाहुरूप पाश तोडून टाकिलेत हीही मोठी भाग्याची गोष्ट आहे. आतां, हे पुरुषश्रेष्ठ, मला उद्धट-पणामुळें क्रूर देह कसा प्राप्त झाला तें मी तुला सांगतों; तूं श्रवण कर (१६-१९)
ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडांतील एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ७१ ॥

द्विसप्ततितमः सर्गः ।

पुरा राम महाबाहो महाबलपराक्रमम् ।
रूपमासीन्ममाचिन्त्यं त्रिषु लोकेषु विश्रुत म् ।
यथा सूर्यस्य सोमस्य शक्रस्य च यथा वपुः १
सोऽहं रूपमिदं कृत्वा लोकवित्रासनं महत् ।
ऋषीन्वनगताग्राम त्रासयामि ततस्ततः २
ततः स्थूलशिरा नाम महर्षिः कोपितो मया ।
स चिन्वन्विविधं वन्यं रूपेणानेन धर्षितः ३
तेनाहमुक्तः प्रेक्ष्यैवं घोरशापाभिधायिना ।
एतदेवं नृशंसं ते रूपमस्तु विगर्हितम् ४
स मया याजितः क्रुद्धः शापस्यान्तो भवेदिति ।
अभिशापकृतस्येति तेनेदं भाषितं वचः ५
यदा छित्वा भुजौ रामस्त्वां दहेद्विजने वने ।
तदा त्वं प्राप्स्यसे रूपं स्वमेव विपुलं शुभम् ६

हे महापराक्रमी रामा, प्रचंड बल व पराक्रम ह्यांनीं युक्त असून त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध व सूर्य, चंद्र आणि इंद्र ह्यांच्या शरीराप्रमाणें दिव्य असें अचिंत्य रूप पूर्वी माझें होतें; परंतु मी हें लोकांना भीतिप्रद होणारें प्रचंड राक्षसरूप धारण करून, हे रामा ! वनातील ऋषींना ठिकठिकाणीं भय दाखवूं लागलों. असें होतां होतां एकदां स्थूलशिरा नांवाच्या महर्षीला मीं क्रोध आणिला. कारण, नानाप्रकारचे वन्य पदार्थ तो गोळा करीत असतांना मी ह्या रूपानें त्याच्या अंगावर चालून गेलों. तेव्हां घोर शाप देणारा तो ऋषि असें अवलोकन करून मला म्हणाला " हें ह्याप्रमाणेंच तुझें निंद्य व दुष्ट शरीर होवो " ( १–४ )

ह्यावर " मी आपल्यावर चालून आल्यामुळें आपण दिलेल्या ह्या माझ्या शापाचा अंत व्हावा " म्हणून मीं त्या मुनींची प्रार्थना केली असतां ते म्हणाले " राम जेव्हां निर्जन वनामध्यें हात तोडून तुझें दहन करील तेव्हां तुला स्वतःचें भव्य व शुभ रूप प्राप्त होईल. हे लक्ष्मणा ! संपत्तीनें झळकत

श्रिया विराजितं पुत्रं दनोस्त्वं विद्धि लक्ष्मण ।
इन्द्रकोपादिदं रूपं प्राप्तमेवं रणाजिरे ७
अहं हि तपसोग्रेण पितामहमतोषयम् ।
दीर्घमायुः स मे प्रादात्ततो मां विभ्रमोऽस्पृशत् ८
दीर्घमायुर्मया प्राप्तं किं मां शक्रः करिष्यति ।
इत्येवं बुद्धिमास्थाय रणे शक्रमधर्षयम् ९
तस्य बाहुप्रमुक्तेन वज्रेण शतपर्वणा।
सक्थिनी च शिरश्चैव शरीरे संप्रवेशितम् १०
स मया याच्यमानः सन्नानयद्यमसादनम् ।
पितामहवचः सत्यं तदस्त्विति ममाब्रवीत् ११
अनाहारः कथं शक्तो भग्नसक्थिशिरोमुखः ।
वज्रेणाभिहतः कालं सुदीर्घमपि जीवितुम् १२
स एवमुक्तः शक्रो मे बाहू योजनमायतौ ।

---

असलेला मी दनूचा पुत्र आहें असें तू समज आतां इंद्रशापामुळें हें रूप मला समरांगणामध्यें कसें प्राप्त झालें तें मी कथन करितों " मी उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला संतुष्ट केलें असतां त्यानें मला दीर्घायुष्य दिलें व त्यामुळें मला गर्व झाला "मला दीर्घ आयुष्य प्राप्त झालें आहे तेव्हां इंद्र माझें काय करणार " अशा विचार मनामध्यें आणून मी समरांगणामध्यें इंद्राच्या अंगावर चालून गेलों. ( ५-९ )

तेव्हां शेंकडों धारांनी युक्त असलेल्या वज्र त्या इंद्रानें आपल्या हातानें सोडिलें असतां त्याच्या योगानें माझ्या मांड्या व मस्तक शरीरामध्यें घुसलें, आणि शेवटीं मीं प्रार्थना केल्यामुळें यमसदनीं माझी रवानगी न करितां "तें ब्रह्मदेवाचें भाषण सत्य होवो " असें तो मला म्हणाला, परंतु, मांड्या, मस्तक व मुख भग्न झाल्यामुळें मला आहार करितां येणार नाहीं, तेव्हां " आहाररहित आणि त्यांतूनही आपला तडाका बसलेला मी दीर्घकालपर्यंत जिवंत राहण्याला कसा समर्थ होणार ?" ह्याप्रमाणें मी प्रश्न केला असतां इंद्रानें मला एकेक योजन लांब

तदा चास्यं च मे कुक्षौ तीक्ष्णदंष्ट्रमकल्पयत् १३
सोऽहं भुजाभ्यां दीर्घाभ्यां संक्षिप्यास्मिन्वनेचरान् ।
सिंहद्वीपिमृगव्याघ्रान्भक्षयामि समन्ततः १४
स तु मामब्रवीदिन्द्रो यदा रामः सलक्ष्मणः ।
छेत्स्यते समरे बाहू तदा स्वर्गं गमिष्यसि १५
अनेन वपुषा तात वनेऽस्मिन्राजसत्तम ।
यद्यत्पश्यामि सर्वस्य ग्रहणं साधु रोचये १६
अवश्यं ग्रहणं रामो मन्येऽहं समुपैष्यति ।
इमां बुद्धिं पुरस्कृत्य देहन्यासकृतश्रमः १७
स त्वं रामोऽसि भद्रं ते नाहमन्येन राघव ।
शक्यो हन्तुं यथा तत्त्वमेवमुक्तं महर्षिणा १८
अहं हि मतिसाचिव्यं करिष्यामि नरर्षभ ।
मित्रं चैवोपदेक्ष्यामि युवाभ्यां संस्कृतोऽग्निना । १९

असे बाहु दिले आणि तीक्ष्णदंष्ट्रांनीं युक्त असें मुख मला उदरामध्यें निर्माण करून दिलें. तेव्हांपासून ह्या वनामध्यें कोणत्याही बाजूला संचार करणारे सिंह, चित्ते, मृग आणि व्याघ्र आपल्या दीर्घ हातांनीं धरून मी भक्षण करीत आहें, असो. ( १०–१४ )

" लक्ष्मणासहवर्तमान राम जेव्हां समरांगणामध्यें तुझे हात तोडून टाकील तेव्हां स्वर्गामध्यें परत जाशील " असें इंद्रानें मला सांगितलें असल्यामुळें, बा नृपश्रेष्ठा ! ह्या शरिरानें युक्त असलेल्या, माझ्या ह्या वनामध्यें जें जें दृष्टीस पडतें तें सर्वच ग्रहण करणें मला बरें वाटूं लागलें. कारण, ( राम कोणता हें मला ठाऊक नाहीं. तेव्हां आपण असा क्रम सुरू ठेविला असतां, राम केव्हां तरी माझ्या हातीं येईल असें मला वाटलें आणि ह्याच विचार मनामध्यें आणून मी ह्या आपल्या देहाचा रामाच्या हातून त्याग करण्याविषयीं यत्न करूं लागलों ,तो राम तूंच आहेस; तुझें कल्याण असो. हे राघवा ! दुसऱ्याच्या हातून माझा वध होणें शक्य नाहीं असें त्या महर्षीनीं मला एक तत्त्व सांगून ठेविलें होतें. हे पुरुषश्रेष्ठा ! तुम्ही अग्नीच्या योगानें माझा और्ध्वदेहिक संस्कार केला म्हणजे मी एक युक्ति सांगून आपलें मित्रत्वाचें सार्थक करीन आणि तुला एक मित्रही

एवमुक्तस्तु धर्मात्मा दनुना तेन राघवः ।
इदं जगाद वचनं लक्ष्मणस्य च पश्यतः २०
रावणेन हृता भार्या सीता मम यशस्विनी ।
निष्क्रान्तस्य जनस्थानात्सह भ्रात्रा यथासुखम् २१
नाममात्रं तु जानामि न रूपं तस्य रक्षसः ।
निवासं वा प्रभावं वा वयं तस्य न विद्महे २२
शोकार्तानामनाथानामेवं विपरिधावताम् ।
कारुण्यं सदृशं कर्तुमुपकारेण वर्तताम् २३
काष्ठान्यानीय भग्नानि काले शुष्काणि कुञ्जरैः ।
धक्ष्यामस्त्वां वयं वीर श्वभ्रे महति कल्पिते २४
स त्वं सीतां समाचक्ष्व येन वा यत्र वा हृता ।
कुरु कल्याणमत्यर्थं यदि जानासि तत्त्वतः २५
एवमुक्तस्तु रामेण वाक्यं दनुरनुत्तमम् ।
प्रोवाच कुशलो वक्ता वक्तारमपि राघवम् २६

सांगेन " ह्याप्रमाणें त्या दनुनामक राक्षसानें सांगितलें असतां धर्मात्मा राम लक्ष्मणाचे समक्ष म्हणाला ( १५-२० )

" मी जनस्थानातून भ्रात्यासहवर्तमान खुशाल बाहेर गेलों असतांना माझी यशस्विनी भार्या सीता रावणानें हरण करून नेली. त्या राक्षसाचें नांव मात्र मला ठाऊक आहे परंतु, त्याचें रूप कसें आहे, त्याचें निवासस्थान कोणतें व त्याचा प्रभाव काय आहे हें आम्हाला माहीत नाहीं. ह्याकरितां, अनाथ व शोकाकुल होऊन ह्याप्रमाणें भटकत असलेल्या व तुजवर उपकार करणाऱ्या आम्हांवर योग्य अशी कांही कृपा कर, आम्ही योग्य वेळीं हत्तींनीं मोडून टाकिलेलीं शुष्क काष्ठें आणून, हे वीरा ! तयार केलेल्या मोठ्या खड्यामध्यें तुझें दहन करूं, परंतु, सीतेला कोणी नेली व कोठें नेली हें तूं आम्हांला सांग तुला जर खरोखर माहीत असेल तर आम्हांला अत्यंत हितावह असलेली ही गोष्ट तूं कर. " ( २१-२५ )

ह्याप्रमाणें राम त्याला म्हणाला असतां त्या कुशल व वक्त्या दनूनें वक्तृत्वगुणांनेंही युक्त असलेल्या रामाशीं उत्तम भाषण केलें कीं " मला दिव्य ज्ञान

दिव्यमस्ति न मे ज्ञानं नाभिजानामि मैथिलीम्।
यस्तां वक्ष्यति तं वक्ष्ये दग्धः स्वं रूपमास्थितः २७
योऽभिजानाति तद्रक्षस्तद्वक्ष्ये राम तत्परम् २८
अदग्धस्य हि विज्ञातुं शक्तिरस्ति न मे प्रभो।
राक्षसं तु महावीर्यं सीता येन हृता तव २९
विज्ञानं हि महद्भ्रष्टं शापदोषेण राघव।
स्वकृतेन मया प्राप्तं रूपं लोकविगर्हितम् ३०
किं तु यावन्न यात्यस्तं सविता श्रान्तवाहनः।
तावन्मामवटे क्षिप्त्वा दह राम यथाविधि ३१
दग्धस्त्वयाहमवटे न्यायेन रघुनन्दन।
वक्ष्यामि तं महावीर यस्तं वेत्स्यति राक्षसम् ३२
तेन सख्यं च कर्तव्य न्याय्यवृत्तेन राघव।
कल्पयिष्यति ते वीरः साहाय्यं लघुविक्रम ३३

---

नाहीं ह्यामुळें सीता कोणीकडे आहे हें मला ठाऊक नाहीं; परंतु, माझें दहन करून स्वतःचें रूप मला प्राप्त झाल्यावर सीतेची बातमी जो लागेल तो मी तुला कथन करीन. साराश, हे रामा, सीतेला हरण करून नेणाऱ्या राक्षसाला जो जाणीत आहे तो मी तुला दहनानंतर कथन करीन, हे प्रभो, ज्यानें सीताहरण करून नेली तो महावीर्यवान् राक्षस कोण हें समजण्याची दग्ध झाल्यावाचून माझी शक्ति नाहीं. कारण, हे राघवा ! शापदोषानें माझें मोठें ज्ञान भ्रष्ट झालें असून स्वतः केलेल्या अनुचित कार्माच्या योगानें हें लोकनिंद्य रूप मला प्राप्त झालें आहे. (२६-३०)

तेव्हा वाहनें श्रांत होऊन रवि अस्ताला गेला नाहीं तोंच, हे रामा! खड्या--मध्यें टाकून माझें यथाविधि दहन कर. हे रघुनंदना महावीरा ! खड्यामध्यें तूं माझें यथाविधि दहन केल्यावर त्या राक्षसाला जाणणारा कोण तो मी तुला सांगेन. हे राघवा! न्यायानें वागणाऱ्या त्याच्याशीं तूं सख्य कर; ह्मणजे, हे शीघ्र-पराक्रमी वीर रामा ! तो तुला साहाय्य करील, हे राघवा, तिन्ही लोकामध्यें

न हि तस्यास्त्वाविज्ञातं त्रिषु लोकेषु राघव ।
सर्वान्परिवृतो लोकान्पुरा वै कारणान्तरे ३४

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे द्विसप्ततितम. सर्ग ७२[२३४०]

त्रिसप्ततितमः सर्गः ।

एवमुक्तौ तु तौ वीरौ कबन्धेन नरेश्वरौ ।
गिरिप्रदरमासाद्य पावकं विससर्जतु १
लक्ष्मणस्तु महोल्काभिर्ज्वलिताभिः समन्ततः ।
चितामादीपयामास सा प्रजज्वाल सर्वत. २
तच्छरीरं कबन्धस्य घृतपिण्डोपमं महत् ।
मेदसा पच्यमानस्य मन्दं दहति पावक ३
स विधूय चितामाशु विधूमोऽग्निरिवोत्थित ।
अरजे वाससी बिभ्रन्माल्यं दिव्यं महाबल ४
ततश्चिताया वेगेन भास्वरो विरजाम्बर. ।
उत्पपाताशु संहृष्ट· सर्वप्रत्यङ्गभूषण ५

त्याला अज्ञात असें कोईंहि नाहीं कारण, कांहीं निमित्त उपस्थित झाल्यामुळे तो पूर्वी सर्व लोक हिंडून आलेला आहे " ( ३१-३४ )

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनावाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं बाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥७२ ॥

ह्याप्रमाणें कबधानें त्या प्रजाधिपति वीर रामलक्ष्मणांना सांगितलें असता त्याला एका पर्वताच्या खड्यांत नेऊन टाकून (आणि सर्व बाजूनीं काष्ठें घालून) त्यांनीं अग्नि दिला, प्रज्वलित अशा मोठमोठ्या ज्वालांनीं लक्ष्मणानें सर्व बाजूनीं ती चिता पेटाविली व ती चोहोंकडून जळू लागली, मेदानें भरलेला तो राक्षस जळू लागला असता घृतपिंडाप्रमाणें असलेल्या त्याच्या त्या प्रचड शरीराला अग्नि सावकाश जाळू लागला, तदनतर चिता ढासळून देऊन तो धूमरहित अग्नीप्रमाणें चितेंतून बाहेर निघाला आणि तो महाबलाढ्य निर्मल वस्त्रें व दिव्यमाला धारण केलेला असा दिसू लागला. ( १-४ )

धाराश, उज्ज्वल, निर्मल वस्त्रानें युक्त आणि अंगुलिप्रभृति सर्व बारीक सारीक अवयवांचे ठिकाणींही अलकार धारण केलेला असा तो आनंदित

विमाने भास्वरे तिष्ठन्हंसयुक्ते यशस्करे ।
प्रभया च महातेजा दिशो दश विराजयन् ६
सोऽन्तरिक्षगतो वाक्यं कबन्धो राममब्रवीत् ।
शृणु राघव तत्वेन यथा सीतामवाप्स्यसि ७
राम षड्युक्तयो लोके याभिः सर्वं विमृश्यते ।
परिमृष्टो दशान्तेन दशाभागेन सेव्यते ८
दशाभागगतो हीनस्त्वं हि राम सलक्ष्मणः ।
यत्कृते व्यसनं प्राप्तं त्वया दारप्रधर्षणम् ९
तदवश्यं त्वया कार्यः स सुहृत्सुहृदां वर ।
अकृत्वा न हि ते सिद्धिमहं पश्यामि चिन्तयन् १०
श्रूयतां राम वक्ष्यामि सुग्रीवो नाम वानरः ।
भ्राता निरस्तः क्रुद्धेन वालिना शक्रसूनुना ११

झालेला कबंध चितेपासून वेगावेगानें सत्वर बाहेर निघाला, आणि हंसयुक्त, यशस्कारक व उज्ज्वल अशा विमानामध्यें बसून आपल्या प्रभेच्या योगानें तो महातेजस्वी दशदिशा प्रकाशित करूं लागला तदनंतर अंतरिक्षामध्यें असलेला तो कबंध रामाला म्हणाला, " हे राघवा ! सीता तुला कशी प्राप्त होईल हें मी तुला खरें खरें सांगत आहें तूं श्रवण कर, हे रामा ! ( संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव आणि समाश्रय ह्या ) सहा युक्त्या जगतामध्यें आहेत व त्याच्याच योगानें सर्व काहीं राजाला विचारानें प्राप्त होत असतें, परंतु, जो ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेला आहे त्याला ग्रहदशेच्या फेऱ्यात सापडलेल्या-चीच मदत होत असते ( अशी नीति असल्यामुळें सहाव्याच युक्तीचें अवलंबन तुला केलें पाहिजे ) हे रामा ! ज्या अर्थी तूं लक्ष्मणासहवर्तमान राज्यापासून भ्रष्ट झाला आहेस त्याअर्थी सांप्रत तूं ग्रहदशेच्या फेऱ्यात सांपडला आहेस ही गोष्ट सिद्ध आहे आणि ह्याच कारणामुळें भार्यापहाररूप संकट तुला प्राप्त झालें आहे ह्यास्तव, हे मित्रश्रेष्ठा ! ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेला तोच मित्र तुला अवश्य केला पाहिजे विचार करून पाहिलें असता त्याला मित्र केल्यावाचून तुझा मनोरथ परिपूर्ण होईल असें मला वाटत नाहीं (५-१०)

हे रामा ! मी सांगतों तें एक सुग्रीवनामक वानर क्रुद्ध झालेल्या इंद्रपुत्र

ऋष्यमूके गिरिवरे पम्पापर्यन्तशोभिते ।
निवसत्यात्मवान्वीरश्चतुर्भिः सह वानरैः ॥ १२
वानरेन्द्रो महावीर्यस्तेजोवानमितप्रभः ।
सत्यसंधो विनीतश्च धृतिमान्मतिमान्महान् ॥ १३
दक्षः प्रगल्भो द्युतिमान्महाबलपराक्रमः ।
भ्रात्रा विवासितो वीर राज्यहेतोर्महात्मना ॥ १४
स ते सहायो मित्रं च सीताया परिमार्गणे ।
भविष्यति हि ते राम मा च शोके मनः कृथाः ॥ १५
भवितव्यं हि तच्चापि न तच्छक्यमिहान्यथा ।
कर्तुमिक्ष्वाकुशार्दूल कालो हि दुरतिक्रमः ॥ १६
गच्छ शीघ्रमितो राम सुग्रीवं तं महाबलम् ।
वयस्यं तं कुरु क्षिप्रमितो गत्वाऽद्य राघव ॥ १७
अद्रोहाय समागम्य दीप्यमाने विभावसौ ।
न च ते सोऽवमन्तव्यः सुग्रीवो वानराधिप ॥ १८

भ्रात्या वालीनें हाकून दिला आहे, आणि तो जितेंद्रिय वीर सुग्रीव चार वानरांसह वर्तमान पंपानामक पुष्करिणीच्या योगानें आसमंताद्भागीं सुशोभित असलेल्या ऋष्यमूक पर्वतावर वास्तव्य करीत आहे तो वानरराज महावीर्यवान्, तेजस्वी, अतुलप्रभेनें युक्त, सत्यप्रतिज्ञ विनयसंपन्न, धैर्यवान्, विचारी, महात्मा, दक्ष, गंभीर, कांतिमान् महाबलाढ्य व महापराक्रमी असून, हे राजा ! त्याच्या महाबलाढ्य भ्रात्यानें राज्यास्तव त्याला हाकून लाविलें आहे हे रामा ! तो सीतेच्या शोधाविषयीं तुझा मित्र व साहाय्यकर्ता होईल, तू आता आपलें मन शोकाकुल करून घेऊं नको ( ११-१५ )

हे इक्ष्वाकुवंशश्रेष्ठा ! जें होणार तें कधींही त्या जगनामध्यें टळणें शक्य नाहीं. कारण, कालाचें अतिक्रमण होणें दुर्घट आहे हे वीरा, तूं येथून त्या महाबलाढ्य सुग्रीवाकडे सत्वर जा आणि, हे राघवा ! येथून गेल्यावर विलंब न करितां आजच्या आजच त्याला मित्र करून घे, एकमेकानीं एकमेकाचा द्रोह करावयाचा नाहीं त्या उद्देशानें तुम्ही एकत्र जुळा आणि अग्नि प्रज्वलित झाला असतांना त्याच्या समक्ष एकमेकांशीं सख्य करा; त्या वानरराज सुग्रीवाचा तूं

कृतज्ञः कामरूपी च सहायार्थी च वीर्यवान्।
शक्तौ ह्यद्य युवां कर्तुं कार्यं तस्य चिकीर्षितम् १९
कृतार्थो वाऽकृतार्थो वा तव कृत्यं करिष्यति।
स ऋक्षरजसः पुत्रः पम्पामटति शङ्कितः २०
भास्करस्यौरसः पुत्रो वालिना कृतकिल्बिषः।
संनिधायायुधं क्षिप्रमृष्यमूकालयं कपिम्। २१
कुरु राघव सत्येन वयस्यं वनचारिणम्।
स हि स्थानानि कार्त्स्न्येन सर्वाणि कपिकुञ्जरः २२
नरमांसाशिनां लोके नैपुणादधिगच्छति।
न तस्याविदितं लोके किञ्चिदस्ति हि राघव २३
यावत्सूर्यः प्रतपति सहस्रांशुः परंतप।
स नदीर्विपुलाञ्छैलान्गिरिदुर्गाणि कन्दरान् २४

---

अवमान करूं नको. तो यथेष्टरूप धारण करणारा वीर्यवान् वानरराज साहाय्य मिळण्याची इच्छा करीत असून कृतज्ञ आहे व तुम्हीही त्यानें मनांत योजिलेलें कार्य करण्यास आज समर्थ आहांत, त्याचा मनोरथ सिद्धीस गेल्यानंतर अथवा सिद्धीस जाण्याचे पूर्वींही तो तुझें कार्य करील. कारण, तो ऋक्षरजाचा ( क्षेत्रज ) पुत्र आहे व भयभीत होऊन पंपानामक पुष्करिणीवर संचार करीत असतो. (१६-२०)

सूर्याचा तो औरस पुत्र आहे व वालीशीं त्याचें वैर पडलेलें आहे. त्याकरितां आयुध संनिध ठेवून ( म्हणजे आयुधाची शपथ घेऊन ) त्या ऋष्यमूकपर्वतावर वास्तव्य करणाऱ्या वनचारी वानरराजाला तूं सत्यानें, हे राघवा ! सत्वर मित्र कर. कारण, तो कपिश्रेष्ठ ह्या जगतामध्यें नरमांसभक्षक राक्षसांचीं जीं कांहीं स्थानें आहेत तीं सर्व निस्पृहतेमुळें पूर्णपणें जाणत आहे. हे राघवा ! जगतामध्यें त्याला विदित नाहीं असें कांहींही नाहीं. हे शत्रुतापना ! हजारों किरणांनीं युक्त असलेला सूर्य जितका प्रदेश प्रकाशित करीत आहे, तितक्या प्रदेशावरील नद्या, मोठमोठे पर्वत, पर्वतांवरील दुर्गम स्थानें आणि गुहा वानरांसहवर्तमान

अन्विष्य वानरैः सार्धं पत्नीं तेऽधिगमिष्यति।
वानरांश्च महाकायान्प्रेषयिष्यति राघव २५
दिशो विचेतुं तां सीतां त्वद्वियोगेन शोचतीम्।
अन्वेष्यति वरारोहां मैथिलीं रावणालये २६
स मेरुशृङ्गाग्रगतामनिन्दितां प्रविश्य पातालतलेऽपि।
प्लवङ्गमानामृषभस्तव प्रियां निहत्य रक्षांसि पुनः प्रदास्यति २७

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः ७३॥[२३६७]

चतुःसप्ततितमः सर्गः।

दर्शयित्वा तु रामाय सीतायाः परिमार्गणे प्रतिपादने।
वाक्यमन्वर्थमर्थज्ञः कबन्धः पुनरब्रवीत्। १
एष राम शिवः पन्था यत्रैते पुष्पिता द्रुमाः।
प्रतीचीं दिशमाश्रित्य प्रकाशन्ते मनोरमाः २
जम्बूप्रियालपनसा न्यग्रोधप्लक्षधतिन्दुकाः।
अश्वत्थाः कर्णिकाराश्च चूताश्चान्ये च पादपाः ३

---

धुंडून काढून तो तुझ्या पत्नीचा शोध लावील. हे राघवा ! दिशा धुंडून काढण्याकरितां तो शरिरानें धिप्पाड असलेले वानर चोहोंकडे पाठवून देईल आणि तुझ्या वियोगामुळें शोक करीत बसलेल्या त्या मिथिलराजकन्या सुंदरी सीतेला रावणाच्या घरीं तो शोधून काढील. ( २१-२६ )

सारांश, तुझी निर्दोष प्रिया जरी मेरुपर्वताच्या शिखरावर असली किंवा पातालांत नेऊन ठेविलेली असली तरी तेथेंही प्रवेश करून व राक्षसांचा वध करून तो वानरराज सुग्रीव तुला ती परत आणून देईल.

त्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडापैकीं त्र्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला. ॥ ७३ ॥

सीतेचा शोध लावण्याविषयीं रामाला उपाय दर्शवून तो व्यवहारज्ञ कबंध अन्वर्थक शब्दांनीं त्याला पुनरपि म्हणाला— " हे रामा, पश्चिम दिशेचा आश्रय करून जिकडे हे मनोहर प्रफुल्लित वृक्ष प्रकाशत आहेत तिकडून हा सुखकारक मार्ग ( ऋष्यमूक पर्वताकडे ) चालला आहे. जांभळी, चार, फणस, वड, पिंपरी, पिंपळ, कर्णिकार, आंबे आणि इतरही वृक्ष ह्या मार्गावर आहेत.

धन्वना नागवृक्षाश्च तिलका नक्तमालकाः।
नीलाशोकाः कदम्बाश्च करवीराश्च पुष्पिताः।
अग्निमुख्या अशोकाश्च सुरक्ताः परिभद्रकाः ४
तानारुह्याथ वा भूमौ पातयित्वा च तान्बलात्।
फलान्यमृतकल्पानि भक्षयित्वा गमिष्यथ ५
तदतिक्रम्य काकुत्स्थ वनं पुष्पितपादपम्।
नन्दनप्रतिमं त्वन्यत्कुरवस्तूत्तरा इव ६
सर्वकालफला यत्र पादपा मधुरस्रवाः।
सर्वे च ऋतवस्तत्र वने चैत्ररथे यथा ७
फलभारनतास्तत्र महाविटपधारिणः।
शोभन्ते सर्वतस्तत्र मेघपर्वतसंनिभाः ८
तानारुह्याथवा भूमौ पातयित्वाऽथ वा सुखम्।
फलान्यमृतकल्पानि लक्ष्मणस्ते प्रदास्यति ९
चङ्क्रमन्तौ वराञ्छैलाञ्छैलाच्छैलं वनाद्वनम्।

---

धावडा, नागकेशर, तिळवा, करज, नील, अशोक, कळंब व कण्हेर हे प्रफुल्लित वृक्ष ह्या मार्गाला असून बिब्वा, लाल अशोक आणि बाळत लिंब असेही आणखी वृक्ष आहेत त्यावर चढा अथवा त्यांना भूमीवर पाडा आणि त्यांची अमृततुल्य फळें भक्षण करून तुम्ही पुढें चालते व्हा (१-५)

हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेलें तें वन ओलांडिल्यावर उत्तरकुरुदेशाप्रमाणें असलेल्या दुसऱ्या एका नंदनतुल्य वनामध्यें तुम्ही जाल ज्यांतून मधुर रसाचा स्राव चालला आहे व ज्यांना नेहमीं फळें येत आहेत असे वृक्ष त्या वनामध्यें असून कुबेराच्या चैत्ररथवनाप्रमाणें ह्याही वनात सर्व ऋतूंतील प्रकार आहेत मोठमोठ्या फांद्या ज्यांवर आहेत असे मेघाप्रमाणें आणि पर्वताप्रमाणें दिसणारे वृक्ष फळाच्या भारानें वाकलेले सर्व बाजूनीं शोभत आहेत त्यांवर आरोहण करून अथवा खुशाल त्यांना भूमिवर पाडून त्यांची अमृततुल्य फळें लक्ष्मण तुला देईल ह्या पर्वतावरून त्या पर्वतावर व ह्या वनातून

ततः पुष्करिणीं वीरौ पम्पां नाम गमिष्यथ १०
अशर्करामविभ्रंशां समतीर्थामशैवलाम् ।
राम सञ्जातवालूकां कमलोत्पलशोभिताम् ११
तत्र हंसाः प्लवाः क्रौञ्चाः कुरराश्चैव राघव ।
वल्गुस्वराणि कूजन्ति पम्पासलिलगोचराः १२
नोद्विजन्ते नरान्दृष्ट्वा वधस्याकोविदाः पुरा ।
घृतपिण्डोपमान्स्थूलांस्तान्द्विजान्भक्षयिष्यथ १३
रोहितांश्चक्रतुण्डांश्च नालमीनांश्च राघव ।
पम्पायामिषुभिर्मत्स्यांस्तत्र राम वरान्हतान् १४
निस्त्वक्पक्षानयस्तप्तानकृशानेककण्टकान् ।
तव भक्त्या समायुक्तो लक्ष्मणः संप्रदास्यति १५
भृशं तान्खादतो मत्स्यान्पम्पायाः पुष्पसंचये ।
पद्मगन्धि शिवं वारि सुखशीतमनामयम् १६

त्या वनांत त्याप्रमाणें श्रेष्ठ श्रेष्ठ पर्वत व वनें हिंडता हिंडतां, हे वीरहो ! तुम्ही पंपानामक पुष्करिणीवर जाल. ( ६–१० )

हे रामा ! त्या पुष्करिणीचे ठिकाणीं खडे नाहींत, शेवाळें नसल्यामुळें निसरडें नाहीं, उदक शांत आहे, आंत वाळू आहे आणि नानाप्रकारच्या कमळांनीं ती सुशोभित आहे. हे राघवा ! पंपापुष्करिणीच्या उदकामध्यें राहणारे हंस, क्रौंच व कुररपक्षी आणि बेडूक त्या ठिकाणीं मधुर ध्वनि करीत असतात. आणि पूर्वी तेथें कोणाचा वध झाल्याचें त्यांना माहित नसल्यामुळें मनुष्यांना पाहून ते भीतही नाहींत. तेव्हां घृतपिंडतुल्य असलेल्या त्या स्थूल पक्ष्यांना तुम्ही भक्षण करा. हे रघुवंशजा ! चक्रतुंड, नीलवर्ण, स्थूल आणि अनेक कंटकांनीं युक्त असे श्रेष्ठ श्रेष्ठ पंपापुष्करिणींतील रोहित नामक मत्स्य बाणांनीं मारून लोखंडाच्या सुळावर भाजून आणि त्यांची त्वचा व पंख काढून टाकून तुझे ठिकाणीं प्रेम करीत असलेला लक्ष्मण तुला देईल. ( ११–१५ )

ते मत्स्य तूं पाहिजे तितके खाऊं लागलास म्हणजे पुष्पसमुदायामध्यें असलेलें त्या पंपापुष्करिणीचें कमलगंधानें युक्त, मंगलकारक, सुखावह, गार, निरोगी,

उद्धृत्य स तदा क्लिष्टं रूप्यस्फटिकसंनिभम्।
अथ पुष्करपर्णेन लक्ष्मणः पाययिष्यति १७
स्थूलान्गिरिगुहाशय्यान्वानरान्वनचारिणः।
सायाह्ने विचरन्राम दर्शयिष्यति लक्ष्मणः १८
अपां लोभादुपावृत्तान्वृषभानिव नर्दतः।
स्थूलान्पीतांश्च पम्पायां द्रक्ष्यसि त्वं नरोत्तम १९
सायाह्ने विचरन्राम विटपी माल्यधारिणः।
शिवोदकं च पम्पायां दृष्ट्वा शोकं विहास्यसि २०
सुमनोभिश्चितास्तत्र तिलका नक्तमालकाः।
उत्पलानि च फुल्लानि पङ्कजानि च राघव २१
न तानि कश्चिन्माल्यानि तत्रारोपयिता नरः।
न च वै म्लानतां यान्ति न च शीर्यन्ति राघव २२
मतङ्गशिष्यास्तत्रासन्नृषयः सुसमाहिताः।
तेषां भाराभितप्तानां वन्यमाहरतां गुरोः २३
ये प्रपेतुर्महीं तूर्णं शरीरात्स्वेदबिन्दवः।

---

स्वच्छ आणि रुप्याप्रमाणें अथवा स्फटिकाप्रमाणें तेजस्वी उदक कमलपत्रानें लक्ष्मण तुला पाजील. पर्वतांच्या गुहेमध्यें निद्रा घेणारे वनचर वानर, हे रामा! सायंकाळीं संचार करीत असतां लक्ष्मण तुला दाखवील. आणि, हे पुरुषश्रेष्ठा, जलपान केल्यामुळें उदकाचा लोभ सोडून परत फिरलेले व बैलाप्रमाणें गर्जना करणारे ते स्थूल वानर पंपापुष्करिणीवर तूंही पाहशील. हे रामा! सायंकाळीं संचार करीत असता फुलझाडें व पंपापुष्करिणींतील मंगलकारक उदक दृष्टीस पडल्यावर तुझें मानसिक दुःख नाहींसें होईल. (१६-२०)

हे राघवा! तिळवे व करंज त्या ठिकाणीं फुलांनीं भरलेले असून नील कमलें व इतर कमलेंही प्रफुल्लित झालेलीं असतात हे राघवा! तेथील पुष्पें घेऊन कोणीही पुरुष धारण करीत नाहीं, तीं कोमेजतही नाहींत आणि नाशही पावत नाहींत. अत्यंत समाधानी असे मतंगशिष्य ऋषि तेथें होते ते गुरुकरितां वनातील काष्ठांचीं वगैरे ओझीं आणताना थकले असतां त्यांच्या शरीरांतून जे

तानि माल्यानि जातानि मुनीनां तपसा तदा ॥ २४
स्वेदबिन्दुसमुत्थानि न विनश्यन्ति राघव ।
तेषां गतानामद्यापि दृश्यते परिचारिणी २५
श्रमणी शबरी नाम काकुत्स्थ चिरजीविनी ।
त्वां तु धर्मे स्थिता नित्यं सर्वभूतनमस्कृतम् २६
दृष्ट्वा देवोपमं राम स्वर्गलोकं गमिष्यति ।
ततस्तद्राम पम्पायास्तीरमाश्रित्य पश्चिमम् २७
आश्रमस्थानमतुलं गुह्यं काकुत्स्थ पश्यसि ।
न तत्राक्रमितुं नागाः शक्नुवन्ति तदाश्रमे । २८
ऋषेस्तस्य मतङ्गस्य विधानात्तच्च काननम् ।
मतङ्गवनमित्येव विश्रुतं रघुनन्दन २९
तस्मिन्नन्दनसंकाशे देवारण्योपमे वने ।
नानाविहगसंकीर्णे रंस्यसे राम निर्वृतः ३०

---

घामाचे बिंदु भराभर भूमीवर पडले ते मुनींच्या तपश्चर्येमुळे पुष्पें झाली. हे राघवा ! घर्मबिंदूंपासून उत्पन्न झालेलीं ती पुष्पें नाहींशीं होत नाहींत. ते मुनि जरी निघून गेले आहेत तथापि, त्यांची दासी कोणी शबरीनामक चिरंजीवी स्त्री, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! अद्याप तेथें दृष्टीस पडत आहे. हे रामा ! धर्माला नित्य अनुसरून वागणारी ती शबरी सर्व प्राण्यांना पूज्य व देवतुल्य अशा तुझें दर्शन घेऊन स्वर्गलोकीं गमन करील. तदनंतर, पंपापुष्करिणीच्या पश्चिम तीराचा आश्रय केल्यावर, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! एक गुह्य व अनुपम आश्रमस्थान तूं अवलोकन करशील. त्याच आश्रमामध्यें प्रवेश करण्याला गज समर्थ होत नाहींत. ( २१-२५ )

हे रघुनंदना, त्या मतंग ऋषीच्या प्रभावामुळें तें वनही मतंगवन म्हणूनच प्रसिद्ध आहे. हे रामा ! देवाच्या उपवनाप्रमाणें अथवा इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें नाना प्रकारच्या पक्षिगणांनीं गजबजून गेलेल्या त्या वनामध्यें तूं सुखी होऊन रममाण होशील. पंपापुष्करिणीच्या समोरच प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असा ऋष्य-

ऋष्यमूकस्तु पम्पायाः पुरस्तात्पुष्पितद्रुमः ।
सुदुःखारोहणश्चैव शिशुनागाभिरक्षितः ३१
उदारो ब्रह्मणा चैव पूर्वकालेऽभिनिर्मितः ।
शयानः पुरुषो राम तस्य शैलस्य मूर्धनि ३२
यः स्वप्ने लभते वित्तं तत्प्रबुद्धोऽधिगच्छति ।
यस्त्वेनं विषमाचारः पापकर्माधिरोहति ३३
तत्रैव प्रहरन्त्येनं सुप्तमादाय राक्षसाः ।
ततोऽपि शिशुनागानामाक्रन्दः श्रूयते महान् ३४
क्रीडतां राम पम्पायां मतङ्गाश्रमवासिनाम् ।
सक्ता रुधिरधाराभिः संहत्य परमद्विपाः ३५
प्रचरन्ति पृथक्कीर्णा मेघवर्णास्तरस्विनः ।
ते तत्र पीत्वा पानीयं विमलं चारु शोभनम् ३६
अत्यन्तसुखसंस्पर्शं सर्वगन्धसमन्वितम् ।
निर्वृत्ताः संविगाहन्ते वनानि वनगोचराः ३७

मूक पर्वत आहे, त्यावर आरोहण करणे फारच कठिण असून बालनागानी त्याचे रक्षण केलेले आहे. ( २६-३१ )

हे रामा, पूर्वी सृष्टिकाली ब्रह्मदेवाने तो उदार पर्वत निर्माण केलेला आहे, त्यामुळे त्या पर्वतावर निद्रिस्थ असलेला पुरुष, जो स्वप्नामध्ये द्रव्य प्राप्त करून घेतो त्याला जागे झाल्यावर ते द्रव्य मिळते. जो दुराचरी व पापकर्मी पुरुष ह्या पर्वतावर आरोहण करितो, तो निद्रिस्थ होताक्षणी त्याला राक्षस धरून तेथेच मारितात. हे रामा ! मतंगाश्रमाच सन्निध वास्तव्य करणारे बाल गज पंपापुष्करिणी-मध्ये क्रीडा करूं लागले असतां त्यांची मोठी गर्जना तेथेही ऐकूं येते. तसेच मदधारांनी बरबटलेले मोठे श्रेष्ठ गज एकत्र मिळून, संचार करीत असतात आणि मेघवर्ण व सामर्थ्यवान् असे काही गज वेगळे वेगळे फुटून संचार करीत असतात स्पर्श झाला असता अत्यंत सुखदायक, सर्व प्रकारच्या सुगंधाने युक्त, निर्मल, मनोहर व पवित्र असे उदक तेथे पिऊन ते वनचर गज परत फिरतात आणि अरण्यामध्ये जातात. ( ३२-३७ )

ऋक्षांश्च द्वीपिनश्चैव नीलकोमलकप्रभान् ।
रुरूनपेतानजयान्दृष्ट्वा शोकं प्रहास्यसि ३८
राम तस्य तु शैलस्य महती शोभते गुहा ।
शिलापिधाना काकुत्स्थ दुःखं चास्याः प्रवेशनम् ३९
तस्या गुहायाः प्राग्द्वारे महाञ्छीतोदको ह्रदः ।
बहुमूलफलो रम्यो नानानगसमाकुलः ४०
तस्यां वसति धर्मात्मा सुग्रीवः सह वानरैः ।
कदाचिच्छिखरे तस्य पर्वतस्यापि तिष्ठति ४१
कबन्धस्त्वनुशास्यैवं तावुभौ रामलक्ष्मणौ ।
स्रग्वी भास्करवर्णाभः खे व्यरोचत वीर्यवान् ४२
तं तु खस्थं महाभागं तावुभौ रामलक्ष्मणौ ।
प्रस्थितौ त्वं व्रजस्वेति वाक्यमूचतुरन्तिके ४३

---

हे रामा ! नीलरत्नाप्रमाणें कोमल कांतीनें युक्त असून हिंसा न करणारे व्याघ्र, अस्वलें आणि मनुष्याला पाहून पळून जाणारे रुरुनामक मृग दृष्टीस पडले असतां तुझें मानसिक दुःख नाहींसें होईल. हे रामा ! त्या पर्वतावर शिलेनें आच्छादून टाकिलेली अशी एक मोठी गुहा शोभत आहे व हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा ! त्या गुहेमध्यें प्रवेश होणें कठीण आहे. त्या गुहेच्या पूर्वद्वाराशी शीत जलानें युक्त असें एक मोठें सरोवर आहे व तें रम्य सरोवर नानाप्रकारच्या वृक्षांनीं गजबजून गेलें असून असंख्य फलमूलांनीं भरलेलें आहे. त्या गुहेमध्यें धर्मात्मा सुग्रीव वानरांसहवर्तमान वास्तव्य करीत असतो आणि कधीं कधीं तो त्या पर्वताच्या शिखरावरही रहात असतो " ( ३८–४१ )

याप्रमाणें त्या उभयतां रामलक्ष्मणांना सांगितल्यावर तो वीर्यवान् कबंध माला धारण करून सूर्यतुल्य कांतीनें युक्त झालेला असा आकाशामध्यें झळकूं लागला. तेव्हां त्यानें सांगितलेल्या मार्गाकडे निघालेले ते उभयतां रामलक्ष्मण जवळच आकाशामध्यें असलेल्या त्या महाभाग्यवान् कबंधाला " तू पुण्यलोकाप्रत गमन कर " असें म्हणाले. असतां " कार्यसिद्धीकरितां जावें " म्हणून त्यानेंही त्यांना

गम्यतां कार्यसिद्ध्यर्थमिति तावब्रवीत्स च।
सुप्रीतौ तावनुज्ञाप्य कबन्धः प्रस्थितस्तदा ४४
स तत्कबन्धः प्रतिपद्य रूपं वृतः श्रिया भास्वरसर्वदेहः।
निदर्शयन्राममवेक्ष्य खस्थः सख्यं कुरुष्वेति तदाभ्युवाच ४५
इत्यार्षे श्रीमद्रा०वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः॥७४[२४१२]

पञ्चसप्ततितमः सर्गः।

तौ कबन्धेन तं मार्गं पम्पाया दर्शितं वने।
आतस्थतुर्दिशं गृह्य प्रतीचीं नृवरात्मजौ १
तौ शैलेष्वाचितानेकान्क्षौद्रपुष्पफलद्रुमान्।
वीक्षन्तौ जग्मतुर्द्रष्टुं सुग्रीवं रामलक्ष्मणौ २
कृत्वा तु तौ शैलपृष्ठे वासं तौ रघुनन्दनौ।
पम्पायाः पश्चिमं तीरं राघवावुपतस्थतुः ३
तौ पुष्करिण्याः पम्पायास्तीरमासाद्य पश्चिमम्।
अपश्यतां ततस्तत्र शबर्या रम्यमाश्रमम् ४

सांगितल आणि असयत प्रसन्न झालेल्या त्या रामलक्ष्मणांना ( ह्याप्रमाणें ) जाण्याची अनुज्ञा देऊन तो कबंध चालता झाला. असो. तें रूप प्राप्त झाल्यावर कांतीनें युक्त झालेल्या त्या कबंधाचा सर्व देह तेजस्वी झाला आणि आकाशामध्यें असलेला तो कबंध मार्ग वगैरे दाखविता दाखविता रामाकडे पाहून "सुग्रीवाशीं सख्य कर" असें त्याला म्हणाला ( ४२–४५ )

याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनावाच्या आदिकाव्यातील अरण्यकांडांतील चौऱ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥७४॥

वनामध्यें कबंधानें दाखविलेल्या त्या मार्गाचें अवलंबन करून ते राजकुमार पंपापुष्करिणीला जाण्याच्या उद्देशानें पश्चिम दिशेकडे चालते झाले. मध, पुष्पें व फलें ह्यांनीं भरलेले अनेक वृक्ष पर्वतांचे ठिकाणीं अवलोकन करीत करीत ते रामलक्ष्मण सुग्रीवाची भेट घेण्याकरितां निघाल्यावर, पर्वताचे पृष्ठभागीं वास्तव्य करून ते रघुनंदन राघव पंपेच्या पश्चिम तीराला जाऊन पोंचले. आणि पंपापुष्करिणीच्या पश्चिम तीराला गेल्यावर शबरीचा रम्य आश्रम त्यांनीं तेथें अवलोकन

तौ तमाश्रममासाद्य द्रुमैर्बहुभिरावृतम् ।
सुरम्यमभिवीक्षन्तौ शबरीमभ्युपेयतुः ५
तौ दृष्ट्वा च तदा सिद्धा समुत्थाय कृताञ्जलिः ।
पादौ जग्राह रामस्य लक्ष्मणस्य च धीमतः ६
पाद्यमाचमनीयं च सर्वं प्रादाद्यथाविधि ७
तामुवाच ततो रामः श्रमणीं धर्मसंस्थिताम् ।
कच्चित्ते निर्जिता विघ्नाः कच्चित्ते वर्धते तपः ८
कच्चित्ते नियतः कोप आहारश्च तपोधने ।
कच्चित्ते नियमाः प्राप्ताः कच्चित्ते मनसः सुखम् ९
कच्चित्ते गुरुशुश्रूषा सफला चारुभाषिणि ।
रामेण तापसी पृष्टा सा सिद्धा सिद्धसंमता । १०
शशंस शबरी वृद्धा रामाय प्रत्यवस्थिता ।
अद्य प्राप्ता तपःसिद्धिस्तव संदर्शनान्मया ११
अद्य मे सफलं जन्म गुरवश्च सुपूजिताः ।
अद्य मे सफलं तप्तं स्वर्गश्चैव भविष्यति १२

केला असंख्य वृक्षांनीं व्याप्त असलेला त्या अत्यंत मनोहर आश्रमाला गेल्यावर (वनसौंदर्य) पहात पहात ते शबरीसमीप गेले (१-५)

तेव्हां त्यांना अवलोकन करिताक्षणीं सिद्ध झालेल्या त्या शबरीनें उठून हात जोडिले आणि रामाचे व बुद्धिमान् लक्ष्मणाचे पाय धरून तिनें पाद्य, आचमनीय वगैरे सर्व यथाविधि त्यांना अर्पण केलें. तदनंतर राम त्या धर्मनिष्ठ तपस्विनी शीला प्रश्न करूं लागला कीं "तपाला विघ्न आणणाऱ्या कामादि षड्रिपूंचें तूं दमन केलें आहेस ना? तुझ्या तपाचा उत्कर्ष आहे ना?, कोपाचा निग्रह झाला आहे ना? हे तपोधने, आहार स्वाधीन ठेविला आहेस ना? नियमानीं वागत आहेस ना? तुझ्या मनाला सुख आहे ना? आणि, हे मनोहरभाषिणि, तुझी गुरुशुश्रूषा सफल आहे ना?" (६-१०)

त्याप्रमाणें रामानें त्या सिद्धांना अभिमत असलेल्या-सिद्ध तापसीला प्रश्न केल्यावर, समोर उभी राहिलेली ती वृद्ध शबरी रामाला म्हणाली "तुझ्या दर्शनामुळें आज माझ्या तपाची सिद्धि मला प्राप्त झाली; आज माझा जन्म

त्वयि देववरे राम पूजिते पुरुषर्षभ ।
तवाहं चक्षुषा सौम्य पूता सौम्येन मानद । १३
गमिष्याम्यक्षयाँल्लोकांस्त्वत्प्रसादादरिन्दम
चित्रकूटं त्वयि प्राप्ते विमानैरतुलप्रभैः १४
इतस्ते दिवमारूढा यानहं पर्यचारिषम् ।
तैश्चाहमुक्ता धर्मज्ञैर्महाभागैर्महर्षिभिः १५
आगमिष्यति ते रामः सुपुण्यमिममाश्रमम् ।
स ते प्रतिग्रहीतव्यः सौमित्रिसहितोऽतिथिः १६
तं च दृष्ट्वा वराँल्लोकानक्षयांस्त्वं गमिष्यसि ।
एवमुक्ता महाभागैस्तदाहं पुरुषर्षभ १७
मया तु संचितं वन्यं विविधं पुरुषर्षभ ।
तवार्थे पुरुषव्याघ्र पम्पायास्तीरसम्भवम् १८
एवमुक्तः स धर्मात्मा शबर्या शबरीमिदम् ।

सफल झाला; उत्कृष्ट रीतीनें गुरुशुश्रूषा केल्याचें आज सार्थक झालें, आचरिलेलें तप आज सफल झालें आणि, हे पुरुषोत्तमा रामा ! तुज श्रेष्ठाचें माझ्या हातून पूजन झाल्यामुळें मला आता स्वर्गप्राप्तिही होईल. हे सन्मानास्पद व विनयसंपन्न रामा ! तुझ्या सौम्य दृष्टीनें मी आज पवित्र झालें आहें. आणि हे शत्रुदमना ! तुझ्या प्रसादामुळें मला अक्षय्य लोक प्राप्त होणार आहेत. तूं चित्रकूट पर्वताला येतांक्षणीं अतुल प्रभेनें युक्त आलेल्या विमानांच्या योगानें, या आश्रमातून मी सेवा केलेले तपस्वी लोक स्वर्गाला चालते झाले व जातां जातां ते धर्मवेत्ते महाभाग्यवान् महर्षि मला म्हणाले ( ११-१५ )

"या तुझ्या महापुण्यदायक आश्रमामध्यें राम येईल आणि लक्ष्मणासहवर्तमान तो अतिथि राम आला असतां तूं त्याचें स्वागत कर. कारण, त्याचें दर्शन झाल्यानें तुला अक्षय्य असे उत्तम लोक प्राप्त होतील" याप्रमाणें, हे पुरुषश्रेष्ठा रामा ! त्या महाभाग्यवान् मुनींनीं मला सांगितलें असता, तुझ्याकरिता, हे पुरुषोत्तमा ! हे पुरुषश्रेष्ठा ! पंपेच्या तीरावरील नानाप्रकारचे वन्य पदार्थ मी गोळा करून ठेवले आहेत". याप्रमाणें शबरीनें सांगितलें असतां तो धर्मात्मा

राघवः प्राह विज्ञाने तां नित्यमबहिष्कृताम् १९
दनोः सकाशात्तत्त्वेन प्रभावं ते महात्मनाम् ।
श्रुतं प्रत्यक्षमिच्छामि संद्रष्टुं यदि मन्यसे २०
एतत्तु वचनं श्रुत्वा रामवक्त्रविनिःसृतम्।
शबरी दर्शयामास तावुभौ तद्वनं महत् २१
पश्य मेघघनप्रख्यं मृगपक्षिसमाकुलम् ।
मतङ्गवनमित्येव विश्रुतं रघुनन्दन २२
इह ते भावितात्मानो गुरवो मे महाद्युते ।
जुहवांचक्रिरे तीर्थं मन्त्रवन्मन्त्रपूजितम् २३
इयं प्रत्यक्स्थली वेदी यत्र ते मे सुसत्कृताः ।
पुष्पोपहारं कुर्वन्ति श्रमादुद्वेपिभिः करैः २४
तेषां तपःप्रभावेण पश्याद्यापि रघूत्तम ।
द्योतयन्ती दिशः सर्वाः श्रिया वेद्यतुलप्रभा २५

---

राघव नेहमीं भूतमात्रांस जाणणाऱ्या त्या शबरीला म्हणाला. "तुझ्या त्या महात्म्या गुरूंचा प्रभाव दनूनें जो मला वस्तुतः कथन केला आहे तो दर्शविण्याची तुझी इच्छा असल्यास प्रत्यक्ष अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे. ( १६-२० )

रामाच्या मुखांतून निघालेलें हें भाषण श्रवण करितांक्षणीं शबरी तें मोठें वन त्या उभयतांना दाखवूं लागली, ( आणि म्हणाली ) " सजल मेघासमान असलेलें, पशुपक्ष्यांनीं व्याप्त झालेलें आणि मतंगवन म्हणून प्रसिद्ध असलेलें हें वन, हे रघुनंदना ! तूं अवलोकन कर. हे महातेजस्वी रामा, मनःसंयमन केलेल्या त्या माझ्या गुरूंनीं वेदमंत्रांनीं पूजित असा समंत्रक यज्ञ या ठिकाणीं केला. ही प्रत्यक्स्थली नामक वेदीचे ठिकाणीं मला अत्यंत पूज्य असलेले ते गुरु आपल्या कंपयुक्त हातांनीं मोठ्या यत्नानें देवतांना पुष्पें अर्पण करीत असत हे रघुवंशश्रेष्ठा रामा ! त्यांच्या तपःसामर्थ्यामुळें अनुपम शोभेनें युक्त झालेली ही वेदी आपल्या कांतीनें सर्व दिशा अद्याप प्रकाशित करीत आहे. उपवासजन्य श्रमामुळें मुक्त होऊन दूर जाण्यास अस-

अशक्नुवद्भिस्तैर्गन्तुमुदवासश्रमालसैः ।
चिन्तितेनागतान्पश्य समेतान्सप्त सागरान् २६
कृताभिषेकैस्तैर्न्यस्ता वल्कलाः पादपेष्विह ।
अद्यापि न विशुष्यन्ति प्रदेशे रघुनन्दन २७
देवकार्याणि कुर्वद्भिर्यानीमानि कृतानि वै ।
पुष्पैः कुवलयैः सार्धं म्लानत्वं न तु यान्ति वै २८
कृत्स्नं वनमिदं दृष्टं श्रोतव्यं च श्रुतं त्वया ।
तदिच्छाम्यभ्यनुज्ञाता त्यक्ष्याम्येतत्कलेवरम् २९
तेषामिच्छाम्यहं गन्तुं समीपं भावितात्मनाम् ।
मुनीनामाश्रमो येषामहं च परिचारिणी ३०
धर्मिष्ठं तु वचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः ।
प्रहर्षमतुलं लेभे आश्चर्यमिति चाब्रवीत् ३१
तामुवाच ततो रामः शबरीं संशितव्रताम् ।
अर्चितोऽहं त्वया भद्रे गच्छ कामं यथासुखम् ३२

---

मग्न झालल्या त्या मुनींनी ध्यान केलं असता त्यांच्याकरितां यथें जुळून आलेल्या या सप्तसागरांना तू अवलोकन कर. ( २१-२६ )

हे रघुनंदना ! स्नान केल्यावर या आश्रमातील प्रदेशामध्यें त्यांनीं जीं वल्कलें वृक्षावर वाळत टाकिलीं आहेत तीं अद्यापिही कोरडीं होत नाहींत. देव पूजेच्या उद्देशानें नीलकमलपुष्पासहवर्तमान जीं पुष्पें येथें आणून ठेविलीं आहेत तीं ( त्यांच्या तप.सामर्थ्यामुळें ) अद्यापि कोमजून जात नाहींत. असो हें संपूर्ण वन तू आता पाहिलें असून जें ऐकावयाचें होतें तेंही तूं माझ्यापासून ऐकिलें आहेस. आतां तुझी अनुज्ञा घेऊन या देहाचा त्याग करावा अशी माझी इच्छा आहे, कारण, ज्या मुनींचा हा आश्रम आहे आणि ज्यांची मी दासी आहे त्या जितेंद्रिय मुनींजवळ जाण्याची माझी इच्छा आहे". ( २७-३० )

हें अत्यंत धर्मानुसारी भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मणासहवर्तमान रामाला अनुपम हर्ष झाला आणि " आश्चर्य आहे " असें तो म्हणाला. " तदनंतर उग्र तप केलेल्या त्या शबरीला राम म्हणाला " हे कल्याणि ! तूं माझें पूजन केलें

इत्येवमुक्ता जटिला चीरकृष्णाजिनाम्बरा ।
अनुज्ञाता तु रामेण हुत्वाऽऽत्मानं हुताशने ३३
ज्वलत्पावकसंकाशा स्वर्गमेव जगाम ह ।
दिव्याभरणसंयुक्ता दिव्यमाल्यानुलेपना ३४
दिव्याम्बरधरा तत्र बभूव प्रियदर्शना ।
विराजयन्ती तं देशं विद्युत्सौदामनी यथा ३५
यत्र ते सुकृतात्मानो विहरन्ति महर्षयः ।
तत्पुण्यं शबरी स्थानं जगामात्मसमाधिना ३६

इत्यार्षे श्रीमद्रा० वाल्मी० आदिका० अरण्यकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः । ७५[२४४८]

षट्सप्ततितमः सर्गः ।

दिवं तु तस्यां यातायां शबर्यां स्वेन तेजसा ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा चिन्तयामास राघवः १
चिन्तयित्वा तु धर्मात्मा प्रभावं तं महात्मनाम् ।
हितकारिणमेकाग्रं लक्ष्मणं राघवोऽब्रवीत् २

---

आहेस, आता अनायासें तुझा मनोरथ परिपूर्ण होईल ' वल्कलें व कृष्णाजिनें परिधान केलेल्या तपस्वी शबरीला याप्रमाणें सांगून रामानें अनुज्ञा दिल्यावर तिनें अग्नीमध्यें आपलें हवन केलें व उज्ज्वल अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेली ती शबरी स्वर्गाला चालती झाली. जातां जातां दिव्य अलंकार, दिव्य पुष्पें, दिव्य चंदन आणि दिव्य वस्त्रें ह्यांनीं ती युक्त झाली, तिचें दर्शन इतरांना प्रिय झालें आणि सौदामनी विद्युल्लतेप्रमाणें तो प्रदेश प्रकाशित करणारी, ती शबरी ते कृतार्थ झालेले महर्षि जेथें विहार करीत होते त्या पवित्र स्थानाला ब्रह्मसमाधीच्या योगानें चालती झाली (३१-३६)

त्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामाच्या आदिकाव्यांतील अरण्यकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥७५॥

स्वतःच्या तेजानें ती शबरी स्वर्गाला गेल्यावर भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान राम विचार करूं लागला, आणि महात्म्यांचा तो प्रभाव लक्षांत आणून धर्मात्मा राघव एकनिष्ठपणें आपल्या हिताकरितां झटणाऱ्या लक्ष्मणाला म्हणाला, " हे

दृष्टो मयाऽऽश्रमः सौम्य महाश्चर्यः कृतात्मनाम्।
विश्वस्तमृगशार्दूलो नानाविहगसेवितः ३
सप्तानां च समुद्राणां तेषां तीर्थेषु लक्ष्मण।
उपस्पृष्टं च विधिवत्पितरश्चापि तर्पिताः ४
प्रणष्टमशुभं यत्तः कल्याणं समुपस्थितम्।
तेन त्वेतत्प्रहृष्टं मे मनो लक्ष्मण संप्रति ५
हृदये मे नरव्याघ्र शुभमाविर्भविष्यति।
तदागच्छ गमिष्यावः पम्पां तां प्रियदर्शनाम् ६
ऋश्यमूको गिरिर्यत्र नातिदूरे प्रकाशते।
यस्मिन्वसति धर्मात्मा सुग्रीवोऽंशुमतः सुतः ७
नित्यं वालिभयात्रस्तश्चतुर्भिः सह वानरैः।
अहं त्वरे च तं द्रष्टुं सुग्रीवं वानरर्षभम् ८
तदधीनं हि मे कार्यं सीतायाः परिमार्गणम्।

---

विनयसंपन्न लक्ष्मणा! त्या कृतार्थ मुनींचा अति आश्चर्यांनीं युक्त असलेला आश्रम मीं पाहिला; त्या आश्रमांतील मृग व व्याघ्र निर्भय असून नानाप्रकारचे पक्षी त्याचा आश्रयाला आहेत. हे लक्ष्मणा! ( लोकांवर उपकार करण्याकरितां ) त्यांनीं स्थापिलेल्या सप्तसागरतीर्थामध्यें मीं यथाविधि स्नान करून पितरांचेंही तर्पण केलें, ह्यामुळें आपलें जें कांहीं नष्टचर्य होतें तें नाहींसें होऊन आपणांस कल्याण होण्याचा काळ जवळ आला आहे आणि, हे लक्ष्मणा! सांप्रत हें माझें मन आनंदित झालें आहे. ( १-५ )

हे पुरुषश्रेष्ठा कांहीं तरी शुभ गोष्ट दृष्टीस पडेल असें माझ्या अंतःकरणाला वाटत आहे. म्याकरितां इकडे ये; आपण त्या दिसण्यांतही मनोहर असलेल्या पंपेकडे जाऊं, तेथून जवळच ऋष्यमूक पर्वत झळकत असून त्या पर्वतावर तो सूर्यपुत्र धर्मात्मा सुग्रीव चार वानरांसहवर्तमान नेहमीं वास्तव्य करीत आहे. कारण वालीच्या भयानें तो घाबरून गेलेला आहे. त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाला पाहण्याची तर मला त्वरा झाली आहे कारण, सीतेचा शोध लावणें हें माझें कार्य त्याच्यावर अवलंबून आहे. ह्याप्रमाणें तो वीर राम बोलत असतांना सुमित्रापुत्र लक्ष्मण

इति ब्रुवाणं तं वीरं रामं सौमित्रिरिदमब्रवीत् ९
गच्छावस्त्वरितं तत्र ममापि त्वरते मनः ।
आश्रमात्तु ततस्तस्मान्निष्क्रम्य स विशांपतिः १०
आजगाम ततः पम्पां लक्ष्मणेन सह प्रभुः ।
समीक्षमाणः पुष्पाढ्यं सर्वतो विपुलद्रुमम् ११
कोयष्टिभिश्चार्जुनकैः शतपत्रैश्च कीचकैः ।
एतैश्चान्यैश्च बहुभिर्नादितं तद्वनं महत् १२
स रामो विविधान्वृक्षान्सरांसि विविधानि च ।
पश्यन्कामाभिसंतप्तो जगाम परमं ह्रदम् १३
स तामासाद्य वै रामो दूरात्पानीयवाहिनीम् ।
मतङ्गसरसं नाम ह्रदं समवगाहत १४
तत्र जग्मतुरव्यग्रौ राघवौ हि समाहितौ ।
स तु शोकसमाविष्टो रामो दशरथात्मजः १५

---

त्याला म्हणाला, ' आपण सत्वर तिकडे जाऊ, माझ्याही मनाला तिकडे जाण्याची त्वरा झाली आहे " ( ९ १० )

तदनंतर, तो प्रजाधिपति राम त्या आश्रमातून निघाला, आणि नंतर लक्ष्मणासहवर्तमान तो समर्थ राम पंपापुष्करिणीकडे वन पाहत पाहत गेला. तें वन प्रफुल्लित झालेलें होतें, सर्व बाजूंनी मोठे मोठे वृक्ष त्यामध्यें होते आणि टिट्टिभपक्ष्यांनी युक्त असलेले अर्जुन वृक्ष, शेकडों पानांनी भरलेले कीचकपंजक वलक व इतरहि पुष्कळ वृक्ष ह्यांच्या योगानें तें महावन नादित झालेलें होतें. असो. कामामुळें संतप्त झालेला तो राम नानाप्रकारचे वृक्ष व सरोवरें अवलोकन करीत करीत त्या उत्कृष्ट सरोवराकडे चालला; आणि जवळच वहात असलेल्या त्या पंपानामक नदीला गेल्यावर त्या मतंगसरसनामक सरोवरामध्यें त्यानें स्नान केलें, सीतेचा शोध लागण्याविषयीं तत्पर आणि स्वस्थ असे ते रघुवंशज रामलक्ष्मण तेथें गेल्यानंतर तो दशरथपुत्र राम शोकाकुल होऊन त्या सरोवरामध्यें प्रविष्ट झाला. ( ९—१५ )

विवेश नलिनीं रम्यां पङ्कजैश्च समावृताम् ।
तिलकाशोकपुंनागबकुलोद्दालकाशिनीम् १६
रम्योपवनसंबाधां रम्यसंपीडितोदकाम् ।
स्फटिकोपमतोयां तां श्लक्ष्णवालुकसंततताम् १७
मत्स्यकच्छपसंबाधां तीरस्थद्रुमशोभिताम् ।
सखीभिरिव संयुक्तां लताभिरनुवेष्टिताम् १८
किंनरोरगगन्धर्वयक्षराक्षससेविताम् ।
नानाद्रुमलताकीर्णां शीतवारिनिधिं शुभाम् १९
पद्मसौगन्धिकैस्ताम्रां शुक्लां कुमुदमण्डलैः ।
नीलां कुवलयोद्घाटैर्बहुवर्णां कुथामिव २०
अरविन्दोत्पलवतीं पद्मसौगन्धिकायुताम् ।
पुष्पिताम्रवणोपेतां बर्हिणोद्घुष्टनादिताम् २१

तें सरोवर रम्य असून कमलांनीं गच्च भरलेलें होतें; तिलक, अशोक, पुन्नाग, बकुल व उद्दाल या वृक्षांच्या योगानें त्याला शोभा आलेली होती; रम्य उपवनांनीं तें गजबजून गेलेलें होतें. त्यांतील मनोहर उदक क्षुब्ध झालेलें होतें. मृदु वाळू तेथें पसरलेली होती आणि आंतील जल स्फटिकासारिखें स्वच्छ होतें, मासे व कांसवें ह्यांची तेथें गर्दी झालेली होती; तीरावरील वृक्षामुळें त्याला शोभा आलेली होती आणि तें लतांनीं परिवेष्टित झालें असल्यामुळें सखीमध्यवर्तमान असलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत होतें. किंनर, उरग, गंधर्व, यक्ष आणि राक्षस ह्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता आणि तें शुभ सरोवर नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं व्याप्त झालेलें असून शीतोदकाचें एक भांडारच होतें. आरक्तवर्ण कमलांच्या योगानें तें कोठें कोठें आरक्तवर्ण दिसत असून श्वेतकमलांमुळें श्वेतवर्ण दिसत होतें आणि तसेंच नील कमलांच्या समूहामुळें तें कोठें कोठें नीलवर्णही भासत होतें. सारांश अनेक वर्णांच्या कमलांनीं युक्त असलेलें तें सरोवर अनेकरंगी गालिच्याप्रमाणें दिसत होतें ( १६-२० )

अरविंद, उत्पल, पद्म, सौगंधिक इत्यादि नानाप्रकारच्या कमलांनीं व फुलून गेलेल्या आम्रवनांनीं तें सरोवर युक्त असून मयूर पक्ष्यांच्या गर्जनेमुळें

स तां दृष्ट्वा ततः पम्पां रामः सौमित्रिणा सह ।
विललाप च तेजस्वी रामो दशरथात्मजः २२
तिलकैर्बीजपूरैश्च वटैः शुक्लद्रुमैस्तथा ।
पुष्पितैः करवीरैश्च पुंनागैश्च सुपुष्पितैः २३
मालतीकुन्दगुल्मैश्च भाण्डीरैर्निचुलैस्तथा ।
अशोकैः सप्तपर्णैश्च केतकैरतिमुक्तकैः २४
अन्यैश्च विविधैर्वृक्षैः प्रमदेवोपशोभिताम् ।
अस्यास्तीरे तु पूर्वोक्तः पर्वतो धातुमण्डितः २५
ऋष्यमूक इति ख्यातश्चित्रपुष्पितपादपः ।
हरेर्ऋक्षरजोनाम्नः पुत्रस्तस्य महात्मनः २६
अध्यास्ते तु महावीर्यः सुग्रीव इति विश्रुतः ।
सुग्रीवमभिगच्छ त्वं वानरेन्द्रं नरर्षभ २७
इत्युवाच पुनर्वाक्यं लक्ष्मणं सत्यविक्रमः ।
कथं मया विना सीता शक्यं लक्ष्मण जीवितुम् २८

नादित झालेले होते, असो. रामानें लक्ष्मणासहवतमान ती पुष्करिणी अवलोकन केली आणि लगेच तो दशरथपुत्र तेजस्वी राम ( सीतेकरितां ) विलाप करू लागला. कारण, तिळवा, माळुंग वड, लोध्र प्रफुल्लित कण्हेर, फारच प्रफुल्लित पुन्नाग, मालत्या व कुंद यांचीं झाडें, शिरस्, निवम, अशोक, सातवण, केवडा, कुसरी आणि इतरही नानाप्रकारचे वृक्ष यांनीं ती पुष्करिणी युक्त असल्यामुळें ( अनेक अलंकार धारण केलेल्या ) तरुण स्त्रीप्रमाणें दिसत होती. "पूर्वी कबंधानें सांगितलेला पर्वत या पुष्करिणीचेच तीरीं असून हा नानाप्रकारच्या धातूंनीं भूषित झालेला आहे. ( २१-२५ )

ऋष्यमूक म्हणून हा प्रसिद्ध आहे आणि चित्रविचित्र प्रफुल्लित वृक्षांनीं हा युक्त आहे. असो. त्या महात्म्या ऋक्षरजनामक वानराचा पुत्र एक वानर, या पर्वतावर वास्तव्य करीत आहे. आणि तो महावीर्यवान् असून सुग्रीव या नांवानें प्रसिद्ध आहे. यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा, तूं वानरराज सुग्रीवाकडे जा " असें पुनरपि सत्यपराक्रमी रामानें लक्ष्मणाला सांगितलें आणि, "हे लक्ष्मणा ! सीते-

इत्येवमुक्त्वा मदनाभिपीडितः स लक्ष्मणं वाक्यमनन्यचेतनः ।
विवेश पम्पां नलिनीमनोरमां तमुत्तमं शोकमुदीरयाणः २९
क्रमेण गत्वा प्रविलोकयन्वनं ददर्श पम्पां शुभदर्शकाननाम् ।
अनेकनानाविधपक्षिसंकुलां विवेश रामः सह लक्ष्मणेन ३०

इत्यार्षे श्रीमद्रा०वाल्मी० आदिकाव्येऽरण्यकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः॥७६[२४७८]

## इति अरण्यकाण्डं समाप्तम् ।

---

वाचून जिवंत राहणें मला कसें बरें शक्य होईल ?" इतकेंच भाषण लक्ष्मणाशीं करून मदनानें पीडित झालेला आणि सीतेशिवाय मनामध्यें दुसरें कांहींच नसलेला तो राम आपलें तें साचलेलें पराकाष्ठेचें दुःख प्रकट करीत करीत त्या कमलांनीं युक्त असलेल्या मनोहर पंपापुष्करिणीमध्यें प्रविष्ट झाला. सारांश, क्रमाक्रमानें वन अवलोकन करीत, गेल्यावर जिच्या तीरीं असलेल्या वनाचें दर्शनही शुभ आहे आणि नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं जी गजबजून गेलेली आहे अशी ती पंपापुष्करिणी रामानें पाहिली आणि लक्ष्मणासहवर्तमान त्यानें त्या पुष्करिणीमध्यें प्रवेश केला. ( २९-३० )

ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण नावाच्या आदिकाव्यातील अरण्यकाण्डांपैकीं शहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७६ ॥

## ॥ अरण्यकाण्ड समाप्त झालें ॥

श्री वाल्मीकि रामायणांतर्गत

## अरण्यकाण्डाचें

# समालोचन

### दण्डकारण्यांतील आश्रम-समुदाय

रामचन्द्रानें दंडकारण्यामध्यें येतांच आश्रम-समुदाय पाहिला, तो त्याच असा दिसला—

प्रविश्य तु महारण्यं दण्डकारण्यमात्मवान् ।
रामो ददर्श दुर्धर्षस्तापसाश्रममण्डलम् ॥ १ ॥
कुशचीरपरिक्षिप्तं ब्राह्म्या लक्ष्म्या समावृतम् ।
शरण्यं सर्वभूतानां सुसंमृष्टाजिरं सदा ॥ २ ॥
मृगैर्बहुभिराकीर्णं पक्षिसंघैः समावृतम् ॥ ३ ॥
पूजितं चोपनृत्तं च नित्यमप्सरसां गणैः ।
विशालैरग्निशरणैः स्रुग्भाण्डैरजिनैः कुशैः ॥ ४ ॥
समिद्भिस्तोयकलशैः फलमूलैश्च शोभितम् ॥ ५ ॥
( अरण्यकाण्ड स १ )

जितेन्द्रिय रामचन्द्र दण्डकारण्यांत प्रविष्ट झाला, तेव्हां त्यानें तेथें आश्रमाचे अनेक समूह पाहिले. एक एक आश्रम ३०।४० झोंपड्यांचा धरला तरी अशीं अनेक आश्रम-मंडलें या दण्डकारण्यामध्यें होतीं. अर्थात् येथें शेंकडों ऋषिमुनि राहत असत. गांवांतील दाट वस्ती येथें असण्याचें कारण नव्हतें. आपल्या झोंपडीच्या चारही बाजूंस फूलझाडें, कंदमुळें आदि खाण्यापुरती उद्यानव्यवस्था प्रत्येकाला करतां येईल इतकी प्रशस्त जागा पर्णकुटिके बाहेर प्रत्येकाच्या असे. अशा अनेक पर्णकुटिका जवळ जवळ असत. हें एक आश्रम-मण्डल झालें.

मर्षी अनेक आश्रम-मण्डलें तेथें होतीं व एवढी मोठी वस्ती या दण्डकारण्यांत होती. सर्व तपस्वी वेदाभ्यास करीत असत. हे तपस्वी वेदमंत्रांतील गूढ अर्थाचें मनन करीत व मानवधर्माची पडी नीट कशी बसेल याचा येथें स्वतंत्र वातावरणात राहून हे विचार करीत असत. (*ब्राह्मा लक्ष्मया समावृतं*) ब्राह्मतेजानें तेजस्वी झालेले हे आश्रम होते. अर्थात् येथें हिंसा नव्हती. शिकार कोणी करीत नसे. त्यामुळें पशुपक्षी-मृग, मोर आदिकांना या ऋषिंपासून आम्हांस भय नाहीं असें वाटे व यामुळें ते निर्भय होऊन या आश्रमांत हिंडत असत.

(**सर्वभूतानां शरण्यं**) मनुष्य, व पशुपक्षी यांनीं आनंदानें येथें विश्राम घ्यावा असें शान्त व सुरम्य वातावरण येथें असे. सर्वत्र शान्ति, सर्वत्र स्वच्छता, नीटनेटकेपणा, रमणीयता असल्यामुळें हीं आश्रमस्थानें आकर्षक झालेली होतीं.

अप्सरांचे तांडे (**अप्सरसां गणैः उपनृत्तं**) तेथें येत व नाचत असत. हे बहुधा आश्रमाचा मान राखण्यासाठीं येत असावे, नाहींतर येथें त्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. अप्सरा व आश्रम याचा संबंध नीट दिसत नाहीं. या अप्सरा येथें भक्तिभावानेंच येत असल्या पाहिजेत असें वाटतें.

जिकडे तिकडे लहान मोठ्या होमशाळा होत्या; तेथें स्रुक, स्रुवा, यज्ञपात्रें, दर्भ, समिधा व पाण्यानें भरलेले कलश व अन्य यज्ञसाधनें दिसत होतीं. तेथें प्रत्यही हवन होत असल्यामुळें यज्ञाचा सुगंध त्या वायुमंडलमध्यें भरलेला होता. कंदमुळें व फळें तेथें भरपूर दिसत होतीं वेदघोष, यज्ञ, हवन यांनीं ते आश्रम दुमदुमलेले होते. सरोवरामध्यें भरपूर प्रफुल्लित कमलें व पुष्पांनीं ओतप्रोत भरलेले वृक्ष येथें असल्यामुळें ते आश्रम फारच रमणीय व मनोहर दिसत होते—

> पुण्यैश्च नियताहारैः शोभितं परमर्षिभिः।
> तद्ब्रह्मभवनप्रख्यं ब्रह्मघोषनिनादितम्।
> महाभैर्द्विर्महाभागैः ब्राह्मणैरुपशोभितम्॥ ९॥
> (अरण्यकाण्ड स० १)

' पुण्य आचरण करणारे, ज्यांनीं आहार परिमित केला आहे अशा श्रेष्ठ ऋषींनीं हे आश्रम सुशोभित झालेले होते. ब्रह्मभवनाप्रमाणें आश्रम तेजस्वी दिसत होते व चहुंकडे वेदघोषानें ते निनादीत झालेले होते. ब्रह्मज्ञानी महाभाग्यवान् ब्राह्मणानीं ते सुशोभित झालेले होते ' याप्रमाणें रात्रंदिवस येथें शुद्ध व दिव्य तत्त्वज्ञानाचा विचार चालत असे, ही तत्त्वज्ञानाची बाजू झाली. इतर सुखसोयी तेथें होत्याच उद्यानात राहिल्याप्रमाणें यांची वस्ती होती. कंदमुळें, फळें व भाजीपाले व अकृष्टपच्य अन्नें यांना विपुल मिळत होतीं. शेती न करतां पुष्कळ ठिकाणीं भात पिकतें, तें पचावयाला हलकें व कोणताही अपाय न करता शरीराची पुष्टि वाढवणारें असतें कोंकणांत, तसेंच बंगालमध्यें आपोआप उगवणारें भात पुष्कळ पिकतें. ब्रह्मदेशात तर याचें पीक विपुलच आहे ब्रह्मपुत्रा नदीच्या तीरावर हें पीक उत्तम येतें सर्व अकृष्टपच्यभातामध्यें ब्रह्मदेशात उत्पन्न होणारें भात सर्वोत्कृष्ट समजलें जातें हें अत्यंत रुचिकर, स्वादिष्ट, *सहज पचणारें व उत्तम पौष्टिक असतें ब्रह्मलोक-ब्रह्मदेवाचा प्रदेश-हाच. येथेंच* पूर्वेकडील भागात ब्रह्मदेवाचा आश्रम होता. पहिला संस्कृतीचा प्रारंभ येथेच झालेला सर्व भारतामध्यें ब्राह्मण गेले ते ब्रह्मपुत्रा-इरावती नदीच्या काठावरून गेले ब्रह्मावर्तांत, आर्यावर्तांत व अनेक ठिकाणच्या नदीतीरावर यानीं वस्ती केली व आता रावणसाम्राज्याचा नाश करण्यासाठीं दक्षिण भारतातील वन्य जातींचा उठाव करण्यासाठीं दक्षिणेत हेच ब्राह्मण आश्रम घालून, विद्यार्थ्यांस फुकट शिकवण्याच्या मिषानें वसलेले होते. रावणसाम्राज्याच्या विरुद्ध यानींच क्रान्ति केली व रामाकडून त्या साम्राज्याचा नाश करविला.

एक एका ऋषींनें रामचन्द्राला कसकसें सहाय्य केलें ते वाचकानीं लक्ष्यपूर्वक पुढें पहावें एका आश्रमात स्वतः इन्द्र येतो, तेथील मुख्य आचार्यांस भेटतो, धनुष्यबाण रामचंद्राला देण्यासाठींच म्हणून त्याच्या जवळ ठेवतो, *आश्रमातील ऋषि तीं शस्त्रास्त्रें सुरक्षित ठेवतात, रामचन्द्राला वेळेवर तीं देतात,* इन्द्र रामचन्द्राला पाहूनही त्यास न भेटता तेथून निघून जातो, या सर्व व्यवहारामध्यें राजकारणाशिवाय दुसरा कांहीं अर्थ काढतां येणार नाहीं ( अरण्य काण्ड ५ वा सर्ग पहा )

या क्रान्तीच्या व्यवहारामुळें ऋषि हे केवल ध्यान धारणेनें योगसाधनच येथें करीत असें म्हणता येणार नाहीं. **अध्यात्मावर अधिष्ठित झालेलें त्यांचें राजकारण होतें**, किंवा त्याचें जीवनही तसेंच होतें. रामचन्द्राला दशरथाच्या राजवाड्यातून यांनींच बाहेर काढला, त्यास विश्वामित्रानें शस्त्रास्त्रविद्या शिकविली, रानावनात हिंडवून निर्भयपणाची दीक्षा यांनींच त्यास दिली, राजवाड्यांत राहून जी त्याच्या शरीरात कोमलता उत्पन्न होत होती, ती दूर करून तेथें कणखरपणा आणण्याच्या योजना हेच करीत असत. हा या ऋषिमुनींचा क्रान्तीचा उपद्व्याप राक्षसांच्याही लक्ष्यात आलेला होता.

यामुळें राक्षस ऋषि-आश्रम व ऋषिलोक यांचा नाश करीत. राक्षसांचें साम्राज्य मोडून टाकावें व तेथें आर्यांचें साम्राज्य करावें, अशा महत्वाकांक्षेनें ऋषि यत्न करीत; यामुळें ऋषि व राक्षस यांचे वैर येथें अगदीं स्वाभाविक होतें. साम्राज्याचा घात करण्याची क्रांतीची चळवळ चहूंकडे उठवणारे हे ऋषि होते. अशी चळवळ हे करीत व राक्षसानीं यांचा नाश केला व यांचा यज्ञ होऊं दिला नाहीं, म्हणजे राक्षसांचा द्वेषही हेच करीत. या राक्षसांच्या द्वेषानें मूळ ऋषींच्या क्रान्तीच्या चळवळींत होतें हें येथें विसरतां नये. राक्षसांचें वर्तनही द्वेष क ण्याजोगेंच असे

ऋषि आश्रम हे या वेळीं रावणसाम्राज्याचा नाश करण्याच्या क्रान्तिकारक चळवळाचे अड्डेच बनलेले होते असे अनेक आश्रम या दण्डकारण्यात होते. अरण्यकाण्डात आश्रम वर्णनें अनेक ठिकाणीं आहेत सर्ग ७ व ८, सर्ग ११–१३, १५; ३५ याप्रमाणें या अरण्यकाण्डात अनेक ठिकाणीं आश्रम वर्णनें आहेत. तीं सर्व वर्णनें एकाच प्रकारचीं आहेत जेथें सरोवर असे, नदी किनारा सुरक्षित असे रमणीय झाडी असे, हवापाणी आरोग्यकारक असे, तेथें ऋषिलोक आश्रम करून राहत असत

दण्डकारण्यातील मूळची वस्ती फारशी सुशिक्षित नव्हती हे ऋषि फार विद्वान व योजक होते. यच पण साधी राहणी व श्रेष्ठ विचारसरणी यांची असे. फळझाडें व फुलझाडें लावावीं व रमणीय उद्यान बनवावें व तेथें कुमारांना घेऊन त्यांना विद्या देऊन तयार करावें हा यांना उद्योग असे

सध्यां हिमालयामध्यें अमेरिकन मिशनरी येऊन पुष्कळ ठिकाणीं वसले आहेत. इंग्रजांनीं ही तेथें अनेक मळे केले आहेत. हिमालयांतील हिंदु वसती गलिच्छ व अगदी दरिद्री आहे. रोजच्या चार आठ आणे मजुरीसाठीं ७।८ मैल चालतही हे जातात. यांच्या याच प्रदेशांत हे युरोपीयन व अमेरिकन लोक फळांचे मोठा-मोठे बाग उठवीत आहेत व पोष्टानें तसेंच रेल्वेनें ही फळें पाठवून लाखों रु० कमावीत आहेत. हिमालयांतील जमिनींचे सारे मालक दारिद्र्यात सडत असताना त्याच जमिनींत उत्तम नन्दनवनें विदेशी लोक बनवीत आहेत व त्यावर ते गबर होत आहेत. हा शिक्षणाचा व ज्ञानाचा परिणाम आहे.

तसाच प्रकार दण्डकारण्यांतील मूळचे रहिवाशी व हे आर्यऋषि यांच्या वागणुकींत व व्यवहारात दिसत आहे. ज्या भूमीमध्यें मूळचे रहिवाशी उपाशी मरत आहेत, तेथें विद्येच्या जोरावर ऋषिलोक उत्तम फळें व फुलें निर्माण करून उत्तम उपजीविका व मोठमोठीं गुरुकुलें चालवीत असलेले दिसत आहेत. दुरूनच येथें ऋषि-आश्रम आहे असें उद्यानवाटिकेकडे पाहताच लक्ष्यात येत असे. ओसाड मुलुखांत रमणीय व उपयोगी झाडी निर्माण करणें व त्यावर शेंकडों तरुणांची उत्तम उपजीविका होईल अशी निर्मिती करणें हें ज्ञानानेंच होऊं शकतें

मूळचे जंगली लोक व ऋषि यातील हा राहणींतील फरक पाहण्यासारखा आहे. राहणीचा सुधार असा झाला पाहिजे वनाचें उद्यान बनवतां आलें पाहिजे शेंकडों विद्यार्थ्यांचा उदरनिर्वाह त्यावर व्हावा पाहिजे. तरच ऋषि-आश्रम स्वावलंबी होऊं शकतील. हे स्वावलंबी होते यांत शंकाच नाहीं व हे स्वावलंबी नसते तर क्रान्ति करूंही शकले नसते.

ऋषि-आश्रमांत क्रान्तीच्या योजना तयार होत. ऋषि, देव व आर्यराजे यांनीं मिळून रावणाच्या साम्राज्याचा नाश करून आर्यांचें राज्य स्थापण्याचा निर्णय दशरथाच्या राजसूय यज्ञामध्यें घेतला होता. यांत आर्यराजे गुप्तपणें या क्रान्तीला अनुकूल होते. देवांनीं या यज्ञांतील परिषदेंत भाग घेतला व मधून मधून सहाय्यही करीत; पण उघड भाग घेण्यास तेही धजत नव्हते.

*

रावणाचा इतका मोठा दरारा होता ऋषि मात्र या चळवळींत केव्हा उघडपणें तर केव्हां भूमिगत राहून भाग घेत असत. अर्थात् ही क्रान्तीची चळवळ ऋषींनींच मुख्यतः चालविली होती असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं या संबंधींचे निर्देश वेळोवेळीं या लेखामध्यें पुढें दाखवण्यांत येतील.

## श्रीरामचन्द्रांची पूजा

जेव्हा श्रीरामचन्द्र दण्डकारण्यात हिंडूं लागले, तेव्हा तेथील ऋषींनीं त्याची अनेक वेळां पूजा केली आहे, तें वर्णन पाहण्यासारखें आहे; तें आता पहा —

तद् दृष्ट्वा राघवः श्रीमान् तापसाश्रममण्डलम् ।
अभ्यगच्छन्महातेजा विज्यं कृत्वा महद्धनुः ॥ १० ॥
(अरण्य स. १)

' श्रीरामचन्द्रांनीं तो आश्रमसमुदाय पाहिला व आपल्या मोठ्या धनुष्याची दोरी उतरून ते आश्रमाजवळ गेले, येथें आश्रमाचा मान कसा राखला जात असे तें दिसून येतें धनुष्य सज्य करून जाणें हें शिकारीला जाण्यासारखें हिंसक कर्म आहे व धनुष्याची दोरी उतरून जाणें यांत अहिंसावृत्ति दिसून येते व आश्रमांविषयींचा आदरही व्यक्त होतो. राम या लहानसहान गोष्टींजवळही किती काळजीपूर्वक व दक्षतेनें पाहत असे हें यावरून ध्यानीं येतें. या राजपुत्राला पाहून ऋषि त्याचा आदर करण्यासाठीं त्याला सामुदायिक रीतीनें सामोरे जातात पहा—

दिव्यज्ञानोपपन्नास्ते रामं दृष्ट्वा महर्षयः ।
अभिजग्मुस्तदा प्रीता वैदेहीं च यशस्विनीम् ॥११॥
मंगलानि प्रयुञ्जानाः प्रत्यगृह्णन् दृढव्रता ॥ १२ ॥
अतिथिं पर्णशालायां राघवं संन्यवेशयन् ।
ततो रामस्य सत्कृत्य विधिना पावकोपमाः ॥ १६ ॥
आजह्रुस्ते महाभागाः सलिलं धर्मचारिणः ।
मंगलानि प्रयुञ्जाना मुदा परमया युताः ॥ १७॥
मूल पुष्प फलं सर्वं आश्रमं च महात्मनः ।
निवेदयित्वा धर्मज्ञास्ते तु प्राञ्जलयोऽब्रुवन् ॥ १८ ॥
(अरण्य स० १)

ते दिव्यज्ञानी महर्षि आनन्दानें राम, सीता व लक्ष्मण यांना पाहून सामोरे गेले, ऋषींनी या राजपुत्रांना आशीर्वाद दिले व त्यांना नेऊन पर्णशालेमध्यें बसविलें. अग्निप्रमाणें तेजस्वी ऋषींनीं पाणी पायधुण्यासाठीं आणलें तसेंच मुळें, कन्द, फुलें व फलें आणून तें सर्व त्यांस अर्पण केलें व आश्रमही तुमचाच आहे असें ते ऋषि रामास म्हणाले.

हा सत्कार करीत असतां सर्व ऋषि ( प्राञ्जलयः ) हातजोडून रामा समोर चसले होते. रामाचें वय लहान व ऋषींचें वय फार होतें. तथापि ऋषि रामापुढें हात जोडतात, याचें कारण राम हा राजपुत्र होता हें आहे. राजाचा व राजपुत्राचा मान अशाच विशेष रीतीनें नेहमींच केला जातो व तो योग्यही आहे.

एवमुक्त्वा फलैर्मूलैः पुष्पैरन्यैश्च राघवम् ।
वन्यैश्च विविधाहारैः सलक्ष्मणमपूजयन् ॥ २३ ॥
( अरण्य स० १ )

'असें बोलून त्या ऋषींनीं फलें, मुळें, फुलें यानीं व अन्य वन्य भक्ष्य पदार्थांनीं त्या रामाची पूजा केली.' हेंच पूजासाहित्य सर्वत्र वापरण्यांत येत असे असें दिसतें. आजही हेंच पूजासाहित्य वापरलें जात आहे

## अगस्ति मुनि

राम दण्डकारण्यांत येऊन दहा वर्षे झालीं. तेथें त्यानें राक्षसांचा संहार पुष्कळच केला. तेव्हां एके दिवशीं सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमात आनदानें वार्तालाप चालले असतां रामानें प्रश्न केला कीं, 'मला अगस्त्य मुनींचें दर्शन घ्यावयाचें आहे. तर ते कोठें राहतात तें सांगा '

सुतीक्ष्णमुनि म्हणाले--' या आश्रमापासून चार योजनें दक्षिणेस चालून गेल्यावर तुला जो आश्रम दिसेल तो अगस्ति मुनींचा आश्रम आहे. तेथें वृक्ष-वनस्पतींची रमणीयता फारच आहे. हंस, कारंडव, चक्रवाक आदि पक्षी तेथें आनंदानें उडत आहेत. नानाप्रकारचीं कमलयुक्त सरोवरें तेथें आहेत.' ( अरण्य ११।३६-४५ )

# अगस्त्यमुनींचा पराक्रम

अगस्त्य मुनींचा पराक्रम कांहीं लहानसहान नव्हता. दक्षिण दिशेचा मार्ग त्यांनीच सर्वांस जाण्यायेण्यास योग्य व निर्भय केला होता. त्याचा इतिहास असा आहे—

सह्याद्रीच्या दक्षिणेस कोणी जाण्यास धजत नसत. ती दिशा आर्यांना वसती करण्यास योग्य आहे असें पाहून अगस्ति मुनि प्रथम उत्तरेकडून दक्षिणेकडे उतरले—

त्यांना याच ठिकाणीं इल्वल व वातापी यांचा आश्रम दिसला हे नरमांस-भक्षक राक्षस ब्राह्मणरूपानें आश्रम घालून येथें राहत असत. जे ब्राह्मण या मार्गानें येत त्यांना श्रद्धासाठीं हे बोलावीत आपल्या भावाचें मांस शिजवून त्यास खायला घालीत व त्याचें जेवण झालें म्हणजे 'हे वातापे! बाहेर ये' अशी हाक मारीत व तो वातापी ब्राह्मणाच्या पोटांत राक्षस बनून त्याचें पोट फाडून बाहेर येई व ते दोघे राक्षस याप्रमाणें त्या ब्राह्मणाला खाऊन टाकीत! असा यांचा क्रम अनेक वर्षे चालला होता याप्रमाणें यांनीं सहस्रावधि ब्राह्मण मारले होते. (अरण्य ११।५६–६१)

अगस्ति मुनि जेव्हां या बाजूला आले, तेव्हां त्यांच्यावरही हाच प्रयोग यांनीं केला! अगस्तीला कपटानें आपल्या भावाचें मांस खावयाला घातलें नंतर 'निष्क्रमस्व' (पोट फाडून बाहेर ये) असें इल्वल ओरडला. तेव्हां अगस्ति मुनी आपल्या पोटावरून डावा हात फिरवीत हंसत म्हणाले—

> अब्रवीत् प्रहसन् धीमान् अगस्त्यो मुनिसत्तमः ।
> कुतो निष्क्रमितुं शक्तिर्मया जीर्णस्य रक्षसः ॥
> भ्रातुस्तु मेषरूपस्य गतस्य यमसादनम् ॥ ६५ ॥
> (अरण्य ११)

"अरे! तुझा भाऊ माझ्या पोटात पचून तो यमाच्या घरीं पोंचला आहे. आतां त्याला परत येण्याची शक्ति नाहीं; यासाठीं आतां तो परत येणार नाहीं."

नंतर इल्वल अगस्तींना ठार करण्यासाठीं त्यांच्या अंगावर धावला. पण अगस्तींनीं त्यालाही नष्ट केलें,—

> निगृह्य तरसा मृत्युं लोकानां हितकाम्यया ।
> दक्षिणा दिक् कृता येन शरण्या पुण्यकर्मणा ॥८२॥
> यदा प्रभृति चाक्रान्ता दिगियं पुण्यकर्मणा ।
> तदा प्रभृति निर्वैराः प्रशान्ता रजनीचराः ॥८४॥
>
> ( अरण्य ११ )

'आमरित मुनींनीं सर्व लोकांचें हित व्हावें यासाठीं मृत्युसारख्या या राक्षसाचा नाश केला. तेव्हांपासून हा दक्षिण दिशा निर्भय झालेली आहे. व याच वेळापासून राक्षस शान्त व निर्वैर झाल्यासारखे दिसत आहेत '

राक्षसाना निर्वैर, शांत व निरुपद्रवी करण्याचा हाच एक मार्ग आहे. जे लोक त्यांच्याशीं शान्तीनें वागतात त्यांचा नाश राक्षस करतात. पण जे त्यांस टोले देतात, त्यांच्याशींच ते शान्तीनें वागूं लागतात!! असा यांचा स्वभाव आहे.

हा महत्त्वाचा राजनीतीचा पाठ येथें रामाला मिळाला **स्वतः बलवान बनावें, राक्षसांना टोला देण्याचें सामर्थ्य अंगीं आणावें,** म्हणजे राक्षस शान्त, निर्वैर, व निरुपद्रवी होतील जोपर्यंत असें वर्तन होणार नाहीं, तोपर्यंत राक्षस क्रूर कर्में करीत राहणारच

राक्षसांना शान्त व समंजस बनवण्यासाठीं आपलें सामर्थ्य वाढवणें आवश्यक आहे. आपलें सामर्थ्य व संघटन वाढलें की, ते समजस झालेच म्हणून समजावें

या कथेमध्यें श्राद्ध करणें व श्राद्धामध्यें ब्राह्मणांस मांस खावयास घालणें व तें त्यानीं खाणें, शिजवलेल्या मांसाचा पुनः राक्षस बनणें या कल्पना आहेत. कोणत्याही प्राण्याला कापून त्यानें मांस शिजविल्यानंतर त्या मांसाला हाक मारताच त्याचा जिवंत राक्षस बनणें हें अशक्य आहे हें सर्वांस माहीत आहे. पण या दृष्टीनें या कथेकडे पहावयाचेंच नाहीं. सध्याही आम्ही शरीच भाषा

वापरतों, ' रशियानें चीन खाल्ला ' असें म्हणतों याचा आशय सर्वांस समजतो तसाच आशय येथें आहे. अगस्ति मुनीनें या राक्षसाना ठार मारलें व दक्षिण दिशा निर्भय केली. तेव्हापासून दक्षिण दिशा मनुष्यांना जाण्यायेण्यास सुरक्षित झाली आहे.

इतर ऋषिमुनि राक्षसांशीं अहिंसा, शान्ति, प्रेम, निर्वैरभाव अशा सात्विक मार्गानें वागत. या सात्विक गुणांचा राक्षसावर कांहीं उपयोग होत नसे. हें पाहून अगस्तींनें त्याना ठोकून काढलें. तेव्हांपासून तेच राक्षस प्रेमानें वागूं लागले ! हा महत्त्वाचा राजनीतीचा पाठ येथें आहे. तो सर्वांनीं घेणें योग्य आहे. जगात शान्ति रहावयाची असेल तर दुष्टाना दण्ड देऊनच ती राहूं शकेल. दुष्टांचा सत्कार करून ते कधींही शान्त होणार नाहींत. अगस्तीचा प्रभाव पहा--

नात्र जीवेत् मृषावादी क्रूरो वा यदि वा शठः ।
नृशंसः पापवृत्तो वा मुनिरेष यथाविधः ॥ ९१ ॥

( अरण्य ११ )

' या अगस्तिमुनीच्या आश्रमात कोणीही असत्यभाषण करणारा, क्रूर, शठ, घातकी, पापी निर्वंत राहूंच शकत नाहीं, असा या अगस्त्य मुनीचा दरारा होता. यांची शिस्त अशी भयंकर आहे कीं, थोडें इकडचें इकड झालें कीं दण्ड झालाच. यामुळें येथें सर्व वातावरण शान्त झालेलें होतें कडक शिस्त असल्याशिवाय दुष्ट वठणीवर येत नाहींत.

इतर ऋषिमुनि व अगस्ति मुनि यांच्या वागणुकीमधील हा विशेषपणा लक्ष्यात ठेवण्यासारखा आहे. अगस्तिमुनि जर दक्षिणेंत उतरले नसते व त्यानीं जो कडकपणा दाखवला तो दाखवला, नसता, तर इतर ऋषिमुनींची वसती दण्डकारण्यात टिकूं शकली नसती. इतकें महत्त्व अगस्ति मुनीच्या त्या वेळच्या हालचालीचें होतें. हे अगस्ति मुनि दक्षिण भारतातच राहिले होते असें नसून, ते दाक्षिणेकडील द्वीपांमध्यें पुष्कळ दूरपर्यंत प्रवास करून आले होते व सर्वत्र त्यानीं आपला दरारा असाच बसविला होता

# इन्द्राचें दर्शन

ज्या वेळीं राम शरभंगऋषीच्या आश्रमाजवळ पोंचला, त्याच वेळीं इन्द्राची स्वारी त्या ऋषींच्या आश्रमामध्यें आली होती. अर्थात् या आगमनाचा हेतु रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याचा होता हें या वेळच्या इन्द्राच्या हालचालींवरून सहज समजण्यासारखें होतें. कारण राम आश्रमांत आला आहे असें समजलें असतांही त्याची भेट योग्य वेळीं पुढें घेऊं ही वेळ योग्य नव्हे, असें म्हणून तो निघून जातो. भूमिगत हालचाली होत असल्याचें हें सूचक आहे. इन्द्राला या वेळीं असें दाखवावयाचें होतें कीं, मी ऋषींची भेट घेण्यासाठींच आलें होतों. वनवासांत असलेल्या रामाची भेट घेण्याचें मला कारण नाहीं. हें इन्द्रानें बाह्यतः दाखवलें हें खरें, पण त्याच्या हालचालीवरून व बोलण्यावरून रामाच्या हालचालींकडे त्याचें पूर्ण लक्ष्य होतें, असें स्पष्ट दिसतें. या वेळचें इन्द्राचें वर्णन सम्राटाच्या भपकेदार व प्रभावशाली वर्णनासारखें आहे. पहा—

विभ्राजमानं वपुषा सूर्यवैश्वानरप्रभम् ।
रथप्रवरमारूढं आकाशे विबुधानुगम् ॥ ५ ॥
असंस्पृशन्तं वसुधां ददर्श विबुधेश्वरम् ।
हरितैर्वाजिभिर्युक्तं अन्तरिक्षगतं रथम् ॥ ७ ॥
पाण्डुराभ्रघनप्रख्य चन्द्रमण्डलसंनिभम् ।
अपश्यद्विमलं छत्रं चित्रमाल्योपशोभितम् ॥ ९ ॥
चामरव्यजने चाग्र्ये रुक्मदण्डे महाधने ।
गृहीते वरनारीभ्यां धूयमाने च मूर्धनि ॥ १० ॥
सहसंभाषमाणे तु शरभंगेन वासवे ।
दृष्ट्वा शतक्रतुं तत्र रामो लक्ष्मणमब्रवीत् ॥ १० ॥
इमे च पुरुषव्याघ्र ये तिष्ठन्त्यभितो दिशम् ।
शतं शत कुण्डलिनो युवानः खड्गपाणयः ॥ १५ ॥
विस्तीर्णविपुलोरस्काः परिघायतबाहवः ।
शोणांशुवसनाः सर्वे व्याघ्रा इव दुरासदाः ॥ १६ ॥

उरोदेशेषु सर्वेषां हारा ज्वलनसंनिभाः ।
रूपं बिभ्रति सौमित्रे पञ्चविंशतिवार्षिकम् ॥ १७ ॥
(अरण्य ५)

'सूर्य व अग्निप्रमाणें तेजस्वी शरीरकांतीनें युक्त आकाशगामी रथावर बसलेला, ज्याच्याबरोबर अनेक देव आहेत असा इन्द्र, जमिनीवर उतरला असताही ज्याचे पाय जमिनीला स्पर्श करीत नाहीत, ज्याच्या रथाला हरिद्वर्ण अश्व जोडले आहेत, ज्याचें छत्र निर्मळ व शोभिवंत आहे, श्रेष्ठ स्त्रियांनीं हातांत घेतलेली चामरें ज्याच्या मस्तकावर ढाळत आहेत असा तो इन्द्र होता. शरभंग ऋषिबरोबर तो बोलूं लागला. अशा तेजस्वी इन्द्राला रामानें पाहिलें व तो लक्ष्मणाला म्हणाला. हे चारही बाजूला कानांत कुंडलें व हातांत खड्ग घेतलेले शंभर शंभर तरुण उभे आहेत. याच्या छात्या रुंद असून हात मुद्गला-प्रमाणें पुष्ट आहेत. हे वाघासारखे भयंकर आहेत व त्यांच्या शरीरावरचे कपडे अत्यंत तेजस्वी आहेत. ते सर्व २५ वर्षांच्या वयाचे दिसत आहेत.' हें इन्द्राचें वर्णन पाहिलें असतां सम्राटाचा थाट येथें दिसत आहे

चारही बाजूला शंभर शंभर शरीरसंरक्षक आहेत. ते हातात नागव्या तल-वारी घेऊन संरक्षणासाठीं दक्ष आहेत. वाघाप्रमाणें त्यांचा चेहरा भयंकर आहे. इन्द्राचें संरक्षण करण्यांत ते सदा दक्ष असल्यासारखे दिसत आहेत. ते तरुण-बांड केवळ पंचवीस वर्षांचे आहेत. स्वतः इन्द्र तेजस्वी, त्याचा रथ ही चमक-णारा, त्यावर श्वेत छत्र, मस्तकावर चवऱ्या व पंखे चालू आहेत व ते (वरनारी) श्रेष्ठ स्त्रियांनीं घेतलेले आहेत व त्या त्यास वारा घालीत आहेत. सर्व स्वच्छ, निर्दोष, भपकेदार, प्रभावी, तेजःपुंज, असें येथें आहे. जसें एखाद्या सम्राट्च्या भोंवतीं वातावरण असावें तसें तें येथें दिसत आहे. शरीरसंरक्षकही तसेच तेजस्वी आहेत. ऋषि-आश्रमांत इन्द्र आला असतांही इतके शरीरसंरक्षक बरोबर आणले जाव हें आश्चर्यकारक आहे. कदाचित् इन्द्र कोठें दुसरीकडे गेला असावा व तेथून तो परस्पर इकडे आला असावा अथवा तो इतके शरीरसंरक्षक सदोदितच बरोबर ठेवीतही असेल.

येथे 'वरस्त्री' असा शब्द श्रेष्ठ स्त्रीचा वाचक आहे. श्रेष्ठ स्त्रिया सम्राटावर छत्रचामरें व पंखे ढुलवीत असतील असें वाटत नाहीं. या संबंधींची परिपाठी काय होती तें पाहणें आवश्यक आहे. कदाचित् 'वारस्त्री' असा हा हा शब्द असेल व वारस्त्रिया हें काम करूं शकतील असें वाटतें. राजाजवळ अथवा सम्राटाजवळ श्रेष्ठ स्त्रिया अथवा वारस्त्रिया अशा सतत बरोबर असणें हें योग्य आहे कीं काय याचाही विचार होणें योग्य आहे. सम्राट् बाहेर जात असतां त्याच्याबरोबर चवऱ्या व पंखे हालवण्यासाठीं स्त्रिया जाव्या हें आज आपणास आश्चर्य वाटण्याजोगें आहे पण त्यावेळीं तें ऐश्वर्याचें लक्षण समजलें जात असावें.

राम शरभंगाच्या आश्रमांत आला हें पाहताच इन्द्र घाई करतो व निघून जातो व जातांना पुढें योग्य वेळीं रामाची व माझी भेट होईल असें म्हणतो. तेंच विशेष परिस्थितीचें सूचक आहे. पहा या वेळचे इन्द्राचे शब्द–

इहोपयात्यसौ रामो यावन्मां नाभिभाषते ।
निष्ठां नयत तावत्तु ततो मां द्रष्टुमर्हति ॥ २१ ॥
जितवन्तं कृतार्थं हि तदाहमचिरादिमम् ।
कर्म ह्यनेन कर्तव्यं महदन्यैः सुदुष्करम् ॥ २२ ॥

( अरण्य ५ )

'राम येत आहे असें पाहून इन्द्र देवांना म्हणाला कीं, हा राम इकडे येत आहे, परंतु इकडे येऊन हा माझ्याशीं भाषण करण्यापूर्वीच तुम्ही माझ्यासह येथून निघून जावें. इतरांस करण्यास अत्यंत कठीण असें फार मोठें कार्य याच्याकडून व्हावयाचें आहे.

या शब्दांमध्यें असा ध्वनि आहे कीं, या वेळीं जर इन्द्र रामास भेटला तर रामाकडून जें मोठें कार्य व्हावयाचें आहे त्यास अडचण उत्पन्न होइल. यासाठीं यावेळीं देव, ऋषि व राम या तिघांची एके ठिकाणीं व एका वेळीं भेट होऊं नये. रामाची व ऋषींची भेट होण्यास अडचण नाहीं. ती तर झालीच पाहिजे. पण मामध्यें देवही येऊन यांच्या गांठीभेटी होतात, याचा बभ्रा होतां

नये. याचाच अर्थ इन्द्रादिकांना या वेळीं आपल्या हालचाली गुप्त ठेवणें भाग होतें असा आहे. देवानीं एकान्तात ऋषींना भेटावें, रामाला देण्यासाठीं देवानीं ऋषींच्या आश्रमांत शस्त्रास्त्रेंही आणून ठेवावीं व ऋषींनीं तीं योग्य वेळीं रामाला द्यावीं; पण प्रत्यक्ष देव येतात व रामाला भेटतात, याची वान्यता बाहेर होऊं नये. अशी परिस्थिति त्यावेळीं होती

याचें कारण वाचकास सहज समजण्यासारखें आहे. देवाच राज्य राक्षसांनीं रावणानें हिरावून घेतलें होतें व देव जवळ जवळ रावणाच्या नजर कैदेंत होते. ऋषींना जितकें स्वातंत्र्य होतें तितकें देवाना नव्हते. देवाच्या हालचालीवर राक्षसाची दृष्टी होती. देव आपलें स्वराज्य प्रयत्न करून हिरावून घेतील हें भय राक्षसाना होतें ऋषिलोक याच खटपटींत आहेत हें ही राक्षस जाणत होते म्हणून ते ऋषींनाही मारीत पण ऋषि हे पूर्णपणें अहिंसावादी होते. एकट्या अगस्तिशिवाय कोणाही ऋषिनें राक्षसवध केलेला नाहीं. या अहिंसा-शील ऋषींचा वध केल्यानें राक्षसाची चहुंकडे निंदा होई. म्हणून दक्षिणेंतील अरण्यात आश्रम स्थापून तरुणाना शिक्षण देण्याचें काम करीत असलेल्या ऋषींचा पूर्णपणें संहार राक्षसही करूं शकत नव्हते जरी ऋषींच्या आश्रमां-तील तरुण पिढी ही 'रावणवधोद्यत' अशी तयार होत होती, तथापि आश्रमाच्या सात्विक व धार्मिक वायुमण्डलामुळें त्याचा बचाव होत असे व त्यांस यामुळें स्वातंत्र्य मिळत असे.

देवाची हालचाल मात्र इतकी स्वातंत्र्यानें होणें शक्य नव्हतें अमुक अमक्याला भेटला असें समजताच त्याची चवकशी होत असे व त्याचें प्रायश्चित देवाना भोगावें लागे. जरी इन्द्राचा डामडौल इन्द्राजरळ होता, तथापि राम हा अरण्यात येऊन राक्षसाचा संहार करीत आहे. हा 'मानवाचा कार्टा' उन्मत्त झाला आहे, असे वृत्तांत मधून मधून राक्षसाना कळत पण जर को इन्द्र, ऋषि व राम यांचा एकत्र विचारविनिमय होत आहे असें राक्षसांना कळलें, तर त्याचा दुष्परिणाम इन्द्रादि देवाना तत्काळ भोगावा लागणार यासाठीं इन्द्र स्वत ही निघून जातो व बरोबर आलेल्या देवाना ही निघून जावयास तो सुचवीत आहे.

इन्द्र किती सावध होता याचा एक वृत्तात येथें सांगण्यासारखा आहे राम-रावणयुद्धांत रावण रथामध्यें व राम पायीं जमिनीवर असें युद्ध होत असताही कुंभकर्ण, इन्द्रजित आदि अतिरथींचा वध झाला रावणाचें वरचेवर बळ नष्ट झालें व त्याचा नाश होणार हें ठरल्यासारखें झालें, त्यानंतर इन्द्रानें आपला रथ रामाजवळ पाठवला तोंपर्यंत इन्द्राची जी काय रामाबद्दल सहानुभूति असेल तर ती मनातच होती ही अवस्था लक्ष्यात घेतली म्हणजे ऋषि-आश्रमात इन्द्र रामाची भेट का घेत नाहीं तें समजल

इंग्रजी राज्यातील संस्थानिकांसारखें रावणराज्यात देव होते त्याच्याकडे डामडौल हवा तेवढा होता पण राक्षसाची ( रेसिडेंटाची ) वक्रदृष्टी सहन करण्याचे सामर्थ्य त्याच्यात नव्हतें

## ऋषि रामाला शस्त्रें देतात.

राम अगस्ति आश्रमामध्यें पोंचला, अगस्तीनें त्याचा उत्तम सत्कार केला व त्यास उत्तम शस्त्रास्त्रेंही दिलीं--

इदं दिव्यं महच्चापं हेमवज्रविभूषितम् ।
वैष्णवं पुरुषव्याघ्र निर्मितं विश्वकर्मणा ॥३२॥
अमोघः सूर्यसंकाशो ब्रह्मदत्तः शरोत्तमः ।
दत्तो मम महेन्द्रेण तूणी चाक्षय्यसायकौ ॥ ३३ ॥
संपूर्णौ निशितैर्बाणैर्ज्वलद्भिरिव पावकैः ।
महाराजतकोशोऽयं असिर्हेमविभूषितः ॥ ३४ ॥
अनेन धनुषा राम हत्वा संख्ये महासुरान् ।
आजहार श्रियं दीप्तां पुरा विष्णुर्दिवौकसाम् ॥ ३५ ॥
तद्धनुस्तौ च तूणी च शरं खड्गं च मानद ।
जयाय प्रतिगृह्णीष्व वज्रं वज्रधरो यथा ॥ ३६ ॥
एवमुक्त्वा महातेजाः समस्तं तद्वरायुधम् ।
दत्वा रामाय भगवान् अगस्त्यः पुनरब्रवीत् ॥ ३७ ॥
( अरण्य १२ )

' अगस्तीनें हेमवज्रयुक्त मोठें धनुष्य, अक्षय्य भाते, उत्तम तेजस्वी बाण हे सर्व रामाला दिले व यानीं राक्षसांचा नाश कर व यश मिळव असा आशीर्वाद ही दिला '

ऋषि लोक रावणसाम्राज्याचा नाश करण्याच्या योजनेमध्यें सहभागी होते हें या ठिकाणीं या वचनावरून स्पष्ट होत आहे दिव्य शस्त्रें यानीं याच-साठीं एकत्र करून ठेवलीं होतीं. तीं राम येताच त्यास दिलीं. यावेळीं अरण्यांत येऊन रामाला १० वर्षे झालीं होती व राक्षसवधाची प्रतिज्ञाही रामानें केली होती. ही प्रतिज्ञा रामाच्या तोंडून बाहेर पडल्यानंतर हीं शस्त्रास्त्रें रामाला ऋषि-कडून मिळत आहेत

## राक्षसांचें स्वरूप

राक्षस ही एक मानवांची जाती होती, अथवा तो एक वंश होता यामध्यें रावणबिभीषणा सारखे विद्वान होते. तसेच विराधासारखे अडाणी व जंगली ही राक्षस होत या जंगली विराधाचें वर्णन पहा—

गभीराक्षं महावक्त्रं विकटं घोरदर्शनम् ।
वसानं चर्म वैयाघ्रं वसार्द्रं रुधिरोक्षितम् ॥ ६ ॥
( अरण्य स २ )

' या विराध राक्षसाचे डोळे खोल होते, तोंड मोठें होतें, कुरूप व भयंकर स्वरूप होतें, रक्तानें थबथबलेलें वाघाचें चामडें पांघरलेला व ज्याच्या शरीरावर रक्त व चरबी माखलेली आहे असा तो विराध राक्षस होता ' अगदीं जंगली अवस्थेंतील माणसाचें हें वर्णन आहे ओलें कातडें पांघरण्याचीही ज्याला किळस नाहीं अशा राक्षसाला तेथें रामानें पाहिलें यानें खाण्यासाठीं कांहीं पशुचे शरीराचे भाग आपल्या शूलावर अडकविले होते व कदाचित् हा कच्चेंच मांसही खात असावा यावेळीं दण्डकारण्यामध्यें अशा राक्षसांची—अडाणी-जंगली, क्रूर मानवांची वसती होती

## राक्षस स्त्रियांना पळवितात

रामायणामध्यें जेथें जेथें राक्षसांचें वर्णन दिसतें, तेथें तेथें त्यांत धर्मकृत्यांचें विध्वंसन, स्त्रियांचें अपहरण व यथेच्छ मांसभक्षण हें दिसून येतें. तसेंच ब्रह्मदेव व महादेव ( श्री शंकर ) यांच्या वरप्रसादानें ते प्रबळ झाल्याचेंही दिसतें. कोठेंही विष्णूच्या सहाय्यानें राक्षस प्रबळ झाला आहे असें दिसून येत नाहीं. असें होण्याचें एकच कारण असावें कीं, ब्रह्मदेव व श्रीशंकर यांचाच संबंध या राक्षसांशीं विशेष असावा. ब्रह्मदेवापेक्षा श्रीशंकराचा संबंध भूत, पिशाच, असुर, राक्षस यांशीं विशेषच दिसत आहे. या काण्डांत या तृतीय सर्गामध्यें हा विराध म्हणत आहे कीं—

> विराध इति मामाहुः पृथिव्यां सर्वराक्षसाः ।
> तपसा चाभिसंप्राप्ता ब्रह्मणो हि प्रसादजा ।
> शस्त्रेणावध्यता लोकेऽच्छेद्याभेद्यत्वमेव च ॥ ६ ॥
>
> ( रा० अरण्य ३ )

' सर्व राक्षस मला विराध असें म्हणतात, मी तप करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतलें व शस्त्रानें अवध्यत्व मिळविलें आहे ' ब्रह्मदेवाच्या लक्ष्यांत हें आलें नाहीं कीं हा राक्षस या वरानें जनतेला पीडा देऊं लागेल. ब्रह्मदेव व श्रीशंकर यांनीं वर देऊन किती तरी राक्षस माजवून ठेवलेले दिसतात, ज्यांनीं जनतेला अतोनात त्रास देऊन जर्जर करून सोडलें व नंतर भगवान् विष्णूंनीं त्या राक्षसांचा कांटा काढून टाकला. केव्हां केव्हां तर हे ब्रह्मदेव व श्रीशंकर यांनीं वर देऊन उन्मत्त केलेल राक्षस यांच्याशीं भोळेपणानें फसले होते व यांना पळतां भुई थोडी झाली होती व शेवटीं यांच्यावरचें संकट भगवान् विष्णूंनीच दूर केलें. रामायणामध्यें त्यांचा भोळेपणा उपयोगी नाहीं हेंच तेथें दिसून येतें. हा विराध राम लक्ष्मणांना म्हणत आहे—

> उत्सृज्य प्रमदामेतां ताननपेक्षौ यथागतम् ।
> त्वरमाणौ पलायेथां न वां जीवितमाददे ॥ ७ ॥
>
> ( अरण्य २ )

' अरे राजकुमारांनो ! तुम्हांला जगावयाचें असेल तर या स्त्रीला येथें सोडा व जसे आलेत तसे पळून जा. असें तुम्ही केलेंत तरच तुमचे प्राण मी घेणार नाही. ' याप्रमाणें राक्षसाचा डोळा नेहमीं परस्त्रीवरच असल्याचें दिसून येतें.

या विराधाला रामानें ' हीनार्थ ' ( सं० ३१९ ) 'परस्त्री हरणासारखें नीच कृत्य करणारा ' असें म्हटलें आहे. राक्षसाची हीच संवय चहूंकडे दिसून येत आहे. रावणानें हेंच केलें, मारीचानें त्याला सहाय्य केलें, सध्यांही हेंच कर्म राक्षस भिन्न भिन्न रूपानें करीत असलेले दिसत आहेत. त्यांना लोकांनीं हुडकून काढून कडक शिस्तींत ठेवलें पाहिजे.

## राक्षसांना पुरीत असत

विराध राक्षसाला ठार मारल्यानंतर राक्षसाच्या चालीरीतीप्रमाणें त्याचें प्रेत पुरून टाकावें असें रामानें लक्ष्मणाला सांगितलें आहे, कारण विराधानेंच तसें यास सांगितलें होतें—

> अवटे चापि मां राम निक्षिप्य कुशली व्रज ।
> रक्षसां गतसत्त्वानामेष धर्मः सनातनः ॥ २२ ॥
> अवटे ये निधीयन्ते तेषां लोकाः सनातनाः ॥ २३ ॥
> कुञ्जरस्येव रौद्रस्य राक्षसस्यास्य लक्ष्मण ।
> वनेऽस्मिन्सुमहान् श्वभ्रः खन्यतां रौद्रकर्मणः ॥ २५ ॥
> इत्युक्त्वा लक्ष्मणं रामः प्रदरः खन्यतामिति ।
> तस्थौ विराधमाक्रम्य कंठे पादेन वीर्यवान् ॥ २६ ॥
> ( अरण्य ४ )

' हे रामा ! मला आता तुम्ही मारलें आहे, करितां आतां मला तुम्ही खड्ड्यामध्यें पुरून टाका. कारण मृत राक्षस पुरले तरच त्यांस शाश्वत लोकाची प्राप्ति होते असा राक्षसाचा सनातन धर्म आहे. ' असें विराधानें रामाला सांगितलें व रामानें आपल्या पायानें विराधाचा गळा दाबला व लक्ष्मणाला सांगितलें कीं, एक मोठा खड्डा येथेंच खण व त्यात त्याला आपण पुरून टाकू. त्याप्रमाणें लक्ष्मणानें कुदळ आणली व मोठा खड्डा खणून त्या राक्षसाला त्यात पुरून टाकला. '

या प्रमाणें राक्षसांना पुरीत असत. राक्षसही प्रेत पुरल्यानें सद्गति होते असें मानीत असत व आर्य ही राक्षसांसाठीं हा विधि आस्थेनें करीत असत.

राक्षस ब्रह्मदेव अथवा श्री शंकर यांच्याच वरानें प्रबल होतात. ते स्त्री लंपट असतात, दुसऱ्याची स्त्री पळवून नेण्यांचें त्यांना कांहीं वाटत नाहीं. नरमांसही खातात, अन्य मांस तर खातच असत. अधिक मांस खाणें अथवा कच्चें मांस, खाणें ही त्यांची संवय येथें दिसत आहे. तसेंच राक्षस मेल्यावर त्यास पुरण्याची चाल होती व पुरल्यानें त्यास सद्गति मिळते असा त्यांचा समज होता.

यावरुन अशीं कृत्यें करणाऱ्या जाती रामायणकालींही होत्या असें दिसतें. आजही कांहीं जातींत हे प्रकार आपणास आढळून येत आहेत.

## राक्षसांचीं अपकृत्यें

सोऽयं ब्राह्मणभूयिष्ठो वानप्रस्थगणो महान् ।
त्वं नाथो नाथवद्राम राक्षसैर्हन्यते भृशम् ॥ १५ ॥
एहि पश्य शरीराणि मुनीनां भावितात्मनाम् ।
हतानां राक्षसैर्घोरैः बहूनां बहुधा वने ॥ १६ ॥
परा त्वत्तो गतिर्वीर पृथिव्यां नोपपद्यते ।
परिपालय नः सर्वान् राक्षसेभ्यो नृपात्मज ॥ २० ॥

(अरण्य० ६)

'ब्राह्मण ज्यांमध्यें अधिक आहेत अशा वानप्रस्थी लोकांचा नाश हे दुष्ट राक्षस करीत असतात. तूं इकडे ये व मुनींच्या शरीरांच्या राशी पहा. हे सर्व सांगाडे राक्षसांनीं मारलेल्या मुनींचे आहेत आमचें तूच आतां संरक्षण कर कारण तुझ्याशिवाय आमचें रक्षण करणारा कोणी नाहीं '

वानप्रस्थी लोकांचीं शरीरें जाळीत नसत कीं काय ? जर जाळीत असते, तर मेलेल्या ऋषिमुनींचीं शरीरें, त्यांच्या राशी रामाला कशा दाखवितां आल्या असत्या ? संन्याशांना पुरण्याची चाल आहे. त्याचप्रमाणें वानप्रस्थी लोकांनाही करतात कीं काय तें पाहणें इष्ट आहे. येथें—

पम्पा नदी निवासानां अनुमन्दाकिनीमपि ।
चित्रकूटालयानां च क्रियते कदनं महत् ॥१५॥

(अरण्य ६)

पम्पा नदीपासून मन्दाकिनीपर्यंत व चित्रकूट पर्वतावर राहणारे एवढ्या मोठ्या क्षेत्रातील मुनींचा नाश हे दुष्ट राक्षस करीत असतात असें मुनींनीं रामाला सांगितलें आहे.

दशरथाच्या राजसूय यज्ञामध्यें ऋषि, देव व आर्य राजे जमले व त्या सर्वांनीं रावण साम्राज्याचा नाश करण्यासाठीं राष्ट्रीय चळवळ करण्याचें ठरवलें. त्या प्रमाणें ऋषिंनीं ही चळवळ सुरू केली. मधून मधून देवही गुप्तपणानें यांस सहाय्य करीत असत. उघडपणानें देवाचें सहाय्य होण्याची शक्यता नव्हती. ऋषींनीं दशरथाच्या राजवाड्यातून राम, लक्ष्मण व सीता याना बाहेर काढलें, रामलक्ष्मणाला शस्त्रास्त्रांचें उत्तम शिक्षण दिलें व दण्डकारण्यांतील राक्षसांचा संहार त्यांच्याकडून चालवला. इकडे वानरजातीच्या मुलांनाही 'रावणाचा नाश' करण्यासाठीं तयार करण्याचें शैक्षणिक काम चालवलें. अशा प्रकारें राक्षस साम्राज्याचा नाश करून तेथें आर्य राज्य स्थापन करण्याची चळवळ हे ऋषि मुनी करीत होते राक्षसाना हें कसें बरें सहन होणें शक्य आहे'? हें राक्षसांना सहन झालें नाहीं व आपलें राज्य उलथून पाडणाऱ्यांस त्यानीं मारलें, म्हणजे ऋषि-मुनी आर्यराजाकडे " हे दुष्ट राक्षस आमचीं धमकृत्यें चालूं देत नाहींत" अशी कागाळी करीत असत। मुनींवरील राक्षसांच्या अत्याचारांचा हा असा संबंध आहे.

या प्रमाणें ऋषिमुनींनीं रामाला राक्षसांच्या अपकृत्यांचें स्वरूप सांगितलें. रामाचें मन तयार करणें हा मुख्य हेतु व दण्डकारण्य सुरक्षित व्हावें हा दुसरा हेतु यांत होता

## राजाचें कर्तव्य

रामाचा सत्कार केल्यानंतर ऋषिंनीं जें भाषण केलें त्यांत राजाचें कर्तव्य कोणतें या संबधींचा मननीय बोध आहे, तो येथें पहा--

धर्मपालो जनस्यास्य शरण्यश्च महायशाः ।
पूजनीयश्च मान्यश्च राजा दण्डधरो गुरुः ॥ १९ ॥
इन्द्रस्येव चतुर्भागः प्रजा रक्षति राघव ।
राजा तस्माद्वरान्भोगान्स्याम्भुंक्ते नमस्कृतः ॥ २० ॥
ते वयं भवता रक्ष्या भवद्विषयवासिनः ।
नगरस्थो वनस्थो वा त्वं नो राजा जनेश्वरः ॥ २१ ॥
न्यस्तदण्डा वयं राजन् जितक्रोधा जितेन्द्रियाः ।
रक्षणीयास्त्वया शश्वद्गर्भभूतास्तपोधनाः ॥ २२ ॥

' राजा हा धर्माचें रक्षण करणारा व सर्व लोकांना आश्रय देणारा आहे. तूं दुष्टाला दण्ड करण्याची शक्ति धारण करतोस म्हणून तूं श्रेष्ठ, पूज्य व सन्मान करण्यास योग्य आहेस. इन्द्र हा देवांचा राजा आहे व येथील मानवांचा राजा हा त्याचा चतुर्थांश आहे. ( राजा हा विष्णुचा अंशच आहे. ) राजा प्रजेचें संरक्षण करतो, याप्रांठीं तो श्रेष्ठ व रमणीय भोग भोगतो व त्यास सर्व लोक वंदन करतात. तुझ्या देशांत आम्ही राहत आहों, म्हणून तूं आमचें रक्षण करावेंस. तूं नगरामध्यें रहा अथवा वनामध्यें रहा, तूंच आमचा राजा आहेस. आम्हीं क्रोधाचा संयम केला असून इंद्रियांचें आम्ही दमन केलें आहे व दुष्टांना दण्ड देण्याचें आम्हीं सोडून दिलें आहे याप्रांठीं तूंच आमचें संरक्षण केलें पाहिजे. '

ऋषि हे तत्त्वज्ञानाच्या चिंतनात नेहमीं रमलेले असल्यानें त्यानींच स्व-संरक्षणासाठीं हातांत शस्त्र घ्यावें हें सर्वथा आयोग्य आहे फार विद्वान्, विचारात मग्न, शास्त्रीय संशोधन करणारे असे जे असतात, त्याचें संरक्षण राजाच्या व्यवस्थेनेंच झालें पाहिजे. राज्यामध्यें स्त्रिया, बालक, वृद्ध, शिक्षणालयें, रासायनिक प्रयोगशाळा, प्रसूतिगृहें, रुग्णालयें आदींचें संरक्षण राजानेंच केलें पाहिजे. तेथें असलेले कर्मचारी लोक आपलें संरक्षण करू शकतील हें संभवनीय नाहीं. राष्ट्राकडूनच यांचें संरक्षण होणें इष्ट आहे, म्हणून येथें ऋषि म्हणत आहेत कीं, हे रामा ! तूंच आमचें संरक्षण कर. कारण तूं क्षत्रिय आहेस, राज-पुत्र आहेस करितां तुझें हें काम आहे.

हे आश्रम म्हणजे शिक्षणालयें होतीं. येथें राष्ट्राच्या भावी पिढीला उत्तम व विना मूल्य शिक्षण मिळत असे. अर्थात् हे राष्ट्राचे संरक्षणीय ठेवेच होते यांत शंका नाहीं.

ऋषि हे रावणाचें साम्राज्य उलथून पाडण्याच्या क्रान्तिच्या कटामध्यें संमिलित होतेच. राम वनवासात का आणला गेला, त्याला विश्वामित्र ऋषिनें शस्त्रास्त्रविद्या शिकवून का तयार केला हें सर्व त्यास माहीत होतें. कोणी केव्हा रामाला काय सांगावें या संबंधींचे संकेत जवळ जवळ ठरलेलेच होते. याप्रमाणें रामाच्या मनामध्यें हळू हळू राक्षसांच्या संबंधी द्वेष उत्पन्न करण्याचें काम हे ऋषि करीत आहेत. निरपराध ऋषींची हत्या हे राक्षस करीत असतात, यासाठीं राजानें यांना दण्ड देणें व ऋषींचें संरक्षण करणें हें राजपुत्राचें कर्तव्यच आहे. हें अ तात्पर्य रामाच्या मनामध्यें येथपर्यंत बिंबवलें गेलें. तें हळू हळू व अत्यंत सावधपणानें कसें बिंबवलें तें पाहण्यासारखें आहे.

राजाच्या कर्तव्याबद्दल अरण्यकाण्डाच्या ६ व्या सर्गामध्यें पुढें दिल्याप्रमाणें लिहिलें आहे—

> अधर्मः सुमहान् नाथ भवेत्तस्य तु भूपतेः ।
> यो हरेद्बलिषड्भागं न च रक्षति पुत्रवत् ॥ ११ ॥
> युञ्जानः स्वानिव प्राणान् प्राणैरिष्टान् सुतानिव ।
> नित्ययुक्तः सदा रक्षन् सर्वान् विषयवासिनः ॥ १२ ॥
> प्राप्नोति शाश्वतीं राम कीर्तिं स बहुवार्षिकीम् ।
> ब्रह्मणः स्थानमासाद्य तत्र चापि महीयते ॥ १३ ॥
> यत्करोति परं धर्मं मुनिर्मूलफलाशनः ।
> तत्र राज्ञः चतुर्भागः प्रजा धर्मेण रक्षतः ॥ १४ ॥
>
> ( अरण्य० ६ )

' प्रजेकडून सहावा भाग कराच्या रूपानें घेऊन जो राजा प्रजेचें पुत्रवत् रक्षण करीत नसेल, त्याला फारच मोठें पाप लागतें. प्रजेच्या रक्षणाविषयीं तत्पर असणारा व त्यांचे आपल्या प्रिय पुत्राप्रमाणें रक्षण करणारा राजा, आपल्या

देशांत राहणाऱ्या सर्व प्रजेचें उत्तम संरक्षण करील तर त्यास शाश्वत व पुष्कळ वर्षे टिकणारी कीर्ति प्राप्त होते त्याला पुढें ब्रह्मलोक प्राप्त होतो व तेथें ही त्याची प्रशंसाच होत असते कंदमूलफल भोजन करून मुनि जें पुण्य प्राप्त करतो त्याचा चौथा भाग धर्मानें प्रजेचें संरक्षण करणाऱ्या राजाला मिळतो '

या ठिकाणीं ( सर्वान विषमवासिन रक्षन् ) आपल्या राष्ट्रांतील सर्व लोकांचें संरक्षण करणें हें राजाचें काम आहे, असें जें म्हटलें आहे तें फार महत्त्वाचें आहे आपल्या राज्यांत धर्म, जाती, वर्ण वंश आदि कारणामुळें कोणाचाही पक्षपात न करता जो सर्वांचें संरक्षण करतो तो राजा यशस्वी होतो आपल्या धर्माच्या लोकांचेंच रक्षण करावें व दुसऱ्या धर्माच्या लोकांस छळावें असें जे कित्येक करतात, त्यांचा येथें निषेध आहे

## राजा तपस्वी लोकांचा सेवक

इद प्रोवाच धर्मात्मा सर्वानेव तपस्विन ।
नैव अर्हथ मा वक्तु आज्ञाप्योऽह तपस्विनाम् ॥ २१ ॥

( अरण्य ६ )

मुनिजन हो! तुम्ही असें बोलू नका, मला काय करावयाची ती आज्ञा करा तुम्ही मला आज्ञा करणें योग्य आहे मी तपस्वी लोकांचा सेवक आहें असें समजा '

राम याठिकाणीं मुनिजनांचें संरक्षण करण्यास तत्पर आहे असें स्पष्ट दिसत आहे

## रामाचा वनामध्यें निवास

कोठें दहा महिने, कोठें चार महिने, असें राम ऋषि आश्रमांत वास्तव्य करीत करीत राम येथें १० वर्षे राहिला

रमतश्चानुकूल्येन ययु सवत्सरा दश ॥

( अरण्य० ११२० )

दहा वर्षे राहिल्यानंतर राम पुन सुतीक्ष्ण मुनींच्या आश्रमांत आला व तेथें राहू लागला

## रामाच्या मनांतील हेतु

अगस्ति ऋषि रामाला म्हणाले—

हृदयस्थं च ते च्छन्दो विज्ञातं तपसा मया ।
इह वासं प्रतिज्ञाय मया सह तपोवने ॥ १६ ॥
अतश्च त्वामहं ब्रूमि गच्छ पञ्चवटीमिति ।

(अरण्य १३)

'तुझ्या हृदयांत काय आहे तें मला माहित आहे, यासाठीं मी तुला सांगतों कीं तूं आता पचवटीमध्यें जाऊन रहा.' येथें रामासाठीं शस्त्रास्त्रें जमा करून ठेवणारा व तीं रामास देणारा अगस्ति ऋषि रामाला म्हणत आहे कीं तुझ्या मनांत काय आहे तें मला माहीत आहे. या साठींच तो रामाला पंचवटीमध्यें जा व तेथें रहा असें सांगत आहे. कारण अगस्तिच्या आश्रमाजवळ राक्षस फिरकूं शकत नाहींत. अगस्तिचा बाणा राक्षसांना चांगला समजून चुकला होता. म्हणून राम अगस्तिच्या आश्रमांत राहिला तर रामाच्या मनातील हेतु कधींच सिद्धीस जाणार नाहीं यासाठीं रामानें येथें राहू नये, तर पंचवटीस जावें हें अगस्तिचें सांगणें पुढील कार्यक्रमाचें सूचक आहे

राक्षसांचा विध्वंस करण्याचें व्रत रामानें घेतलें होतें हें काम अत्यावश्यक ही होतें. पण अगस्ति आश्रमाच्या आजूबाजूला राक्षस फिरकत ही नसत. तेव्हा येथें राहिल्यानें रामाचा उद्देश सफळ कसा होणार ? यासाठीं रामाला ते म्हणत आहेत कीं तूं पंचवटीस जा तेथें राक्षसांचा झिंगाणा चालू आहे त्याच कामासाठीं मी हीं शस्त्रास्त्रें राखून इतके दिवस ठेवलीं होतीं.

रामाचा 'हृदयस्थ छंद' म्हणजे 'राक्षसांचें बंड मोडणें' हें या मुनिला समजलें होतें. त्याचें कारण ऋषि मुनि हे सर्व ठिकठिकाणीं घडलेले वृत्तांत परस्परांस कळवीत व काय करावयाचें व काय नाहीं ते ठरवून तसें घडवून आणीत रावण विरोधी कालीमधील महत्वाचा दुवा अगस्ति मुनि हा होता हें यावरुन समजून येईल 'रामाचें मनोगत' अगस्तिला रामाची भेट होण्याच्या पूर्वीच समजलें होतें. अर्थात् तें ऋषींच्या हालचालींनीं येथपर्यंत पोंचलें होतें.

## पंचवटीची पर्णशाला

पंचवटीमध्यें फळांनीं व फुलांनीं ओतप्रोत भरलेली जागा पाहून येथें आपण जटायुसह राहूं असें रामानें ठरवलें व लगेच लक्ष्मणानें पर्णशाला बनवली, असें वर्णन आहे.

> पर्णशालां सुविपुलां तत्र संघातमृत्तिकाम् ।
> सुस्तम्भां मस्करैर्दीर्घैः कृतवंशां सुशोभनाम् ॥ २१ ॥
> शमीशाखाभिरास्तीर्य दृढपाशावपाशिताम् ।
> कुशकाशशरैः पर्णैः सुपरिच्छादिताम् तथा ॥ २२ ॥
> समीकृततलां रम्यां चकार सुमहाबलः ।
> निवासं राघवस्यार्थे प्रेक्षणीयमनुत्तमम् ॥ २३ ॥
>
> ( अरण्य० १५ )

लक्ष्मणानें पर्णशाला बनवली. त्या पर्णशालेला मातीच्या भिंती होत्या. खोल्या प्रशस्त विस्तीर्ण होत्या. तिला चांगले खांब लावलेले होते. शमीवृक्षाच्या शाखा व वासे यांवर तिचें छप्पर बसवलेलें होतें सर्व वांसे बळकट बांधून ती तयार केली होती. ती प्रेक्षणीय व सुंदर अशी होती

ही पर्णशाला कांहीं अगदींच लहान नसावी. सीता व राम यांच्यासाठीं एक, लक्ष्मणासाठीं एक अशा दोन तरी खोल्या असतीलच बाहेर एक ओटी व स्वयंपाकघर एवढी जागा तरी येथें असेलच. जटायु कोठें तरी राहील असें मानलें तरी राम व लक्ष्मण यांच्यासाठीं निरनिराळ्या खोल्या तरी हव्याच

मातीच्या भिंती उभ्या राहण्यास कांहीं दिवस लागणारच. अगदीं लहान ही पर्णशाला होती असें जरी मानलें तरी २०'×३०' ची तरी असेल. सध्याच्या दिवसात सुतार व गवंड्याकडून मातीच्या भिंतीची एवढी पर्णशाला बनण्यास निदान ८।१० दिवस तरी लागतील. ही एकट्या लक्ष्मणानें केली असें येथें म्हटलेलें आहे. पंचवटीमध्यें जनस्थान जवळच असल्यानें लोकवस्ती कांहीं तरी असेलच. तेथील लोकांपहीं सहाय्यार्थ बोलावल्याचा उल्लेख नाहीं. एकट्या लक्ष्मणानेंच हें केलें असें मानलें व रामानें कांहींच केलें नाहीं असें

मानलें तर तें चमत्कारिक वाटतें आर्धी खाब उभारून वरलि छप्पर आर्धी तयार केलें व हळूहळू पाठीमागून भिंती घातल्या तर ही पर्णशाला सहज व लवकर होणें शक्य आहे

त्यावेळेच राजपुत्र किती काटक असत व त्याना कष्ट करण्याची गुरूगृहामध्यें कशा सवय होत असे हें येथें समजून येतें

## वास्तु शांति

पर्णशाला लक्ष्मणानें तयार केल्यानंतर त्या घरात जाऊन राहण्यापूर्वी लक्ष्मण स्नान करून स्वत तिचा वास्तुशान्ति करतो व मग राम तेथें राहतो, हें पाहण्यासारखें आहे या धार्मिक सत्काराकडे या राजकुमाराचें दुर्लक्ष्य होत नाहीं

स गत्वा लक्ष्मण श्रीमान् नदीं गोदावरीं तदा।
स्नात्वा पद्मानि चादाय सफल पुनरागतः ॥ २४ ॥
तत पुष्पबलिं कृत्वा शान्ति स च यथाविधि।
दर्शयामास रामाय तदाश्रमपद कृतम् ॥ २५ ॥
स त दृष्ट्वा कृत सौम्यं आश्रम सह सीतया।
राघव पर्णशालया हर्षमाहारयत् परम् ॥ २६ ॥
सुसहृष्ट परिष्वज्य बाहुभ्या लक्ष्मण तदा।

(अरण्य १५)

'नतर लक्ष्मण गोदावरी नदीवर जाऊन स्नान करून तथून फुलें व फळें घेऊन तो आला व त्यानें तेथें त्या पर्णशालेमध्यें पुष्पबलि व यथाविधि शान्ति केली व त्यानें ती पर्णशाला रामाला दाखविला सीतेसह रामानें तो आश्रम पाहिला तेव्हां त्यास फार आनद झाला व एवढें मोठें श्रमाचें काम केल्याबद्दल रामानें लक्ष्मणाला गाढ आलिंगन दिलें ' व नतर राम त्याला म्हणाला- मजजवळ दुसरें देण्यासारखें कांहीं नाहीं, म्हणून मी हें आलिंगन तुला दिलें आहे हे लक्ष्मणा माझा पिता जरी मृत झाला असला तरी तू येथें अभिप्राय जाणणारा माझें उत्तम पालन करण्यास तयार असल्यानें मला असें वाटत आहे का माझा पिता मेलाच नाहीं

भावज्ञेन कृतज्ञेन धर्मज्ञेन च लक्ष्मण।
त्वया पुत्रेण धर्मात्मा न संवृत्तः पिता मम ॥ २९ ॥
(अरण्य० १५)

इतकें बोलून सीतेसह राम त्या पर्णशालेमध्यें राहू लागला

## पंचवटीमध्यें हिमालय कोठें ?

राम लक्ष्मण यावेळीं पंचवटी–नासीक–मध्यें येऊन तेथें पर्णशाला बांधून राहू लागले आहेत तेथें शरदृतु संपून हेमंत ऋतु लागला आहे थंडीचा कडाका सुरु झाला आहे अशा वेळीं लक्ष्मण हिमालयाचें वर्णन करीत आहे हें कसें काय ?

प्रकृत्या हिमकोशाढ्यो दूरसूर्यश्च सांप्रतम्।
यथार्थनामा सुव्यक्त हिमवान् हिमवान्गिरिः ॥ ९ ॥
शून्यारण्या हिमध्वस्ता दिवसा भान्ति सांप्रतम्।
निवृत्ताकाशशयना॰ पुष्यनीता हिमारुणाः ॥ १२ ॥
रसवज्जलम् ॥ २५ ॥ (अरण्य० १६)

'हिमालयावर बर्फ वाढलें आहे सूर्य दूर गेला आहे हिमालय हा सत्य अर्थानें हिमाचें--बर्फाचें घर -बनला आहे बर्फानें अरण्यें नाश पावलीं आहेत रात्रीं कोणी उघड्या जागीं निजत नाहींत सूर्य पुष्य नक्षत्रावर मावळत आहे जमिनीवर बर्फ पडल्यामुळें ती पांढरी दिसत आहे. पाणी पाऱ्याप्रमाणें घट्ट झालें आहे'

नाशीकला कांहीं बर्फ पडत नाहीं व तेथून हिमालयही दिसत नाहीं तेव्हां लक्ष्मण पूर्वीच्या स्मरणानें असें बोलत असेल व जमिनीवर दव पडलेलें पाहून जो पांढुरका रंग सकाळीं दिसतो, तो साधारण बर्फासारखा दिसू शकतो, त्याचें हें वर्णनही कदाचित् असेल पण नाशीक पंचवटीकडे हें वर्णन अप्रस्तुत दिसतें एवढें मात्र खरें.

## राक्षसवध इष्ट कीं अनिष्ट?

त्रीण्येव व्यवसनान्यत्र कामजानि भवन्त्युत।
मिथ्यावाक्यं तु परमं तस्माद्गुरुतरावुभौ ॥ ३ ॥
परदाराभिगमनं विना वैरं च रौद्रता।

(अरण्य० ९)

सुतीक्ष्ण मुनींचा निरोप घेऊन राम वनात जाण्यासाठीं धनुष्यबाण हातात धारण करून निघाला असता त्यास सीता म्हणते–' हे रामा, कामापासून उत्पन्न झालेलीं तीन व्यसनें आहेत. (१) मिथ्या भाषण, (२) परस्त्रीगमन व (३) वैरावाचून क्रूर कर्म करणें.' हीं तीनही व्यसनें वाईट पण त्यात पाहिल्यापेक्षा पुढचीं दोन तर फारच वाईट आहेत. '

पुढें सीता म्हणते कीं ' तुम्ही खोटें कधीं बोलत नाहींच. परस्त्रीगमन तर तुमच्याकडून होत नाहींच कारण तुम्ही स्वस्त्रींचे ठिकाणींच रमत आहा. तेव्हा शिल्लक राहिलेलें जें तिसरें व्यसन ' वैर नसतांना क्रूर कर्म करणें ' (अरण्य ९।४–९) हें येथें आपल्याकडून होणार आहे—

प्रतिज्ञातस्त्वया वीर दण्डकारण्यवासिनाम्।
ऋषीणां रक्षणार्थाय वधः संयति रक्षसाम् ॥ १० ॥

(अरण्य. ९)

' तुम्ही तर या दण्डकारण्यातील मुनींचें संरक्षण करण्याची प्रतिज्ञाच केली आहे तेव्हा राक्षसांचा वध तुम्हाला करावाच लागणार ' व हा तर वैर न करणाऱ्यांचा वध असल्यामुळें दोषार्ह आहे, यासाठीं तुम्ही या दण्डकारण्यात जाऊ नये असें मला वाटतें असें सीता रामाला म्हणूं लागली.

त्वं हि बाणधनुष्पाणिर्भ्रात्रा सह वनं गतः।
दृष्ट्वा वनचरान् सर्वान् कच्चित्कुर्याः शरव्ययम् ॥ १४ ॥

(अरण्य. ९)

' हे रामा! तुम्ही धनुष्यबाण घेऊन आपल्या भावासह या वनात हिंडत राहणार व तेथें वनांत संचार करणाऱ्या श्वापदावर अथवा राक्षसावर बाण सोडून त्यांचा वध करणार ' हें मला योग्य वाटत नाहीं.

## शस्त्रधारणच पाप

सीतेच्या मतानें शस्त्रधारण हेंच पाप आहे. हें सिद्ध करण्यासाठीं तिनें रामाला पुढील गोष्ट सांगितली ती अशी–

" पूर्वी एका वनात एक पवित्र ऋषि तप करीत होते. त्याच्या तपात विघ्न करावें म्हणून इन्द्रानें त्याच्या आश्रमांत एक शस्त्र आणून ठेवलें त्या शस्त्राचें रक्षण करण्यासाठीं ते मुनि फार जपत असत कारण तें शस्त्र इन्द्रानें ठेव म्हणून ठेवलें होतें पुढें पुढें ते मुनी तें शस्त्र आपल्या बरोबर बाळगूं लागलें त्यामुळें पुढे त्याच्यात क्रूर बुद्धि उत्पन्न होऊ लागली. ही वृत्ति पुढें वाढली व शेवटीं या-मुळें ते नरकाला गेले—

नित्यं शस्त्रं परिवहन् क्रमेण स तपोधनः।
चकार रौद्रीं स्वां बुद्धिं त्यक्त्वा तपसि निश्चयम् ॥ २१ ॥
ततः स रौद्रीमभिरतः प्रमत्तोऽधर्मकर्षितः।
तस्य शस्त्रस्य संवासाज्जगाम नरकं मुनिः ॥ २२ ॥
(अरण्य ९)

या प्रमाणें आश्रमामध्यें शस्त्र ठेवल्यामुळें मुनिचा अधःपात झाला असें सीतेनें रामाला सांगितलें व पुढें ती म्हणते—

बुद्धिर्वैरं विना हन्तुं राक्षसान् दण्डकाश्रितान् ।
अपराधं विना हन्तुं लोको वीर न मंस्यते ॥ २५ ॥
क्षत्रियाणां तु वीराणां वनेषु नियतात्मनाम् ।
धनुषा कार्यमेतावदार्तानामभिरक्षणम् ॥ २६ ॥
क्व च शस्त्रं क्व च वनं क्व च क्षात्रं तपः क्व च।
व्याविद्धमिदं अस्माभिः देशधर्मस्तु पूज्यताम् ॥ २७॥
कदर्यकलुषा बुद्धिर्जायते शस्त्रसेवनात् ।
पुनर्गत्वात्वयोध्यायां क्षत्रधर्मं चरिष्यसि ॥ २८ ॥
अक्षया तु भवेत् प्रीतिः श्वश्रूश्वशुरयोर्मम ।
यदि राज्यं हि संन्यस्य भवेस्त्वं निरतो मुनिः ॥ २९ ॥
(अरण्य ९)

' राक्षस आपला द्वेष जोंपर्यंत करीत नाहींत, तोंपर्यंत त्यांचा वध करूं नये हें उत्तम होय अपराधावाचून राक्षसाचा वध करणें कोणालाही पसत होणार नाहीं. वनात राहणाऱ्या तपस्व्याचें संरक्षण करणें हें क्षात्रियाचें काम आहे. शस्त्र कोणीकडे, वन कोणीकडे, क्षात्रधर्म कोणीकडे व तप कोणीकडे ! तुम्ही या परस्पर विरुद्ध धर्माचें आचरण करण्याचें सोडा व वनातील मुनिधर्माप्रमाणें वागा शस्त्र धारण करणाऱ्या पुरुषाची बुद्धि कृपणाप्रमाणें मलिन होते. तुमचा क्षात्र धर्म आहे हें खरें पण जेव्हा अयोध्येमध्यें जाल तेव्हा खुशाल क्षात्रधर्माप्रमाणें शस्त्र बाळगा तुम्हीं राज्याचा त्याग करून वनांत आला आहा यासाठीं येथें मुनिप्रमाणें वागावें हें उत्तम होय असें केल्यानें तुमच्या सासूसासऱ्यानाही आनद होईल '

धर्मानें सर्व सुख मिळतें या साठीं तपोवनामध्यें तुम्ही मुनि-धर्मानें वागावें हेंच उत्तम आहे असें सीता रामाला म्हणू लागली व शस्त्र धारण करून पाप करू नका असें सागू लागली हिंसा हा अधर्म व अहिंसा हा धर्म आहे शस्त्र घेण्यानें हिंसेकडे प्रवृत्ती होते म्हणून शस्त्रच धारण करू नये. राक्षस असले म्हणून काय झालें, त्यांना हाणीत सुटणें योग्य नव्हे ते जोंपर्यंत आपणावर आक्रमण करीत नाहींत तोंपर्यंत आपण त्याचा वध करू नये असें सीता रामाला सागू लागली व वनात राहून शस्त्र धारण करू नका असें ती रामाला विनवू लागली.

यावर राम म्हणाला--

' हे सीते ! तू सागितलेंस तें सर्व खरें आहे पण त्याला ही दुसरी बाजू आहे तीही तू पहा--

> क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ।
> ते चार्ता दण्डकारण्ये मुनयः संशितव्रता ॥ ४ ॥
> भक्ष्यन्ते राक्षसैर्भीमैर्नरमांसोपजीविभिः ॥ ९ ॥
> सर्वैरेव समागम्य वागियं समुदाहृता ।
> अर्दिता स्म भृशं राम भवांस्तत्र रक्षतु ॥ १० ॥
> (अरण्य० १० )

' हे सीते ! क्षत्रिय शस्त्र एवढ्यासाठीं धारण करतात कीं राष्ट्रामध्यें आर्त स्वर निघू नये. सध्या या दण्डकारण्यात हे सर्व मुनि आर्त झालेले आहेत. नरमास-भोजी राक्षसाकडून ते ठार होत आहेत. अशा त्रासलेल्या मुनींनीच आमचें रक्षण कर असें मला सांगितलें आहे. " याप्रमाणें मुनींनीं सांगितल्यावरून त्यांचें रक्षण करण्याची मी प्रतिज्ञा केली आहे व ती मोडणें मला शक्य नाहीं ( अरण्य १०-१५-२० )

कोणी सांगण्याची अपेक्षा न करता मुनिजनांचें संरक्षण करणें हें आपलें कामच आहे. तें आम्ही न करावें असें कसें म्हणता येईल व प्रतिज्ञा करून तें न करणें हें तर अगदींच अयोग्य आहे, असें म्हणून व सीतेची तिच्या वरील भावना बद्दल प्रशंसा करून रामानें हा प्रश्न अशारीतिनें सोडवून टाकला !

मुनींनीं विनविलें व मी त्यांचें रक्षण करण्याची प्रतिज्ञा केली यासाठीं शस्त्रास्त्रें घेऊन वनात आपण हिंडणार व जे राक्षस भेटतील त्यांनीं त्या दिवशीं काहीं अपकृत्य केलें असो वा नसो, त्याचा निःपात हा आपण करणारच त्याण जरी त्यांनीं त्या दिवशीं कोणा मुनींचा अपराध केला नसला, तरी पूर्वी केला नसेल असें नाहीं व पुढें करणार नाहींत असेंही नाहीं. राक्षस हे अत्याचारी आहेत. यासाठीं जर मुनींनीं येथें सुखानें रहावयाचें असेल तर अत्याचारी व अनत्याचारी अशा सर्व राक्षसांचा निःपात करणें हाच धर्म ठरता दण्डकारण्यच राक्षसरहित केलें पाहिजे. तेथें हा किंवा ना राक्षस व्याकश वै करता कीं नाहीं, हें पाहण्याचें कारण नाहीं तो राक्षस आहे, हें त्याच्या वधास पुरेसें कारण आहे. कारण राक्षस मुनींना खात असतात म्हणून सर्व राक्षसच वध्य होतात. त्यात एक बरा व दुसरा वाईट असा भेद करता येत नाहीं

## शूर्पणखा व रावण परिचय

शूर्पणखा राक्षसी ह्या पञ्चवटीमध्यें आली व सुन्दर व भव्य रामाचें शरीर पाहून ती त्यावर मोहित झाली. ( अरण्य १७-१-८ )

रावण, कुंभकर्ण व बिभीषण हे तिघे बंधु व शूर्पणखा ही बहीण अशीं हीं चार भावंडें आपण आहोंत असें तिनें रामाला आपला परिचय करून देताना

सांगितलें व आपणाबरोबर विवाह कर व यथेच्छ सुखाचा उपभोग घे असेंही तिनें रामाला सांगितलें. ( अरण्य १७।१०-२८ )

यावर रामानें समयोचित उत्तर दिलें तें असें—

कृतदारोऽस्मि भवति भार्येयं दयिता मम।
त्वद्विधानां तु नारीणां सुदुःखा ससपत्नता ॥ १ ॥
अनुजस्त्वेष मे भ्राता शीलवान् प्रियदर्शनः।
श्रीमानकृतदारश्च लक्ष्मणो नाम वीर्यवान् ॥ २ ॥
एनं भज विशालाक्षि भर्तारं भ्रातरं मम।

( अरण्य १८ )

' हे शूर्पणखे ! मी विवाह केला आहे व ही माझी पत्नी माझ्याबरोबर आहे. तुझ्या सारख्या ( थोर ) स्त्रियांना सवतीचें दुःख असणें हें बरें नाहीं. यासाठीं हा माझा भाऊ अजून लग्नाचा आहे. याच्याशीं तूं लग्न कर. '

याठिकाणीं रामानें लक्ष्मणाचें लग्न झालेलें नाहीं असें खोटेंच सांगितलें आहे. उपहास करतांना असें बोलणें कदाचित क्षम्य होऊं शकेल. असो. रामाचें वर लिहिल्याप्रमाणें भाषण ऐकून ती लक्ष्मणाकडे गेली व त्याच्याशीं लाडीगोडीचें भाषण करूं लागली तेव्हां लक्ष्मण तिला म्हणाला—

' रामाची भार्या होऊन त्याची पट्टराणी हो. मी त्याचा दास आहें. माझी भार्या होऊन तूं दासी होशील. तुझ्यासारख्या सुन्दर स्त्रीला दासी बनणें योग्य नाहीं. यासाठीं तूं त्याचीच बायको होण्यास योग्य आहेस. ' हें लक्ष्मणाचें भाषण ऐकून पुनः ती रामाकडे आली व त्याच्याशीं पुनः सलगीचें भाषण करूं लागली व सीतेचा मधला काटा काढून टाकण्यासाठीं तिला खाऊन टाकण्याच्या इच्छेनें तिच्या अंगावर धांवूनही गेली. तेव्हां राम लक्ष्मणास म्हणाला.—

राक्षसीं पुरुषव्याघ्र विरूपयितुमर्हसि ॥ २० ॥

( अरण्य १८ )

'या राक्षसीला विरूप करून टाक, ही आज्ञा ऐकताच लक्ष्मणानें तलवार घेऊन तिचे नाक व कान कापून टाकले!

येथें रामानें ही रावणाची बहीण आहे हें जाणून मग तिचे नाक कान कापले आहेत. एक वेळ थेटपर्यंत आह्वान पोंचलें पाहिजे. ही इच्छा येथें असावी. शूर्पणखा विरूप होऊन आपल्या खर नामक सेनापतिकडे गेली व त्यास झालेला सर्व वृत्तांत निवेदन करून त्याच्यासमोर मोठा आक्रोश करूं लागली. तेव्हा त्याचें व रामाचें युद्ध होऊन रामानें पञ्चवटींत असलेल्या सर्व १४००० राक्षसांचा नाश केला.

या वेळीं अनेक ऋषिमुनि जमून त्या सर्वांनीं रामाचा मोठा सत्कार केला व ते म्हणाले—

> ऋषयश्च महात्मानो लोके ब्रह्मर्षिसत्तमाः ।
> समेत्य प्रोचुः सहितास्तेऽन्योन्यं पुण्यकर्मणः ॥ २० ॥
> स्वस्ति गोब्राह्मणानां च लोकानां चेति संस्थिताः ।
> जयतां राघवो युद्धे पौलस्त्यान् रजनीचरान् ॥ २१ ॥
> ( अरण्य २४ )

'ऋषि, महात्मे सर्व जमले व ते परस्पर बोलूं लागले कीं गोब्राह्मणांचें कल्याण व्हावें यासाठीं या युद्धामध्यें रामाचा जय होवो व रावण पक्षाच्या सर्व राक्षसांचा पराभव होवो.'

या वेळीं एकटा राम या इतक्या १४००० राक्षसांना कसा बरें मारील अशी शंकाही या ऋषिलोकांना आली होतीच—

> चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ।
> एकश्च रामो धर्मात्मा कथं युद्धं भविष्यति ॥ २३ ॥
> ( अरण्य २४ )

'इकडे एकटा राम आहे व विरुद्ध पक्षाकडे चौदा हजार राक्षस आहेत. हें युद्ध आम्हांला अनुकूल कसें बरें होईल?' अशी आर्य शंका ऋषिमुनींना वाटत होती.

रामानेंही परिणाम काय होतो न कळे असा विचार करून सीता व लक्ष्मण यांना तेथील एका गुहेमध्यें पाठवून दिलें होतें व तो एकाकीच युद्धाला ठाकला होता—

रामाचें कवच तुटलें, धनुष्यही निरुपयोगी झालें. तेव्हां त्यानें अगस्ति ऋषिंनी दिलेलें प्रचंड धनुष्य काढलें व तो राक्षसांशी युद्ध करूं लागला.

बरेंच युद्ध झाल्यावर खर राक्षसाला रामानें एकच वाक्य सांगितलें तें राजनीतिचें द्योतक असल्यांमुळें येथें पाठण्यासारखें आहे—

## पापी फार दिवस राहत नाहीं

*उद्वेजनीयो भूतानां नृशंसः पाप-कर्मकृत्।*
*त्रयाणामपि लोकानां ईश्वरोऽपि न तिष्ठति॥ ३॥*

(अरण्य १९)

'लोकांना त्रास देणारा, क्रूरकर्म करणारा पापी जरी तीनही लोकांचा सम्राट् असला तरी तो कायम टिकूं शकत नाहीं.' हा विश्वास रामाच्या अन्तः-करणात जागृत होता. मी जनपद हितासाठीं लढत आहें व हे राक्षस जन-पदाला त्रास देत आहेत. यासाठीं आपल्याच दुष्टकर्मांनीं हे मेलेले आहेत. तसेंच राम आणखीहि म्हणतो—

न चिरं पापकर्माणः क्रूरा लोकजुगुप्सिताः।
ऐश्वर्यं प्राप्य तिष्ठन्ति शीर्णमूला इव द्रुमाः॥ ७॥
अवश्यं लभते कर्ता फलं पापस्य कर्मणः।
घोरं पर्यागते काले द्रुमः पुष्पमिवार्तवम्॥ ८॥

(अरण्य २९)

'पापी व क्रूर लोकाना त्यांच्या कर्मांचें फळ मिळाल्यावाचून राहत नाहीं. पाप कर्माचें फळ करर्याला अवश्य मिळेंच मिळतें.' या कारणानें खर दूषण आदि राक्षस आपल्या दुष्ट कर्माचें फल आता मिळवतील अर्थात् त्यांचा आता निःसंशय नाश होईल.

इन्द्रानें येऊन अगस्ति ऋषिकडे जे बाण ठेवले होते त्यानेंच खराचा शेवटीं वध झाला—

'स तद्दत्तं मघवता सुरराजेन धीमता ।
संदधे च स धर्मात्मा मुमोच च खरं प्रति ॥ २५ ॥
(अरण्य. ३०)

' इन्द्रानें दिलेल्या बाणानें खर राक्षसाचा वध झाला ' ऋषिमुनि व देव यांना आनन्द झाला. सर्वांनीं रामावर पुष्पवृष्टि केली. याप्रमाणें १४००० राक्षसाचा येथें निःपात झाला. ऋषिमुनिनीं रामाची प्रशंसा केली--

'अहो बत महत्कर्म रामस्य विदितात्मनः ।
अहो वीर्यं अहो दार्ढ्यं विष्णोरिव हि दृश्यते ॥ ३२ ॥
ततो राजर्षयः सर्वे संगताः परमर्षयः ।
सभाज्य मुदिता रामं सागस्त्या इदमब्रुवन् ॥ ३४ ॥
एतदर्थं महातेजा महेन्द्रः पाकशासनः ।
शरभंगाश्रमं पुण्य आजगाम पुरन्दरः ॥ ३५ ॥
आनीतस्त्वं इमं देशं उपायेन महर्षिभिः ।
एषां वधार्थं शत्रूणां रक्षसां पापकर्मणाम् ॥ ३६ ॥
तदिदं नः कृतं कार्यं त्वया दशरथात्मज ।
स्वधर्मं प्रचरिष्यन्ति दण्डकेषु महर्षय ॥ ३७ ॥
(अरण्य० ३० )

' रामाचें काय हें सामर्थ्य ! अहो यानें केवढें मोठें हें कार्य केलें बरें ! काय याची ही शक्ति ! विष्णुसारखा याचा हा पराक्रम आहे रामाजवळ अगस्त्यमुनिसह अनेक ऋषि जमले व त्याची प्रशंसा करूं लागले ते रामाला म्हणाले— हे रामा ! याच कामासाठीं इन्द्र शरभंग ऋषिंच्या आश्रमांत आला होता व तुला ही ऋषिनीं येथें युक्तियुक्तिनीं आणला तो याच कार्यासाठीं होय. आज तें कार्य सफळ झालें. आता ऋषि या दण्डकारण्यामध्यें आपल्या धर्माचा प्रचार करतील '

येथें स्पष्ट म्हटलें आहे कीं इन्द्र शरभंग ऋषींच्या आश्रमांत आला व रामाला ऋषींनीं युक्ति प्रयुक्तिनीं येथें आणलें हें सर्व या खर दूषणाचा कांटा काढावा याचसाठीं होय. रामाला पंचवटीलाच आणून सोडावा, हा ऋषींच्या रावण-साम्राज्याचा नाश करण्यासाठीं रचलेल्या कटाचा एक भाग होता. रामाला माहीत नव्हतें कीं आपण कोठें कशासाठीं जात आहों. पण ऋषींना माहीत होतें कीं आपण रामाला कोठें व कशासाठीं नेत आहों इन्द्राचाही भाग या कार्यांत होताच.

'महर्षिभिः त्वं इमं देशं आनीतः' ( अरण्य. ३०।३६ ) या बोलण्यात कटाचा स्पष्ट उल्लेख आहे. महर्षींच्या हालचाली याच एका दिशेनें चालू होत्या. एका ऋषीनें पुढच्या ऋषीच्या आश्रमाचा मार्ग दाखवावा व रामानें तेथें पोंचावें असें हें यंत्राप्रमाणें चाललें होतें व तसें घडूनही येत होतें

रावणानें आपल्या साम्राज्याच्या संरक्षणासाठीं हें १४००० राक्षसाचें सैन्य नासीक पंचवटजिवळ आणून ठेवलें होतें. नासीकच्या वर उत्तरेकडे आर्यांचीं राज्यें होतीं. जवळ जवळ ३०० आर्य राजे यावेळीं उत्तर भारतामध्यें लहान लहान राज्यें करीत होते. ते आपसात भांडत. यामुळें या आर्य राजामध्यें संघटित बळ फारसें नव्हतें. यामुळें हे सर्व रावणाला भिऊन होते व यांच्याकडून रावणाचें साम्राज्य नष्ट होईल याची शक्यताही नव्हती याचसाठीं तर ऋषींनीं या रामलक्ष्मणांला दशरथाच्या घरच्या स्त्रैणवातावरतातून बाहेर काढलें होतें

नासिकच्या दक्षिणेस दण्डकारण्यात वानरराज्य होतें त्याचा मुख्य वाली होता व तो फार शूर व बलाढ्य होता व रावणाचा समाचार घेण्याएवढें सामर्थ्य त्याच्यामध्यें होतें पण त्याचा व रावणाचा परस्परांवर अनाक्रमण करण्याचा तह झालेला होता व ही मैत्री तुटल्यासारखी नव्हती म्हणून रावणाला वानर राज्याकडून भीति नव्हती

उत्तरेकडचे आर्य संघटित होतील ही एकच भीति होती, पण त्यांच्या आपसांतील वैरामुळें तीहि भीति रावणाला नव्हती. रावणाला एकच भीति होती व ती ही कीं वानर व आर्य एक होऊं नयेत हे एक झाले तर आपलीं

घडगत नाहीं हें रावण जाणत होता. याचसाठीं रावणानें आपलें चवदा हजार राक्षसांचें भयंकर सैन्य पंचवटीला सज्य ठेवलें होतें. आर्यराजे व वानर राजे यांचा या सैन्यामुळें संबंध तुटला होता तो संबंध घडवून आणणें इष्ट होतें. रामाकडून हें घडवून आणावयाचें होतें. तें आज घडलें म्हणून ऋषिमुनि व देव या सर्वांना फार आनंद झाला

आर्यराजे व वनराजे यांत ऐक्य घडून येण्याची संभावना आज उत्पन्न झाली. हा महत्त्वाचा भाग आहे. रावण साम्राज्य आतां नष्ट झालें असें ऋषींना वाटूं लागण्याइतकें या घटनेचें महत्त्व आहे

**'महर्षयः स्वधर्मं दण्डकेषु प्रचरिष्यन्ति'** ( अरण्य. ३०।३७ )

ऋषिमुनी आतां दण्डकारण्यांत आर्यधर्माचा खूब प्रचार करतील हें वाक्य फार महत्त्वाचें आहे ज्याप्रमाणें युरोपचे मिशनरी धर्मप्रचार आधीं करतात व मग साम्राज्यवादी तेथें जातात तसाच हा प्रकार दिसत आहे दण्डकारण्यांत ऋषि आधीं येऊन ठाण मांडून बसले होते व आतां रामानें त्याचा मार्ग निष्कंटक केला. हें असेंच घडत राहिलें पाहिजे धर्माचा प्रचार करणारे प्रचारक पाहिजेत देशोदेशीं त्यांनीं या प्रचारासाठीं आपल्या संस्था स्थापल्या पाहिजेत व विश्वाला आर्य धर्मांची दीक्षा देऊन संस्कारसंपन्न केलें पाहिजे.

## रावणाला वार्ता समजली

पंचवटीजवळ आपण शेवटची संरक्षणाची योजना करून तेथें १४००० राक्षसांचें जे सैन्य ठेवलें होतें, त्याचा रामानें नाश केला व आपण आर्यराज व वानर राजे यांचे सख्य कधींहि घडून येऊ नये अशी जी आखणी केली होती ती सर्व यानें उधळून लावली हें वृत्त रावणाला अकम्पन राक्षसाकडून समजलें, तेव्हां सम्राट् रावण फारच क्रुद्ध झाला व म्हणाला–' सर्व देव मला भीत आहेत. तेही माझ्या आज्ञेचें उल्लंघन करण्यास धजत नाहींत. असें असता येथें हा कोण आला आहे कीं जो माझ्यामारख्याचा विरोध करण्यास धजत आहे ! ( अरण्य. ३१।१–७ )

हें भाषण ऐकून अकम्पन राक्षस रावणाला म्हणाला कीं ' महाराज हा राम राजा दशरथाचा पुत्र असून, त्याच्याजवळ विलक्षण प्रकारचीं शस्त्रास्त्रें आहेत. त्याच्या सहाय्यार्थ कोणीही नसता त्यानें एकट्यानेंच तुमच्या पंचवटीजवळच्या छावणीचा नाश करून टाकला.—

न हि रामो दशग्रीव शक्यो जेतुं रणे त्वया।
रक्षसां वापि लोकेन स्वर्गः पापजनैरिव ॥ २७ ॥

(अरण्य ३१)

'युद्धामध्यें तुझ्याकडून रामाला जिंकणें शक्य नाहीं ज्याप्रमाणें पापी लोकाना स्वर्ग प्राप्त होत नाहीं ' त्याचप्रमाणें तूं रामाला जिंकणें शक्य नाहीं. पण एक उपाय आहे तो हा कीं ' रामाची स्त्री सीता नावाची आहे, तिला तू हरण करून आण म्हणजे सीतेशिवाय राम जिवत राहणार नाहीं. '

(अरण्य ३१।३१)

नतर हें श्रवण करून रावणानें सीतेचें हरण करण्याचा निश्चय केला व तो आकाशगामी रथामध्यें बसून मारीचाच्या आश्रमाजवळ आला व मारीचाला त्यानें आपला बेत सांगितला ' सीतेचें हरण करावें ' हा रावणाचा बेत ऐकून मारीच रावणाला म्हणाला—

आख्याता केन वा सीता मित्ररूपेण शत्रुणा।
त्वया राक्षसशार्दूल को न नन्दति नन्दितः ॥ ४२ ॥
सीतां इहानयस्वेति को ब्रवीति ब्रवीहि मे ।
रक्षोलोकस्य सर्वस्य कः शृगं छेत्तुमिच्छति ॥ ४३ ॥

(अरण्य ३१)

' हे रावण ' मित्रता दाखवून तुझ्याशीं गुप्तपणानें कोण बरें शत्रुता करीत आहे ? सीतेला पळवून आण असें तुला कोणी सांगितलें तें मला आधीं सांग पाहूं सर्व राक्षसाचा नाश करण्याची इच्छा कोण बरें करीत आहे ?'

असें बोलून मारीचानें रावणाची समजूत घालून त्यास परत पाठवलें (अरण्य ३१।५०)

इतक्यात विरूप झालेली शूर्पणखा लकेंत येऊन आक्रोश करीत, रावणाच्या राजवाड्यात दाखल झाली रावणाच्या सातमजली वाड्यांत पोंचून तिनें तेथें आक्रोश करून प्रळयच मांडला तेथें रावण नुकताच मारीचाकडून परत आलेला होता त्याचा मोघभ्रम शमला नव्हताच, इतक्यात या शूर्पणखेनें त्यांत तेल ओतलें. याठिकाणीं रावणाचें वर्णन पाहण्यासारखें आहे

विष्णुचक्रनिपातैश्च शतशो देवसंयुगे ।
अन्यैः शस्त्रैः प्रहारैश्च महायुद्धेषु ताडितम् ॥ १० ॥
अच्छेत्तारं च धर्माणां परदाराभिमर्शनम् ॥ ११ ॥
(अरण्य ३२)

' सुदर्शन चक्राचे व अन्य शस्त्रास्त्रांचे घाव रावणाच्या शरीरावर दिसत होते. हा रावण धर्माचा उच्छेद करणारा व परस्त्रीवर बलात्कार करणारा होता. '

पण पुढें ' एकही स्त्री रावणाच्या अन्त पुरात अशी नव्हती कीं, जी त्यावर अनुरक्त नव्हती ' असें वर्णन येणार आहे कदाचित् असें असेल कीं प्रथम हा परस्त्रीयांना हरण करून आणीत असे व नंतर त्या स्त्रिया निरुपाय होऊन त्यास वश्य होत असतील. विचाऱ्या काय करणार ?

## शूर्पणखेचें प्रोत्साहन

एकदां सीताहरण करण्यापासून निवृत्त झालेल्या रावणाला शूर्पणखेनें सीतेच्या सौंदर्याचें वर्णन करून तिचें हरण करण्यास पुन प्रोत्साहन दिलें. तेव्हां रावण पुनः सीतेचें हरण करण्यासाठीं मारीचाजवळ आला व मारीचाला त्यानें आपणास सहाय्य करण्यास सांगितलें तेव्हां मारीचानें राम लहान असतांना त्यानें विश्वामित्राचा यज्ञ संरक्षण करीत असतां केवढा पराक्रम केला व आपण स्वतः त्याच्या माऱ्यांतून कसा सुटलों वगैरे इत्थंभूत सांगितलें रामाच्या विलक्षण पराक्रमाचें वर्णनही केलें. पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं

रावणानें त्यास पुनः सीताहरणाच्या कामीं सहाय्य करण्यास सांगितलें, तेव्हा मारीचानें थोडासा राजनीतीचा उपदेशही रावणाला केला. ( अरण्य ४१ )

पण त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं मारीचाला ठार मारण्याचा धाक रावणानें घातला व त्यामुळें तो रावणाच्या आज्ञेप्रमाणें त्याला मदत करावयास तयार झाला.

रावण व मारीच हे दोघेही रथामधून पंचवटीमधील रामाच्या आश्रमाला गेले. मारीचानें सुवर्णमृगाचें सोंग घेतलें. सीतेनें तो मृग पाहिला व रामाला *त्याला धरून आणावयास सांगितलें. राम त्या मृगामागून गेला, तेव्हां त्या* मृगानें रामाला फारच दूर नेलें व कांहीं केल्या रामाला तो सांपडेना.

रामानें जाते वेळींच हें कपट आहे हें ओळखलें होतें व याचसाठीं सीतेच्या संरक्षणासाठीं लक्ष्मणाला ठेऊन तो एकटाच त्या मृगाच्या मागें गेला होता. शेवटीं ठरल्याप्रमाणें ' हे लक्ष्मणा धाव ' असें रामाच्या शब्दासारखा शब्द करीत मारीच ओरडला तो रामाचा शब्द आहे असें सीतेला वाटलें सीता लक्ष्मणाला रामाच्या *मदतीसाठीं जा म्हणून सांगूं लागली लक्ष्मण जाईना, कारण हें कपट आहे हें त्यानें*-ही ओळखलें होतें. लक्ष्मण जाईना हें पाहून सीतेला राग आला व त्या रागामध्यें बोलूं नये तें ती लक्ष्मणाला बोलली.

तें भाषण ऐकून *लक्ष्मणाला फार वाईट वाटलें व तो रामाकडे निघून गेला.* इकडे सीता एकटी आहे हें पाहून रावण रामाच्या आश्रमांत आला. सीतेनें रावणाचा संन्यासी समजून आश्रमास योग्य असा सत्कार केला शेवटीं *रावण व सीता यांची बरीच बोलाचाली झाली पण शेवटीं सीतेला रावणानें उचलली* व तिला तो नेऊं लागला. स्त्री अबला असते हें येथें सिद्ध झालें.

मार्गामध्यें जटायूचें व रावणाचें युद्ध झालें. रावणानें जटायुला ठार केलें *व सीतेला तो नेऊं लागला. हें वृत्त जेव्हां ब्रह्मदेवाला समजलें तेव्हां ब्रह्मदेव* म्हणाला—

## आपलें कार्य झालें.

**दृष्ट्वा सीतां परामृष्टां देवो दिव्येन चक्षुषा ॥ १० ॥**
**' कृतं कार्यं ' इति श्रीमान् व्याजहार पितामहः ॥**
**प्रहृष्टा व्यथिताश्चासन् सर्वे ते परमर्षय. ॥ ११ ॥**

दृष्ट्वा सीतां परामृष्टां दण्डकारण्यवासिनः ॥
रावणस्य विनाशं च प्राप्तं बुध्वा यदृच्छया ॥ ११ ॥
(अरण्य० ५२)

' सीतेला रावणानें पळविली हें जाणून ब्रह्मदेव म्हणाले कीं, ' वः ! आपलें कार्य झालें ! ' त्याचप्रमाणें ऋषिमुनिंही आपलें कार्य झालें म्हणून आनंदित झाले, पण सीतेला कष्ट होणार हें पाहून त्यांनाही दुःख झालें. ' रावणाचें साम्राज्य आता राहत नाहीं हा निश्चय झाल्यामुळें सर्वांस आनन्द होणें स्वाभाविक होतें. पण राम व सीता अशा थोरांना कष्ट झाल्याविना राष्ट्रीय कार्येंही घडत नसतात म्हणून असे कष्ट अपरिहार्यही असतात.

.ब्रह्मदेव व ऋषिमुनी आनन्दित झाले, म्हणजे त्याना हवें होतें तें घडलें हें उघड आहे. रावणसाम्राज्याचा नाश या सर्वांना करावयाचा होता. मोठा अन्याय घडल्यावाचून रावणाचा नाश घडणें शक्य नव्हतें. सीतेचें हरण केल्यामुळें रावणाचा नाश निःसंदेह होणार हे ठरल्यासारखें झालें. आपण ज्या राष्ट्रकार्यासाठीं आतांपर्यंत देशव्यापी योजना आखली तें कार्य आतां घडून येईल; असें याना वाटल्यामुळेंच सीतेला कष्ट झालेले पाहत असूनसुद्धा या सर्वांना आनंद झाला. क्रान्तीच्या सिद्धिमधील आनन्द हा असाच असतो. रावणाच्या विरुद्ध ऋषि, मुनि व देव यांचा कट होता हें या आनन्दावरून कळून येणें शक्य आहे

## रावणाला राजनीतिचा पाठ

शूर्पणखेनें रावणाची निंदा करीत असता कांहीं राजनीतीच्या तत्वांचा उल्लेख केलेला आहे. तो सर्व इतर लोकांनाही बोधप्रद आहे म्हणून तो येथें देत आहों–

प्रमत्तः कामभोगेषु स्वैरवृत्तो निरंकुशः ।
समुत्पन्नं भयं घोरं बोद्धव्यं नावबुध्यसे ॥ २ ॥
सक्तं ग्राम्येषु भोगेषु कामवृत्तं महीपतिम् ।
लुब्धं न बहु मन्यन्ते श्मशानाग्निमिव प्रजाः ॥ ३ ॥

स्वयं कार्याणि यः काले नानुतिष्ठति पार्थिवः ।
स तु वै सह राज्येन तैश्च कार्यैर्विनश्यति ॥ ४ ॥
अयुक्तचारं दुर्दर्शं अस्वाधीनं नराधिपम् ।
वर्जयन्ति नरा दूरान्नदीपङ्कमीव द्विपाः ॥ ५ ॥
(अरण्य० ३३)

१ जो राजा कामभोगामध्यें रमतो, स्वैर आचरण करतो व कोणाचेंही ऐकत नाहीं, त्याला भयंकर आपत्ति आली तरी ती कळत नाहीं. (२)

२ ग्राम्यविषयभोगामध्यें प्रवृत्त, इच्छेस येईल तसें वागणारा जो राजा असतो व जो लोभी असतो त्याला प्रजाजन मान देत नाहींत. (३)

३ जो राजा आपलीं कर्तव्यें वेळच्या वेळीं करीत नाहीं, त्याचा नाश राज्यासह त्याच कार्यांनीं होत असतो. (४)

४ अयोग्य हेर अयोग्य ठिकाणीं ठेवणारा, प्रजाजनांना न भेटणारा, असंयमी असा जो राजा असतो त्याला लोक टाळीत असतात. (५)

ये न रक्षन्ति विषयं अस्वाधीनं नराधिपाः ।
ते न वृद्ध्या प्रकाशन्ते गिरयः सागरे यथा ॥ ६ ॥
आत्मवद्भिर्विगृह्य त्वं देवगन्धर्वदानवैः ।
अयुक्तचारः चपलः कथं राजा भविष्यसि ॥ ७ ॥
त्वं तु बालस्वभावश्च बुद्धिहीनश्च राक्षस ।
ज्ञातव्यं तं न जानीषे कथं राजा भविष्यसि ॥ ८ ॥
येषां चाराश्च कोशश्च नयश्च जयतां वर ।
अस्वाधीनां नरेन्द्राणां प्राकृतैः तैः जनैः समाः ॥ ९ ॥
यस्मात्पश्यन्ति दूरस्थान् सर्वानर्थान्नराधिपाः ।
चारेण तस्मादुच्यन्ते राजानो दीर्घचक्षुषः ॥ १० ॥
अयुक्तचारं मन्ये त्वां प्राकृतैः सचिवैर्वृतम् ।
स्वजनं च यतः स्थानं निहतं नावबुध्यसे ॥ ११ ॥
(अरण्य० ३३)

५ परकीयांच्या हातांत गेलेल्या आपल्या देशाचें जे राजे त्याला पुनः आपल्या हातांत आणून रक्षण करीत नाहींत ते ऐश्वर्यानें समृद्ध होत नाहींत. ( ६ )

६ देव-गन्धर्व-दानव यांनीं सावधपणानें तुझें . वैर चालविलें आहे पण तुझे दूत योग्य नाहींत व तूं स्वतः चंचल आहेस, यामुळें तुझें राज्य कसें बरें टिकेल ? ( ७ )

७ तूं पोरकट स्वभावाचा व बुद्धिहीन आहेस, जें जाणलें पाहिजे तें तूं जाणत नाहींस. मग तूं राजा कसा राहशील ? ( ८ )

८ दूत, कोश व न्याय हीं ज्याच्या स्वाधीन नाहींत, असे राज्य चालविण्यास अयोग्य राजे हे सामान्य माणसासारखेच होत ( ९ )

९ राजे लोक दूतांच्या नेत्रांनीं दूर दूरचें पाहू शकतात म्हणून त्यांना दूर दृष्टि असें म्हणतात. ( १० )

१० तुझे दूत चांगले नाहींत व सचिवही अनुभवी नाहींत यामुळें तुझें सैन्य व तुझें ठाणें शत्रूनें नाहींसें केलें याचेंही ज्ञान तुला नाहीं ( ११ )

त्वं तु लुब्धः प्रमत्तश्च पराधीनश्च राक्षस ।
विषये स्वे समुत्पन्नं यद्भयं नावबुध्यसे ॥ १४ ॥
तीक्ष्णं अल्पप्रदातारं प्रमत्तं गर्वितं शठम् ।
व्यसने सर्वभूतानी नाभिधावन्ति पार्थिवम् ॥ १५ ॥
अतिमानिनं अग्राह्यं आत्मसंभावितं नरम् ।
क्रोधनं व्यसने हन्ति स्वजनोऽपि नराधिपम् ॥ १६ ॥
नानुतिष्ठति कार्याणि भयेषु न बिभेति च ।
क्षिप्रं राज्याच्च्युतो दीनस्तृणैस्तुल्यो भवेदिह ॥ १७ ॥
शुष्ककाष्ठैर्भवेत्कार्यं लोष्टैरपि च पांसुभिः ।
न तु स्थानात्परिभ्रष्टैः कार्यं स्याद्वसुधाधिपै ॥ १८ ॥

११ तूं अत्यंत असावध, विवेकहीन, लोभी व विषयांच्या आधीन झालेला आहेस यामुळें आपल्या राज्यांतच भय उत्पन्न झालेलें तुला समजलेंसुद्धां नाहीं. ( १४ )

१२ क्रूर, कृपण, उन्मत्त, गर्विष्ठ, लवाड अशा राजाला संकट समयींही सहाय्य करण्यासाठीं कोणी येत नाहींत. ( १५ )

१३ अत्यंत अभिमानी, जवळ जाण्यास अशक्य, आपणास फार मोठा मानणारा, क्रोधी अशा राजाला संकटसमयीं आपलेच लोक ठार करतात ( १६ )

१४ जो आपलीं कर्तव्यें करीत नाहीं, जो भय आलें असता त्याकडे दुर्लक्ष करतो, तो राजा राज्यापासून भ्रष्ट होतो व त्याचें कोणीही मूल्य मानीत नाहींत ( १७ )

१७ सुकलेलीं लाकडें, मातीचीं ढेकळें व धूळ याचाही उपयोग होऊं शकतो, पण राज्यभ्रष्ट झालेल्या राजाचा काहींसुद्धा उपयोग होत नसतो ( १८ )

अप्रमत्तश्च यो राजा सर्वज्ञो विजितेन्द्रियः ।
कृतज्ञो धर्मशीलश्च स राजा तिष्ठते चिरम् ॥ २० ॥
नयनाभ्यां प्रसुप्तो वा जागर्ति नयचक्षुषा ।
व्यक्तक्रोधप्रसादश्च स राजा पूज्यते जनैः ॥ २१ ॥
( अरण्य० ३३ )

१८ जो स्वकार्यामध्यें दोष करीत नाहीं, जो राज्यातील सर्व बातमी जाणतो, इंद्रियें स्वाधीन ठेवतो, कृतज्ञ व धर्मशील असतो तो राजा पुष्कळ दिवस राज्यावर टिकतो ( २० )

१९ डोळ्यानीं निजला असला तरी जो राजनीतीनें जागत असतो, ज्याचे क्रोध व कृपा हीं प्रकट होतात, त्या राजाचा सत्कार लोक करतात ( २१ )

ह्या राजनीतीच्या सूचना सर्वांनीच लक्ष्यात ठेवण्याजोग्या आहेत राक्षसाच्या स्त्रिया राजनीतिमध्यें इतक्या प्रवीण असत शूर्पणखेनें हें रावणाला ऐकविलें आहे हें ऐकून रावणाला समजून आलें कीं माझ्या साम्राज्याला कीड लागली व क्रान्तीची वेळ जवळ आली आहे.

" आपल्या देशाचा भाग जर परकीयाच्या हातीं गेला असेल, तर तो आपला प्रदेश आपल्या देशास पुन जोडण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे जो असें करीत नाहीं त्याची संपत्ति वाढत नाहीं हें ६ व्या श्लोकातील वाक्य फार महत्त्वाचें आहे

## स्त्रिस्वभाव

स्त्रीस्वभावसंबंधानें अगस्ति मुनींच्या भाषणात पुढील उल्लेख आढळतो—

दुष्करं कृतवत्येषा वने त्वामभिगच्छती ॥ ४ ॥
एषा हि प्रकृतिः स्त्रीणां आसृष्टे रघुनन्दन ।
समस्थमनुरज्यन्ते विषमस्थं त्यजन्ति च ॥ ५ ॥
शतन्हदानां लोलत्वं शस्त्राणां तीक्ष्णता तथा ।
गरुडानिलयोः शैघ्र्यमनुगच्छन्ति योषितः ॥ ६ ॥
इयं तु भवतो भार्या दोषैरेतैर्विवर्जिता ।
श्लाघ्या च व्यपदेश्या च यथा देवेष्वरुन्धती ॥ ७ ॥
(अरण्य० १३)

अगस्ति म्हणाले— ' हे रामा ! तुझ्याबरोबर वनात येण्याचें फार दुष्कर कर्म या सीतेनें केलें आहे. बहुत करून स्त्रिया या यथास्थित चालत असेल तर पतीवर प्रेम करतात, व त्याला विपन्नावस्था आला कीं त्याचा त्याग करतात. विद्युल्लतेचें चंचलत्व, शस्त्राचा तीक्ष्णपणा, गरुड व वायु याचें शाघ्रत्व हे सर्व दोष स्त्रियामध्यें एकवटल असतात. तुझ्या या सीतेमध्यें मात्र हे दोष नाहात म्हणून ही अरुंधतीप्रमाणें प्रशंसेला पात्र आहे.

## सीतेचा जळफळाट

सीतेला रामाचा पराक्रम माहित होता नुकताच १४००० राक्षसाचा संहार रामानें केल्याचें तिनें पाहिलें होतें. असें असतां य कथित सुवर्ण मृग तो काय व त्यामुळें रामाला कष्ट किती होणार, हें सीतेला समजलें पाहिजे होतें लक्ष्मणानें सांगितल्यावर तरी ती उमजली पाहिजे होती पण तसें घडलें नाहीं यात स्त्रीस्वभावाचा दुर्गुण दिसून येतो सीता लक्ष्मणास किती कठोर बोलली तें पहा—

' हे लक्ष्मणा ! तू मित्ररूपानें राहून या वेळीं आपल्या भावाचें शत्रुत्व करीत आहेस. सध्या राम राक्षसाच्या जाळ्यांत सापडला आहे अशा वेळीं तूं त्याच्या सहाय्यास जाऊं नये, यावरून तूं मासी प्राप्ति व्हावी म्हणूनच रामाचा नाश

व्हावा अशी इच्छा करीत आहेस. रामावर तुझें प्रेम नाहीं व याचसाठीं तो संकटात आहे हें समजल्यावरही येथें खुशाल स्वस्थ राहिला आहेस। ( अरण्य० ४५।५–९ )

*यावर लक्ष्मण म्हणाला— ' हे देवि सीते ! देव, दानव किंवा कोणीही असो* युद्धामध्यें रामाची बरोबरी करूं शकेल असा येथें कोणीही नाहीं. समरांगणात राम अवध्य आहे. तसेंच तुला एकटी सोडून हालूं नको अशी त्याची मला आज्ञा ही आहे. यासाठीं मी येथून हालूं शकत नाहीं ( अरण्य० ४५।१०–१६ )

हें भाषण ऐकून तर सीता फारच रागावली व ती त्या लक्ष्मणाला असे मर्मभेदक शब्द बाल्ली— ' माझें रक्षण करण्याचें मिष करून माझा लोभ करणाऱ्या दुष्टा ! नराधमा ! कुलदूषका ! तूं येथें स्वस्थ उभा आहेस यावरूनच तुला राम संकटात सापडावा असें वाटत आहे हें उघड होत आहे ! तूं भरताचा ही हेर असशील अथवा भरताच्या आज्ञेप्रमाणेंही असा वागत असशील. तुझा अथवा त्या भरताचा मजविषयींचा दुष्ट मनोरथ सिद्धीस जाणार नाहीं. मी तुझ्यापुढें प्राणत्याग करीन, रामावाचून मी एक क्षणभरही येथें जिवंत राहणार नाहीं ( अरण्य. ४५।२१–२७ )

लक्ष्मणाला हें भाषण ऐकून फारच वाईट वाटलें. तो हात जोडून सीतेला म्हणाला कीं— ' तापलेल्या बाणाप्रमाणें हें तुझें भाषण मला सहन होत नाहीं. याचा परिणाम नीट होईल असें वाटत नाहीं. दुश्चिन्हें दिसत आहेत तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी राम गेला आहे तेथें जातों. पण आम्ही परत आल्यावर तूं येथें दिसशील असें काहीं मला वाटत नाहीं वनदेवता तुझें सरक्षण करोत.'

असें म्हणून लक्ष्मण निघाला व सीता एकटी आहे असें पाहून रावण त्या पर्णकुटिकेमध्यें आला.

## रामाचें व्रत

दद्यान्न प्रतिगृह्णीयात् सत्यं ब्रूयान्न चानृतम् ।
एतद्ब्राह्मण रामस्य व्रतं ध्रुतमनुत्तमम् ॥ १७ ॥
विचराम द्विजश्रेष्ठ वनं गम्भीरमोजसा ॥ २१ ॥
( अरण्य० ४७ )

' दान द्यावें, पण दान घेऊं नये; सत्य बोलावें व खोटें बोलू नये असें रामाचें व्रत आहे. असे हे आम्ही या वनामध्यें आपल्या सामर्थ्यानें संचार करीत आहों.'

या अरण्यात आपल्या अंगच्या सामर्थ्यानें हिंडत आहों, आम्ही कोणास भीत नाहीं व कोणाजवळ आमचें रक्षण करा अशी याचनाही करीत नाहीं. हें आत्मविश्वासाचें सांतिचें वाक्य आहे.

## रामाचे कैकेयीविषयींचे उद्गार

ज्यावेळीं त्या क्रूर जंगली विराधानें सीतेला उचलली व आपल्या मांडीवर ठेवली व सीतेला आपली बायको करण्याच्या व रामलक्ष्मणाचें रक्त पिण्याच्या गप्पा तो मारूं लागला तेव्हा सीता तर थरथरा कापूं लागलीच, पण रामही शोकमग्न होऊन म्हणू लागला—

पश्य सौम्य नरेन्द्रस्य जनकस्यात्मसंभवाम् ।
मम भार्यां शुभाचारां विराधाङ्के प्रवेशिताम् ॥ १७ ॥
यदभिप्रेतमस्मासु प्रियं वरवृतं च यत् ।
कैकेय्यास्तु सुसंवृत्तं क्षिप्रमद्यैव लक्ष्मण ॥ १८ ॥
या तु न तुष्यति राज्येन पुत्रार्थे दीर्घदर्शिनी ॥ १९ ॥
ययाहं सर्व भूतानां प्रियः प्रस्थापितो वनम् ।
अद्येदानीं सकामा सा या माता मध्यमा मम ॥ २० ॥
परस्पर्शात्तु वैदेह्या न दुःखतरमस्ति मे ।
पितुर्विनाशात् सौमित्रे स्वराज्यहरणात्तथा ॥ २१ ॥
( अरण्य० २ )

' हे लक्ष्मणा ! जनकाची कन्या लहानपणापासून सुखात वाढलेली असता आज ती विराध राक्षसाच्या मांडीवर बसलेली आहे ती तूं पहा ! वनामध्यें आम्हांला जें दुःख व्हावें असें कैकेयीला वाटत होतें व वरानें राजाकडून जे करून घ्यावें असें कैकेयीच्या मनामध्यें होतें तें आज घडून आलें आहे ती फार दूरदृष्टीची आहे व यामुळें तिनें आपल्या मुलाला राज्यमागून घेतलें व

मला वनामध्यें पिटाळून लावलें. वास्तविक ( **अहं सर्व भूतानां प्रियः** ) मी सर्व प्रजांना प्रिय असल्यामुळें राज्य मलाच मिळालें पाहिजे होतें. आज या विरोधानें सीता आपल्या मांडीवर बसवली असल्यामुळें कैकेयीची इच्छा पूर्ण झाली आहे ! आज ती कृतकृत्य झाली आहे ! माझा पिता मरण पावला अथवा राज्यापासून मी भ्रष्ट झालों यापेक्षां सीतेला परपुरुषाचा स्पर्श झालेला मी पाहत आहें याचें दुःख मला अतिशय होत आहे."

हें रामाचें भाषण पाहिलें म्हणजे त्याच्या मनांत जी कालवाकालव चालली होती ती यावरून स्पष्ट होत आहे. कैकेयीबद्दल अन्तःकरणांत स्वाभाविकपणें वसत असेलेले भाव याप्रकारें रामाच्या तोंडून बाहेर पडले आहेत. रामासारख्याला असें वाटणें अगदीं स्वाभाविकही होतें. कारण ( **अहं सर्व भूतानां प्रियः** ) सर्व प्रजाजनानीं एकमतानें रामाला यौवराज्यासाठीं निवडला होता. यामुळें राज्यावर त्याचा अधिकार होता. पण कैकेयीच्या दुराग्रहामुळें वनवास भोगणें रामाला भाग पडलें यामुळें त्याला असें वाटणें अगदीं स्वाभाविक आहे.

( **परस्पर्श** २।२१ ) स्त्रीला परपुरुषाचा स्पर्श होऊं नये हा येथें कटाक्ष स्पष्ट दिसत आहे. आज परपुरुषाचा स्पर्श व्हावा यासाठीं अनेक योजना पुढें आणल्या जात आहेत. विवाहपूर्वीचा संबंध, विवाह जुळवण्याच्या वेळचा अनेक प्रेयस्कराचा संबंध स्त्रियांनीं नोकऱ्या करणें आदि अनेक प्रसंग सध्यां असे होत आहेत कीं, तेथें परपुरुषस्पर्श घडत असतो. तो घडावा अशीहि अपेक्षा असतेच. रामाच्या वेळची व आजची मानसिक स्थिति यातच हा फरक झालेला आहे.

सीतानिमित्तं सौमित्रे मृते मयि गते त्वयि ।
कच्चित्सकामा कैकेयी सुखिता सा भविष्यति ॥ ७ ॥
( अरण्य० ५९ )

'सीतेच्या वियोगानें मला मरण आलें व तूं एकटा अयोध्येंत परत गेलास तर त्या कैकेयीस आपले मनोरथ पूर्ण झाल्यासारखें वाटून ती सुखी होईल काय!'

सीतेचें रावणानें हरण केल्यानंतर राम जेव्हां पंचवटीच्या आश्रमांत लक्ष्मणासह परत येतो, त्यावेळीं तो हें बोलत आहे.

## डावा डोळा लवणें

' वामलोचनं प्रास्फुरत् ' ( अरण्य ६।१।१ ) रामाचा डावा डोळा स्फुरूं लागला तेव्हां रामाला वाटलें कांहीं तरी अशुभ घडणार आहे.

डोळा लवण्याच्या शुभाशुभाची कल्पना रामायणाइतकी जुनी आहे.

## लक्ष्मणाचें भाषण

रामाचें भाषण ऐकून लक्ष्मण म्हणतो—

शरेण निहितस्याद्य मया क्रुद्धेन रक्षसः ।
विराधस्य गतासोर्हि मही पास्यति शोणितम् ॥ २४ ॥
राज्यकामे मम क्रोधो भरते यो बभूव ह ।
तं विराधे विमोक्ष्यामि वज्री वज्रमिवाचले ॥ २५ ॥
( अरण्य० २ )

' हे रामा ! आज मी या विराधाला बाण मारतों व त्याचा वध करतों आज त्याचें रक्त ही पृथ्वी प्राशन करील राज्यासंबंधीं भरतासंबंधीं जो क्रोध माझ्या मनामध्यें उत्पन्न झाला आहे मी या राक्षसावर सोडतों व या राक्षसाला मी ठार मारतों '

लक्ष्मणाच्या मनात तर भरताविषयीं व कैकेयीविषयीं अत्यन्त क्रोध होता राम वनांत निघाला त्यावेळीं हाच लक्ष्मण, आपले वडील दशरथ यांना व कैकेयीला व जे कोणी विघ्न करतील त्यांना ठार मारून, कैद करून, बंदिखान्यात टाकून रामाला राज्यावर बसवावें असा विचार बोलून दाखवीत होता पण रामानें त्याला समजुतीच्या चार गोष्टी सांगून आपसांत वाढणारा हा वैरभाव फार वाढूं दिला नाहीं व आपसांतील यादवी तेथल्या तेथेंच थांबवली.

## लक्ष्मण भरताची प्रशंसा करतो

भरतासंबंधानें लक्ष्मणाच्या बोलण्यातही प्रशंसेचे उद्गार आले आहेत—

अस्मिंस्तु पुरुषव्याघ्र काले दुःख समन्वितः ।
तपश्चरति धर्मात्मा त्वद्भक्त्या भरतः पुरे ॥ ७ ॥

त्यक्त्वा राज्यं च मानं च भोगांश्च विविधान्बहून्।
तपस्वी नियताहारः शेते शीते महीतले ॥ २८ ॥
सोऽपि वेलामिमां नूनमभिषेकार्थमुद्यतः।
वृतः प्रकृतिभिर्नित्यं प्रयाति सरयूं नदीम् ॥ २९ ॥
अत्यन्तसुखसंवृद्धः सुकुमारो हिमार्दितः।
कथं त्वपररात्रेषु सरयूमवगाहते ॥ ३० ॥
संत्यज्य विविधान् सौख्यान् आर्य सर्वात्मना श्रितः ॥ ३२ ॥
जितः स्वर्गस्तव भ्रात्रा भरतेन महात्मना ॥ ३३ ॥
न पित्र्यं अनुवर्तन्ते मातृकं द्विपदा इति।
ख्यातो लोकप्रवादोऽयं भरतेनान्यथा कृतः ॥ ३४ ॥
भर्ता दशरथो यस्याः साधुश्च भरतः सुतः।
कथं नु साम्बा कैकेयी तादृशी क्रूरदर्शिनी ॥ ३५ ॥
(अरण्य० १६)

'या थंडीच्या दिवसात पहाटे उठून भरत सरयू नदीवर स्नानाला कसा बरें जात असेल व तेथें कसें बरें थंड पाण्यानें स्नान करीत असेल? राज्याचीं सर्व सुखें सोडून, रामा! तुझ्याप्रमाणें भरत तप करीत आहे. तो जमिनीवर निजत असतो. पहाटे उठून नदीवर थंड पाण्याचें स्नान करतो. तो अत्यंत सुखामध्यें लहानपणापासून वाटला असतांही हे कष्ट कसे बरें सहन करीत असेल! खरोखर आपल्या या तपाचरणानें भरतानें स्वर्ग प्राप्त केला आहे यात शंकाच नाहीं. मुलें पित्याला अनुसरत नाहींत, तर मातेसारखीं तीं होतात, ही म्हण या भरतानें खोटी केली आहे. जिचा पति दशरथ व जिचा पुत्र भरतासारखा साधु ती माता कैकेयी कशी बरें अशी क्रूर असावी?''

लक्ष्मणानें कैकेयीची निंदा केलेली रामाला सहन झाली नाहीं व तो लगेच लक्ष्मणास म्हणाला--

परिवादं जनन्यास्तं असहन् राघवोऽब्रवीत् ॥ ३६ ॥
न तेऽम्बा मध्यमा तात गर्हितव्या कदाचन।
तामेवेक्ष्वाकुनाथस्य भरतस्य कथां कुरु ॥ ३७ ॥
(अरण्य० १६)

' लक्ष्मणा ! आपल्या कैकेयी मातेची अशी निंदा करूं नकोस. भरताच्या गोष्टीच बोल.' यावेळीं राम असें बोलला हें खरें आहे. पण रामानेंही कैकेयीची निन्दा केली नाहीं असें नाहीं.

## तपस्वी

अरण्यकाण्डाच्या सहाव्या सर्गामध्यें अनेक प्रकारच्या तपस्व्यांची यादी दिली आहे. ती पाहण्यासारखी आहे. रामायणकालीं तपासंबंधीं काय काय समजुती होत्या तें यावरून समजूं शकतें--

वैखानसा वालखिल्याः संप्रक्षाला मरीचिपाः ।
अश्मकुट्टाश्च बहवः पत्राहाराश्च तापसाः ॥ १ ॥
दन्तोलूखलिनश्चैव तथैवोन्मज्जकाः परे ।
गात्रशय्या अशय्याश्च तथैवानवकाशिकाः ॥ ३ ॥
मुनयः सलिलाहारा वायुभक्षास्तथापरे ।
आकाशनिलयाश्चैव तथा स्थण्डिलशायिनः ॥ ४ ॥
तथोर्ध्ववासिनो दान्तास्तथार्द्रपटवाससः ।
सजपाश्च तपोनिष्ठास्तथा पञ्चतपोऽन्विताः ॥ ५ ॥

( अरण्य० ६ )

१ वैखानसाः — नखें वाढवणारे,
२ वालखिल्याः — केंस वाढवणारे,
३ संप्रक्षालाः -- विशेष स्नान करणारे,
४ मरीचिपाः — सूर्यकिरणांमध्यें बसणारे,
५ अश्मकुट्टाः -- फुटलेलें अन्न खाणारे,
६ पत्राहाराः -- पानें खाऊन राहणारे,
७ दन्तोलूखलिनः -- दातांनीच चाऊन खाणारे, कुटण्याचें सामान मुळींच न ठेवणारे तपस्वी,
८ उन्मज्जकाः -- पाण्यांत बसून तप करणारे,
९ गात्रशय्याः -- भूमीवर चादरी न अन्थरतां निजणारे,

१० अशय्या — बिछान्यावर न निजणारे,
११ अवकाशिका — एका पायावर उभे राहून तप करणारे,
१२ सलिलाहाराः — केवळ पाणी पिऊन राहणारे,
१३ वायुभक्षाः — वायु भक्षण करणारे,
१४ आकाशनिलयाः — आकाश खालीं राहणारे, घरात न राहणारे.
१५ स्थण्डिलशायिनः — ओट्यावर निजणारे,
१६ ऊर्ध्ववासिनः — उच्च स्थानावर राहणारे,
१७ दान्ताः — इंद्रियाना जिंकणारे,
१८ आर्द्रपटवाससः — ओलें वस्त्र नेसणारे,
१९ सजपाः — सदा जप करीत राहणारे,
२० तपोनिष्ठाः — तप करण्यात निमग्न असणारे,
२१ पञ्चतपोऽन्विताः — पञ्चाग्निसाधन करणारे, उन्हाळ्यांत वर सूर्य व चार बाजूला अग्नि पेटवून मध्यें बसणारे.

अशा अनेक तपस्यांचें वर्णन येथ केलेलें आहे. अशा प्रकारें वागण्यानें काहीं विशेष आध्यात्मिक उन्नति होत असेल असें मानण्याचें कारण नाहीं. यातील काहीं चाली निसर्गचिकित्सेला साधक आहेत. 'आर्द्रपटवाससः' ओलें वस्त्र नेसल्यानें शौचाला साफ होतें व बद्धकोष्ठ दूर होतो. 'संप्रक्षालाः' उत्तम स्नान करण्यानें चर्मरोग दूर होणे शक्य आहे. 'दन्तोलूखलिनः' दातानीं चावून खाणारे, कच्चे अन्न चाऊन खाणारे पचनक्रियेचा सुधार होण्यासाठीं याचा उपयोग आहे 'मरीचिपाः' सूर्यकिरण स्नान करणें हें आरोग्यसाधक आहे. युरोपमध्यें असें सूर्य स्नान करणारे हल्ली पुष्कळच आहेत व निरनिराळ्या रंगांच्या किरणांनीं अनेक रोग दूर करणारेही आहेत. 'सलिलाहाराः' पोट बिघडलें असेल तर नुसतें पाणी पिऊन उपवास करणें हितकारक असतें 'वायुभक्षाः'—केवल हवा खाऊन राहणें म्हणजे पाणीसुद्धा न पिणें हेंसुद्धा केव्हा केव्हा हितकारक होत असतें. प्राणायाम करणारेही यात येऊ शकतात.

'आकाशनिलयाः' — घरांत न राहतां घराबाहेर उघड्या जागेंत

राहणें हें आरोग्याला साधक असतें क्षयरोगी असे राहून बरे होतात **'पञ्चाग्निसाधना.'** पञ्चाग्निसाधन करून शरीरांतून घाम काढून शरीर शुद्ध करणारे.

हे सर्व प्रकार शरीरशुद्धतेसाठीं सध्यां निसर्गचिकित्सेच्या उपचारगृहामध्यें वापरतात याचा बराच उपयोग होतो.

या दृष्टीनें याकडे पाहणें योग्य आहे याशिवाय आणखीही पुष्कळ प्रकार आहेत उलटें टांगून घेणें, धुरामध्यें बसून धूर खाणें, खिळ्यांवर बसणें वगैरे आणखीही प्रकार आहेत सध्यां हे कमी होत चालले आहेत तथापि कोठेंकोठें हे सध्याही दिसतात. असें वागल्यानें पुण्यसंचय होतो असें मानण्याचें कारण नाहीं आरोग्यरक्षणासाठीं पूर्वीच्या योगी लोकांनी निसर्गोपचारासाठीं यांचा उपयोग केला होता व याच दृष्टीनें यांचा उपयोग आहे

ऋषींचे आश्रम हे निसर्गोपचाराचे आश्रमच होते व तेथें याप्रकारचे प्रयोग चालत या दृष्टीनें वाचकांनीं याकडे पाहावें

## तपाला विघ्न

माण्डकर्णी मुनि तप करीत होते वायुभक्षण करून यानीं अनेक वर्षे तप केलें त्यामुळें देव भ्याले व आपणापैकीं कोणाचें तरी स्थान हा घेईल यासाठीं याच्या तपात विघ्न करण्यासाठीं देवानीं ५ अप्सरा त्या मुनींजवळ पाठविल्या. त्या अप्सरानीं त्या मुनींना वश केलें व त्या त्याच्या बायका होऊन राहिल्या या तलावामध्यें आत घर करून तो मुनि त्या अप्सरासह येथें राहत आहे, त्यांच्या गायनवादनाचा ध्वनि हा या सरोवराजवळ वारवार येत असतो ( अरण्य० ११।१०-२३ )

देवानीं अप्सरा पाठवून तपस्व्याना तपापासून भ्रष्ट करावें हें देवाना योग्य नव्हे कदाचित् हें तप करणाराची परीक्षा पाहण्यासाठींही असेल पण वारवार असे उल्लेख येतात, ते सर्व असें दाखवितात कीं या देवपक्षाच्या लोकाना आपल्या हातांत आलेली त्रिभुवनाची शासक शक्ति आपल्या हातांतून जावी अशी इच्छा नव्हती यासाठीं ते या तपस्वी लोकांना भुलवून तपोमार्गापासून भ्रष्ट करवीत व लोकाना वाढू देत नसत इतकेंही करून जे तप करीत त्याचा मोठेपणा मान मानावयास हेच देव तयार असत

## कश्यप प्रजापति

जटायु नांवाचा एक गृध्र पक्षी रामाला वाटेंत भेटला. प्रथम रामानें तो राक्षस आहे असें कल्पिलें. पण पुढें विचारपूस केल्यानंतर तो जटायु नावाचा गृध्र पक्षी आहे असें समजलें व तो आपल्या वडिलाचा—दशरथ राजाचा--मित्र आहे असेंही समजलें तो जटायु पक्षी आपली वंशावळ रामाला सागत आहे ती अशी--

१ कर्दम, २ विकृत, ३ शेष, ४ संश्रय, ५ वीर्यवान्, बहुपत्र, ६ स्थाणु, ६ मरीचि, ८ अत्रि, ९ महाबलाश्च क्रतु, १० पुलस्त्य, ११ अंगिरा, १२ प्रचेताः, १३ पुलह, १४ दक्ष, १५ विवस्वान्, १६ अरिष्टनेमि, १७ कश्यप हा शेवटचा प्रजापति होय ( अरण्य. १४।७–८ )

दक्ष प्रजापतीला ६० कन्या झाल्या. यापैकीं १ अदिति, २ दिति, ३ दनु, ४ कालका, ५ ताम्रा, ६ क्रोधवशा, ७ मनु व ८ अनला या आठ कन्याचा स्वीकार कश्यपानीं केला कश्यपानीं या आपल्या आठ स्त्रियाना म्हटलें की " तुम्हाला माझ्यापासून त्रैलोक्याधिपति पुत्र होतील " हें ऐकून अदिति, दिति, दनु व कालका या चार स्त्रीयाना असे पुत्र व्हावे अशी इच्छा झाली, पण इतर स्त्रीया उदासीन राहिल्या. ( अरण्य० १४।११–१४ )

अदितीच्या ठिकाणीं १२ आदित्य, ८ वसु व ११ रुद्र व २ अश्विनीकुमार असे ३१ देव उत्पन्न झाले ( अरण्य १४।१५ )

दितीनें दैत्याना जन्म दिला. या दैत्यांजवळ ही पृथ्वी पूर्वी होती ( अरण्य १४।१६ )

दनुला अश्वग्रीव हा पुत्र झाला कालकेला नरक व कालक असे पुत्र झाले ताम्रेला क्रौंची, भासी, श्येनी, धृतराष्ट्री व शुकी अशा पाच कन्या झाल्या याच्या पासून हे पक्षी उत्पन्न झाले.

कश्यपापासून मनु नामक स्त्रीला ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्य–शूद्र हे उत्पन्न झाले

विनता ही शुकीची नात होय आणि कद्रु व सुरसा या परस्पर भागिनी होत. पृथ्वीला धारण करणारे सहस्र पुत्र सर्प कद्रूला झाले व विनतेला गरुड व अरुण

असे दोन पुत्र झाले. या अरुणापासून मी उत्पन्न झालों आहे. आणि संपाति हा माझा ज्येष्ठ भाऊ आहे. माझें नाव जटायु असून मी श्येनीचा पुत्र आहे. ( अरण्य० १४।२८–३४ )

हे रामा, तुझी इच्छा असेल तर मी तुझें संरक्षण करीन असें नातें जटायुनें सांगितल्यानंतर रामाला फार आनंद झाला व त्यानें पंचवटीमध्यें राहत असतांना जटायुला सीतेचें संरक्षण करण्यासाठीं म्हणून आपल्या आश्रमाजवळ ठेवलें. ( अरण्य० १४।३५–३६ )

या ठिकाणीं कश्यपाला मनुष्य, देव, पशु, पक्षी व सर्प हे झाले असें वर्णन आहे. जटायु हा पक्षी आहे. त्याला पंख आहेत सर्प ही कश्यपाचीच संतति हें मानावयाचें कसें हा मोठा प्रश्न आहे.

आज आपणास या पृथ्वीवर ' **कास्पीयन समुद्र** ' एक समुद्र आहे हें माहीत आहे. ' कास्पीयन ' म्हणजे ' कश्यपीय ' किंवा कश्यपाचा होय. कश्यप ऋषीचा आश्रम या समुद्राजवळ होता असेल. असीरियन प्रदेश या भागाजवळ आहे, तेथील लोक ' असुर ' होत. दान्यूब नदीही येथें जवळच आहे, तेथील ' दानव ' असावेत. बॉल्टयिन प्रदेशही याच दिशेला आहे, तेथील बक राक्षस असावेत कदाचित् रक्षस् ( राक्षस ) ज्याना म्हणतात ते ' रसस् ' रशियन असतील. येथेंच ' उरर्तु ' प्रांत आहे; तेथील ' वृत्र ' असतील

' भूत ' लोकाचा प्रदेश आजचा भूतान ( भूत–स्थान ) दिसत आहे.

वर लिहिलेल्या कश्यप समुद्राकडून सर्व भूभागामध्यें हे सर्व गेले व वसले म्हणून ' काश्यपी पृथिवी ' असें म्हणत असावे व कश्यपाची ही संतति आहे अशा कथा पुढें उत्पन्न झाल्या असतील. नाहीं तर कश्यप ऋषाला पशु, पक्षी व साप हे निर्माण झाले हें कसें मानावें ?

' देव, आर्य, सर्प, पिशाच, भूत या मानव जाती आहेत असें मानता येतें. देव जाती त्रिविष्टप ( तिबेट ) या प्रदेशात, आर्य आर्यावर्तात, सर्प समुद्रसपाटीच्या प्रदेशात, पिशाच पश्चिम पंजाब, पठाणिस्थानच्या प्रदेशात, भूत जाती भूतानामध्यें असल्याचें दिसतें त्याचप्रमाणें दैत्य, दानव, असुर, राक्षस या मानव जाती वर दिलेल्या प्रदेशात होत्या असें म्हणता येतें.

आपला रामायण कथेचा संबध आर्य ( राम आदि ), वानर (सुग्रीव, हनुमान आदि ), राक्षस ( रावण, बिभीषण आदि ), आस्वल ( जांबवान् आदि ) याशीं विशेषत आहे जटायु हाही एक पक्षी आहे असें वर्णन आहे. यांमध्यें राम व रावण हे तर मनुष्यवंशीयच होते यांत शंका नाहीं हनुमान वेद, शास्त्र शिकलेला होता म्हणून हा वानर वंशीय वानर नसून मनुष्यवंशीयच होता यांत शका नाहीं. कारण माकडें संस्कृत भाषा शिकतील व वेदपाठ करतील हें शक्य नाहीं हे सर्व या नावाचे मानव वंश होते यांत शका दिसत नाहीं

या दृष्टीनें येथील प्रजापति व त्याची संतति याची संगति लावली पाहिजे ज्या रीतीनें येथें वर्णन केलें आहे तें सर्व तसेंच असण्याचा संभव मुळींच नाहीं

याचा शोध करण्यासाठीं सर्व पृथ्वीवरील भूगोलाचीं प्राचीन नावें अभ्यासलीं पाहिजेत व त्यांवरून कोठचे कोणते वंश हें शोधावयास हवे

## जटायूचा रावणाला उपदेश

लोकानां च हिते युक्तो रामो दशरथात्मजः ।
तस्यैषा लोकनाथस्य धर्मपत्नी यशस्विनी ॥ ५ ॥
सीता नाम वरारोहा या त्वं हर्तुमिहेच्छसि ।
कथं राजा स्थितो धर्मे परदारान् परामृशेत् ॥ ६ ॥
रक्षणीया विशेषेण राजदारा महाबल ।
निवर्तय गतिं नीचां परदाराभिमर्शनात् ॥ ७ ॥
यथात्मनस्तथाऽन्येषां दारा रक्ष्या विमर्शनात् ॥ ८ ॥
( अरण्य० ५० )

' राम हा राजा असून तो सर्वलोकांचें हित करीत असतो त्याची ही धर्मपत्नी आहे जिला तू नेत आहेस धर्माप्रमाणें चालणारा राजा परस्त्रीला कसा बरें स्पर्श करील ? राजस्त्रियांचें सर्वांनीं रक्षण करणेंच योग्य आहे ज्याप्रमाणें आपल्या स्त्रीयांचें संरक्षण केलें पाहिजे त्याचप्रमाणें दुसऱ्याच्या स्त्रियांचेंही संरक्षण केलेंच पाहिजे, यासाठीं परस्त्रीला चोरून नेण्याच्या या दुष्ट कर्मापासून तू मागें फिर '

असें जटायूनें रावणास सांगितलें पण तो कोठें ऐकावयास तयार होता ? शेवटीं जटायु व रावण यांचें युद्ध झालें व जटायु बिचारा मारला गेला व रावणानें सीतेला लंकेंत नेली व तेथें ठेवून दिली.

## रावण काळा होता

रराज राजपुत्री तु विद्युत्सौदामिनी यथा ।
उद्धूतेन च वस्त्रेण तस्याः पीतेन रावणः ॥ १५ ॥
तप्तप्रवालरक्ता सा नीलांगं राक्षसेश्वरम् ।
प्रशोभयत वैदेही गजं कक्ष्येव काञ्चनी ॥ २० ॥
(अरण्य० ५२)

सीताहरणाच्या वेळीं सीता पिवळी पैठणी नेसलेली होती. व रावणाचा रंग काळा निळा होता यामुळें सुवर्णाची झूल हत्तीवर घालावी त्याप्रमाणें तें दृश्य दिसूं लागलें.

## सीतेचें उत्तरीय

रावण सीतेला घेऊन चालला होता. सीतेनें कांहीं वानर पर्वतावर बसले आहेत असें पाहिलें व हे रामाला सांगतील असें समजून आपले दागिने आनन्द उत्तरीयांत बांधून ते त्याच्याकडे टाकले—

उत्तरीयं वरारोहा शुभान्याभरणानि च ॥ १ ॥
मुमोच यदि रामाय शंसेयुरिति भामिनी ॥
वस्त्रमुत्सृज्य तन्मध्ये निक्षिप्तं सहभूषणम् ॥
संभ्रमात्तु दशग्रीवस्तत्कर्म च न बुद्धवान् ॥ ३ ॥
(अरण्य० ५४)

सीता व त्यावेळच्या स्त्रिया या पंजाबी स्त्रीयांप्रमाणें उत्तरीय धारण करीत असत. महाराष्ट्रीय स्त्रीयांप्रमाणें सीतेचा पोषाख नव्हता हें यावरून ठरत आहे

याप्रमाणें सीतेला रावणानें आणून लंकेंत ठेवली

## परस्त्रीहरण आर्ष पद्धति आहे !

सीतेची समजूत घालण्यासाठीं रावण सीतेला म्हणत आहे—

उवाच वचनं वीरो रावणो रजनीचरः ॥ ३३ ॥
अलं व्रीडेन वैदेहि धर्मलोपकृतेन ते
आर्षोऽयं दैवि निष्पन्दो यस्त्वामभिभविष्यति ॥ ३४ ॥

( अरण्य० ५५ )

' रावण सीतेला म्हणाला हे सीते ! आतां लज्जा करण्याचें कांहींच कारण नाहीं तुझा व माझा हा जो संबंध होणार आहे तो ऋषिप्रोक्त विधिच आहे. कारण बलात्कारानें स्त्रीला आणणें हा राक्षसविवाह प्रसिद्धच आहे तेव्हां यात धर्मलोप घडत नाहीं '

रावण परस्त्रीला चोरून आणूनहि तिला धर्माच्या बाता मारीत आहे. राक्षस जातालि लोक स्त्रियांना पळवून आणीत व त्याच्याशीं विवाह करीत हें खरें आहे. पण ही पद्धति आर्ष, ऋषिप्रणीत अथवा वैदिक आहे हें रावणाचें म्हणणें खरें नव्हे, कारण तशी आज्ञा कोणत्याही वेदमंत्रात नाहीं.

## चांडालस्पर्श

न शक्या यज्ञमध्यस्था वेदिः स्रुग्भाण्डमण्डिता ।
द्विजातिमंत्रसंपूता चण्डालेनावमर्दितुम् ॥ १८ ॥

( अरण्य० ५६ )

' यज्ञाच्या मण्डपामध्यें असलेली, स्रुचा व यज्ञपात्रें यानीं सुशोभित झालेली व द्विजांनीं म्हटलेल्या मत्रानीं पवित्र झालेली वेदी जशी चाण्डालाचा स्पर्श होण्यास अयोग्य असते. ' त्याप्रमाणें सीतेला रावणाचा स्पर्श होणें

शक्य नाहीं सीतेच्या अनुमतीनें तिच्या शरीराला स्पर्श होणार नाहीं हा येथें भाव आहे.

चांडाल स्पर्श अपवित्र मानला जात असे असें यावरून दिसतें

## स्त्रीचें कुंकू

रामायणकाळीं स्त्रीया कुंकू लावीत असत असें पुढील वचनावरून दिसतें—

विहीनातिलकेव स्त्री नोत्तरा दिक् प्रकाशते ॥ ८ ॥
( अरण्य० १६ )

" उत्तर दिशा सध्या थंडीच्या कडाक्यामुळें नीट प्रकाशमान दिसत नाहीं; ज्याप्रमाणें तिलक नसलेली स्त्री शोभत नाहीं "

' विहीन-तिलका स्त्री ' हे शब्द दाखवीत आहेत कीं, या रामायणाच्या वेळीं स्त्रीया तिलक लावीत व तो प्रायः=लाल=रंगाच्या कुंकवाचाच असावा

## विजयेच्छु राजे

शरद ऋतु संपला व हेमन्त ऋतु लागला म्हणजे विजयेच्छु राजे शत्रूवर आक्रमण करण्यासाठीं निघत असत याविषयीं हेमन्त ऋतूचें वर्णन लक्ष्मण करीत आहे--

नीहारपरुषो लोकः पृथिवी सस्यशालिनी ।
जलान्यनुपभोग्यानि सुभगो हव्यवाहनः ॥ ५ ॥
नवाग्रयणपूजाभिः अभ्यर्च्य पितृदेवताः ।
कृताग्रयणकाः काले सन्तो विगतकल्मषाः ॥ ६ ॥
विचरन्ति महीपाला यात्रार्थं विजिगीषवः ।
( अरण्य० ३६ )

' दंव पडल्यामुळें खडखडीतपणा आला आहे. भूमीवर धान्याची समृद्धि झाली आहे व पाणी पिऊं नये असें वाटूं लागलें आहे विस्तवाजवळ

बसावें असें वाटूं लागलें आहे. नवान्न भक्षण करण्यासाठीं आग्रयण करून पितरांचें व देवांचें पूजन लोकांनी केलें आहे. विजयेच्छु राजे शत्रूवर आक्रमण करण्यासाठीं संचार करीत आहेत, ' असा हा काल सुंदर आला आहे.

नवान्नेष्टि, आग्रयणेष्टि, पितृपूजा, देवपूजा यांचा येथें उल्लेख आहे. विजयेच्छु राजे शत्रूवर आक्रमण करण्यासाठीं याच वेळीं निघत असत.

## खोटी साक्ष

दुःसाक्षीव परे लोके स्वानि मांसानि भक्षयेत् ॥ १९ ॥
( अरण्य० १२ )

' खोटी साक्ष देणारा परलोकीं आपलेंच मांस खातो. ' अतिथीचा सत्कार न करणाऱ्याचीहि अशीच गति होते.

## अक्षय्य लोकांचें दान

शरभंग ऋषि रामाला म्हणतात—

अक्षया नरशार्दूल जिता लोका मया शुभाः ।
ब्राह्माश्च नाकपृष्ठ्याश्च प्रतिगृह्णीष्व मामकान् ॥ ३१ ॥
( अरण्य० ५ )

'हे रामा ! मी ब्रह्मलोक व स्वर्गलोक तपस्येनें संपादन केले आहेत, ते हे तू घे ' यावर राम म्हणाला,

अहमेवाहरिष्यामि सर्वाँल्लोकान् महामुने ॥ ३२ ॥
( अरण्य० ५ )

'हे मुने ! मी स्वतः तप करून हे लोक मिळवीन ' दुसऱ्यानें मिळविलेले लोक आयते घेणें हें मला योग्य वाटत नाहीं. थोर पुरुष आयत्या पिठावर रेघा ओढीत बसत नाहींत. असेंच उत्तर सुतीक्ष्ण मुनींनां रामानें दिलेलें आहे ( पहा अरण्य० ७।१४ ). दुसऱ्यानें कष्ट करून मिळविलेले भोग तेजस्वी माणसें उप-भोगीत नसतात.

## सर्पाचा मंत्र

सर्पाचा मंत्र घालीत असा उल्लेख येथें आला आहे. खर राक्षसानें रामावर टाकलेली गदा रामाच्या बाणांनीं तुटून खालीं पडली तिचें वर्णन यहां—

सा विशीर्णा शरैर्भिन्ना पपात धरणीतले ।
गदा मन्त्रौषधिबलैर्व्यालीव विनिपातिता ॥ २८ ॥
( अरण्य० २९ )

' मंत्र औषधीच्या बलानें सर्पिण पडावी त्याप्रमाणें रामाच्या बाणांनीं ती गदा खालीं पडली. ' येथें मंत्राच्या सामर्थ्याचा परिणाम सर्पावर होतो असें स्पष्ट म्हटलेलें आहे.

## प्रातःसंध्या

अथ तेऽग्निं सुरांश्चैव वैदेही रामलक्ष्मणौ ।
काल्यं विधिवदभ्यर्च्य तपस्विशरणे वने ॥ ३ ॥
उदयन्तं दिनकरं दृष्ट्वा विगतकल्मषाः । ( अरण्य० ८ )

' रामानें सीतेनें व लक्ष्मणानें अग्नीची, देवतांची पूजा या आश्रमामध्यें विधिप्रमाणें करून सूर्य उदय पावला असें पाहून निष्पाप झालेले ते त्या मुनीं-जवळ जाऊन त्यांस म्हणाले. '

येथें प्रातःसंध्येचा व देवपूजेचा उल्लेख आहे. ' अग्निं अभ्यर्च्य, सुरान् विधिवत् अभ्यर्च्य ' हे शब्द महत्त्वाचे आहेत. प्रति दिवशीं हवन केलें जात असे, असें यावरून दिसतें. आतां ' सुरान् अभ्यर्च्य ' म्हणजे हवनच कीं, कांहीं निराळा पूजाविधि होता तें येथील शब्दांतून समजत नाहीं पण हीं स्नान, संध्या व पूजा आदि सर्व कृत्यें सूर्याचा उदय होण्यापूर्वी केलीं जात असत असें यावरून दिसते. येथें संध्येचा उल्लेख स्पष्टपणें नाहीं. पण तो अन्यत्र आहे.

इत्येवं विलपंस्तत्र प्राप्य गोदावरीं नदीम् ।
चक्रेऽभिषेकं काकुत्स्थः सानुजः सह सीतया ॥ ४१ ॥

तर्पयित्वाथ सलिलैस्ते पितॄन् देवतास्तथा ।
स्तुवन्ति स्मोदितं सूर्यं देवताश्च तथानघाः ॥ ४२ ॥
( अरण्य० १६ )

आश्रमं तदुपागम्य राघवः सहलक्ष्मणः ।
कृत्वा पौर्वाह्णिकं कर्म पर्णशालामुपागमत् ॥ २ ॥
( अरण्य० १७ )

' राम लक्ष्मणासह असें बोलत गोदावरी नदीजवळ पोंचले. तेथें त्यांनीं स्नान केलें. जलानें पितरांचें व देवतांचें तर्पण केलें व उदय पावलेल्या सूर्याचें व अन्य देवतांचेंही स्तवन केलें. आपल्या आश्रमामध्यें ते तिघेही आले व सकाळीं कारवयाची संध्या त्यांनीं केली व आपल्या त्या पर्णशाळेमध्यें राहूं लागले. '

येथें स्नान, संध्या, पितृतर्पण, देवतर्पण सूर्यस्तवन व देवतास्तवन हा सकाळचा कार्यक्रम दिसत आहे.

राम दोनही वेळा संध्या करीत असे हें पुढील वचनांवरून दिसतें—

## सायं संध्या

तमेवमुक्त्वोपरमं रामः संध्यामुपागमत् ॥ २२ ॥
अन्वास्य पश्चिमां संध्यां तत्र वासमकल्पयत् ॥
सुतीक्ष्णस्याश्रमे रम्ये सीतया लक्ष्मणेन च ॥ २३ ॥
( अरण्य० ७ )

*' त्या मुनींना असें सांगून राम सायं संध्या करण्यासाठीं गेला. तेथें पश्चिमेकडे तोंड करून संध्या केल्यानंतर सीता व लक्ष्मण यांसह तो राम त्या सुतीक्ष्ण मुनींच्या रम्य आश्रमामध्यें राहिला.*

## संध्याकाळचें जेवण

सुतीक्ष्ण मुनीच्या आश्रमामध्यें रात्रीचें भोजन त्या मुनींनीं रामाला दिलें. तें रात्र पडल्यानंतर दिल्याचा उल्लेख आहे—

ततः शुभं तापसयोग्यमन्नं स्वयं सुतीक्ष्णः पुरुषर्षभाभ्याम् ॥
ताभ्यां सुसत्कृत्य ददौ महात्मा संध्यानिवृत्तौ रजनीं समीक्ष्य ॥ २४॥
( अरण्य० ७ )

' नंतर सुतीक्ष्ण मुनींनीं स्वतः तापसी लोकांना योग्य असलेलें अन्न त्याची संध्या झाली, संध्याकाळ संपून रात्री पडली असें पाहून, सत्कारपूर्वक रामादिकांस दिलें '

येथें ( रजनीं समीक्ष्य ) ' रात्र पडलेली पाहून ' हे शब्द सूर्यास्तानंतर एक दान तासांनीं ' रात्रीचें जेवण ऋषिमुनि करीत होते असें सुचवितात संध्याही आपला हाच वेळ सर्वसाधारणपणें आहे

## रामाचें वय

सीता रावणास सांगते कीं—

उषित्वा द्वादश समा इक्ष्वाकूणां निवेशने ।
भुञ्जाना मानुषान् भोगान् सर्वकामसमृद्धिनी ॥ ४ ॥
अथ त्रयोदशे वर्षे राजा मन्त्रयत प्रभुः ।
अभिषेचयितुं रामं समेतो राजमन्त्रिभिः ॥ ५ ॥
( अरण्य० ४७ )

' विवाह झाल्यानंतर मी १२ वर्षें इक्ष्वाकु राजाच्या घरी-दशरथाच्या राजवाड्यांत—' दिलें तेथें सर्व राजभोग उपभोगीत होतें तेरावें वर्ष प्राप्त झाल्यावर दशरथानें आपल्या मंत्र्यांसह विचार करून रामाला यौवराज्याभिषेक करावयाचें ठरवलें ' यावेळीं रामाचें वय—

मम भर्ता महातेजा वयसा पञ्चविंशकः ।
अष्टादश हि वर्षाणि मम जन्मनि गण्यते ॥ १० ॥
( अरण्य० ४७ )

' यावेळीं रामाचें वय २५ वर्षांचें व माझें १८ वर्षांचें होतें म्हणजे विवाहाच्या वेळीं राम १३ व सीता ६ वर्षांची होती कीं काय ? वनवासांत येऊन आतां रामाला १३ वें वर्ष लागण्याचा सुमार होता म्हणजे यावेळीं राम ३९ वर्षांचा व सीता ३१ वर्षांच्या आंत बाहेर असावी असें दिसतें

## सीतेचा निश्चय

रावण सीतेची मनधरणी करूं लागला असतां सीतेनें शेवटचा निश्चय रावणाला सांगितला तो असा--

इदं शरीरं निःसंज्ञं बन्ध वा घातयस्व वा ।
नेदं शरीरं रक्ष्यं मे जीवितं वापि राक्षस ॥ २१ ॥
न तु शक्यमपक्रोशं पृथिव्यां दातुमात्मनः ॥ (अरण्य० ५६)

' हे राक्षसा ! हें शरीर जड आहे याला बांधून ठेव अथवा ठार कर. या शरीराचें रक्षण मला करावयाचें नाहींच पण या पृथ्वीवर आपली निंदा मी होऊं देणार नाहीं. '

हा सीतेचा निर्धार सर्वांनीं लक्ष्यात ठेवण्याजोगा आहे.

## जनस्थानचें संरक्षण

रामानें जनस्थानांतील खरदूषणाच्या आधिपत्याखालीं असलेलें १४००० राक्षसाचें सैन्य ठार केलें व जनस्थानचें ठाणें उध्वस्त करून टाकलें; तें पुनः सुरक्षित करण्यास रावण विसरला नाहीं. आठ महाबलाढ्य राक्षसाना त्यानें बरोबर पुष्कळसें सैन्य देऊन जनस्थानाकडे पाठवलें ( अरण्य ५५।१ ). जन-स्थान आपल्या आधीन राहणें हें फार अगत्याचें आहे असें रावण मानीत होता हें यावरून दिसतें. आर्यांचा व वानराचा संबंध अथवा एकोपा होऊं नये हें रावणाला अभीष्ट होतें. जर हे आर्य व वानर एक झाले तर त्यात आपला नाश होणार हें रावण पूर्णपणें जाणत होता.

## कुलहीनाची तापदायक संपत्ति

आविष्ह्यातपो यावत्सूर्यो नातिविराजते ।
अमार्गेणागतां लक्ष्मीं प्राप्येवान्वयवर्जितः ॥ ८ ॥(अरण्य० ८)

' जसा कुलहीन मनुष्य वाईट मार्गानें ऐश्वर्य प्राप्त करून लोकांना त्रास देतो, त्याप्रमाणें हा सूर्य जोंपर्यंत असह्य ताप देऊं लागला नाहीं तोंपर्यंतच मी पुढें जातों ' असें राम सुतीक्ष्णमुनींचा निरोप घेतांना म्हणत आहे.

कुलीन मनुष्य श्रीमंत झाला तरी तो दुसऱ्याना ताप देत नाहीं. पण कुलहीन मनुष्य मात्र दुर्मार्गानें ऐश्वर्य मिळविल्यावर फारच तापदायक होतो. असा येथें भाव आहे.

# पद्मपुराणांत संक्षिप्त रामायण

## सीताहरणापासून पुढील गोष्टींचे दिवस दिले आहेत ते असे—

श्रीरामचारित्रामध्यें श्रीरामरावण युद्धप्रसंग एकंदर किती दिवस घडला, कोणत्या मितीस काय घडलें, यासंबधीं तिथींवार टिपण *आरण्यकऋषि, लोमशऋषि* व शेष यांचें समाधणांत श्रीवेदव्यासप्रणीत पद्मपुराण यात लिहिलें आहे

विश्वामित्र ऋषींनीं आपल्या यज्ञाचें संरक्षण करण्याकरितां श्रीरामलक्ष्मणास घेऊन विश्वामित्र ऋषींच्या सिद्धाश्रम स जाण्यास निघाले असता वाटेत शरयू नदीचे कांठीं ऋग्वेदांतर्गत शाकलसंहितेतील बला अतिबला या विद्याचे मंत्र प्रथम विश्वामित्र ऋषींनीं श्रीरामलक्ष्मणास शिकवले त्यानंतर ताटका राक्षसीचा वध, *नंतर सांगोपांग, सबीज, सरहस्य मंत्र व सांगोपांग धनुर्वेदाचें शिक्षण* त्यानंतर सिद्धाश्रमांत यज्ञाचें संरक्षण, सातवे दिवशीं सुबाहु मारीच वध, इतकें झाल्यावर *यज्ञसमाप्तिनंतर विश्वामित्र ऋषि श्रीरामलक्ष्मणासह जनकाचा यज्ञ पाहण्यास* निघाले वाटेंत अहिल्योद्धार करून नंतर जनक राजाचे नगरींत श्रीशिवधनुष्य भंग करून पण जिंकला व **जामदग्न्य राम—गर्व हरण केल्यानंतर-सीतास्वयंवर झालें** यावेळीं श्रीरामाचें वय १५ वर्षांचें असून सीतेचें वय ६ वर्षांचें होतें राम सीता विवाहानंतर पितृगृहीं मातृपितृसेवा करून १२ वर्षे आनंदांत राहिल्यानंतर श्रीरामचंद्राचे वयाच्या २७ व वर्षी श्रीरामास यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें असतां कैकेयीनें एका वरानें भरतास राज्याभिषेक व दुसऱ्या वरानें श्रीरामचंद्रास १४ वर्षे वनवासास जाण्याची आज्ञा करणें असें दशरथ राजाकडून मागून घेऊन त्याबद्दल हट्ट धरला त्यामुळें श्रीरामास यौवराज्याभिषेक झाला नाहीं व त्यास वनवासास १४ वर्षे जावें लागलें त्यानंतर श्रीरामचंद्र सीता व लक्ष्मण यांसह वनांत जाऊन भरद्वाजऋषि, अत्रिऋषि अगस्त्यिऋषि इत्यादि महर्षींचे सहवासांत चित्रकूट पर्वतावर पर्णकुटिका करून त्यांत राहिले होते तीन दिवस उदकआहार व चवथे दिवशीं फलाहार करून वेदप्रणीत धर्माचरण करीत याप्रमाणें दिनचर्या होती पुढें शूर्पणखा राक्षसी

(रावणाची भगिनी) ही त्रास देऊं लागल्यानें तिला विरूप करून वनांतून घालवून दिली. तिनें रावणास सर्व हकीगत सांगून सीतेच्या रूपाचें वर्णन केलें व तिला बलात्कारानें हरण करण्यास रावणास प्रोत्साहन दिलें. रावणानें भिक्षूचें रूप घेऊन पापबुद्धीनें सीतेला लंकेंत नेण्याकरतां श्रीरामचंद्राचे आश्रमांत येऊन बलात्कारानें सीतेचें हरण केलें.

माघ व॥ ८. आठ घटिका दिवस आल्यावेळीं रावणानें सीतेस बलात्कारानें नेलें.

माघ व॥ ९. जटायूबरोबर युद्ध व पक्षच्छेदन. सीतेस लंकेंत नेऊन अशोक वनांत त्रिजटेच्या संरक्षणाखालीं ठेवलें.
पुढें रामानें सीतेबद्दल फार शोक केला व तिचे शोधाकरतां निघाला असतां वाटेंत जटायूनें सीताहरणाची हकीगत सांगितली व प्राण सोडला. त्यानंतर ऋष्यमूक पर्वतावर जाऊन किष्किंधापति वालीचा वध करून सुग्रीव, हनुमान् इत्यादिकांबरोबर अग्निसाक्षीनें शपथ करून सख्य केलें, पुढें तपास करतां सीताहरणानंतर सुमारें दहा महिन्यांनीं जटायूबंधु संपाति यानें सीता लंकेंत असल्याची बातमी दिली.

मार्ग. शु॥ ९. हनुमानास लंकेंत पाठविण्याचें ठरलें.

,, ११. समुद्रोल्लंघन व रात्रीं सीताभेट.

,, १२. शिंशपा वृक्षावर बसून राहून रात्रीं जानकीस सर्व हकीगत सांगितली व ऐकली.

,, १३. जंबुमाली व सात अमात्यपुत्र यांचा वध.

,, १४. इंद्रजितानें हनुमानास ब्रह्मास्त्रानें बद्ध केलें व शिक्षा म्हणून शेपटीस वस्त्रें बांधून पेटविलीं. त्यानेंच त्या दिवशीं लंकादहन.

,, १५. समुद्र उल्लंघन करून रामाकडे येण्यास हनुमान निघाला.

मार्ग. व॥ १. महेंद्र पर्वतावर आगमन, त्यानंतर मधुवन उध्वस्त करून सहा दिवसांनीं--

मार्ग॰ व॥ ७. हनुमान श्रीरामचंद्राजवळ येऊन सर्व साद्यंत हकीगत सांगितली. त्यानंतर सर्व वानरसेनेसह निघण्याचें ठरलें.

,, ८ उत्तरा फाल्गुनी नक्षत्रावर प्रयाणाचा मुहूर्त केला त्यानंतर,

,, ८ ते आठ दिवस प्रवास करून सुग्रीवासह श्रीरामचंद्र समुद्राचे कांठीं आले व समुद्राचें उपस्थान करीत राहिले

पौष शु॥ १ ते शु॥ ३ सर्व वानर सेना येऊन पोंचली

,, ४ विभीषण रामाकडे आला. रामानें त्याचेबरोबर सख्य करून त्यास अभिषेक केला

,, ५ समुद्रतरणार्थ समुद्राची मंत्रानें प्रार्थना करून नंतर चार दिवस प्रायोपवेशन केलें.

,, १० ते १३ चार दिवस सेतु बांधला.

,, १४ सुवेला पर्वतावर श्रीरामचंद्र ससैन्य पोंचले.

,, १५ ते या तीन दिवसांत राहिलेलें सर्व कपिसैन्याचें ( तारण )
पौष व॥ २ सेतूवरून आगमन.

,, ३ ते १० आठ दिवस लंकेभोंवतीं सैन्याचा तळ, मांडणी वगैरे केलें.

,, ११ शुक, सारण हे राक्षस हेरगिरीकरतां आले,

,, १२ सैन्याची मोजणी केली

" १३ ते ३० रावणानें आपल्या सैन्याची तयारी मांडणी व मोजणी केली

माघ शु॥ १. अंगद-शिष्टाई अंगद गेल्यानंतर रामाचें मायावी शिर व धनुष्य हें सीतेला दाखवून वश करण्याचा प्रयत्न

,, २ ते ८. अष्टमी अखेर राक्षस वानर युद्ध

,, ९. रात्रीं इंद्रजित व रामलक्ष्मण युद्ध. नागमय बाणानीं रामलक्ष्मणास इंद्रजितानें बद्ध केलें व मर्मी घाव लागल्यानें ते पडले पण इंद्रजितानें रामलक्ष्मण ठार झाले असें म्हणत तो

लंकेंत परतला. वानर सैन्यांतून दुःखाचा प्रचंड ध्वनि उठला व आकाश व पृथ्वी व्यापून टाकली.

माघ शु॥ १०. नागपाशविनाशार्थ पवनानें गरुडाचें आवाहन.

,, ११. गरुडागमन व नागपाशविमोचन.

,, १२. धूम्राक्षाचा मारुतीनें वध केला

,, १३. अकम्पन हनुमान युद्ध व अकम्पन वध.

,, १४ ते तीन दिवसपर्यंत नील प्रहस्त यांची घनघोर लढाई

व॥ २ झाली व शेवटीं नीलानें प्रहस्ताचा वध केला.

माघ व॥ २ ते ४. तीन दिवस रामरावण युद्ध व शेवटीं रामानें रावणास रणांगणांतून पिटाळून लावलें

,, ५ ते ८. कुंभकर्णास उठविलें.

,, ९ ते १४. राम व कुंभकर्ण युद्ध व चतुर्दशीस कुंभकर्ण वध.

,, ३० लंकेमध्यें शोकदिन.

फाल्गुन शु॥ १ ते ४. या चार दिवसांत बिसतन्तुप्रभुति पांच राक्षसांचा वध.

,, ५ ते ७ तीन दिवसांच्या लढाईनंतर अतिकाय राक्षसाचा वध

,, ८ ते १२. पांच दिवस कुंभनिकुंभाबरोबर युद्ध व शेवटीं त्यांचा वध.

,, १३ । १४. मकराक्षाबरोबर युद्ध व वध.

,, १५ ते या तीन दिवसांत इंद्रजिताबरोबर घनघोर संग्राम

व॥ २. करून त्यास रणांतून पळवून लावला. परंतु या संग्रामांत अनेक वानर सैन्य जखमी झाल्यानें

,, ३ ते ७. औषधी आणून दिली.

,, ८ ते १३ पांच दिवसांच्या महासंग्रामानंतर लक्ष्मणानें इंद्रजिताचा वध केला

| | | |
|---|---|---|
| फाल्गुन वा॥ १४ | रावणानें युद्धदीक्षा घेतली |
| ,, ३० | रावणानें स्वत युद्धास सुरवात केली |
| चैत्र शु॥ १ ते ५ | प्रधुरादि राक्षसांचा वध |
| ,, ६ ते ८ | महापार्श्व व विरूपाक्ष वध |
| ,, ९ | लक्ष्मणास रावणानें मारलेला शक्ति लागली परंतु कोपाविष्ट रामानें रावणावर बाणांचा वर्षाव करून पुन्हा त्यास लढाईतून पिटाळून लावलें |
| ,, १० | रामाचें इतर राक्षसांबरोबर युद्ध |
| ,, ११ | इंद्रानें आपला रथ व सारथि मातली यास रामाकडे पाठविलें ( या वेळपर्यंत रावण रथांतून व राम जमिनीवरून लढत होते !!! ) |
| ,, १२ ते वा॥ १४ | अठरा दिवस समानवाहन रामरावण युद्ध होऊन चैत्र वा॥ १४ दिवशी रावणाचा वध झाला |
| वा॥ ३० | रावणाचा अंत्य संस्कार |
| वैशाख शु॥ १ | रणांगणांत राहिल्या नंतर, |
| ,, २ | बिभीषण-राज्याभिषेक |
| ,, ३ | सीताशुद्धि व वानरसैन्यास जिवंत करण्याबद्दलचा वर देवाकडून रामानीं मिळविला |
| ,, ४ | पुष्पक विमानांत लक्ष्मण सीता वगैरेसह बसून अयोध्येस जाण्यास निघाले |
| ,, ५ | पूर्ण चौदा वर्षानीं पुन्हा भरद्वाज आश्रमांत आले, |
| ,, ६. | नंदिग्रामाहून भरतासह अयोध्येस आगमन |
| ,, ७ | श्रीरामराज्याभिषेक |

एकंदर युद्ध दिवस माघ शु॥ २ ते चैत्र कृष्ण १४ असेर ८७ दिवस त्यात रावण पाहिल्यांदा युद्धास आला त्यावेळेपासून म्हणजे माघ वा॥ २ पासून ७२ दिवसांनीं रावण वध झाला



